KÂVYASANGRAHA. 20.

# THE MAHÂBHÂRATA

OF

## MOROPANTA

(THE GREAT MARÂTHÎ POET OF THE MAHÂRÂSHTRA.)

" *Poetry gives treasures more golden than gold.*"

*PALGRAVE.*

## 5. UDYOGAPARVA.

*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

VÂMANA DÂJÎ OKA,

HEAD MASTER, HIGH SCHOOL, RAIPORE.

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂMA JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS.

Bombay.

1896.

*Price* 1¾ *Rupees*

काव्यसंग्रह. २०.

महाराष्ट्रकविवर्यमोरोपंतकृत

# महाभारत.

## ५. उद्योगपर्व.

आर्याग्रंथ रचुनि बहु विठ्ठलचित्तासि तोषवी फार ।
त्या मोरेश्वरपंता माझा साष्टांग हा नमस्कार. ॥

हें

वामन दाजी ओक,
हेडमास्तर, हायस्कूल, रायपुर;

यांनीं अर्थनिर्णायक, साहित्यशास्त्रविषयक, व अवांतर माहितीच्या टीपा देऊन तयार केलें,

आणि

मुंबईत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

१८९६.

किंमत १॥ रुपये.

हा ग्रंथ,

**नामदार न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे,**

एम्. ए., एल् एल् बी., आडव्होकेट, मुंबईच्या हायकोर्टाचे जज्ज,

ह्यांस,

त्यांच्या अगाध उद्योगशीलता, अप्रतिम विद्वत्ता, साधुमान्य
सुजनता आणि सर्ववंद्य स्वराष्ट्रहिततत्परता, इत्यादि
गुणांच्या अभिनंदनार्थ
अत्यंत प्रेमपूर्वक आणि पूज्यबुद्धिपूर्वक
त्यांची अनुज्ञा घेऊन,

**अर्पण केला आहे.**

'काव्यसंग्रह' कार.

# अनुक्रमणिका.

एकंदर ग्रंथसंख्या—१४०७

# सूचना.

हें पर्व तयार करण्याच्या कामीं अनेक 'काव्यसंग्रह'हितैषी सज्जनांनीं सोल्हास साहाय्य केलें. कै० दत्तात्रय घनश्याम सबनीस, रा०सा० नागनाथ केशव गोडबोले, बी. ए., रा० रा० सदाशिव मोरेश्वर भिडे, मोरो गणेश लोंढे, कृष्णाजी नरहर वाडीकर, केशव विश्वास फणसे, रामचंद्र विष्णु सोमण, प्रो० श्रीधर विष्णु परांजपे बी. ए., विनायकराव दाजी वेहरे, व नागपुरास असणारे आमचे जुने विद्यालयीन वयस्य यांनीं हस्तदोष, दुर्बोध पद्यांचा अर्थ, इत्यादि प्रकरणीं लेख पाठवून साहाय्य केलें, यास्तव या सकल सज्जनांचे आभार मानतों व 'पुढेंही असेंच साहाय्य करावें' अशी विनंति करून तूर्त रजा घेतों.

'काव्यसंग्रह'कार.

# मोरोपंतकृत महाभारत.

## ५. उद्योगपर्व.

### अध्याय पहिला.

(गीतिवृत्त.)

[1]सरसिजनाभ [2]सभेंत [3]द्रुपदविराटादिनिजजनांसहित ।
बैसुनि मनीं [4]विचारी ध्याया साधूनि [5]निजजनांस [6]हितें. ॥ १
प्रभु [7]सभ्यांस म्हणे, 'हो ! [8]जें झालें तें तुम्हां सकळ कळलें, ।
सर्वां [9]साधूंचें मन, परिसुनि धर्मश्रमासि, कळकळलें. ॥ २
वसतां द्वादश वर्षें क्षणहि गडबडों दिली न [10]धी रानीं, ।
केला स्वजनांत परम [11]दुष्कर अज्ञातवास [12]धीरांनीं. ॥ ३

---

१. सरसिज=(कमल) आहे नाभिस्थानीं ज्याच्या तो सरसिजनाभ=सरसिजं (कमलं) नाभौ यस्य सः=सरसिजनाभः=पद्मनाभः=विष्णुः (कृष्ण). या प्रथम पद्यांत जें प्रथमाक्षर 'स' आहे तें 'श्रीपांडवसहायो भगवानरविंदाक्षो जयति' या अष्टादशाक्षरी संस्कृत वाक्याचें पांचवें अक्षर आहे. पंतकृत महाभारताच्या प्रत्येक पर्वाच्या पहिल्या गीतीचें आद्याक्षर घेतलें असतां पूर्वोक्त वाक्य निष्पन्न होतें हें सुप्रसिद्ध आहे. सरसिजनाभ (कृष्ण) बलरामासह अभिमन्युविवाहोत्सवासाठीं विराटनगराला आला होता. तसेंच सौभद्रविवाहार्थ द्रुपदराजाही आला होता असें वर्णन मागें गेलें आहे. [विराटपर्व–अध्याय ७ गीति २८-२९.] अभिमन्यूचा विवाह झाल्यावर दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं विराटसभेंत कृष्ण, द्रुपद, विराट, पांडव इत्यादि पुढें काय करावें याचा विचार करण्यासाठीं जमले होते. २. विराटाच्या सभेंत. ३. द्रुपद आणि विराटनृपति आहेत आदि (प्रमुख) ज्यांत अशा आप्त–स्वकीय–जनांसहित. येथें 'आदि' शब्दानें पांच पांडव, द्रुपदाचे सर्व पुत्र, द्रौपदीचे पांच पुत्र, सांब, प्रद्युम्न, अभिमन्यु, विराटाचे पुत्र, सात्यकि, इत्यादिकांचें ग्रहण करणें इष्ट आहे. ४. चिंतन करी, कोणता उपाय योजून स्वजनकार्य साधावें असा विचार करी. ५. आप्तजनाला. (राज्यभ्रष्ट पांडवांला.) ६. कल्याण, स्वराज्यलाभरूप कल्याण, पांडवकौरवसख्यरूपहित. या प्रथम गीतींत सप्ताक्षरात्मक यमक आहे. ७. सभासदांला. [सभ्य=सभायां साधुः सभ्यः । 'सभासदः सभास्ताराः सभ्याः सामाजिकाश्च ते' इत्यमरः.] ८. राज्यहानि, वनवासांगीकार, अज्ञातवाससेवन, इत्यादि दुःखद वृत्त, त्रयोदशवर्षात्मक उग्रव्रत. [गीति ३ पहा.] ९. सज्जनांचें, सभ्यांचें, कुलीनांचें. १०. बुद्धि. ११. करावयास कठिण. १२. धीर=पंडित, सुधी, बुध, धैर्यान्वित प्राज्ञ. ['धीरो धैर्यान्विते स्वैरे बुधे क्लीबं तु कुंकुमे' इति यादवः.]

आतां सुयोधनानें [१]यांचा यांला [२]विभाग ओपावा, ।
लोपावा न [३]न्याय, स्वल्पहि [४]राजर्षि हा न कोपावा. ॥ ४
सुज्ञ [५]ब्राह्मण कोणी ति[६]कडे प्रेषावयासि योजावा, ।
जो [७]संमत सर्वांला सत्वर [८]कौरवपुरासि तो जावा.' ॥ ५
[९]राम म्हणे, 'दुर्योधन संमत आम्हांसि, पार्थसा मानें, ।
हे [१०]ते कुशल असावे, साधावा [११]बलिहृतार्थ [१२]सामानें. ॥ ६
[१३]अक्षज्ञ नसोनि [१४]भरीं [१५]भरला [१६]स्वगुणेंचि [१७]अर्थ हारविला, ।

---

१. या धीर पांडवांचा. २. पितृसंपादित राज्यार्ध. ३. नीति. [नीतीचा लोप होऊं नये. अधर्मानें देवांचें राज्य मिळत असलें तरी तें युधिष्ठिराला नको आहे असें येथें सूचविलें आहे.] ४. राजन्+ऋषि=धर्म. ऋषि=जे सदां सत्य वचन बोलतात त्यांस ऋषि असें म्हणतात. ऋषि हे सप्तविध आहेत:—देवर्षि, ब्रह्मर्षि, राजर्षि, महर्षि, परमर्षि, श्रुतर्षि आणि कांडर्षि अशीं नांवें रत्नकोशांत आहेत. ५. धर्मशील, शुचि, कुलीन, अप्रमत्त आणि समर्थ असा दूत प्रशम करण्यासाठीं पाठवा—असें मूळांत आहे. [अध्याय १ श्लोक २४-२५.] ६. दुर्योधनाकडे. ७. मान्य. ८. हस्तिनापुराला. ९. बलराम. (अध्याय २ श्लोक १-१४ पहा.) 'राम' शब्द बलराम बलदेव या अर्थीं योजिला आहे. कित्येक शब्दांचीं दोन दोन रूपें असतात, एक मोठें व एक लहान. गोदा=गोदावरी नदी. केव्हां केव्हां शब्दाचें समग्र रूप न योजितां त्याचा अवयव योजण्याचा संप्रदाय 'शब्दा अवयवेष्वपि वर्तते' या न्यायानें आहे:—भीम=भीमसेन, सत्या=सत्यभामा, राम=बलराम इत्यादि. तसेंच पुढील श्लोकांत अशा प्रकारच्या कांहीं शब्दांचा संग्रह केला आहे:—'गोदा गोदावरी नद्यां मथुरा मथुरापुरी । कविकं कविकायां च स्याद्गवेधौ गवेधुका ॥' [शब्दभेदप्रकाश]. १०. पांडव आणि कौरव. ११. बलवंतानें हरण केलेला अर्थ. १२. सख्यानें, सांत्वनानें. साम हा उपायचतुष्टयांतील एक आहे. साम, दान, दंड आणि भेद असे राजाला उपयोगीं पडणारे चार उपाय राजनीतिशास्त्रांत सांगितले आहेत. क्वचित् माया, उपेक्षा आणि इंद्रजाल असे तीन उपाय आणखी मानून एकंदर सात उपाय समजतात. 'भेदो दंडः साम दानमित्युपायचतुष्टयम्' इत्यमरः. 'साम दानं च भेदश्च दंडश्चेति चतुष्टयम् । मायोपेक्षेंद्रजालं च सप्तोपायाः प्रकीर्तिताः ॥' साम म्हणजे मधुर भाषण करून कोपाचें उपशमन करणें. सामाचे पांच प्रकार आहेत ते असे:—'परस्परोपकाराणां दर्शनं गुणकीर्तनम् । संबंधस्य समाख्यानमायत्याः संप्रकाशनम् ॥ वाचा पेशलया साधु तवाहमिति चार्पणम् । इति सामविधानज्ञैः साम पंचविधं स्मृतम् ॥' [अमरकोश—भानुजिदीक्षितकृत टीका—पृष्ठ ४५६]. १३. फांशांविषयीं ज्ञानी, द्यूतज्ञानी. १४. भरीं भरणें=छंदास—नादास लागणें, नादीं लागणें—पडणें, छंद लागणें. १५. धर्मराज भरीं भरला=द्यूतासक्त झाला. १६. आपल्या गुणानेंच (आपल्याच दुर्गुणानें—अक्षक्रीडानभिज्ञत्वामुळें.) १७. द्रव्य. ['अर्थः प्रकारे विषये वित्तकारणवस्तुषु । अभिधेये च शब्दानां वृत्तौ चापि प्रयोजने ॥' इति विश्वः. 'अर्थः प्रयोजने वित्ते हेत्वभिप्रायवस्तुषु । शब्दाभिधेयविषये स्यान्निवृत्तिप्रकारयोः ॥' इति विश्वलोचनः.] अर्थ=राज्यार्ध.

पडतां[1] गांठि गतश्री[2] होय शशी[3], दोष[4] काय हा रविला ?’ ॥ ७
‘शिव! शिव! हर! हर!’ ऐसें बोलुनि सात्यकि[5] म्हणे, ‘अगा! रामा! ।
धर्मासि दोष लाविल, तरि सोडिल विष्णुच्या[6] अगारा[7] मा[8]. ॥ ८
मानधनासि[9] बळेंचि द्यूतक्रीडार्थ बाहिलें कुटिलें[10], ।
लुटिलें सर्वस्व, अहो! बलदेव! खळांसि पाहिजे कुटिलें[11]. ॥ ९
याचें न धर्मयुद्धें हरिलें द्यूतेंकरूनि पदें[12] कपटें[13], ।
शुचिचें[14] अशुचि न मिरवू, झांकील कसा हरूनि पदक[15] पटें[16]. ॥ १०
पदर[17] पसरितील शकुनि दुर्योधन कर्ण हे तिघे राया, ।
नाहीं तरि त्या[18] माझ्या सिद्धचि आहेत हेति[19] घेराया. ॥ ११
उपदेशितील अस्मच्छस्त्रें[20] त्यां[21] द्यावयासि पदें[22] नमुनी, ।

---

१. यांत ‘प्रतिवस्तूपमा’ अलंकार आहे. २. निस्तेज. ३. चंद्र. हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ४. अंक. यांत सूर्याला दोष लावण्यास काय जागा आहे? अर्थात् नाहीं हें उत्तर अपेक्षित आहे. ५. सात्यकि=शिनिप्रवीर युयुधान. हा शिनिकुलोत्पन्न म्हणून याला शैनेय असेंही म्हणतात. हा मोठा पराक्रमी होता. याचें हस्तचापल्य पाहून द्रोणाचार्यांनीं मान डोलविली—अशी कथा आहे. हा यादवकुलोत्पन्न पांडवपक्षानुयायी वीर होय. [अध्याय ३.] ६. हा दृष्टांत मूळांत नाहीं, हा पंतांच्या पदरचा होय. ७. गृहास. ८. लक्ष्मी. ९. मान हेंच आहे धन ज्याचें अशा युधिष्ठिराला. [युद्धाला अथवा द्यूताला बोलाविलें असतां क्षत्रियांनीं विमुख होऊं नये या क्षात्रधर्माला अनुसरून वागणाऱ्या धर्मराजाला.] १०. कुटिलमति (दुर्योधनानें). कुटिल=वक्रमनस्क, अनृजुप्रकृति, जिह्ममनस्क- ११. मारलें, चेंचलें. १२. राज्यपद. १३. कपटानें. (कपटद्यूतानें.) १४. पवित्राचें. १५. शुचिचें पदक अशुचि न मिरवू; शुचिचें पदक हरूनि अशुचि पटें झांकील कसा?—असा अन्वय. १६. वस्त्रानें. १७. पदर पसरणें=पादप्रणाम करून क्षमा मागणें, पाय धरणें, मिन्नतवारी करणें. १८. त्या सुप्रसिद्ध, सुप्रख्यात अशा (हेति=तरवारी). १९. शस्त्रें. २०. आमचीं आयुधें. [मूळांत सात्यकीचें क्रोधभाषण आहे. त्याचा सारांश असा:—दुर्योधनप्रभृति कौरवांनीं पांडवांचें राज्यपद त्यांस दिलें नाहीं, तर मी त्यांस रणांगणीं तीक्ष्ण बाणांनीं पराजित करून धर्मराजाच्या पायां पडवीन. ते जर पायां पडणार नाहींत तर यमसदनाला त्वरित जातील. या कोपाविष्ट झालेल्या युयुधानाचा वेग त्यांच्यानें सहन करवणार नाहीं. या भीमसेनाचा, अर्जुनाचा, नकुलसहदेवांचा, विराटद्रुपदांचा, द्रौपदीच्या पांच पुत्रांचा, सौभद्राचा, गदप्रद्युम्नसांबांचा वेग सहन करण्यास कोण समर्थ आहे? पांडवांस अर्धें राज्य न दिलें तर सर्व कौरवांस मारून पांडवांस राज्याभिषेक करूं. आततायी शत्रूंचा वध केला असतां अधर्म होत नाहीं. आज पांडवांना अर्धें राज्य कौरवांनीं द्यावें, नाहीं तर संग्रामभूमीवर मरण

हें न घडतां, न तुमचें[1] यावरि अवलोकितील वदन[2] मुनी[3]. ॥ १२
पांचाल[4] मत्स्य यादव पांडव हे वीर काय सामान्य? ।
होईल श्रीहंसी[5] हे हंस त्यजुनि वायसा[6] मान्य? ॥ १३
मारुनि सुयोधनातें राज्यपदीं बसवितों पहा यांस[7], ।
याचेंचि तेज अद्भुत, रामा! आम्हां नको महायास[8].' ॥ १४
द्रुपद म्हणे, 'सत्य वदसि, योग्य खल प्राप्तदर्प[9] हा निधना[10], ।
पावेल कसा[11] चतुरहि न करूनि निधिस्थसर्पहानि[12] धना[13]? ॥ १५
पळहि न वळेल सामें दुर्योधन दुष्ट मत्त अंधकसा[14], ।
पुत्रस्नेहें भुलला नयनिष्ठुर हित वदेल अंध[15] कसा? ॥ १६

---

सेवून पडून राहण्यास तयार असावें. अध्याय ३ श्लोक १२-२३.] आमच्या शस्त्रांचा मारा पाहून कौरव आपले डोळे उघडतील आणि कृतकर्माबद्दल पश्चात्ताप पावून आम्हांस शरण येतील. या प्रसंगीं आम्हांस शरण यावें असा उपदेश कौरवांना आमचीं शस्त्रें करतील. २१. त्या दुर्योधनशकुनिकर्णादिक कौरवपक्षीयांस. २२. राज्यार्धपद.

१. रामकृष्णविराटद्रुपदप्रभृति सभासदांचें. २. वदन न अवलोकणें=तोंड न पाहणें. ही क्रिया अवहेलना अथवा तिरस्कार सूचविते. ३. नारदादिक थोर थोर जन. ४. पांचाल देशाचे राजे (द्रुपद, त्याचे पुत्र). पांचाल हें नांव पडण्याचें कारण असें कीं, या देशाचा राजा भर्म्याश्व (भद्राश्व) याला मुद्गल, यवीनर, बृहदिषु, कांपिल्य आणि संजय, असे पांच पुत्र असून ते माझें राज्य रक्षण करण्यास समर्थ (पंच अलं) असें तो म्हणे. यावरून त्या मुलांना 'पंचाल' आणि त्यांच्या देशाला व वंशाला 'पांचाल' असें नांव पडलें. [महाभारत–वनपर्व–अ० २१.] ५. लक्ष्मीरूप हंसी. ६. काकाला, कावळ्याला. ७. या धर्मराजाला. ८. महाप्रयास. ९. प्राप्त झाला आहे गर्व ज्याला असा. १०. मरणा. ११. यांत 'प्रतिवस्तूपमा' अलंकार आहे. १२. द्रव्यावर बसलेल्या सर्पाची हानि (नाश). १३. द्रव्याला. [धनवान् पुरुष पुढल्या जन्मीं साप होऊन आपण पुरून ठेवलेल्या धनाचें संरक्षण करतात अशी समजूत सर्वत्र प्रचलित आहे तिला अनुसरून हें वर्णन आहे.] १४. अंधकासुरासारखा. अंधकासुर–या असुरानें लावण्यमोहित होऊन पार्वतीला हरण्याचा प्रयत्न केला. त्यावरून त्याचें आणि शिवाचें मोठें घोर युद्ध झालें. त्यांत त्याच्या रक्तापासून अनेक अंधक उत्पन्न होऊं लागले, म्हणून त्याचें रक्त शुष्करेवती नामक देवतेकरवीं नाहींसें करविलें. तेव्हां तो एकटाच अंधक अवशिष्ट राहिला. तेव्हां हतवीर्य होऊन त्यानें महादेवाचें स्तवन केलें. नंतर शिवानें प्रसन्न होऊन त्यास आपलें गणत्व म्हणजे सेवकत्व दिलें. अंधक हा भृंगी नामक सेवक झाला–अशी अंधकासुरकथा आहे. [सौरपुराण–अध्याय २९.] १५. धृतराष्ट्र.

जरि धीर वीर **भीष्म द्रोण** प्रख्यात पात्र [1]तन्नमना, ।
तरि [2]दीनचि ते, त्यांच्या [3]त्याचें बहु लाजवील अन्न मना. ॥ १७
**कर्ण शकुनि** तों त्यांचे [4]मूर्तकुसंकल्प काय सांगावे? ।
ज्यांहीं [5]नयहंसांतें निंदावें [6]अनयवायसां गावें. ॥ १८
न शके **शक्र** [7]घनांहीं शमवूं, शमवील त्या नर [8]गडूनीं? ।
सांगेल कोण दुसरा? **भीष्म**हि सांगेल ज्या न [9]रगडूनी? ॥ १९
येइल [10]बहूपचारें [11]वंध्योरसिजासि काय ओलांवा[12]? ।
डोलांवा[13] [14]**हर**मूर्धा **कुरुपति**पूर्वींच [15]भूप बोलावा. ॥ २०
सांगूनि सांगणें तें, प्रेषावा आमुचा '[16]पुरोहित हो ! ।
न्यायाला न चुकावें, अंधाचें पुत्रशत उरो, हित हो.' ॥ २१
'[17]**श्री**श म्हणे, 'तूं [18]गुरुसा, हे आम्हीं शिष्यसेचि' [19]रायास, ।
स्वपदीं स्थापावें त्वां या [20]देवें भोगिला [21]चिरायास. ॥ २२

---

१. दुर्योधनादिकांच्या नमनास. २. पामर, कृपण. (कारण द्रोण भीष्म हे कौरवान्नसेवी होत, कौरवांचें अन्नभक्षण केल्यामुळें भीष्मद्रोणांस त्यांचा पक्ष स्वीकारणें भाग होय. अध्याय ४ श्लो० २ टीका पहा.) ३. दुर्योधनाचें. ४. मूर्तिमंत वाईट संकल्प. ५. न्यायरूप हंसांस. ६. अनयरूप कावळ्यांस. ७. मेघांहीं. ८. लोट्यांनीं, लहान पात्रांनीं. या पद्यांत दृष्टांत अलंकार आहे. ९. रगडून=पुष्कळ; दटावून, दहशत घालून—असाही अर्थ केला तरी चालेल. १०. बहुउपचारानें, औषधिक्रियेनें, वैद्योपचारानें. ११. वंध्या+उरसिजास=वांझेच्या स्तनांस. १२. यांत 'अतिशयोक्ति' अलंकार आहे. १३. हरमूर्धा डोलावा (या हेतूनें) कुरुपतिपूर्वींच भूप बोलावा—असा अन्वय. कौरवपांडवांचें युद्ध पाहून शिवानें मस्तक डोलवावें यासाठीं दुर्योधनानें (कुरुपतीनें) बोलावण्यापूर्वींच आपण सर्व देशांतील भूपांला (राजांला) बोलावणीं पाठवावींत. शिव हा महायोद्धा आहे. त्याला मोठें युद्ध पाहून आनंद होईल आणि त्या आनंदभरांत तो मान डोलवील. तर दुर्योधनाकडील आमंत्रणें जाण्यापूर्वीं आपल्याकडील आमंत्रणें राजे लोकांस गेलीं पाहिजेत. [अध्याय ४ श्लो० ९-१० पहा.] १४. शिवमस्तक. १५. शल्य, भगदत्त, हार्दिक्य इत्यादि राजे. [श्लो० ११-२४.। १६. उपाध्याय. पुरोहित कसा असावा किंवा पुरोहित होण्यास कोणते गुण लागतात याचें निरूपण पुढच्या पद्यांत केलें आहे:—'त्रय्यां च दंडनीत्यां च कुशलः स्यात्**पुरोहितः**] अथर्वविहितं कुर्यान्नित्यं शांतिकपौष्टिकम् ॥' इति कामंदकः; अथवा '**पुरोहितं** च कुर्वीत दैवज्ञमुदितोदितम् । दंडनीत्यां च कुशलमथर्वाङ्गिरसे तथा ॥' इति मिताक्षरायाम्. १७. लक्ष्मीपति, वासुदेव. १८. वयानें आणि ज्ञानानें श्रेष्ठ असा. (अ० ५ श्लो० ५.) [गुरु=अंधकारनिरोधक. 'गुशब्दस्त्वंधकारश्च रुशब्दस्तु निरोधकः । अंधकारनिरोधत्वाद्गुरुशब्दो निगद्यते ॥' सौरपुराण—अध्याय ६८ श्लोक १०.] १९. विराटाला. २०. धर्मानें. २१. फार दिवस श्रम.

धृतराष्ट्र मानितो [1]तुज, तूं द्रोणाचा सखा कृपाचाही; ।
विश्वास तुझ्याठायीं [2]याचाही आणि [3]त्या नृपाचाही. ॥ २३
झाला [4]विवाह, [5]जातों, [6]सर्वांमागूनि मजहि [7]पाचारा, ।
साचा, [8]राया! माझ्या [9]चित्तखगा [10]साधुसंग हा [11]चारा.' ॥ २४
सत्कारिला विराटें, प्रभु गेला [12]निजपुरा [13]सपरिवार, ।
बहुधा घेउनि उद्धवसंमत मग मारणार [14]अरिवार. ॥ २५
'[15]पांडवदूतचि पाहति, नृप न, मुहूर्तास यावयाला, हो! ।
[16]जो तो म्हणे, '[17]भल्याच्या साह्यें सार्थक्य या वयाला हो[18].'॥ २६
प्रेषी द्रुपद [19]गुरुसि, जो संमत [20]जीवा तसाच [21]काव्याही, ।

---

१. तुला विराटाला. (अध्याय ५ श्लो० ६.) २. या धर्माचा. ३. धृतराष्ट्राचा. ४. अभिमन्यु आणि उत्तरा यांचा विवाह. ५. मी द्वारकेला जातों—असा भाव. ६. तुम्ही राजांस बोलावीत आहांच, तर सर्वांच्या मागून मला आमंत्रण पाठवावें. [अ० ५ श्लोक ५.] ७. बोलावा. ८. हे विराटनृपते. ९. चित्तरूपी पक्ष्यास. १०. सज्जनांचा समागम. ११. हें 'रूपका'चें उदाहरण आहे. १२. द्वारकेला. १३. सगण आणि सहबांधव. (श्लो० ११.) १४. अरिसमुदाय. १५. पांडवांचे दूत (विशेषतः द्रुपदपुरोहित) पुष्पयोग मुहूर्तावर कौरवांकडे गेले असें मूळांत वर्णन आहे. [अ० ६ श्लो० १७.] पांडवांचे दूत उत्तम दिवस पाहून राजांस आमंत्रण करण्यासाठीं गेले, परंतु राजे मुहूर्त न पाहतां पांडवांचें साहाय्य करण्यासाठीं निघाले. १६. सर्व. १७. भल्या युधिष्ठिराच्या कार्यीं हा देह खर्चून या वयाचें (आजपर्यंत वांचल्याचें) साफल्य होवो असें जो तो राजा म्हणूं लागला व प्रस्थानाचा मुहूर्त न पाहतां निघाला. १८. होवो. १९. द्रुपदानें आपल्या पुरोहिताला धृतराष्ट्राकडे पाठविलें त्या प्रसंगाचें वर्णन असें आहे:—'विराटपुरीं पृषदनंदन । पांडवसदनीं सुखसंपन्न । गालव कृतबुद्धि प्रधान । पाचारिला जवळिके. ॥ ४० ॥ द्रुपद बोले मधुर वचन, । म्हणे, 'कृतबुद्धि! मैत्रीं मज तूं मान्य । बोलोनी गेला जनार्दन । तें कारण सिद्धी त्वां न्यावें. ॥ ४१ ॥ तुझें नाम गा! कृतबुद्धी । गेलें कार्य करिसी सिद्धी । ऐक त्याचा अर्थ सुबुद्धी । नाममहिमा यथार्थ. ॥ ४२ ॥ सर्व योनींत नर श्रेष्ठ । त्यांत श्रेष्ठ विवेकवरिष्ठ । त्या बुद्धिमंतांमाजी वरिष्ठ श्रेष्ठ । ब्राह्मण भूदेव तत्वतां. ॥ ४३ ॥ तया विप्रकुळीं थोर । वेदवेदांगपारग ऋषीश्वर । तयांहुनी तपी तापसी थोर । इंद्रियजित् आगळा. ॥ ४४ ॥ तया इंद्रियजिताहूनी । भूतकृपाळ आगळा जनीं, । त्याहोनी शमदमसाधनीं । तत्वज्ञान आगळें. ॥ ४५ ॥ तरि ब्रह्मप्राप्ति पावे सुबुद्धी । तोचि जाणावा कृतवर्मशुद्धी । सर्व कारण त्यासी सिद्धी । पैं सद्बुद्धीपासोनी. ॥ ४६ ॥ तोय मधुर आणि गोड । परी पाषाण फोडी प्रचंड । पुरवीतसे जगाचें कोड । परोपकारीं सर्वदा. ॥ ४७ ॥ धेनू भक्षोनियां तृण । दुजया करवी पयःप्राशन । पर्णभक्षक रामभजन । करोनी धन्य ते

कीं नरकीं न बुडावा जोडुनि [1]सद्घातपातका [2]व्याही. ॥ २७
[3]शल्याद्याप्त [4]ब्हाया प्रेषुनि दूत, स्वयेंचि [5]वासवि [6]त्या ।
पाचाराया [7]जाय, [8]प्रणतजनाब्जांचिया [9]शिवा [10]सवित्या. ॥ २८

---

झाले. ॥ ४८ ॥ चंदन झिजोनी आपण । निववी दुजया देहींचें उष्ण । सुगंधें उपचारीं संपूर्ण । परोपकारालागोनी. ॥ ४९ ॥ कर्पूर विरोनी सुगंध करवी । आगरु जाळोनियां परिमळ दावी । परोपकारीं सत्कीर्ति बरवी । घेती देहलोभ सांडोनी. ॥ ५० ॥ तैसा तूंही कृतबुद्धी । केवळ परोपकारमहोदधी । गेलें कार्य करिसी सिद्धी । निश्चयेसीं मी जाणे. ॥ ५१ ॥ कुळीं श्रेष्ठ वयें श्रेष्ठ । सर्वज्ञ होसी इंद्रियनिष्ठ । बुद्धिवादें होसी इष्ट । पैं सुरगुरूसारिखा. ॥ ५२ ॥ त्वां गा! मित्रा! वीरपुंगवा! । आमचा सांग संकल्प सिद्धी न्यावा । हस्तिनापुरीं गुरु पार्थिवा । जावोनियां भेटावें ॥ ५३ ॥ धर्म अर्थ काम मोक्ष । पुरुषार्थ चारी प्रत्यक्ष । उपदेशुनी राजा प्रमुख । उभयपक्ष रक्षावा. ॥ ५४ ॥ धर्मकारणा लागोन । बरवा बोधीं कुरुनंदन । उपदेश मुख्य करोनी दुर्योधन । पांडवविभाग सोडवीं. ॥ ५५ ॥ साम दाम दंड भेद । करूनि बोले चतुर्विध । त्यामाजी एक करीं सिद्ध । विना युद्धा सुगम जें. ॥ ५६ ॥ भीष्म द्रोण कृप बाल्हिक । विदुर संजय युयुत्सु, देख । यांसमवेत कुरुनायक । राजा वृद्ध प्रबोधीं. ॥ ५७ ॥ धृतराष्ट्रातें सांगें वचन । कौरव पांडव तुझे नंदन । कौरव नांदती सुखसंपन्न । पांडव वनीं कां हिंडती. ॥ ५८ ॥ द्वादशवर्षे अरण्यवास । नष्टचर्य त्रयोदश । भोगोनि वांचले पांच पुरुष । तुमचे कृपानुग्रहें. ॥ ५९ ॥ आतां त्यांचा विभाग त्यांसी । देतां लोकीं सत्कीर्ति घेसी । उभयलोकीं पुण्यराशी । पुढती नांदसी पुत्रपौत्रीं. ॥ ६० ॥ तुझे अनुजनंदन । सत्यवादी पुण्यपावन । त्यांचा क्लेश ऐकोन । तुझें हृदय कां न फुटे? ॥ ६१ ॥' [सुभानंतस्वामीकृत उद्योगपर्व—अध्याय ३]. २०. बृहस्पतीस. २१. शुक्रास. [अ० ६ श्लो० ४.]

१. साधुघाताच्या पातकास. रण झालें असतां त्यांत अनेक साधुजनांचा घात करून त्या पातकानें आपला व्याही (धृतराष्ट्र) न बुडावा या हेतूनें उपदेश करून साम करण्यासाठीं द्रुपदानें आपला गुरु (पुरोहित) कौरवांकडे पाठविला. २. धृतराष्ट्र. ३. शल्य+आदि+आप्त=शल्य+प्रभृति+स्वजन. ४. पाचाराया. ५. अर्जुन. (अ० ७ श्लो० २.) ६. त्या सुप्रसिद्ध कृष्णाला. ७. द्वारकेला जाई. ८. नम्रजनकमलांच्या. ९. सुखदायका. १०. सूर्यास. 'प्रणतजनाब्जांचिया शिवा सवित्या' यांत रूपकमूलक **'पर्यायोक्त'** नामक अलंकार आहे. येथें 'कृष्णाला' असें न म्हणतां पर्यायानें 'शरणागतजनरूप कमलांला सुख देणाऱ्या सूर्याला' असें वळसा घेऊन वर्णन केलें आहे, ह्मणून हें पर्यायोक्तनामक अलंकाराचें उदाहरण आहे. जेथें कोणत्याही पदार्थाचें वर्णन, सरळ न करितां, रूपांतरानें अथवा पर्यायानें वळसा घेऊन केलें असतें तेथें **'पर्यायोक्त'** अलंकार होतो. 'रामाला नमस्कार असो' असें न म्हणतां **'सापत्नबंधुसु-**षाशापदग्धरक्षोगणाधिपांतकाला नमस्कार असो' असें वळसा घेऊन म्हटलें असतां पर्यायोक्त

[1]तें परिसतां [2]मन म्हणे त्याहि [3]अनार्यासि '[4]आर्यसा धावें, ।
प्रियविजयापूर्वींच प्रभुला गांठूनि कार्य साधावें.' ॥ २९
जाय प्रथम [5]कुरूप तो, निजला होता प्रभु [6]स्वपर्यंकीं, ।
[7]ज्यासि स्मरुनि निजावें स्वस्थ स्थापूनि [8]शीर्ष [9]अर्यंकीं. ॥ ३०
प्रभुच्या शिराकडे तो स्वमहत्वास्तव [10]बसे [11]अंकवि मानी; ।
होईल काय हंस ब्रह्मयाच्याहि बसला [12]बकें विमानीं? ॥ ३१
मागुनि गेला अर्जुन, बसला पायांकडेचि पाहत, कीं ।
या [13]विनतीं श्रीगुरुची बहु, त्या लेशाहि नसे, कृपा, [14]हतकीं. ॥ ३२

---

होतें. या अलंकाराचें सुप्रसिद्ध उदाहरण म्हटलें तर 'अलिकुलवहनाच्या वाहना नेत होतें, शशिधरवहनानें लोटिलें मार्गपंथें । नदिपतिरिपु त्याचा तात भंगोनि गेला, रविसुत महिसंगें फार दुःखीत झाला ॥' हा श्लोक होय. तसेंच 'त्वद्बंधूंचीं झालीं युगपत् शून्योत्सवें महागेहें' [विराटपर्व–अ० १ गी० १७८], 'केलेंचि धन्य दर्शनदानें येऊनि कानना मातें; । अजि देवेश, निवावे बहु हे सेवूनि कान नामातें ॥' [वनपर्व–अध्याय १३ गीति ५५ पहा].

१. अर्जुनाचें द्वारकेस जाणें ऐकतां. [माधव जात आहे असें गुप्त हेरांपासून ऐकून दुर्योधन स्वल्प सैन्यासह द्वारकेस त्वरित आला असें मूळांत आहे. अ० ७ श्लो० ५.] २. दुर्योधनाचें मन. ३. नीचा दुर्योधनास. ४. श्रेष्ठ अर्जुनासारखा. ५. दुर्योधन. ६. आपल्या पलंगावर. ७. ज्या कृष्णाला स्मरुनि. [या अर्धात 'उदात्त' नामक अलंकार आहे. जेथें समृद्धि अथवा अन्योपलक्षक श्लाघ्यचरित यांचें वर्णन असतें तेथें हा अलंकार होतो. याचें लक्षणः–'उदात्तमृद्धेश्चरितं श्लाघ्यं चान्योपलक्षकम्' [कुवलयानंद], 'उदात्तं वस्तुनः संपत्' [काव्यप्रदीप–दशम उल्लास– पृ० ४२६], 'आशयस्य विभूतेर्वा यन्महत्त्वमनूत्तमम्। उदात्तं नाम तं प्राहुरलंकारं मनीषिणः ॥' [काव्यादर्श–श्लो० ३००], 'लोकातिशयसंपत्तिवर्णनोदात्तमुच्यते । यद्वापि प्रस्तुतस्यांगं महतां चरितं भवेत् ॥' [साहित्यदर्पण]. जेथें महाशयाचें अथवा अनूत्तम संपत्तीचें वर्णन केलेलें असतें तेथें उदात्त हा अलंकार होतो. येथें कृष्णाच्या श्लाघ्य चरिताचें अथवा त्याच्या महाशयाचें वर्णन आहे. ८. मस्तक. ९. वैऱ्याच्या मांडीवर. १०. अध्याय ७ श्लो० ८-९. ११. मूढ (सुयोधन.) १२. ब्रह्मयाच्याहि विमानीं बसला (बसलेला) बक हंस होईल काय?—असा अन्वय. यांत 'प्रतिवस्तूपमा' अलंकार आहे. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १३. विनयसंपन्न अर्जुनावर श्रीगुरूची (कृष्णाची) बहु कृपा होय, त्या हतकीं (त्या कुत्सितमति दुर्योधनावर) कृपालेशाहि नसे. १४. निंदित दुर्योधनावर. [हतक=हा शब्दकुत्सावाचक आहे. 'दग्धहतकनिंदितानि कुत्सायाम्' इति शाब्दाः. अनर्घराघवम्–रुचिपत्युपाध्यायकृत टीका–पृ० १५०.]

कैसा असेल[1] अन्य प्रभुच्या दृष्टीसमोर सामान्य? ।
उठतांचि तीस अर्जुन झाला दृष्टीस मोरसा[2] मान्य. ॥ ३३
पार्थ म्हणे, 'प्रार्थाया आलों प्रभुजी! तुला सहायास.' ।
कौरव म्हणे, 'बहाया प्रथमचि जो पातला[3], पहा यास. ॥ ३४
तुज मीं याचें[4] माझें सम सख्य[5] जसें, तसेंच सम नातें[6], ।
संत[7] म्हणति, 'पूर्वागतसाह्य[8]शिवपदीं सदा वस[9] मनातें.' ॥ ३५
देव[10] म्हणे, 'सत्यचि हें, तरि पार्थ प्रथम पाहिला आहे, ।
सर्वहि संत न्यायें भेद न आगमनदर्शनीं पाहे. ॥ ३६
पूर्वागत तूं जैसा तैसा मज पूर्वदृष्ट हा मान्य, ।
दोघांचेंहि करावें म्यां साह्य प्रिय, तुम्हीं न सामान्य. ॥ ३७
तुजहुनि कनिष्ठ अर्जुन बाळकसा, हें मनीं पहा नातें, ।
[11]रीति दहांची हे कीं पहिलें समजाविती लहानातें[12]. ॥ ३८
आहेत एक अर्बुद नारायण नाम गोप[13] मजसम[14] जे ।
सर्वहि अनंतबल[15] ते, समजे न परां, परंतु मज समजे. ॥ ३९
ते कीं न्यस्तायुध[16] मी, त्यांत तुम्हां मान्य काय दोघांस?' ।
ऐसें प्रभूत्तम पुसे त्या दैवादैवसंपदोघांस[17]. ॥ ४०

---

१. अन्य (अर्जुनेतर) सामान्य (साधारण) [नर] प्रभुच्या दृष्टीसमोर कैसा असेल? कसा राहील? २. मयूरासारखा. यांत 'उपमा' अलंकार आहे. यांत आठ अक्षरांचें यमक असून अर्थ अगदीं सरळ आणि सरस आहे. अर्थाची हानि होऊं न देतां शब्दालंकारांनीं काव्य सुशोभित करण्याची पंतांची हातोटी अपूर्व होय, हें मनांत येऊन त्यांजविषयींची आदरबुद्धि पदोपदीं वृद्धिंगत होते. ३. जो प्रथमचि बहाया (बोलावण्यासाठीं) पातला यास (याला-मला दुर्योधनाला) पहा-असा अन्वय. ४. या पार्थाचें. ५. अध्याय ७ श्लोक १२ पहा. ६. तसाच संबंध ही तुल्यच आहे. (श्लो० १३.) ७. साधुजन. (श्लो० १४-१५.) ८. पूर्वी आलेल्याचें साह्य करणें हाच शिव त्याचे चरणीं. ९. वास कर. १०. अध्याय ७ श्लो० १५-२० पहा. ११. हें अर्ध सुभाषितरूप असून यांत सामान्यव्यवहारनीतीचें सुरेख निरूपण केलें आहे. मूळांत (अ० ७ श्लो० १६) ही असेंच वर्णन आहे. मुलाचें प्रवारण (काम्य वस्तु देऊन मनोरथ पूर्ण करणें) प्रथम करावें अशी श्रुति आहे, तेव्हां कनिष्ठत्वामुळें पार्थाचें प्रवारण प्रथम करावें हें योग्य आहे. १२. यांत 'अर्थांतरन्यास' नामक अलंकार आहे. १३. यादव. १४. माझ्यासारखे (शरीरानें). श्लोक १८ पहा. १५. अपरिमितपराक्रम असे. (संग्रामकुशल.) १६. न्यस्त (टाकलें आहे) आयुध (शस्त्र) ज्याणें असा. (श्लो० १९.) १७. सुदैव आणि दुर्दैव यांचे संपत्तीच्या ओघांस; अर्जुन व दुर्योधन यांस.

**पार्थ** म्हणे, '**गो**विंदा! न्यस्तायुध तूंचि पाहिजेस मज[1].' ।
मागे[2] सैन्य **सु**योधन, वैरहि[3] वरायासि पाहिजे समज. ॥ ४१
मग साह्यार्थ विनविता[4], **रा**म म्हणे, 'ऐक भारता[5]! राया! ।
सिद्धचि मी स्वजनांतें उतरुनियां आधिभार[6] ताराया. ॥ ४२
वदलों **वि**राट[7]नगरीं त्वद्विषयक[8] किमपि जें विहित सुचलें, ।
परि परिस, त्या **ह**रिस त्या समयीं न सभेंत तें वचन रुचलें. ॥ ४३
दुष्कर **कृ**ष्ण[9]त्याग, स्वप्राणत्यागही न दुष्करसा[10], ।
**कृ**ष्णाविणें क्षिति मला, नलिनी[11] मधुपासि[12] जेंवि शुष्करसा[13]. ॥ ४४
यास्तव[14] सहाय संप्रति हा बल[15] न तुझा न **पां**डुतनयाचा, ।
निश्चल निश्चय जाणा, आजि तुम्हीं सर्व आप्तजन याचा. ॥ ४५
जा, आहेसि क्षत्रिय, भांड[16], न अभिमान सांड, गा! साच. ।

---

१. या प्रसंगाचें वर्णन अन्यत्र आढळतें तें असें:—"मनीं विचारी नारायण । पाहे पीतांबराआंतून । तंव चरणापाशीं अर्जुन । देखोनियां संतोषे. ॥ १ ॥ कोणी निजोनियां उठीला । तो पाहे चरणाकडे भला । त्यापरि अर्जुन पाहिला । उठोनियां श्रीकृष्णें. ॥ २ ॥ अर्जुन अवलोकोनि जनार्दन । म्हणे, 'गा! तुज साह्या येईन.' । मागां पाहे तंव दुर्योधन । साभिमानें विलोकी. ॥ ३ ॥ क्षेमालिंगन परस्पर । म्हणे, 'गेलें माझें उत्तर । प्रथम नाहीं तुज साचार । अवलोकिलें राजया! ॥ ४ ॥ जरि पूर्वीं पाहिलें होतें तुतें । तरि मी येतों तुझ्या साह्यातें । जिंकोनियां पांडवांतें । तुतें राजा मी करितों. ॥ ५ ॥ काय करूं धृतराष्ट्रपुत्रा! । वचन दिधलें अर्जुनवीरा । तरि मी शस्त्र नेघें करा । तुज लागोनि राजया! ॥ ६ ॥ तुजवरि राया! माझी प्रीति । परि शब्द गेला पांडवांप्रति । तरि मी होईन पार्थसारथी । शस्त्र नेघें युद्धार्थ.' ॥ ७ ॥" [सुभानंतस्वामीकृत उद्योगपर्व—अ० ११ ओं० ६०-६६]. २. श्लो० २३ पहा. मंदमति दुर्योधनानें नारायणसंज्ञक योधांचें सैन्य मागितलें. ३. हें 'अर्थांतरन्यास' नामक अलंकाराचें उदाहरण होय. ४. दुर्योधनानें साहाय्य मिळविण्यासाठीं बलरामाची विनंति केली असतां. [न्यस्तायुध कृष्णाला अर्जुनानें वरिलें म्हणून आनंद पावून दुर्योधन बलरामाकडे साहाय्य मागण्यासाठीं गेला.] ५. भरतवंशोत्पन्ना दुर्योधना! ६. मानसव्यथेचें ओझें. ७. विवाहप्रसंगीं विराटनगराला गेलों होतों तेव्हां. [मागें आर्या ६-७ पहा.] ८. तुझ्याविषयींचें. ९. कृष्णाचा त्याग करणें हें मला (बलरामाला) अतिशयित अशक्य आहे. १०. करावयास अशक्य. ११. कमलिनी. १२. भ्रमरास. या चरणांत 'उपमा' आहे. १३. रस सुकलेली, कोमेलेली १४. श्लोक २९ पहा. १५. बलराम. १६. क्षात्रधर्मास अनुसरून युद्ध कर.

स्वर्ग[1] असे, काळमुखीं व्हायाचा काय[2] सांडगा साच.' ॥ ४६
ऐसें वदोनि रामें[3] आलिंगुनि तो खलेंद्र बोळविला[4], ।
रविनें[5] विधुसा, प्रभुनें खगृहागत[6] मलिनही न पोळविला. ॥ ४७
अक्षौहिणी[7] कटक कृतवर्मा[8] दे त्यासि[9], कीं 'न[10]' येनांच[11], ।

---

१. रणांत क्षात्रधर्माप्रमाणें लढून जो मरण पावतो त्याला खरोखर स्वर्ग असे (स्वर्ग मिळतो). केव्हां तरी काळाच्या मुखांत पडून देहाची सांडग्यासारखी अवस्था व्हावयाची आहे, तर ऊठ आणि देहाची पर्वा न करतां युद्ध करून स्वर्ग मिळव–असा भावार्थ. २. शरीर. ३. मूळांत दुर्योधनानें बलरामाला आलिंगिलें असें वर्णन आहे. (श्लोक ३१.) ४. बोळविणें=पाठविणें. ५. रवीचें गृह सिंह (राशि). रवि सिंहीं असतां चंद्र आला तरी चंद्राचा अस्त होत नाहीं या गोष्टीकडे कविकटाक्ष आहे. चंद्र मलिन आणि रवि दुःसह ताप करणारा, तरी गृहागत (घरीं आलेला–राशीं आलेला) म्हणून चंद्रास पोळवून त्याचा अस्त करीत नाहीं. यांत 'उपमा' अलंकार आहे. ६. ख+गृह+आगत=आपल्या घरीं आलेला. खगृहीं आलेल्या अतिथीस (तो कसाही असला तरी) त्रास देऊं नये, तर उलट त्याचा सत्कार करावा असें येथें सूचविलें आहे. ७. अक्षौहिणी. या संबंधें पुढील कोष्टक लक्षांत ठेवण्यासारखें आहे:—'अक्षौहिण्यामित्यधिकैः सप्तत्या ह्यष्टभिः शतैः । संख्या युक्ता सहस्राणि गजानामेकविंशतिः ॥ एवमेव रथानां तु संख्यानं कीर्तितं बुधैः । पंचषष्टिः सहस्राणि षट् शतानि दशैव तु ॥ संख्यातास्तुरगास्तज्ज्ञैर्विना रथतुरंगमैः । नृणां शतसहस्रं तु सहस्राणि नवैव तु ॥ शतानि त्रीणि चान्यानि पंचाशच्च पदातयः ॥.'

| सेना | पत्तिः | सेनामुखम् | गुल्मः | गणः | वाहिनी | पृतना | चमूः | अनीकिनी | अक्षौहिणी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| गजाः,–रथाः | १ | ३ | ९ | २७ | ८१ | २४३ | ७२९ | २१८७ | २१८७० |
| अश्वाः– | ३ | ९ | २७ | ८१ | २४३ | ७२९ | २१८७ | ६५६१ | ६५६१० |
| पदातयः– | ५ | १५ | ४५ | १३५ | ४०५ | १२१५ | ३६४५ | १०९३५ | १०९३५० |

यावरून १ पत्ति=१रथ+१गज+३अश्व+५ पदाति; ३ पत्ति=सेनामुख; ३ सेनामुख=१ गुल्म; ३ गुल्म=१ गण; ३ गण=१वाहिनी; ३ वाहिनी=१पृतना; ३ पृतना=१ चमू; ३ चमू=१ अनीकिनी; १० अनीकिनी=१ अक्षौहिणी. ८. हार्दिक. हा हृदिकराजाचा तिसरा पुत्र. (श्लो० ३२.) ९. सुयोधनास. १०. कृतवर्म्याच्या तोंडांतून नकार म्हणून आला नाहीं, तो त्या दुर्योधनाला 'मी सेना देतों' असेंच म्हणाला. त्याच्यानें ना म्हणवलें नाहीं. या पद्यांतील पहिल्या पादाशिवाय करून अन्य तीन पाद पंतांच्या पदरचे आहेत, त्यांस मूळांत आधार नाहीं. या ठिकाणीं पंतांनीं प्रसंगोचित वर्णन करून आपली मार्मिकता आणि रसिकता दाखविली आहे असें कोण आनंदानें कबूल करणार नाहीं? ११. येतच नाहीं.

कुलजा[1] नकार[2] जैसा मेल्याही[3] पंगुला नये नाच. ॥ ४८
बहु मेळवूनि बल्लव[4] अज्ञ[5] पळत जाय, कृष्ण सोडून, ।
अधन शिशु[6] जसा टाकुनि चिंतामणि[7] बहु कपर्द[8] जोडून. ॥ ४९
चित्तांत[9] म्हणे, 'कैसा केला अरिमीनऱ्हद[10] अगाध[11] रिता?' ।
भ्रांत[12] श्रुत[13] स्मरेना कीं हा प्रभु जाहला अगा[14] धरिता. ॥ ५०
कृष्ण म्हणे[15], 'पार्था! त्वां अर्बुद बल हातिचें दिलें अरिला, ।
जो म्हणतो, 'भांडेना, शस्त्र धरीना' असा कसा वरिला?' ॥ ५१

१. कुलीन पुरुषास. २. न म्हणणें. ३. कुलीनाच्या तोंडून कधींही नकार निघत नाहीं किंवा पंगु मेला तरी त्यास नाच येणें नाहीं, त्याप्रमाणें कृतवर्म्याच्या मुखांतून 'नकार' आला नाहीं. कृतवर्मा दुर्योधनास अक्षौहिणीसंख्यात्मक कटक (सैन्य) दे (देता झाला). कारण त्याच्या तोंडांतून नकार येईना. पांगळ्यास मरेपर्यंत खटपट केली तरी जसा नाच यावयाचा नाहीं तसा कुलजा (कुलवान् पुरुषाला) नकार यावयाचा नाहीं. ४. गोप. (नारायण नामक योद्धे.) ५. मूर्ख. ६. लेंकरूं. ७. चिंतिलेली वस्तु देणारा मणि. या अर्धांत 'पूर्णोपमा' आहे. ८. कवड्या. ९. कृष्णाकडून कांहींच मदत मिळणार नाहीं असें असतां, त्याच्याकडून बरेंच सैन्य मिळालें म्हणून आनंद पावून व आपली धन्यता वाटून [अज्ञ दुर्योधन] चित्तांत म्हणतो:—(एक अर्बुद नारायण नांवाचे गोप मिळवून) मी अगाध जो शत्रुरूप मत्स्याचा ऱ्हद (डोह) तो रिकामा केला; माझी करामत किती अपूर्व आहे पहा कीं शत्रुरूप (पांडवरूप) मीनांचा ऱ्हद (डोह—मत्स्यास आधार जसा डोह तसा शत्रूंला आधार जो कृष्ण) त्याला अगाध असतांही रिकामा करून टाकला. पांडवांस हटकून मिळणारें सैन्य आपण मिळविलें असें समजून दुर्योधन मनांत मांडे खाऊं लागला. एक अर्बुद गोप जर मला साह्य करण्यास तयार आहेत तर त्यांजपुढें एकट्या कृष्णाचें काय चालणार आहे अशी फुशारकी दुर्योधन मनांत मारूं लागला. पण भ्रांत (बुद्धीस भ्रम झालेला) दुर्योधन हा प्रभु (कृष्ण) अगा (गोवर्धनपर्वताला) धरिता (धरणारा) जाहला हें श्रुत (ऐकिलेलें असतांही) स्मरेना (आठविता झाला नाहीं). भ्रम झालेल्या दुर्योधनाला कृष्णानें करांगुलीवर गोवर्धनपर्वत धरून गोपाळभक्तांचें संरक्षण केलें ही गोष्ट ऐकिलेली असूनही आठवली नाहीं. एक कृष्ण पांडवांकडे गेला तरी पुरे, तो भगवान् काय पाहिजे तें करील, इत्यादि विचार भ्रांत दुर्योधनाच्या मनांत आला नाहीं. कृष्ण हा भक्तांचा कैवारी आहे इतकें जर त्याला आठवतें तर तो त्या कैवाऱ्यासच वरता व मनांत मांडे खाऊं लागला ते न खाता—असा भाव. १०. शत्रुरूप मत्स्यांचा डोह. या सामासिक पदांत 'न'काराला गुरुत्व आलें आहे, कारण त्याच्यापुढें 'ऱ्ह' हा संयुक्त आहे. 'सानुस्वारो विसर्गांतो दीर्घो युक्तपरश्च य:' या वृत्तरत्नाकरस्थ नियमानें मागील 'न'वर्णास गुरुत्व येतें व त्यामुळें एक मात्रा अधिक होते. हें अप्रशस्त होय. ११. अत्यंत खोल. १२. भ्रमिष्ट. १३. ऐकिलेलें. १४. गोवर्धन पर्वतास. (अग=पर्वत.) १५. अ० ७ श्लो० ३५ पहा.

पार्थ म्हणे, 'तूं मुनिनीं चित्तीं षडरिक्षयार्थ धरिलास, ।
हरिला समस्तहि श्रिततताप तुवां म्हणुनि म्यांहि वरिलास. ॥ ९२
'न धरावें शस्त्र' असी प्रभुची आहे जरि प्रतिज्ञा, ते ।
राहो, त्वत्स्मरणेंचि ध्वंसिति कामाद्यरिप्रति ज्ञाते. ॥ ९३
सुगम त्वदाश्रितांला देवेंद्रालाहि अर्थ असुगम जे, ।
त्वत्प्रेक्षितामरांतकसेनांचे लोपतात असु गमजे. ॥ ९४
तूं या धनंजयाचा सारथि करुणानदा! समीरण हो, ।
वाढेल तेज माझें प्रचुर मग करीन दास मी रण, हो! ॥ ९५
व्हावा सारथि समरीं शौरि मनोरथ मनीं असे चिर हा ।

---

१. कामक्रोधादिकषड्वैऱ्यांच्या नाशार्थ. २. कर्मणिप्रयोगांत कर्म प्रथम किंवा द्वितीय पुरुषीं गद्यांत फारसें येत नाहीं, पण पद्यात्मक ग्रंथांत तशीं उदाहरणें कधीं कधीं आढळतात. जसें प्रस्तुत गीतींत 'तूं' हें द्वितीय पुरुषीं कर्मपद आहे. या नियमाचीं अन्य उदाहरणें:—(१) **वरिलासि** मत्सखीनें, म्यांही वरिलासि **तूं** मनें मातें. । पापापासुनि रक्षीं या माझ्या चालवूनि नेमातें. ॥, (२) जाउनि तो सूत म्हणे **कृष्णे!** द्यूतांत **तूं** स्वयें धर्में । **हारविलास,** सुयोधनसदनाप्रति ये करावया कर्में. ॥, (३) प्रभु तिस म्हणे धुवावया **सोडविलीस (तूं)** यशास । जा, **त्यजिलीस.** परकरगता व्हाविस मला कशास. ॥, (४) परमेशा! **(तूं)** मुनिनीं चित्तीं षडरिक्षयार्थ **धरिलास**. ।, (५) प्रद्युम्न म्हणे **केलों** पूर्वीं ऐसाचि **मी** हरें काय. ।, (६) त्यातें प्रद्युम्न म्हणे मायेसि **तुम्हीं दिला** उपाय नसे. ।. ३. घालविला. ४. आश्रितांचा संताप. ५. नाशिती. ६. मदनादि शत्रूंस. ७. सोपें. ८. प्राप्त होण्यास कठिण, अप्राप्य; ज्या गोष्टी इंद्रालाहि असुगम (अवघड, अलभ्य) त्या तुझ्या भक्तांस सहज सुलभ आहेत. ९. त्वां पाहिलेल्या दैत्यांच्या सेनांचे. १०. नाश पावतात, बंद पडतात. तूं (क्रोधदृष्टीनें) पाहिलेल्या अमरांतकसेनाचे (दैत्यसैन्याचे) असु (प्राण) आणि गमजे (चेष्टा,) बंद पडतात. तूं एकदां देवांच्या शत्रूंच्या (दैत्यांच्या) सेनेकडे पाहिलेंस कीं बस, मग त्यांचे प्राण आणि चेष्टा हीं बंद झालींच असें समजावयाचें–तुझा आश्रय मिळाला म्हणजे पुरे आहे. मला तुझी सेना नको, तींत कांहीं हांशील नाहीं–असा अर्जुनाच्या बोलण्याचा भाव. ११. प्राण. १२. चेष्टा. १३. अर्जुनाचा; (पक्षीं) अग्नीचा. १४. सूत; (पक्षीं) साहाय्य करणारा, मदतनीस. या पद्यांत एकंदर चार शब्द श्लिष्ट आहेत. धनंजय=अर्जुन; अग्नि. समीरण=वायु; श्रीकृष्ण. तेज=पराक्रम; धैर्य. प्रखरता=कांति; प्रकाश. १५. वायु. १६. पुष्कळ. १७. शौरि (कृष्ण) समरीं (युद्धांत) सारथि व्हावा हा मनोरथ मनीं चिर (पुष्कळ दिवस) असे (आहे). [येथें प्रथमार्धांत कृष्णाला अनुसरून एकवचन योजिलें आहे, कारण तें मनांत आहे. पण द्वितीयार्धांत जनरूढीला अनुसरून

मत्प्रग्रहप्रतोद स्वीकारुनि मदर्थीं असेचि रहा.' ॥ ९६

स्वजनामरद्रुम प्रभु हांसोनि म्हणे, 'अवश्य तुजला जो ।

अर्थ अपेक्षित तो हो, मातलिसारथि महेंद्र तुज लाजो.' ॥ ९७

असि साधु साधुपतिसीं गांठि पडे, ती जसी अया परिसा; ।

यापरि साचा हाचि प्रेमळ, याच्याचि या जया परिसा. ॥ ९८

---

अनेकवचन योजिलें आहे. एकाच भाषणांत एकवचनांत आणि बहुवचनांत प्रयोग करणें हें प्रेमाचें, सलगीचें अथवा अत्यंत लडिवाळपणाचें सूचक होय असें समजावें. प्रथमार्धांत तृतीय पुरुषीं एकवचन आहे व द्वितीयार्धांत द्वितीय पुरुषीं बहुवचन आहे. याप्रमाणें एकदां एकवचन व लागलेंच बहुवचन योजणें बरें दिसत नसेल तर 'असा चिर हा' 'असाचि रहा' असे पाठभेद कल्पिण्यास फारशी हरकत नाहीं.

१. माझी लगाम आणि चाबूक. २. माझ्या घोड्याचे प्रग्रह (लगाम) आणि प्रतोद (चाबूक) हातांत धरून माझ्या रथावर असेचि (जसे आहां तसे=शस्त्राशिवाय, शस्त्ररहित) रहा (बसा. ३. स्वजनांचा कल्पवृक्ष. ४. इष्ट, वांच्छित. ५. होवो. (अ० ७ श्लो० ३८.) ६. मातलि आहे सारथि ज्याचा (असा महेंद्र). ७. हा चवथा चरण केवळ पंतांच्या पदरचा आहे व यानेंच एकंदर आर्येला विशेष मनोहरत्व व सरसत्व आलें आहे. ८. याप्रमाणें कृष्णार्जुनांची भेट झाली. साधु (अर्जुनाला) साधुपतिसीं (कृष्णाशीं) गांठि पडे (गांठ पडली, भेट झाली). जशी अया (लोखंडाला) परिसाशीं गांठ पडते तशी ही गांठ पडली. ९. लोखंडास. हा 'उपमा' अलंकार आहे. १०. यापरि (याप्रमाणें) हाचि (हा अर्जुनच) साचा (खरोखर) प्रेमळ (प्रेमपूर्ण) [होय]. अर्जुनासारखा प्रेमळ खरोखर अर्जुनच होय. अर्जुनानें अर्बुद सैन्य टाकून शस्त्र न धरणाऱ्या एकट्या कृष्णाला स्वीकारलें म्हणून साचा (खरा) प्रेमळ अर्जुनच होय. अर्जुनाला उपमा अर्जुनाचीच होय. हा 'अनन्वय' अलंकार होय. जेथें ज्याची त्यालाच उपमा दिली असते म्हणजे जेथें उपमानत्व आणि उपमेयत्व हीं दोन्हीं एकाच वस्तूवर असतात, तेथें हा अलंकार होतो; जसें-गगन हें गगनासारखें आहे, रामरावण हे रामरावणोपम होत. याचें लक्षण व उदाहरण—'उपमानोपमेयत्वं यदेकस्यैव वस्तुनः । इंदुरिंदुरिव श्रीमानित्यादौ तदनन्वयः ॥ गगनं गगनाकारं सागरः सागरोपमः । रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव ॥' ११. या अर्जुनाच्या या जया (कृष्णाकडून सारथ्य पत्करविलें या जया-अर्जुनानें आपल्या प्रेमळपणानें कृष्णास वश करून सारथ्य करण्यास लाविलें या जयाला) परिसा (श्रोते हो! ऐका). अर्जुनाच्या कृष्णसारथ्यलाभरूप जयाला ऐका.

भुजबलयुक्तिबळें जो मधुकैटभकातरा अजा तारी, ।
त्या प्रभुला घेउनि ये तो अर्जुन ज्या स्थळीं अजातारी. ॥ १२

## अध्याय दुसरा.

धर्माकडे बहु कटक घेउनि मद्रेश यावया लागे, ।
तत्पूजार्थ सुयोधन अष्टौप्रहर स्वयें सदा जागे. ॥ १
कुरुवरकृतसाहित्यें त्या शल्याचे निवास जे वाटे, ।
ते खोद्यांनींच असें त्याला त्याच्या भटांसही वाटे. ॥ २

---

१. जो (प्रभु कृष्ण) आपलें भुजबल (बाहुसामर्थ्य) आणि युक्ति (कल्पनाचातुर्य) यांच्या बलानें मधुकैटभकातरा अजा तारी (मधु व कैटभ नामक असुरांपासून कातर–त्रस्त–भीत झ्यालेल्या अजा=ब्रह्मदेवाला तारतो). [एकदां विष्णु निजला असतां त्याच्या कर्णमलापासून मधु आणि कैटभ या नांवाचे दोन दैत्य (असुर) उत्पन्न झाले. ते उत्पन्न होतांच विष्णुनाभिकमलस्थ अजाला (ब्रह्मदेवाला) मारण्याला सिद्ध झाले, तेव्हां तो फार घाबरून गेला. त्यामुळें त्याचें कमल कंपित होऊन भगवंताची निद्रा भग्न झाली व ते जागृत झाले. नंतर या दोघां दैत्यांला विष्णूनें मारिलें म्हणून त्याला कैटभजित् आणि मधुसूदन असीं नांवें पडलीं आहेत. महाभारत वनपर्व–अध्याय २०३. ही कथा सप्तशती–अध्याय १ व देवीभागवत–स्कं० १ अध्याय ४-९ यांत ही आहे.] २. मधुकैटभ राक्षसापासून भ्यालेला. ३. ब्रह्मदेवास. ४. या अर्थांत 'पर्यायोक्त' अलंकार आहे. ५. त्या कृष्णाला घेऊन जेथें अजातारि (अजातरिपु युधिष्ठिर) होता तेथें अर्जुन आला. ६. या अध्यायास 'कृष्णसारथ्यस्वीकार' असें नांव दिलें असतां शोभेल. ७. धर्म. ८. सैन्य. ९. अध्याय ८ श्लो० १-६ पहा. १०. मद्रदेशाचा स्वामी. (शल्य.) ११. त्या मद्रेशाच्या सन्मानार्थ. १२. आठ प्रहर. [हा निवळ संस्कृत प्रयोग आहे. असे प्रयोग पंतांच्या काव्यांत पुष्कळ आहेत. या संबंधानें 'निबंधमाला'कार काय म्हणतात तें पहाः—"मोरोपंताच्या कवितेचा दुसरा गुण तिची प्रौढ रचना होय. प्राकृत भाषेच्या अंगीं संस्कृत भाषेचा डौल आणण्याविषयीं प्रस्तुत कवीस पराकाष्ठेची हौस होती असें त्याच्या एकंदर काव्यपद्धतीवरून स्पष्ट दिसून येतें. संस्कृत शब्दांचा चोहोंकडे भरणा, लांबलांब संस्कृत समास, संस्कृत पद्धतीवर केलेले प्राकृत भाषेचे प्रयोग, कोठें कोठें संस्कृत सबंधची सबंध वाक्यें, हे सर्व प्रकार प्रस्तुत कवीच्या कृतींतून आढळतात. आतां या गुणाच्या योगानें प्रकृत कविता केवळ प्राकृत वाचकांस बरीच दुर्बोध झाली आहे खरी, तरी अंमळ वरच्या प्रतीच्या वाचकांस वरील गुणास्तव ती अत्यंत प्रिय झालेली आहे." [निबंधमाला–अं० ६३ पृ० ७-८ पहा.] १३. अध्याय ८ श्लो० ७-१२ पहा. १४. रहाण्याचीं स्थानें. १५. मार्गी. १६. आपल्या उपवनांतच. १७. योद्ध्यांस. भट= योद्धा. 'भटा योधाश्च योद्धारः' इत्यमरः.

जेथें उतरे तेथें सर्व अचिंतित पदार्थ सिद्ध [1]करी, ।
'[2]शल्यासि [3]सुरनगाधिक कुरुपति' हे [4]उक्ति [5]कवि म्हणेल खरी. ॥ ३
त्या साहित्यें शल्य [6]क्षितिपति होउनि बहु [7]प्रसन्नमना, ।
[8]स्वप्रेष्यांसि म्हणे, 'रे! पाचारा [9]पार्थसचिव [10]मन्नमना. ॥ ४
जपला बहु, [11]प्रसादा माझ्या तो [12]धर्मदास [13]भाजन '[14]हो, ।
खसभेहूनि शतगुणें झाल्या मज [15]शर्मदा सभा जन हो! ॥ ५
या तों सभा [16]सभाग्या, जन हो! यातेंचि बहु न बाखाणा, ।
पाहों [17]कूपशतांतुनि एका ऐसा बरें नवा खाणा. ॥ ६
ऐसें जल, ऐसें स्थल, ऐसें आलें कधीं न अन्न [18]मना, ।
मी सुप्रसन्न झालों आणा तो [19]निपुण पुरुष मन्नमना.' ॥ ७
भेटे त्यासि सुयोधन जाणुनियां समय [20]कामलाभाचा, ।
चित्तीं शल्य म्हणे, 'बहु याहुनि भासेल कां मला [21]भाचा?' ॥ ८
आलिंगुनि [22]त्यासि म्हणे, '[23]इष्टार्थ [24]प्राणसमहि मागावा.' ।
[25]आराधिल्या वश न्हे, तरि थोराचाहि न महिमा गावा. ॥ ९
[26]कुरुप [27]म्हणे, 'माझ्या तूं सेनांचा [28]नाथ मद्रपा! हो गा ।
[29]अर्थी [30]जयलाभाचा हा भाचा, हेंचि [31]भद्र पाहो, गा! ॥ १०

१. सुयोधन सिद्ध करी—असा प्रयोग समजावा. २. शल्याला कुरुपति (दुर्योधन) कल्पवृक्षापेक्षांही श्रेष्ठ असा वाटला. अध्याय ८ श्लोक १३ यांत शल्याला इंद्रापेक्षांही आपण श्रेष्ठ असें वाटलें असें वर्णन आहे. ३. सुर+नग+अधिक=देव+तरु+श्रेष्ठ= कल्पतरुहून अधिक. ४. म्हणणें. ५. पंडित, सुज्ञ. ६. पृथ्वीपति. ७. प्रसन्न (संतुष्ट) आहे मन ज्याचें असा. (शल्य.) ८. स्वसेवकांस. (अध्याय ८ श्लो० १३.) ९. पार्थाचा प्रधान. १०. माझ्या नमनास. ११. अध्याय ८ श्लोक १५ पहा. १२. धर्माचा (युधिष्ठिराचा) दास (सेवक) सभाकार पुरुष. १३. पात्र. १४. होवो. १५. सुखदाल्या, सुख देणाऱ्या. [शर्म=सुख, द=देणारीं.] १६. शुभसंपन्ना, वैभवशालिनी. १७. विहिरी. १८. मना येणें=पसंत पडणें, रुचणें, आवडणें. १९. कुशल, कृती, प्रवीण. २०. इष्टार्थप्राप्तीचा. २१. भागिनेय (दुर्योधन). २२. आपलें खरें रूप छपऊन आलेल्या दुर्योधनाला. (श्लो० १६.) २३. इच्छितार्थ. (अ० ८ श्लो० १७ पहा.) २४. प्राणासारखा अमोलिक असला तरी देखील. (श्लो० १६.) २५. हें अर्ध सुभाषितरूप आहे. थोरांची आराधना केल्यावर जर ते वश (अनुकूल) होत नाहींत तर त्यांचा देखील महिमा स्तवूं नये. हें उत्तरार्ध शल्योक्ति मानण्यापेक्षां कव्युक्ति मानणें अधिक प्रशस्त असें समजून त्याचा समावेश शल्यवचनांत केला नाहीं. २६. दुर्योधन. २७. श्लोक १८ पहा. २८. सर्वसेनाप्रणेता. २९. याचक. ३०. हा 'लाटानुप्रास' समजावा. ३१. कल्याण.

**शल्य** म्हणे, 'आराधुनि मागितलें काय ? आणिकहि मागा, ।
चिंतामणि देणारा[1] मागावें काय माणिक हिमागा[2] ?' ॥ ११
भूप म्हणे, 'हेंचि पुरे[3], माझी ईष्टार्थसिद्धि[4] याच वरें, ।
विजयश्री[5] येणेंचि न मजवरि ढाळील[6] काय गा ! चवरें[7] ?' ॥ १२

'**पां**डव पाहुनि येतों[8]' 'यां जा[9], परि संभ्रमा[10] गुता ना कीं, ।
आहेचि धर्मसंभ्रम[11] व्हायाचा प्राप्त मागुता नाकीं[12]'. ॥ १३

---

१. चिंतामणिसारखें अनंतमोल रत्न देणारा जो हिमालय पर्वत त्याजपाशीं माणिकासारखें क्षुद्र रत्न मागणें हें अनुचित होय असें शल्योक्तीचें मर्म आहे. 'माझ्या सेनांचा नाथ हो' हें दुर्योधनाचें मागणें माणिक मागण्यासारखें तुच्छ होय. येथें हिमाग शल्य आणि माणिक 'सेनांचा नाथ हो' असें समजावें. हें 'प्रतिवस्तूपमा' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. २. हिम+अग=बर्फ+पर्वत=हिमालय. [हिमालय हा अनेक रत्नांनीं भरलेला आहे असी समजूत आहे तिला अनुसरून हें वर्णन आहे. 'अनन्तरत्नप्रभवस्य यस्य' इत्यादि वर्णन पहा—कुमारसंभव. स० १ श्लोक ३]. ३. हें दुर्योधनाचें भाषण मुलांत नाहीं. **पं**तांनीं दुर्योधनाच्या स्वभावास अनुरूप अशी उक्ति योजून आपली मार्मिकता आणि कवित्वस्फूर्ति दाखविली आहे. ४. इच्छितार्थाची सिद्धि. ५. 'विजयश्रीनें चवरें ढाळणें' हें वर्णन काव्यभाषेला अनुसरून असल्यामुळें हें उत्तरार्ध फार हृदयंगम उतरलें आहे. विजयश्री ही नायिका आपल्या नायकावर सानुराग चामरें ढाळीत आहे ही कल्पना इष्टार्थद्योतक आहे म्हणून ती फार सुंदर समजली पाहिजे. ६. फिरवील. ७. चमर नांवाचे मृग असतात, त्यांच्या शेंपटाच्या चंवऱ्या (चामरें) करतात. यांच्या शेपटांस केसांचा झुबका अथवा गोंडा असतो, तो चंवरी करण्यास फार उपयुक्त असतो. ८. ही शल्याची उक्ति आहे. पांडवांना भेटून येतो. ९. यावर दुर्योधनाची प्रत्युक्ति आहे. दुर्योधन शल्यास म्हणतो:—या जा (जाऊन या) परि (परंतु) [पांडवकृत] संभ्रमा गुता ना कीं=पांडवांच्या आदरातिथ्यास भुलून गुंतले जाणार नाहीं असें असेल तर या जा. पांडवांच्या आदरातिथ्यास तुमचें मन गुंतणार नाहींना ? मागुता (पुनः) नाकीं (स्वर्गांत) धर्मसंभ्रम (धर्माचरण केल्यानें प्राप्त होणारा आदर—मला दुर्योधनाला वचन दिल्याप्रमाणें वर्तन ठेविल्याचें फळ, सत्यवचनपालनरूप धर्माचें फळ, धर्ममार्गलब्ध आदर) प्राप्त व्हायाचा (मिळायाचा) [आहे]. स्वर्गीं मिळणाऱ्या धर्मादराला टाकून पांडवाच्या अत्रस्थ आदराकडे वळूं नका, भेटायास जाणार तर जा, पण मला वचन दिल्याची आठवण ठेवा—असा दुर्योधनाचा भाव. 'वरदानं स्मरय नः'=आम्हाला दिलेल्या वरदानाचें स्मरण ठेवा=असेंच मूळांत आहे. [श्लो० २२]. १०. आदरसत्कारा. ११. धर्मादर. वचन पालण्याचा धर्म राखल्यामुळें होणारा संभ्रम (आदर—मान). शल्यानें दुर्योधनास वचन दिलें होतें तें पालणें हा धर्म. (गी० १०-११). १२. स्वर्गीं.

उक्तिप्रत्युक्ति अशा झाल्या, गेले निघूनि ते राजे,[1] ।
बाहेर[2] शल्य देखे होते हृदयांत अब्द[3] तेरा जे. ॥ १४
आलिंगितां प्रमोदें[4] पांडुसुतांनीं नमूनि मद्रप हा ।
धर्मासि म्हणे, 'साधो ! निजसाधुत्वेंचि[5] साधुभद्र[6] पहा. ॥ १५
तूं राम[7]सम समर्थ प्रभु पुण्यश्लोक[8] लोकमत[9], राया ! ।
अज्ञातवास दुस्तर बा ! त्वदितर[10] यासि योग्य न तराया.' ॥ १६
पूजा करितां शल्य, स्तुति करितां धर्महो, बसे उगला[11]. ।
पूज्यत्वें स्तुत्यत्वें ते न, परि ग्रंथ मात्र हा फुगला. ॥ १७
शल्य म्हणे, 'बा ! म्यां तो ऐसा[12] दुर्योधना दिला वर, हो ! ।
तुज आशीर्वाद[13] असा कीं 'धर्मा ! धार्मिका ! ईलावर[14] हो'. ॥ १८

---

१. शल्य राजा पांडवांकडे गेला व दुर्योधन राजा स्वगृहीं गेला. २. जे (पांडव) तेरावर्षें शल्याच्या हृदयांत होते त्यांना शल्य आतां [हृदया] बाहेर देखे (पाहे). तेरावर्षें वनवासांत असल्यामुळें जे दृष्टीस पडले नाहींत ते पांडव शल्य आतां प्रत्यक्ष पाहता झाला. ज्या पांडवांना शल्यानें तेरा वर्षें आपल्या हृदयांत ठेविलें होतें त्यांना आतां बाहेर मूर्तिमंत पाहिलें. ३. वर्षें. ४. आनंदानें. ५. क्षमा दम सत्य अहिंसा इत्यादि साधुत्वानें (श्लो० ३५-३६) ६. उत्तम कल्याण. ७. रामानें जसा सुदुष्कर वनवास केला तसा धर्मानेंही केला. या कथेकडे कविकटाक्ष आहे. ८. पवित्रकीर्ति. [पुण्यदायकः श्लोको यशश्चरित्रं वा यस्य स पुण्यश्लोकः; 'पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः । पुण्यश्लोका च वैदेही पुण्यश्लोको जनार्दनः ॥' हा श्लोक सुप्रसिद्ध आहे.] ९. लोकमान्य. १०. तुझ्या खेरीज. ११. उगीच. १२. अशा प्रकारचा वर दिला. मी तुझा सेनानायक होईन—असा वर दिला. १३. 'तूं राजा हो' असा तुला आशीर्वाद दिला. वर आणि आशीर्वाद यांत भेद आहे. वर प्राप्त होण्यास सेवेची अपेक्षा असते, तशी आशीर्वादास नसते. एखाद्याची जेव्हां बरेच दिवस सेवा करावी तेव्हां तो प्रसन्न होऊन वर देतो. परंतु आशीर्वाद हा कोणी सहजही देतो. वर प्राप्त होण्यास प्रयास पडतात आणि आशीर्वाद सुलभ रीतीनें अप्रयासानें प्राप्त होतो. रावणानें फलाच्या इच्छेनें जेव्हां तपश्चर्या केली तेव्हां ब्रह्मदेवानें त्यास वर दिला. बिभीषणानें रामाची निष्काम भक्ति केली तेव्हां रामानें त्यास आशीर्वाद दिला. वर देणाराचे खुषीविरुद्ध मिळतो, पण आशीर्वाद तसा मिळत नाहीं. वर मोबदल्यानें मिळतो पण प्रेम उत्पन्न झाल्याशिवाय आशीर्वाद मिळत नाहीं. सकाम भक्तीचें फळ वर, व निष्काम प्रेमभावाचें फळ आशीर्वाद. राक्षसांना प्रथम वर द्यावयाचे आणि नंतर त्यांचा नाश करावयाचा अशा कथा आहेत. परंतु ज्यांना आशीर्वाद मिळतात त्यांचा नाश आशीर्वादकांकडून झाल्याची पौराणिक कथा कोठेंही नाहीं. दुर्योधनानें शल्याची सेवा केली म्हणून त्यास वर मिळाला, पण पांडवांनीं नुसतें त्याचें पूजन केलें म्हणून

प्रथम 'तथास्तु' मग [1]म्हणे, 'वरदान तुम्हांसि उचित मामातें, ।
[2]तप्ता गजासि [3]गंगा तशि हे [4]आशीहि [5]शुचितमा ! मातें. ॥ १९
तुजकरवीं कर्णाचें सारथिपण [6]धार्तराष्ट्र करवील, ।
पसरील [7]पदर, तेव्हां [8]सारथ्यगुणप्रतोद धरवील. ॥ २०
'[9]तेजोवध कर्णाचा अर्जुन वांचावया करावा,' हें ।
दे दान, 'करीन' असें म्हण, आण न बा ! [10]दयाकरा ! वाहें.' ॥ २१
मद्रप म्हणे, '[11]करीन, स्वस्थ रहा, दुःखसिंधु आटेल, ।
वाटेल स्वप्न तसें, त्वत्कीर्ति त्रिभुवनांत दाटेल. ॥ २२
[12]बलवत्तर विधि[13] देतो थोराला [14]थोरल्यांचि तापातें, ।
इंद्रप्रमुखसुरांसहि जें [15]भावि न [16]लंघवेचि बापा ! तें. ॥ २३
पावे [17]सभार्य शक्रहि पूर्वीं बहु दुःख, ऐक बापा ! तें, ।
कीं होय [18]विश्वरूप ब्राह्मण मारूनि पात्र तापातें. ॥ २४
त्यावरि [19]वृत्रवध करी आधीं देऊनि त्यासि विश्वास, ।
ब्राह्मण[20]वधानृतानें लाजे, दावी न वदन [21]विश्वास. ॥ २५
शक्र [22]जळांत, [23]मखादिक सद्व्यवहारहि [24]अराजकांत, बुडे. ।
उत्सव पळे, बलावी [25]ताप मुनित्रिदशचित्तरूप [26]हुडे. ॥ २६

---

त्यांस आशीर्वाद. आशीर्वादाचें लक्षण असें आहे:—'वात्सल्याद्यत्रमान्येन कनिष्ठस्याभिधीयते । इष्टावधारकं वाक्यं आशीः सा परिकीर्तिता ॥.' 'संतुष्ट देवादीनां अवश्यं भाविफलकं वचनं वरः । शुभाशंसनरूपत्वादनियतफणकं त्वाशीः' १४. इला+वर=पृथ्वी+पति.

१. धर्म म्हणे—असा संबंध. २. तापलेल्या. ३. श्लोक ४३ पहा. ४. आशीर्वाद. ५. अति पवित्रा ! ६. दुर्योधन. ७. पदर पसरणें=अत्यंत दीनवाणीनें प्रार्थना करणें. ८. सारथ्यगुण+प्रतोद=सारथ्य संबंधी दोऱ्या (लगाम)+चाबूक. ९. तेजोभंग (श्लोक ४४) उत्साहभंग. १०. दया+आकार=दया+खाण. ११. कर्णाचा तेजोवध करीन असा भाव १२. अतिबलिष्ठ. १३. दैव. 'विधिर्हि बलवत्तरः' असें मूळांत आहे. (श्लो० ५२.) १४. हें पूर्वार्ध सुभाषितरूप आहे. १५. होणारें. १६. न टाळवे. १७. भार्येसहित. १८. विश्वरूप हा देवश्रेष्ठ जो त्वष्टा नामक प्रजापति त्याचा पुत्र, याला 'त्रिशिरा' असेंही नांव होतें. याला सूर्य चंद्र वन्हि यांसारखीं तीन मुखें होतीं. १९. वृत्र नामक असुराचा वध. २०. ब्रह्महत्या (विश्वरूपवध) आणि अनृत (असत्य भाषण) येणेंकरून. २१. लोकांस. २२. इंद्र पाण्यांत लपून राहिला (अ० १० श्लो० ४६.) २३. यज्ञादिक. २४. राजा नाहीं अशा स्थितींत. २५. मुनित्रिदशचित्तरूप हुडे ताप बलावी=ऋषि आणि देव यांचीं चित्तें हे हुडे (बुरुज) यांस ताप (अराजकानें झालेला ताप) बलावी, (जबरीनें घेई), तापानें मुनिदेवांच्या चित्तरूप बुरुजाचा आश्रय

देवांनीं सन्मुनिंनीं देउनि वर नहुष[1] अमरपति केला[2]. ।
स्पर्शावया शचीला[3] पाहे, दव[4] जेंवि कल्पलतिकेला[5]. ॥ २७
सुरमुनिसन्मंत्रांहीं[6] कांहीं नाहींच नहुख[7] वळला हो ! ।
भाग्यमदांत मनोभूग्रग्रह[8] शिरतांचि बहु खवळला हो. ॥ २८
गुरुला[9] शची म्हणे, 'हो ! नहुषीं कांहींच धर्म नय[10] नाहीं, ।
कैसें तुम्हीं पहावें ऐसें हें पापकर्म नयनांहीं[11] ? ॥ २९
न परस्पर्श स्वप्नीं तुमच्या या धर्मकन्यकेला[12] हो[13], ।
प्राणत्याग सतींनीं केला कीं अन्य कांत केला हो !?' ॥ ३०
तीस गुरु म्हणे, 'वत्से ! धैर्य असों दे, उगी, नकोचि रडों, ।
माझ्या माथां दे हें[14] तूं या चिंताभरें नको चिरडों'[15]. ॥ ३१
सभय सुरर्षिहि म्हणती, 'शचि ! हा अत्युग्र[16] नहुष, न भला गे ! ।
हूं म्हण, बाई ! याच्या धाकें कांपावयासि नभ लागे. ॥ ३२

---

केला. मुनि आणि देव यांचीं मनें तापानें व्याप्त झालीं. २६. हुडा=बुरुज–उदाहरण–मेरु ऐसे लंकेचे हुडे । कैसा जाशील तयापुढें । स्वर्गींचा हुडा अकस्मात् । उर्वीवरी जैसा पडत॥ हुडा हा शब्द जुन्या बखरींत पुष्कळ आढळतो.

१. नहुष राजा हा ययातिराजाचा पिता. हा इंद्रपद पावला असतां यास इंद्राणीविषयीं कामवासना उत्पन्न झाली. तिजकडे जाण्यासाठीं यानें आपल्या वाहनास सप्तर्षींस लाविलें व त्यांत बसून तो जाऊं लागला. वाटेंत यानें 'सर्प सर्प (चला चला)' असें म्हणून वाहनवाहकांस लत्ताप्रहार केला. तेव्हां क्रोधाविष्ट होऊन 'तूं स्वर्गापासून पतन पावून साप होशील' असा शाप अगस्त्यमुनीनें दिला, या कथेकडे येथें लक्ष्य आहे. २. इंद्र केला. [देवांचा राजा इंद्र हा विप्रवधानें आणि अनृतानें स्थानभ्रष्ट झाला म्हणून त्याच्या स्थानीं नहुष राजाची स्थापना ऋषि आणि देव यांनीं केली. नहुषाला राज्याभिषेक झाल्यावर इंद्रपत्नी शची हिनें आपली सेवा करावी अशी इच्छा झाली. नहुषाची इच्छा जाणून इंद्राणीला फार वाईट वाटलें. ती बृहस्पतीला शरण गेली व त्यानें तिचें रक्षण करण्याचें कबूल केलें]. ३. इंद्राणीस. ४. दवाग्नि. ५. कल्पवल्लीस. ६. हितबोधांनीं. ७. नहुष. ८. मनोभू+उग्र+ग्रह=मदनरूप उग्र ग्रह. ९. बृहस्पतीला इंद्राणी म्हणाली (अ० ११ श्लो० २०-२३ पहा.) १०. न्याय. ११. नेत्रांहीं. १२. धर्मानें झालेली कन्या–इंद्राणी. १३. होवो. १४. चिंताभर. १५. येथें इंद्राणी आणि गुरु यांचीं जीं भाषणें आहेत तीं मूळांतील श्लो० २०-२५ यांशीं ताडून पहावीं म्हणजे बिंब आणि प्रतिबिंब यांत सरस कोणतें हें सहज कळेल. पंताच्या पद्यांत मार्दव, प्रसंगानुरूप्य आणि प्रागल्भ्य यांचा अंश ज्यास्त आहे असें दिसून येईल. १६. अति उग्र=अतिभयंकर.

अजि! आचार्य[1]! तुम्हीं तरि सांगा[2], जरी काय नहुष पाहेल, ।
राहेल[3] तेज न किमपि, याचा दृक्पात[4] कोण साहेल?' ॥ ३३
जीवे[5] म्हणे, 'हो[6] कांहीं, त्यागावें केंवि शरण[7] आलीला[8]? ।
मी काय[9]? सत्क्रियांचि[10] व्यसनीं[11] या न त्यजील आलीला[12].' ॥ ३४
नहुषासि स्वमुखेंचि प्रार्थाया[13] युक्ति सत्वरा शिकवी, ।
धाडी सतीस[14], अवना[15] आशी देऊनि, सत्वराशि[16] कवी[5]. ॥ ३५
तो[17] पाहुनि तीस म्हणे, 'ये, मज भज, सुमुखि! पावलों सुरता[18]. ।
झालों इंद्र जगाचा, मग मजसीं इच्छिसी न कां सुरता?' ॥ ३६
प्रार्थुनि शची म्हणे[19], 'द्या कांहीं अवकाश या नतजनातें[20], ।
'नाहींच हरि[21]' असा हो निश्चय[22], मग मी करीन भजनातें.' ॥ ३७
नहुष[23] म्हणे, 'जा, वेड्ये! जोडुनियां पापविसर[24] त्या पतितें[25] ।

---

१. हे बृहस्पते. २. समजावा, बोध करा (शचीला). शचीनें नहुषाच्या इच्छेस अनुसरावें–असा तिला बोध करा. ३. कदाचित् हा काय (देह) नहुष पाहेल (पाहील)=जर हा देह नहुषाच्या दृष्टीस पडला, तर त्याचें तेज (पातिव्रत्त्यरूप तेज) मुळींच उरणार नाहीं. या नहुषानें नुसतें एकदां जर कोणाकडे पाहिलें, तर त्याचें तेज तेव्हां नष्ट व्हावयाचें; याचा दृक्पात कोण साहेल?=या नहुषाचा दृष्टिपात सहन करण्यास कोण समर्थ आहे? नहुषाची उग्र दृष्टि सोसणारा कोणी नाहीं असा भाव. ४. दृष्टिपतन. ५. बृहस्पति. ६. कांहीं होवो. ७. अ० ११ श्लोक १८ पहा. ८. आलेल्या शचीला. ९. मी काय यःकश्चित् पुरुष. मी कोण हिचें रक्षण करणारा? मला हिचें रक्षण करण्यास कोठें सामर्थ्य आहे? येथें 'काय' हा शब्द तुच्छपणा दाखवितो. १०. सदाचरण, पुण्य कर्म. ११. संकटांत. १२. सखीस. १३. नहुषाकडे जाऊन इंद्राणीनें त्याची प्रार्थना करावी व कांहीं कालाचा नियम करावा–अशी युक्ति बृहस्पति देवांच्या मार्फत इंद्राणीला शिकवी (श्लो० २६-३०.) १४. पतिव्रतेला (शचीला) उपदेश करून नहुषाकडे पाठवी. १५. रक्षणाकरितां आशीला बरोबर देऊन. येथें आशीही रक्षण करणारी कोणी स्त्रीच काय असा भाव. १६. धैर्यनिधि, गांभीर्यनिधि. १७. तो (नहुष आलेल्या इंद्राणीला पाहून) म्हणतो. १८. देवपणा. १९. अध्याय १३ श्लो० १-२ पहा. २०. नम्रजनास. २१. इंद्र. २२. इंद्र कोठेंही नाहीं असा मनाचा निश्चय झाला म्हणजे मी तुलाच भ्रतार करीन–असा भाव. २३. नहुष म्हणे:–जा, वेड्ये! त्या पतितें (त्या पापी इंद्रानें) पापविसर जोडुनियां केंवि वांचावें? [इंद्र कदाचित् जिवंत असेल अशी शंका शचीनें दर्शविली तिचा निरास करण्यासाठीं नहुष म्हणतो] अग जा, वेडी कुठली! त्या पातकी इंद्रानें पापाचा समुदाय संपादून (पुष्कळ पाप जोडून) वांचावें असें संभवनीय तरी आहे काय? [नाहीं–हें उत्तर.] [हे वेड्ये इंद्राणि!] धर्मन्याय विसरल्या पतितें तूं विसर=धर्म आणि न्याय यांस विसरणारा जो पति (नवरा–इंद्र) त्यातें विसर (स्मरूं नको) तो कधींच मेला असेल, त्यातें आतां आठवीत बसूं नको. २४. पापसमुदाय. २५. पतन पावलेल्यानें.

वांचावें केवि? विसर तूं धर्मन्याय विसरल्या पतितें[1]. ॥ ३८
जा शचि! नाशचि झाला, प्राप्त महाघें[2] करूनि पहिल्याला[3], ।
असलाहि[4] काय पापी? कैसा आलिंगवेल अहि ल्याला[5]? ॥ ३९
जा, अवकाश दिला, परि सत्वर हो पूर्णकाम[6], हो दारा[7], ।
राज्यश्री ज्या भजली, तूं न भजसि तूर्ण[8] कां महोदारा[9]?' ॥ ४०
आली पुन्हा गुरुकडे, मग तो देवांसमेत विष्णूतें ।
प्रार्थी, म्हणे, 'प्रभो! हो[10], अघ[11] जाउनि, राज्यलाभ जिष्णूतें[12].' ॥ ४१
'हयमेध[13] जिष्णुकरवीं करवा, विजया सुखा मग न वाणी[14].' ।
निर्जरकर्णचकोरज्योत्स्ना[15] असि जाहली गगनवाणी[16]. ॥ ४२
दूर उडविला होता जो केवळ तूलसाचि[17] अघवातें[18], ।
तो हुडकिला सुरांनीं[19], करिता झाला सुकर्म[20] मघवा[21] तें. ॥ ४३

---

१. पतीस (इंद्रास.) २. महापापें. ३. पहिल्या पतीला ४. जरी तो पापी जीवंत असला तरी त्याचें आतां काय प्रयोजन? तो आतां कोणत्या कामाचा? ५. सर्प धारण केलेला.(जो) अहि ल्याला (तो) कैसा आलिंगवेल–असा अन्वय. ६. पूर्णमनोरथ. ७. पत्नी. पंतांनीं नहुषाच्या भाषणाचा मूळापेक्षां विस्तार केला आहे आणि तो फार सुरस आहे. मूळांत या तीन आर्यांच्या ऐवजीं एक श्लोक आहे. [अ० १३ श्लो० ७] ८. लवकर. ९. महा उदारा. प्रशस्तमनस्का. १०. होवो. ११. पाप. १२. इंद्रास. १३. अश्वमेध. १४. कमताई. १५. देवाच्या कर्णचकोरास चंद्रप्रभेसारखी. १६. आकाशवाणी. १७. कापसासारिखा. १८. पातकरूप वायूनें. १९. देवांनीं शोधून काढिला. ज्या देशामध्यें इंद्र होता त्या देशांत सकल देवांनीं जाऊन इंद्राचें ब्रह्महत्येचें पाप जावें म्हणून एक मोठा अश्वमेध याग केला. त्यांनीं ब्रह्महत्येचे पांच विभाग केले. एक वृक्षांचे ठायीं, एक नद्यांचे ठायीं, एक पर्वतांचे ठायीं, एक पृथ्वीचे ठायीं आणि एक स्त्रियांचे ठायीं. असे पांच भाग करतांच शक्र निष्पाप आणि शुचि झाला. नंतर तो नहुषाकडे आला. दुःसह अशा नहुषाला पाहून इंद्र पुन्हा भयानें पळाला. हें पाहून इंद्राणी दुःखानें विलाप करूं लागली. नंतर उपश्रुति नामक संदेहनिर्णायिका देवीचें तिनें स्तवन केलें; तेव्हां ती प्रसन्न होऊन तिच्यापुढें उभी राहिली व इंद्राणीला शक्र दाखविण्याचें तिनें वचन दिलें. नंतर त्या दोघी जणी हिमालय पर्वताच्या उत्तरपार्श्वभागीं समुद्रतीरीं गेल्या. तेथें एक मोठें द्वीप होतें. त्यांत एक दिव्य सरोवर होतें. त्यांत एक मोठी कमलिनी होती. त्या कमलिणीच्या देंटांत उपश्रुति देवी आणि इंद्राणी या शिरल्या. तेथें त्यांनीं सूक्ष्मरूपधारी इंद्रास पाहिलें. शचीनें त्याचें स्तवन करून नहुषाचें सर्व वृत्त त्यास कळविलें. त्यानें नहुषाच्या पराभवाचा उपाय (गीति ५३ पहा) सांगून तिला परत पाठविलें [अ० १३-१४.] २०. हयमेधकर्म. २१. इंद्र

झाला शुंचि[1] परि भ्याला त्या नहुषाच्या असह्य वरतेजा[2], ।
पाहों न शके भगवान् भानुहि[3] डोळे करूनि वरते ज्या[4]. ॥ ४४
पुनरपि हरि[5] शतयोजनविस्तृत[6]कासारपद्मनालांत ।
बिसतंतु[7]माजि राहे, जो मान्य समस्त लोक[8]पालांत. ॥ ४५
नेली शची उपश्रुतिदेवीनें त्याहि नलिन[9]नालांत, ।
त्यांसि म्हणे सुर[10]पति, 'या ऐशा कां संकटांत आलांत?' ॥ ४६
प्रार्थुनि शची[11] म्हणे, 'व्हा प्रकट, धरा वज्र तेज उत्साहा, ।
अज्ञातवास न भला, प्रभुजी! प्रसवेल फार कुत्सा[12], हां[13]! ॥ ४७
त्यागावया शचीला न तुम्हीं हरि[14] योग्य[15], तोहि न रमेला, ।
भोगुनि तुमच्या श्रीतें, टपतो स्त्रीतेंहि नहुष नर मेला. ॥ ४८
तुमच्या पदच्युतिस्तव मजहुनि बहु नित्य अभ्रमु[16] रडे हो ।
नाथ! वळा जी! चातकरुत[17] आइकतांचि अभ्र मुरडे[18], हो!' ॥ ४९
शक्र म्हणे, 'नहुषाचें दुःसह वरतेज साहवेना तें; ।
हेंही न सोसवे[19] जें आपत्पूरांत[20] वाहवे नातें[21]. ॥ ५०
मी किति तद्दृष्टिपुढें? निजतेज न रक्षिजेल मत्तातें[22]; ।
श्रीमद[23] करिल पदच्युत अल्पें काळें तया प्रमत्तातें[24]. ॥ ५१

---

१. धूतपाप, विज्वर (अ० १३ श्लो० १०). २. श्रेष्ठतेजास. ३. सूर्यहि. ४. ज्या नहुषाला. ५. इंद्र. ६. शतयोजन विस्तार ज्या सरोवराचा त्यांतील एका कमलाच्या देंटांत. ७. कमलाच्या देंटाच्या आंतील भागांत (अ० १४ श्लो० ९-११). ८. इंद्र, अग्नि, यम, वायु, इत्यादि लोकपालांत. ९. नलिन+नालांत=कमलाच्या+देंटांत. १०. इंद्र (अध्याय १४ श्लो० १४). ११. श्लोक १५–१८ पहा. १२. अपकीर्ति. १३. हा अज्ञातवास निंदा उत्पन्न करील. १४. इंद्र; पक्षीं (विष्णु) 'हरि' शब्द श्लिष्ट समजावा. जसें लक्ष्मीत्याग करणें विष्णूला योग्य नाहीं, जसें शचीत्याग करणें इन्द्राला योग्य नाहीं. १५. 'न तुम्ही हरि योग्य तेहि न रमेला' असाही पाठ आहे. १६. ऐरावताची स्त्री. १७. चातकाचा शब्द. १८. वळतो. १९. नहुष म्हणतो–एक पक्षीं नहुषाचें दुःसह तेज सहन करवत नाहीं [म्हणून काय होईल तें होवो असें म्हणून स्वस्थ रहावें, तर तसें ही करवत नाहीं] दुसऱ्या पक्षीं स्वस्थ वसावें तर विपत्तिरूप पाण्याच्या लोटांत जें नातें (शची माझी पत्नी व मी तिचा भर्ता हा संबंध) वाहवे (वाहून जात आहे) हेंही न सोसवे ( सहन करवत नाहीं–तें नातें असून नसून सारखेंच झालें आहे म्हणून तें संताप उत्पन्न करतें). २०. विपत्तिरूप पूरांत. २१. संबंध. या विपत्तीच्या लोटांत आमचें नवरावायकोचें नातें नाहींसें होत आहे–हें सहन करवत नाहीं. २२. माझ्या तातें (ब्रह्मदेवानें). २३. लक्ष्मीचा गर्व. २४. माजलेल्या नहुषातें.

जरि खलपरपुरुषाचें असदुक्त तुझ्या मनासि बहु खातें, ।
तरि जाचि, भेट, मतिमति! सति! अतिरतिदाससीच नहुखातें.॥९२
म्हण, 'मजकडे महर्षिस्कंधीं देऊनियां स्वशिबिका या, ।
हें मत्प्रिय बहु काय? च्छेदी पक्षिप्रियार्थ शिबि काया'. ॥ ९३

---

१. वाईट भाषण. २. हे बुद्धिमति. ३. रतीच्या दासीसारखी (कामज्वरपीडित असा भाव). ४. 'सति अतिरतिदा तसीच नहुखातें' असाही पाठ आहे. ५. नहुषातें. ६. हा कथांश सुभानंत स्वामींनी कसा वर्णिला आहे पहाः— 'सांगणें आलिया तुजप्रती । त्यांसीं प्रबोधीं एक युक्ती । नूतनयानीं सुरपती । म्हणे यावें आरोढूनी ॥ ६६ ॥ जरी लंघिसी माझें वचन । तरि मी जाईन त्यागून । आरूढतांची नूतन यान । अंगीकारीन पैं तूतें ॥ ६७ ॥ ऐसें सांगणें पाठवीं राया । तंव तो द्विजीं करील बैसावया । त्यासी शाप देऊनियां । तत्काळ अधःपातन करूं॥६८॥ सहसा तुझिया धर्मा हानी । न होय माझिया वरदानीं । ऐसें तियेतें बोलोनी । जाता झाला आश्रमीं ॥ ६९ ॥ दूतांप्रति बोले सती । म्हणे विदित करा नृपती । जरी तूं होणार माझा पति । तरी एक विनंती परिसावी ॥ ७० ॥ 'नूतन यानीं आरुढोनी । शीघ्र यावें माझ्या सदनीं । माझी प्राप्ति तुजलागोनी । होईल जाण सर्वथा ॥ ७१ ॥ उल्लंघोनी येतां माझें वचन । जाईन त्यजूनि क्षोभून' । दूतें सांगतां वर्तमान । संतोष नहुषें मानिला ॥ ७२ ॥ 'अवश्य' म्हणे नहुषनृपती । म्हणे आहे स्वल्प गुंती । मग वाहनार्थी उपाय चिंती । सभास्थानीं नृपनाथ ॥ ७३ ॥ ऐरावती इंद्रवाहान । अश्व तो धनेशाचा जाण । वृषभ तो शिववाहान । मेढवाहान तो अग्नी ॥ ७४ ॥ महिषवाहान वैवस्वतपुत्र । गृध्रवाहान शनैश्वर । सिंहवाहान चंद्रकुमर । व्याघ्रवाहान चंडिका ॥ ७५ ॥ हंसवाहन सरस्वती । आणि आरुढे प्रजापति । गरुडवाहान श्रीपती । काकवाहान यमदूता ॥ ७६ ॥ शिखिवाहान स्वामी कार्तिक । मूषकवाहन विनायक। वानर श्रीरामासी झाले वाहक । मृगवाहान चंद्रमा ॥ ७७ ॥ मनुष्यवाहान नैऋत्यनाथ । मकरवाहान वरुण विख्यात । हरणीवाहान नैऋत्यनाथ । प्रेतवाहान उत्तरे ॥ ७८ ॥ एवं धुंडाळितां सकळ । अनुच्छिष्ट न दिसे निर्मळ । बोलतां मन झालें विकळ । कामभरें करोनी ॥ ७९ ॥ म्हणे दीर्घ विचारितां । विलंबें कार्य नासे सर्वथा । तरी कोण बैसल्या ऋषींच्या माथां । शीघ्र काळें विचार॥८०॥ विचारें पाहतां वित्पती । एकावरी एक बैसले होती । ब्राह्मणमाथां यया जगतीं । नाहीं कोण बैसला ॥ ८१ ॥ ऐसा निश्चय करोनी । पाचारिले तापसी मुनि । बैसोनियां त्याचे मूर्ध्नीं । शचीप्रती जाऊं पाहे' ॥ ८२ ॥ [सुभानंतस्वामिकृत उद्योगपर्व–अध्याय १०]. ७. मोठ्या ऋषींच्या खांद्यावर. ८. आपली पालखी. ९. अध्याय १५ श्लोक १-४ पहा. १०. शिबिराजा. शिबि–हा सोमवंशीय उशीनरराजाचा ज्येष्ठ पुत्र. या राजाविषयीं दोन कथा महाभारतांत आहेत, त्यांतून पहिलीचा येथें उल्लख आहे ती अशीः–शिबिराजाची परीक्षा करण्याकरितां इंद्रानें श्येनाचें रूप घेतलें व अग्नीनें कपोताचें रूप घेतलें. नंतर

जाय शची, शक्र म्हणे, 'पावो श्रीभगवती उमा नवसा.'[1] ।
राहे उगाचि विधिवरि[2] भर घालुनि संकटीं सुमानवसा. ॥ ९४
देवी नहुषासि[3] म्हणे, 'कथिन प्रियवचन, जरि न फिरवाल, ।
बैसुनि अपूर्वयानीं[4] जरि या अमरावतींत[5] मिरवाल. ॥ ९५
जरि अद्भुत प्रताप प्रकटूनि, कराल मन परम हर्षी[6] ।
होइन वशगा[7], जोडा शिबिकेसि समाधिधनपर महर्षी.[8]' ॥ ९६
बहुखल नहुख[9] लवकरी स्त्री हरिची आपणासि वशगा[10] हो[11] ।
म्हणुनि चढे ऋषियानीं, गंधर्वाला म्हणे, 'स्वयश गा हो!' ॥ ९७

---

श्येन आपले पाठीस लागला आहे अशा मिषानें कपोत उशीनर राजाजवळ आश्रयार्थ आला. त्यास आश्रय मिळाला हें पाहून 'माझा भक्ष्य मला दे' असें श्येन म्हणूं लागला. तेव्हां कपोताचे भारंभार उशीनर राजानें आपल्या शरीराचें मांस श्येनास देण्याचें कबूल केलें. परंतु शरीराचा बराच भाग तोडून तराजूंत घातला तरी कपोत जडच येऊं लागला, तेव्हां उशीनर स्वतःच पारड्यांत बसला. तें पाहून उभयतां संतुष्ट होऊन आपलीं रूपें प्रगट करून वर देऊन गेले. (महाभारत–वनपर्व–अध्याय १३०-१३१) याप्रमाणें प्रथम कथा झाली. द्वितीय कथा आहे ती अशीः–या राजाचें सत्व पाहण्यासाठीं ब्रह्मदेव विप्ररूपानें आला आणि त्यानें राजाच्या पुत्राचें (बृहद्गर्भाचें) मांस खावयास मागितलें. राजानें मांस शिजवून तयार केलें, पण विप्र कोठें दिसेना, तेव्हां मांसपात्र मस्तकावर घेऊन राजा विप्राचा शोध करीत फिरूं लागला. तों तो विप्र राजमंदिरास आग लावीत आहे असें यानें पाहिलें. पण मनांत विकल्प न धरतां राजानें विप्राची प्रार्थना करून 'सिद्ध केलेलें मांस स्वीकारावें' अशी विनंति केली. 'मी तें खात नाहीं, तूंच तें खा' असें प्रत्युत्तर विप्रानें केलें. त्याप्रमाणें राजा ते मांस खाणार तों ब्रह्मदेव प्रसन्न होऊन, स्वरूप प्रकट करून, राजास आशीर्वाद देऊन त्याचा पुत्र पूर्ववत् सजीव करून अंतर्धान पावला अशी कथा आहे. (महाभारत–वनपर्व–अध्याय १९४-१९८.)

१. याला मूळांत आधार नाहीं. 'नवसाला पावणें'=इष्टार्थप्राप्तीसाठीं देवादिकांस केलेला संकल्प (अर्ज–प्रार्थना) सफळ करणें. देवी नवसाला पावली=पुत्रलाभ, संकटविमोचन, सुरक्षित प्रत्यागगन, सुख प्रवास इत्यादि इष्टार्थ प्राप्त होण्यासाठीं देवीला केलेली प्रार्थना देवीनें प्रसन्न होऊन सफळ केली. २. दैवावर. ३. अध्याय १५ श्लोक ९–१५ पहा. ४. अश्रुतपूर्व अथवा अदृष्टपूर्व अशा वाहनांत. ५. इंद्रनगरींत. [अमराः सन्त्यस्याम् इति अमरावती=जींत अमर (देव) असतात ती अमरावती.] ६. आनंदित. ७. अनुकूल. ८. समाधि (चित्तैकाग्र्य) हेंच धन ज्यांचें असे जे मुनी त्यांत श्रेष्ठ. ९. येथें 'ख' अक्षराची आवृत्ति साधण्यासाठीं 'नहुख' असें पद योजिलें आहे. १०. आज्ञाधारक. ११. होवो.

मुनि म्हणति, 'देवराया! ऐसें हें अयश हीन कां गावें? ।
गोप्रोक्षणमंत्र तुम्हां प्रमाण कीं अप्रमाण सांगावें' ॥ ९८

---

१. गो+प्रोक्षण+मंत्र= गाई+उपाकरणमारणादि संस्कार, यज्ञार्थ पशुहनन+वेदमंत्र=यज्ञांत गोवध करावा अशाविषयीं जे मंत्र आहेत ते तुला मान्य आहेत किंवा अमान्य आहेत? [अ० १७ श्लो० ९ टीका पहा.] मान्य आहेत असें उत्तर द्यावें तर गोवध मान्य असें होतें. अमान्य आहेत असें म्हणावें तर वेदमंत्राची अवमानना होते. असा दोन्ही बाजूनीं अडचण करणारा हा प्रश्न आहे. **गोप्रोक्षणमंत्र**—हा सामासिक शब्द विशेष लक्ष पुरविण्याजोगा आहे. यांतील प्रत्येक शब्द अनेकार्थक आहे. **गो** शब्द गाय, बैल किंवा सामान्य यज्ञीय पशु अशा अर्थांचा वाचक आहे. यांतील कोणता विशिष्टार्थ घ्यावयाचा याचा निश्चय करणें कठिण आहे. नहुषाचा इतिहासदृष्ट्या पक्का कालनिर्णय होईपर्यंत त्या काळीं कोणत्या पशूचा यज्ञ करीत असत याचा निश्चय होईपर्यंत **गो** शब्द सामान्य यज्ञीय पशु असाच घ्यावा हें प्रशस्त दिसतें. गाय किंवा बैल असा अर्थ घेतल्यासही हरकत नाहीं. पण ऐतरेय **ब्राह्मणाचे** २ रे पंचिकेंतील ८ वे खंडात **मे**धाचें उत्क्रमण वर्णिलें आहे. त्यावरून पाहतां प्रथम मनुष्याचा हवि देत असत. पण मनुष्यांतून **मे**ध निघून घोड्यांत शिरला. म्हणून घोड्याचा हवि देणें सुरू झालें. पण त्यांतूनही निघून तो बैलांत शिरला. त्यामुळें गो (बैला)चा हवि सुरू झाला. नंतर याच पद्धतीनें मेंढ्याचा नंतर बकऱ्याचा हवि सुरू झाला. बकऱ्यांत **मे**ध बराच काळ टिकला त्यामुळें बकऱ्याचा हवि देण्याचा संप्रदाय पुष्कळ काळ चालला. पुढें तो **मे**ध पृथ्वींत शिरला. म्हणून पृथ्वीचा हवि देणें प्राप्त झालें. पण तो द्यावयाचा कसा हा प्रश्न उत्पन्न झाला. तेव्हां ज्या पार्थिव वस्तूंत मेधाचा जास्ती अंश दिसला त्या पदार्थांचा हवि देणें सुरू झालें. तो पदार्थ तांदूळ. त्याचें हवन होऊं लागलें. असा ८ वे खंडाचा आशय आहे. तेव्हां गो शब्दाचा अर्थनिर्णय नहुषाचे कालनिर्णयावर अवलंबून आहे हें उघड आहे. तेव्हां 'गो' शब्दाचा विशिष्ट पशुवाचक अर्थ घेण्याचे भानगडींत न पडतां सामान्य यज्ञीय पशु असा अर्थ घ्यावा असें आम्हांस वाटतें. आतां यज्ञीयकर्में दोन प्रकारचीं:—एक **वै**तानिक किंवा **श्रौ**त व दुसरें **गृ**ह्य. वैतानिक यज्ञांत सर्वत्र पश्वालंभ उक्त आहे. गृह्यांत मात्र तसा प्रकार नाहीं. तथापि पश्वालंभ नाहीं व त्याची मनाई आहे असा मात्र प्रकार नाहीं. **सो**मयाग सर्वांत प्रधान मानलेला आहे. पशुयज्ञ हे **सो**मयागाचे अंगभूत आहेत. गाय, कालवड, बैल व खोंड यांचा यज्ञ कांहीं विशेष प्रसंगीं मात्र सांगितला आहे. उदाहरणार्थ **ऐ**तरेय ब्राह्मण—प्रथम पंचिका १५ वें खंड अखेर अखेर पहावें म्हणजे त्यांत राजा किंवा कोणी, पुज्य, माननीय पुरुष आला असतां त्याचे प्रीत्यर्थ बैल किंवा गाय मारण्याचे संप्रदायाचा उल्लेख सांपडेल. गृह्यकर्मांत **म**धुपर्क, **अ**नुस्तरणी, **शू**लगव वगैरे कर्मांत गोमारण वैकल्पिक ठेविलें आहे. तेव्हां 'गो' शब्दाचा गाय किंवा बैल असा अर्थ घेतल्यास ही चालेल. आतां '**प्रोक्षण**' शब्दाचा अर्थ उपलक्षणीं समजला पाहिजे— '**प्रोक्षण**' शब्दाचा (प्र+उक्षण) मूळ अर्थ पाणी शिंपडणें असा आहे. कोणचाही पदार्थ

**नहुष म्हणे, 'गोमारणमंत्र सकल अप्रमाण; गो विप्र ।**

पवित्र किंवा शुद्ध करण्यास पाणी त्या पदार्थावर शिंपडावें लागतें त्या संस्कारास **प्रोक्षण** म्हणतात. परंतु पाणी शिंपडून पवित्र करणें एवढाच प्रोक्षण शब्दाचा अर्थ नसून इतर जे पशुयज्ञांत संस्कार करावे लागतात त्यांचाही 'प्रोक्षण' शब्दांत समावेश होतो. सर्व आवश्यक संस्कारांचीं नांवें व क्रिया अशा लहानशा टीपेंत देतां येत नाहींत. त्यांतील ठळक संस्कारांचा नामनिर्देश मात्र करतों. पशूचें **प्रोक्षण**, **अंजन**, **वारिपायन**, **अभिषेक**, **पर्यग्निकरण**, **उपस्पर्शन**, उपाकरण **यूपबंधन**, **मारण**, **हवन** व **भक्षण**—हे सर्व संस्कार **प्रोक्षण** शब्दानें समजले पाहिजेत. आमच्या वैदिकधर्मीय लोकांच्या प्रत्येक कर्माला वेदवचनांचा आधार लागतो. हीं वेदवचनें म्हणजे मंत्र. आतां वेदमंत्रांचा जो निरनिराळ्या प्रसंगीं किंवा कामीं उपयोग ठरवून टाकला आहे त्याला **विनियोग** म्हणतात. आतां या विनियोगप्रकाराचे प्राचीन, अर्वाचीन व आधुनिक असे तीन वर्ग दृष्टीस पडतात. त्यांतील प्राचीन विनियोग बरेच समर्पक आहेत. बाकीचे विनियोग कांहींतरी आहेत. धर्मशास्त्रवचनांचा आधार घेऊन कर्में करण्याची रीति सर्व जगभर दृष्टीस पडते. महाराष्ट्रांत (विशेषत: देशावरील कांहीं भागांत) क्षेत्रपाल देवतांस वार्षिक पशुबलि देण्याची चाल आहे. त्या बलिप्रदानसंस्काराला **डवरा** म्हणतात. पूर्वीं यज्ञांत जसा पशुहननास **शामितृ** नांवाचा पुरोहित जरूर लागत असे व जसे निरनिराळे मंत्र म्हणावे लागत असत तसाच प्रकार या **डवऱ्यांतही** आहे. **शामित्याचे** जागीं मुसलमान मुंजावर लागतो व कुराणांतील कांहीं आयतें म्हणावीं लागतात. हाच प्रकार इतरत्रही आहे. अस्तु. तेव्हां **गोप्रोक्षणमंत्र** ही **प्रोक्षण** शब्दाचे अर्थानुरोधानें पुष्कळच आहेत. ते सर्व येथें देण्याचें प्रयोजन दिसत नाहीं व तितकें स्थळही नाहीं. प्रस्तुत आर्येच्या स्पष्टीकरणार्थ एवढें सांगणें पुरे आहे कीं ऋषींनीं **नहुषास** असा प्रश्न केला कीं तुला वेद व वेदविहित कर्में मान्य आहेत कीं नाहींत. पशुहवन हें वेदविहित आहे तेव्हां तें किंवा तत्प्रसंगोचित वेदमंत्र तुला मान्य आहेत किंवा कसें एवढा या प्रश्नाचा मुख्य कटाक्ष आहे. आतां ज्यांना हे मंत्र जाणून घेण्याची उत्कट इच्छा असेल त्यांनीं श्रौतसूत्रें, गृह्यसूत्रें व ब्राह्मणें पहावीं म्हणजे त्यांचा कार्यभाग होईल. एवढा मोठा हवाला देण्याचें कारण एकच मंत्र सर्वत्र एकाच संस्काराला नियत असा नाहीं. निरनिराळ्या प्रसंगींचे एकच संस्कार असले तरीं मंत्र निरनिराळे आढळतात. तेव्हां ते मंत्र देण्याचे भानगडींत आम्ही पडत नाहीं. आतां या **नहुषाख्यानाचें** ऐतिह्य महत्व सांगून ही टीप संपवितों. यद्यपि **नहुषाचा** काल नक्की निश्चित करणें कठिण आहे तथापि अतिप्राचीन कालापासून देखील श्रद्धाजडत्व टाकून देऊन विचारप्रगति झपाट्यानें होत चालली आहे. वेद व वेदविहित कर्में **नहुषानें** आपणास अमान्य आहेत असें म्हणावें व तेंही अतिप्राचीनकालीं तेव्हां हें कशाचें द्योतक आहे? तेव्हां इतिहासबुभुत्सूंनीं हें व अशा सारखीं आख्यानें अवश्य लक्षपूर्वक चिंतनीय आहेत

१. अमान्य. **नहुष** म्हणे:—'गोमारण—मंत्र सकल अप्रमाण; गो विप्र एकचि; अवध्य कुल; हें पुसता रे! काय? हूं; चला क्षिप्र' अर्थ—नहुष म्हणाला कीं 'गोमारण मंत्र म्हणून जेवढे

एकचि, अवध्य कुल, हें पुसतां रे! काय? हूं, चला क्षिप्र.' ॥ ९९
करितां विवाद कोपें नहुष वदे 'सर्प सर्प' हे वाणी, ।
चरणें अगस्त्य मुनिला कामात्मा दुष्ट तो शिरीं हाणी. ॥ ६१
अवमानिले असे मुनि, मंत्रहि, पोषूनि गर्व ते ज्यानें ।
चैतन्यें वायु तसा तो संत्यजिलाचि सर्व तेजानें. ॥ ६१

---

आहेत ते सर्व मला अमान्य आहेत. गाई (किंवा पशु) व ब्राह्मण हीं दोन्ही एकसारखीं किंवा एकच आहेत. तीं दोन्हीं ही अवध्य आहेत. अरे (भोयांनो!) हें (म्हणजे इतकी सोपी गोष्ट) काय विचारतां? हूं. लवकर पाय उचला-चला' 'गो विप्र एकचि. अवध्य कुल' ब्राह्मण वधार्ह नाहीं हा सिद्धान्त यानवाहक ऋषींना मान्य असल्याचें गृहीत करून नहुषानें गाईचें (किंवा मेध्य पशूचें) व ब्राह्मणांचें एकत्व स्थापन केलें म्हणजे सादृश्यप्रमाणानें पशुवधही अयोग्य असें ठरविलें. 'ब्राह्मणाश्चैव गावश्च कुलमेकम् द्विधाकृतम् । एकत्र मंत्रास्तिष्ठन्ति हविरेकत्र तिष्ठति ॥' ब्राह्मण व गाई (किंवा मेध्य पशु) हीं मूळचीं एक कुलाचीं. परंतु त्यांचे दोन विभाग केले गेले. एका भागांत (ब्राह्मणांत) मंत्र वास्तव्य करतात व दुसऱ्या भागांत (मेध्य पशूंत) हवि वास्तव्य करतें, असा शास्त्रप्रवाद आहे. या आधारावरून गोब्राह्मणांचें एककुलत्व व अवध्यत्व मानून नहुषानें गोमारण मंत्र अमान्य आहेत असें उत्तर दिलें.

१. गाई आणि ब्राह्मण यांचें कुल एकच, हीं दिसायाला मात्र द्विधाकृत (दोन केलेलीं) आहेत. ज्याप्रमाणें ब्राह्मण अवध्य त्याप्रमाणें गाईही अवध्यच होत. गाई अवध्य म्हटल्यानें वेद (वेदमंत्र) अप्रमाण झाले. वेदांचा आणि ब्राह्मणांचा अपमान केला असतां अधोगति प्राप्त होते. नहुषाला गोसवादि प्रतिपादक वेदमंत्र मान्य नव्हते म्हणून त्यानें ते अप्रमाण असें म्हटलें. [अ० १७ श्लोक १० टीका.] २. मारायास अयोग्य ३. त्वरित. ४. चला. ['सर्प' हें संस्कृत 'सृप्'=जाणें—या धातूचें आज्ञार्थक द्वितीय पुरुषाचें एकवचन आहे.] ५. वचन. ६. मदनपीडितचित्त [आत्मन्=चित्त. 'आत्मा कलेवरे यत्ने स्वभावे परमात्मनि । चित्ते धृतौ च बुद्धौ परव्यावर्तनेऽपिच' इति धरणिः] ७. मंत्रांचा ही अपमान केला, कारण गोप्रोक्षण मंत्रास अप्रमाण गणिलें. ८. गर्व वाळगून. ९. आत्म्यानें. १०. गतप्रभ झाला. [अ० १७ श्लो० १६.] चैतन्यें [जसा] वायु [त्यजावा] तसा तो सर्व तेजानें संत्यजिलाचि असा अन्वय. चैतन्यशक्ति (चलनव्यापारशक्ति) जशी वायूला सोडून जाते तशी तेजःप्रभा त्या नहुषाला सोडून गेली. चैतन्यानें जसें वायूला सोडावें, तसें तेजानें राजाला सोडलें, राजा निस्तेज झाला. [मनुष्य मेला म्हणजे चैतन्यशक्ति [शरीरांतील] वायूला सोडून जाते, तसें तेज राजाला सोडून गेलें. [मनुष्य जीवंत असतां] त्याच्या शरीरांत वायु असतो, तसाच मनुष्य मेल्यावर ही त्याच्या शरीराच्या पोकळींत वायु असतो. मनुष्य मेला म्हणजे प्राणवायु शरीरांतून निघून गेला असें म्हणतात, पण तें म्हणणें खरें नव्हे, तर चैतन्य (शरीरांतील) वायूला सोडून गेलें असें म्हणणें रास्त आहे.

घटज[1] म्हणे, 'रे! मंदा! दुर्गतिद[2] तुला त्वदीय दर्प[3]चि हो, ।
हाणुनि विप्रशिरीं पद, जरि म्हणसी 'सर्प सर्प' सर्पचि हो.' ॥ ६२
गर्वेंचि नहुष पडला, अनुतापें[4] हरि[5] पुन्हा पदीं चढला. ।
हें समजे श्रद्धेनें[6] सद्गुरुपाशीं सुबुद्धि जो पढला. ॥ ६३
ऐसें दुःसहसंकट शक्रासहि लागलेंचि भोगावें[7], ।
साधुजयद[8] हें म्हणवुनि ऐकावें भारता[9]! विभो! गावें. ॥ ६४
शक्र तसा प्रभु तूंहि स्वपदातें पावसील बा! पार्था! ।
नहुष तसा दुर्योधन कीं याची रीति तापपापार्था[10].' ॥ ६५
करुनि समाधान असें गेला रक्षावया स्ववचनातें[11], ।
सत्य गुरुनिष्ठ मद्रप[12] दुसरें न गणीच जेविं कच[13] नातें. ॥ ६६

---

१. अगस्त्यमुनि. २. दुर्गति देणारा. ३. गर्व. ४. पश्चातापें. ५. इंद्र. ६. आस्तिक्य बुद्धीनें. ७. हें सर्व शल्याचें धर्मास प्रत्युतर आहे (आर्या २२-६५.) ८. साधुजनांला जय देणारें. साधु आणि जयद असें ९. [हे] विभो! भारता! हें [नहुषेन्द्रकथानक] साधुजयद म्हणवुनि ऐकावें [आणि] गावें–असा अन्वय. या कथानकांत साधुजनांला जय प्राप्त झाला आहे असें हें आहे म्हणून याचें श्रवण व गान करावें. यांत साधूंचा जय वर्णिला आहे म्हणून हे भरतकुलोत्पन्ना धर्म प्रभो! हें श्रवण करावें आणि गावें. १०. ताप आणि पाप यांस कारणीभूत अशी. ११. आपलें दुर्योधनगत वचन पालण्यासाठीं शल्य धर्माचें याप्रमाणें सांत्वन करून गेला. १२. मद्रप (मद्रदेशाधिप–शल्य) हा सत्यगुरुनिष्ठ (सत्यरूप गुरूच्याठायीं निष्ठा ज्याची असा) [होता–म्हणून] दुसरें नातें न गणीच [दुर्योधनाशीं दुसरें शत्रुत्वाचें नातें मानिलें नाहीं–शल्य हा पांडवाचा मातुल असल्यामुळें याचें व दुर्योधनाचें जें मूळचें शत्रुत्वाचें नातें तें यानें गणिलें नाहीं–मनांत आणिलें नाहीं, कारण याची सत्यरूप गुरूवर निष्ठा होती. सत्य (सत्यवचनपालन) हाच आपला गुरु असें शल्य समजे म्हणून त्याच्यानें दुर्योधनास दिलेल्या वचनाचा भंग आप्तपणाच्या पाशीं गुंतून करवेना. दुर्योधन आपला शत्रु आहे हें दुसरें नातें शल्य न गणी, एकच नातें मानी.] जेविं कच=जसा कच दुसरें नातें न गणीच. कचाचें आणि गुरूचें (गुरु=शुक्राचार्य) मूळचें नातें शत्रुत्वाचें असतां तें नातें कचानें मानिलें नाहीं. शुक्र हा गुरु व आपण त्याचे शिष्य हेंच नातें कचानें मानिलें, कचानें शुक्राच्या ठिकाणीं जशी गुरुनिष्ठा ठेविली, तशी शल्यानें सत्याच्याठायीं गुरुनिष्ठा ठेविली आणि दुर्योधनास साहाय्य करण्यासाठीं निघून गेला–असा भावार्थ. १३. बृहस्पतीचा पुत्र.

## अध्याय तिसरा.

अक्षौहिणी मिळाल्या धृतराष्ट्राच्या सुताकडे अकरा, ।
परि धर्मनयविहीना[1] काय? सुहेती[2] जशा जना अकरा[3]. ॥ १
सात[4] अजातरिपुकडे[5], झाल्या या त्या मिळोनि अठरा[6] हो ।

---

१. धर्म न्याय नाहीं ज्यांत अशाला. २. चांगल्या तलवारा. ३. हस्तरहिताला. ४. येथें 'सेनोद्योगपर्व' समाप्त होऊन 'संजययानपर्व' सुरु होतें. ५. धर्माकडे. ६. या अठरा अक्षौहिणींचा तपशील १९ व्या अध्यायांत दिला आहे तो असा:—

दुर्योधनपक्षीय सेना. युधिष्ठिरपक्षीय सेना.

| राजनाम. | संख्या. | श्लोक. | राजनाम. | संख्या. | श्लोक. |
|---|---|---|---|---|---|
| भगदत्त | १ | १५ | सात्यकि | १ | ६ |
| भूरिश्रवा | १ | १६ | धृष्टकेतु | १ | ७ |
| शल्य | १ | १६ | जयत्सेन | १ | ८ |
| कृतवर्मा | १ | १८ | पांड्य | १ | ९ |
| जयद्रथ | १ | २० | द्रुपद | १ | ११ |
| कांबोज | १ | २१ | विराट | १ | १२ |
| विंदानुविंद | १ | २५ | इतरभूप | १ | १३ |
| केकय | १ | २६ | | | |
| इतरभूप | ३ | २७ | | | |
| एकंदर | ११ अक्षौहिणी | | एकंदर | ७ अक्षौहिणी. | |

याप्रमाणें अठरा अक्षौहिणी सैन्य होतें. महाभारतांत या 'अठरा' संख्येविषयीं अनेक चमत्कार आहेत. त्यांचें टांचण कै० ज० बा० मोडक यानीं आपल्या एका निबंधांत केलें आहे तें अवलोकनीय आहे. येथें हा ग्रंथ व अठरा ही संख्या यांचा संबंध मोठा चमत्कारिक दिसतो. तो असा. ह्या ग्रंथांत पर्वें अठरा आहेत. यांत ज्या दोन पक्षांचें युद्ध वर्णिलें आहे त्या दोन पक्षांच्या सैन्याची संख्या अठरा अक्षौहिणी. दोन पक्षांचें जें युद्ध झालें तें अठरा दिवस चालू होतें. ह्या ग्रंथांत भगवद्गीता म्हणून जें एक बोधपर प्रकरण आहे त्याचे अध्याय अठरा. दुर्योधन मृत झाल्यानंतर त्याचा पिता त्याचे पश्चात् अठरा वर्षेंच जगला. ह्या भारत ग्रंथाचा 'जय' असा एक पर्यायशब्द आहे त्याच्या अक्षरांवरूनही अठरा संख्याच उत्पन्न होते ती अशी:—रूपात् कटपयपूर्वा वर्णा वर्णक्रमाद् भवन्त्यङ्काः । ञ्नौ शून्ये प्रथमार्थे स्याच्छून्यं ज्ञस्तृतीयार्थे ॥ २ ॥ लघुआर्यसिद्धांत. अ० १. या आर्येंत क, ख, ग, घ, ङ, च, छ, ज, झ, ञ या अक्षरांस अनुक्रमें १, २, ३, ४, ५, ६, ७, ८, ९, ० अशा संज्ञा सांगितल्या आहेत. तसेंच ट, ठ, ड, ढ, ण, त, थ, द, ध, न या अक्षरांस

**धर्म** म्हणे, 'यश राहो' खल **दुर्योधन** म्हणे, 'स्वहठ[1] राहो.' ॥ २
**धृतराष्ट्र**प्रमुखांतें भेटोनि **द्रुपदगुरु**[2] म्हणे, 'परिसा[3] ।
सुहृदुक्ता[4], हितकामें[5] धनकामें जड म्हणों नये परिसा[6]. ॥ ३
**धृतराष्ट्र पांडु** दोघे एँकाचे[7] पुत्र, पितृधनविभागी[8]. ।
हें वचन अनादरितां होईल सुरगुरुसभेसह[9] विभा[10] **गी**[11]. ॥ ४
सांगा **सुयोधनाला** पावावे **पांडु**पुत्र अंशाला[12], ।
भीष्मा! न स्पर्शावें **धृतराष्ट्राच्या** अभद्र[13] वंशाला. ॥ ५

---

आणि य, र, ल, व, श, ष, स, ह, ळ, क्ष, ज्ञ या अक्षरांस ही त्याच संज्ञा सांगितल्या आहेत. आणि प, फ, ब, भ, म या पांच अक्षरांस अनुक्रमें १, २, ३, ४, ५ या संज्ञा सांगितल्या आहेत. या रीतीनें पाहिलें तर 'जय' ह्या शब्दापैकीं 'ज' हें अक्षर ८. या संख्येचें वाचक आहे आणि 'य' हें अक्षर एक या संख्येचें वाचक आहे. संस्कृत गणितग्रंथांत 'अंकानां वामतो गतिः' या नियमाप्रमाणें अंक उजवेकडून डावेकडे मांडीत असतात. म्हणून 'जय' या शब्दांतील 'ज' या अक्षरावरून बोध होणारा जो आठांचा अंक तो लिहून त्याचे डावेकडे 'य' या अक्षरावरून समजणारा एक हा अंक लिहिला म्हणजे अठरा ही संख्या उत्पन्न होते. सारांश भारत ग्रंथाचा पर्यायशब्द जो 'जय' तोही अठरा ही संख्याच दाखवितो. 'जय' हा शब्द भारतनामक इतिहासाचाच वाचक आहे हें 'नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् । देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ।। १ ।। या प्रत्येक पर्वाच्या आरंभीं असणाऱ्या श्लोकांवरून स्पष्ट होतें. धर्मराजानें आपल्या राज्याभिषेकापासून स्वर्गारोहणापर्यंत एकंदर छत्तीस वर्ष राज्य केलें ती कालमर्यादा दाखविणारी संख्या ही अठरांच्या दुप्पट आहे. असो. याप्रमाणें हा प्रचंड महाभारत ग्रंथ व अठरा ही संख्या यांचा असा चमत्कारिक संबंध आहे.'

१. आपला दुराग्रह [धर्म आणि दुर्योधन हे दोघेही युद्धास तयार झाले होते. धर्मास युद्ध करण्यास योग्य कारण होतें, पण दुर्योधनाची गोष्ट तशी नव्हती, त्यानें ही लढाई कारण नसतां बळेंच उकरून काढिली होती असें प्रतिपादन करण्यासाठीं **पंत** म्हणतातः— यश राखण्यासाठींच धर्म युद्धास प्रवृत्त झाला तेव्हां तो म्हणे—यश राहो (यशाचें संरक्षण होवो म्हणजे झालें) दुर्योधन म्हणे—स्वहठ राहो (पांडवांस सुईचे अग्रावर राहील इतकीसुद्धां माती द्यावयाची नाहीं असा जो आमचा दुराग्रह तो तडीस जावो). २. द्रुपदाचा पुरोहित (अध्याय १-गीति ३७) ३. ऐका. ४. सुहृद्+उक्ता=मित्र+वचना. ५. हितेच्छूनें. ६. परिस हा जड (चैतन्यरहित) आहे असें धनाची इच्छा बाळगणारांनीं म्हणूं नये. ७. विचित्रवीर्याचे. (अध्याय २० श्लो० ४). ८. पैतृक धनाचे समान भागीदार होत (अध्याय २०-श्लोक ४) असें असतां धृतराष्ट्राच्या पुत्राला पैतृक धन मिळालें आणि पांडूच्या मुलांना मिळालें नाहीं, असें सुचविलें आहे. ९. बृहस्पतीच्या सभेसहित. १०. तेजोरहित. ११. वाणी. १२. विभागाला. १३. अकल्याण.

तिकडे सात असोंद्या, इकडे अक्षौहिणी जरी अकरा. ।
अक्षौहिणीसहस्रासम सात्यकि भीम, साम[1] कां न करा.[5] ॥ ६
त्यां या तुम्हां समस्तांहुनि अर्जुन अधिक[2], कृष्ण[3] त्यापरिस, ।
परि सर्व सामकामुक[4], कां मुकसि सुखा सुयोधना! परिस.' ॥ ७
भीष्म म्हणे[7], 'द्रुपदगुरो! तूं ब्राह्मण[6] म्हणुनि तीक्ष्ण वदसि, परी ।
सदसि[8] परिस्फुट[9] शब्दचि[10] कार्य कराया समर्थ सदसिपरी[11]. ॥ ८
राज्यार्धभाक्[12] युधिष्ठिर, म्हणतों, अर्जुन समर्थ शिवसा, [13]मी, ।
कृष्ण जगत्प्रभु, कलहीं [14]अशिवचि सर्वत्र, विपुल शिव सामीं.' ॥ ९
सभ्यश्रुत्यमृत[15] असें जो बोले सर्वभारतेश[16] तदा, ।

१. संधि. २. हे 'अधिक' नामक अलंकाराचें उदाहरण होय, कारण येथें अर्जुनाचें इतरांवर आधिक्य वर्णिलें आहे. जेथें एका पदार्थावर दुसऱ्या पदार्थाचें आधिक्य वर्णिलेलें असतें तेथें 'अधिक' अलंकार होतो. याचें दुसरें उदाहरण: 'जो पीडिला रडविला देवुनि माथां स्वराज्यभर तातें । तदधिक कसा नव्हे प्रभु, जो दे सुख हरुनि भार भारतातें.' ॥ [वनपर्व अ० १२ गी० १४५; काव्यसंग्रह-पृ० १९० पहा.] ३. अध्याय २० श्लो० १७-२० पहा. ४. साम करण्यास उत्सुक (अध्याय २० श्लोक १३-१४). ५. येथें 'पुरोहित यान' नामक २० वा अध्याय पुरा झाला. ६. स्पष्ट प्रकारानें बोलतोस याचें कारण तूं ब्राह्मण आहेस, ब्राह्मणाला अप्रिय पण सत्य बोलण्याचा पूर्ण अधिकार आहे त्याजबद्दल राग धरणें अनुचित होय. ७. अध्याय २१ श्लो० ४ पहा. ८. सभेमध्यें. ९. स्पष्ट. १०. सदसिपरी (प्रखर खड्गाप्रमाणें) परिस्फुट (स्पष्ट) शब्दचि (भाषणच) सदसि (सभेमध्यें) कार्य कराया (काम बजावण्यास) समर्थ (शक्तिमान्) होतें तूं ब्राह्मण म्हणुनि (ब्रह्मतेज अंगीं असल्यामुळें कोणाचें भय न बाळगतां योग्य जें भाषण तें) तीक्ष्ण वदसि (प्रसंगाला योग्य चरचरित असें भाषण करतोस). तुझें भाषण जरी तीक्ष्ण (तिखट-मनाला झोंबणारें) आहे, तरी तें प्रसंगाला अनुरूप आहे. कारण असेंच भाषण कार्य कराया समर्थ होय. ११. प्रखरखड्गाप्रमाणें. १२. राज्यार्धाचा भागी. १३. मी (भीष्म) म्हणतों:—'राज्यार्धभाक् युधिष्ठिर, शिवसा अर्जुन समर्थ-सामीं विपुल शिव'—असा अन्वय. १४. अकल्याण. साम केलें असतां त्याजपासूए विपुल (पुष्कळ) शिव (कल्याण) होणारें आहे. १५. सभ्यांच्या कर्णाला अमृतासारखें. 'सभ्य' शब्दाच्या विस्तृत अर्थाविषयीं पुढील विवेचन वाचनीय आहे. 'आतां, सरते शेवटीं सभ्यपणाचें वर्तन घेऊं. ह्यांतच सर्व शिष्टाचाराचा समावेश होतो. 'सभ्य' हा शब्द आपली कुळकथा सांगत आहे हें एक प्रकारें चांगलें आहे. सभ्य म्हणजे 'सभेसंबंधीं' 'राजदरबारांत दिसणारें' असा या शब्दाचा अर्थ आहे. तात्पर्य हें कीं, राजदरबारांत आपल्यास जें वर्तन ठेवावें लागतें, त्यास सभ्य वर्तन म्हणावयाचें. आपली दृष्टी नेहमीं भूमिगत ठेवणें, मित भाषण, आणि तेंही कोणी सांगितलें तरच करणें, महाराजांशीं बोलावयाचा प्रसंग आल्यास तोंडाला प-

**कर्ण**[1] म्हणे, 'राहों द्या पाल्हाळ, कशास तेंच तें शतदा[2]? ॥ १०
अज्ञातवास पूर्ण न झालाचि **द्रुपद**नृपपुरोहित! हो! ।
द्वादश वर्षें पुनरपि वनवासें स्पष्ट पण पुरो[3], हितें[4] हो. ॥ ११
कां मूर्खसा[5] **युधिष्ठिर** अर्थकर[6] न्यायसमय[7] सोडून ।
उडतो? अनर्थकर लघु[8] **पांचाल** तसेच **मत्स्य** जोडून[9]. ॥ १२
निजबाहुबळें तरला **मारुति** कीं अब्धिला[10] अलाबुबळें[11]? ।
होय भला इष्टार्थग्रह[12] उपनेत्रेंचि[13], कीं भला[14] बुबळें? ॥ १३
देइल नयें[15] समस्तहि[16], अनयें[17] प्रभु[18] राज्यभाग चवथा[19] न, ।

---

दर लावणें, यजमान बसावयाच्या आधीं आपण न वसणें, वसावयाचें तें वीरासन घालून वसणें, हंसूं आल्यास तें गालाच्या बाह्यप्रदेशाबाहेर येऊं न देणें, राग आला आहे हें कधींही न दाखविणें, कालत्रयीं दुर्भाषण न करणें, राजेसाहेब उठल्याबरोबर आपण उठून उभें राहणें, इत्यादि हजारों गोष्टींचा या 'सभ्य' वागणुकींत अंतर्भाव होतो' [शास्त्ररहस्य—व्यवहारशास्त्र—पृ० १२-१३.] १६. भरतवंशश्रेष्ठ (भीष्म).

१. अध्याय २१ श्लो० ८-१५ यांत कर्णोक्ति आहे. २. शतवार. (अध्याय २१ श्लोक ९ पहा.) ३. तडीस जावो, पूर्ण होवो. ४. कल्याण होवो. ५. मूर्खासारखा. 'मूर्खवत्' असाच शब्द मूळांत आहे. [अ० २१ श्लो० ११.] ६. राज्यार्थ प्राप्त करून देणारा, लाभदायक. ७. न्यायानें ठरलेला समय (प्रतिज्ञा—संकेतवाक्य, काल, सिद्धांत, शपथ, अंगीकार)=तेरा वर्षें अरण्यवास आणि एक वर्ष अज्ञातवास करण्याची प्रतिज्ञा तडीस न गेली तर पुनः तसें करणें—असा संकेत. ही प्रतिज्ञा सिद्धीस जाईपर्यंत पैतृक राज्यांशाची इच्छा न करणें इत्यादि संकेत. [श्लो० ११ टीका पहा.] ८. क्षुद्र. ९. पांचाल व मत्स्य यांचा आश्रय करून. १०. सागराला. ११. भोंपळ्याच्या बळानें. १२. इष्ट वस्तूचा स्वीकार. १३. उपनेत्र=चष्मा. १४. बरा, चांगला. 'भला' हें येथें क्रियाविशेषण जाणावें. इष्टार्थग्रह बुबळें भला होय कीं (किंवा) [बुबुळावांचून नुसत्या] उपनेत्रेंचि (केवळ चष्म्यानें) भला (होय?)—असा अन्वय. इच्छिलेल्या वस्तूचें ग्रहण (दर्शन) बुबुळानें चांगलें होतें किंवा (नुसत्या) चष्म्यानें चांगलें होतें? म्हणण्याचा भाव असा कीं अलाबुबळ व उपनेत्र हीं केवळ उपसाधनें होत, हीं प्रधान अंगें नव्हत, केवळ उपांगें, तेव्हां त्यांची मातब्बरी फारशी मानण्याचें कारण नाहीं. सागरतरणाचें प्रधान साधन निजबाहुबळ आणि इष्टार्थग्रहाचें बुबुळ होय. ही आर्या **पं**तांच्या पदरची आहे. हिला मूळांत आधार नाहीं. १५. न्यायानें. १६. सगळें राज्य, सकळ मही. १७. अधर्मानें. भीति घातल्यानें. (श्लो० १२.) १८. दुर्योधन. १९. पाद. (राज्याचा पाद=चवथा भाग).

स्वापत्यासचि दे कीं व्याघ्रीचें भलतयासि चेव थान? ॥ १४
सांगा त्यां मूर्खांला कीं रक्षा प्राणपालका समया, ।
या प्रभुकडे विभाग प्रार्थाया साधुबालकासम या. ॥ १५
त्यजितिल धर्मसमय जरी, युद्धचि केवल हटेंचि वरितील, ।
तरि ती लयासि जाइल कीर्ति, चमू अश्रुमोक्ष करितील.' ॥ १६
भीष्म म्हणे, 'राधेया! उत्तरगोग्रह तुला न आठव दे, ।
स्मर जें विजय तुज, तुझी पाहुनि असकृत् रणांत पाठ, वदे. ॥ १७
गांडीव त्वद्धनुनें जिंकावें, रजेत तरि न कां कथिलें? ।

१. स्व+अपत्यासचि=निज, स्वीय+मुलाला. [अपत्य=न पतंति पितरोऽनेन इति अपत्यम्. ज्याच्यामुळें पितर पतन पावत नाहींत तें अपत्य. यास्काचार्यांनीं या शब्दाची व्युत्पत्ति दोन प्रकारची दिली आहेः-(१) अपत्यं कस्माद् अपततं भवति पितुः सकाशादेत्य पृथगिव ततं भवति, (२) अनेन जातेन सता पिता नरके न पततीति वा.] २. रुचि. ३. राज्यांश. ४. मागाया. ५. निष्कपट बालकासारखे. अधार्मिकबुद्धिरहित मूल जसें असतें तसें, अथवा साधूसारखे किंवा बालकांसारखे हात जोडून नम्रभावानें या. (१) साधु+बालकासम+या=चांगल्या प्रकारें+मुलाप्रमाणें+या-(२) साधुसारखे अथवा बालकासारखे नम्रभावानें या-असे अर्थ केले तरी चालतील. ६. न्यायसमय. [गीति १२ पहा.] ७. अश्रुपात. (रडणें.) ८. श्लोक १४-१५ पहा. ९. अर्जुन. १०. वारंवार. ११. रणांत पाठ पाहुनि असकृत् वदे-असा अन्वय. 'पाठ पाहुनि' या शब्दांनीं कर्णाचें पलायन सुचविलें आहे. पंतकृत विराटपर्वाच्या चतुर्थ अध्यायाच्या अंतीं (गीति ९६) आणि पंचम अध्यायांत (गीति ४१-५१) कर्णाला उद्देशून अर्जुनाचें भाषण आहे. उत्तरगोग्रहणसमयीं कौरवांचा पराभव झाला आणि कर्ण रणांगणांतून पळून गेला-असें वर्णन आहे. १२. अर्जुनाचें धनुष्य. हें अग्नीनें वरुणापासून मागून घेऊन, (महाभारत-आदिपर्व-अध्याय २२५ श्लोक १-९) अर्जुनास दिलें. वीरांच्या धनुष्यांस भिन्न भिन्न नांवें होतीं असें दिसतेंः-कर्णाचें 'कालपृष्ठ,' अभिमन्यूचें 'रौद्र.' या 'गांडीव' धनुष्याचें वर्णन (विराटपर्व-अध्याय ४३ श्लोक १-७ यांत) केलें आहे तें असेंः-विराटपुत्र उत्तर आणि बृहन्नला यांचें संभाषण चाललें असतां बृहन्नला उत्तरास म्हणतेः-'हे उत्तरा! तूं मला विचारलेंस, तें हें अर्जुनाचें गांडीव नामक धनुष्य आहे. हें शत्रूंचा संहार करण्यास समर्थ आहे. हें लोकांमध्यें प्रख्यात आहे. हें सर्व आयुधांहून उत्कृष्ट आहे. हें सुवर्णालंकृत आहे. हें अर्जुनाचें गांडीव धनुष्य मोठें प्रबल आयुध आहे. याला हजार धनुष्यांचें बल आहे. हें राष्ट्राचा उत्कर्ष करणारें आहे. या धनुष्यानें पार्थ देवांना आणि मनुष्यांना रणामध्यें जिंकतो. हें अनेक प्रकारच्या रंगांनीं चित्रविचित्र केलेलें आहे. हें सडसडीत बारिक आहे. हें लांब व अविद्ध आहे. पूर्वीं हें धनुष्य ब्रह्मदेवानें एकहजार वर्षें धारण केलें. प्रजापतीनें ५०३ वर्षें, इंद्रानें ८५, वर्षें, सोमदेवानें ५०० वर्षें व वरुणानें १०० वर्षें धारण केलें.

खाल रणीं रंज मदसह न करुनियां या महर्षिचें कथिलें.' ॥ १८
कर्णासि निवारुनियां, जोडुनि देवव्रतासि हातातें, ।
अंध म्हणे, 'जें सन्मत अस्मद्धित सत्य वदसि ताता ! तें. ॥ १९
द्रुपदगुरो ! बा ! तूं जा, तुजमागुनि संजयासि पाठवितों, ।
मी पांडुपांडवांतें घटिकेंत सहस्रवेळ आठवितों'. ॥ २०
तो पांचालपुरोहित जातां, पळभरि उगेचि राहून, ।
पाहून विचार मनीं वृद्ध म्हणे संजयासि बाहून. ॥ २१
'गावल्गणे ! न झाले पुरुष कुरुकुलांत सत्य पांडवसे, ।
यांचें विष्णुयशासम सुयश, व्यापूनि सत्यपांड, वसे. ॥ २२
भजले भजतीलहि बहु, गुरुसेवेतें सुधा समजतात, ।
मानिति मनांतुनि प्रभु पांडव परमाबुधास मज तात. ॥ २३
हातींहि चित्रगुप्तें यांविषयीं घेतली नसेल वही, ।
कैसें काय लिहावें ? कीं पुण्य अगण्य, अघ नसे लवही. ॥ २४
द्वेष अशा साधूंचा, रुचला या कुरुकुलांत मत्तनया, ।

---

३२॥ वर्षें श्वेतवाहन (ज्याच्या रथाला शुभ्रवर्ण घोडे असतात अशा) अर्जुनापाशीं आहे. ह्या धनुष्याचा पराक्रम मोठा आहे. हें सुंदर आहे. हें उत्कृष्ट व मनोहराकृति धनुष्य अर्जुनाला (अग्निद्वारा) वरुणापासून प्राप्त झालें.' १३. रौप्य.

१. मृत्तिकाकण. २. या मोठ्या ऋषीचें (द्रुपदपुरोहिताचें—या ब्राह्मणश्रेष्ठाचें) कथिलें (कथन केलेलें वचन) न करुनियां (न केलें असतां, अनादरिलें तर) तुम्ही मदसह (अभिमानासह—गर्वासह) रज खाल (माती खाल). या ब्राह्मणाचे वचनास अनुसरून न वागाल तर युद्ध होऊन त्या युद्धांत तुम्ही गर्वासह धुळीस मिळाल. खाल रज=Shall have to bite the dust. पराजय पावाल. 'पांसुकान् भक्षयिष्यामः' असें मूळांत आहे. [श्लो० १७.] ३. सांगितलेलें. (वचन-भाषण.) ४. भीष्माला. [देवं इंद्रियसंयमनं व्रतं यस्य स भीष्मः.] ५. नमस्कार करून. ६. सत्+मत=साधूंस+मान्य झालेलें. ७. आमचें हित. ८. बापा ! (भीष्मा !) ९. श्लोक २० पहा. १०. धृतराष्ट्र. ११. बोलावून. १२. हे संजया ! [संजयाच्या बापाचें नांव गवल्गण होतें, म्हणून त्याला क्वचित् गावल्गणि असेंही नांव दिलेलें आढळतें.] १३. सत्य+प+अंड=सत्यलोक, ब्रह्मदेवाचें स्थान+पालक+अंड= सत्यलोकाचा पालक जो ब्रह्मदेव त्याचें अंड=ब्रह्मांड. १४. वडिलांच्या सेवेला. १५. परम+ अबुधास=अत्यंत मूर्खास. १६. चित्रगुप्त हा यमाचा गुप्त चिटणवीस होय. हा सर्वांचीं पापपुण्यें लिहून ठेवतो. १७. पातक. १८. ज्यांविषयीं चित्रगुप्तानें आपल्या वहींत कांहींच लिहिलें नाहीं अशा सज्जन पांडवांचा. १९. माझ्या पुत्राला—सुयोधनाला.

कीं क्षुद्रा[1] या कर्णा,[2] लंघिति[3] हे दुष्ट भाग्यमत्त[4] नया.[5] ॥ २५
हा भाग पांडवांचा मंदात्मा[6] पाहतो हरायास, ।
ऐकुनि नुमजे निष्फळ जो पार्थपराभवीं[7] हरायास.[8] ॥ २६
कृष्णसख्यासीं[9] युद्धीं होईल दहांत हा कसा मान्य? ।
नृहरिपुढेंचि[10] त्रसती[11] हरि, मग देईल हांक[12] सामान्य? ॥ २७
उलतिल[13] युधिष्ठिराच्या उष्णकटाक्षें कडे[14] हिमाद्रीचे,[15] ।
न असे भीम जनार्दन,[16] मज भयद न पुत्र[17] तेहि माद्रीचे. ॥ २८
यास्तव युधिष्ठिराला भेट बुधा![18] कुशल[19] पूस, जांच[20] कसा, ।
साधुविरोधें मजला परलोकीं सोसवेल जाच[21] कसा? ॥ २९

---

१. नीचा. २. अध्याय २२ श्लो० ७ पहा. ३. उल्लंघन करतात. ४. भाग्यानें (ऐश्वर्यानें) मत्त (माजलेले.) ५. नीतिधर्माला. ६. मूर्ख, मूढमानस, मंदबुद्धि (दुर्योधन). ७. येथें किरातार्जुनीय कथानकाकडे कविकटाक्ष आहे. ही कथा वनपर्वांत आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–वनपर्व अ० ३ पृ० २७-२८ पहा.] ८. महादेवाचा श्रम. ९. कृष्ण आहे सखि (मित्र) ज्याचा तो कृष्णसख (अर्जुन) त्याशीं. येथें कृष्णसखा असें अर्जुनाला सहेतुक म्हटलें आहे. कृष्णासारख्या अलौकिक पुरुषाचें ज्याला साहाय्य आहे त्याच्यापुढें उभा राहण्यास कोणीही धजणार नाहीं असें या पदानें सूचविलें आहे. एक तर अर्जुन हा महाप्रतापशाली वीर आणि त्याचें साहाय्य करणारा श्रीभगवान् कृष्ण, तेव्हां त्यांच्याशीं युद्ध करून लोकांत मान पावणें ही गोष्ट अत्यंत अशक्य होय असें म्हणण्याचें तात्पर्य. १०. नृहरिपुढेंचि हरि (सिंह) त्रसती=नृसिंहापुढें (उभे राहण्यास) सिंह त्रासतात (भय पावतात)=नृसिंहापुढें सिंह टिकत नाहींत; मग सामान्य (जनावर) हाक देईल काय?=असें आहे तर सामान्य प्राणी नृसिंहासीं सामना करील काय? त्याचे हाकेला हाक देईल काय? मग सामान्य मनुष्यास त्याला तोंड कसें देतां येईल? ११. भय पावतात. त्रसणें=भय पावणें, भिणें. त्रास म्हणजे भय असा संस्कृतांत अर्थ आहे. १२. हांक देणें=उत्तर देणें, जबाब देणें, बरोबरी करणें, तोंड पुढें करणें, मुकाबला करणें. १३. फुटतील, तुटतील. १४. ही दृष्टिपातानें कडे उलण्याची कल्पना मूळांत नाहीं. १५. हिमालयपर्वताचे. १६. कृष्ण. [जनार्दन=भक्तद्वेषी जनातें अर्दन करतो तो=भक्तद्वेषिणां तूर्णं मर्दनाद्धि जनार्दनः (विवृत्तिसहित विष्णुनामसहस्र.) अभक्त जनांस मारून नरकांत घालणारा, अथवा भक्तजनांनीं कल्याणार्थ याचना करण्यास योग्य तो जनार्दन. 'जो दंडी दुष्टाला, किंवा जन याचिती कुशल ज्याला । यास्तव जनार्दन असें साधूंनीं नाम ठेविलें त्याला ॥ २६ ॥' [नामार्थदीपिका पृ० १४.] १७. नकुलसहदेव. (श्लोक ३४-३५.) १८. ज्ञात्या! (संजया!) १९. श्लोक ३७ पहा. २०. पांचालराजाच्या चमूनिवेशनस्थानीं जा. २१. जाच कसा–हें ठरींव यमक आहे.

सुज्ञा! मद्वचनें तूं कुशल सकल[१]वृष्णिपालका पूस, ।
ज्याच्या [२]प्रतापलक्षणवन्हिपुढें होय काल कापूस. ॥ ३०
'धृतराष्ट्र [३]सामकामुक, [४]आपणचि युधिष्ठिरासि वळवावें,' ।
हें [५]सव्यसाचिसचिवा सदया श्रीकृष्णजीस कळवावें. ॥ ३१
वळवील धर्ममन तो, न [६]म्हणेलचि साधु तुच्छ सामास, ।
'[७]नीतींत तसें खलमन जेंवि नळींत [८]श्वपुच्छ [९]सा [१०]मास.' ॥ ३२

संजय युधिष्ठिरातें [११]भेटुनि [१२]निधितें जसा निवे दीन[१३], ।
कुशल पुसोनि म्हणे, 'जी! आज्ञेनें तातमत निवेदीन.' ॥ ३३
धर्म म्हणे, 'तात विदुर भीष्म द्रोणादि कुशल आहेत? ।
रे संजया! असावे सर्व सुखी या मनांत हा हेत. ॥ ३४
कर्ण बरा आहे कीं? कुशल असावें सदा [१४]वदान्यातें, ।
जो याचकांसि म्हणतो, 'जें वस्तु प्रिय सुखें वदा, न्या तें.' ॥ ३५
[१५]ताताज्ञेंत सुयोधन आहे कीं? [१६]विप्रवृत्ति चालवितो? ।
बहुधा [१७]युयुत्सु, [१८]दुसरा [१९]तात सदा [२०]साश्रु [२१]भक्त कालवितो? ॥ ३६
ताताभिप्राय कसा? वद, [२२]सांनिध्यें तुला सकळ कळतें; ।

---

१. यादवपालका कृष्णा. २. पराक्रमरूप अग्निपुढें. ३. संधि इच्छिणारा. ४. श्रीकृष्णानें धर्मराजाचें मन वळवावें. ५. सव्यसाचिन्+सचिव=अर्जुन+प्रधान, अमात्य. अर्जुनाचा उपदेशक मंत्री कृष्ण. अर्जुनाला 'सव्यसाची' असें नांव पडण्याचें कारण असें:—'उभौ मे दक्षिणौ पाणी गांडीवस्य विकर्षणे । तेन देवमनुष्येषु सव्यसाचीति मां विदुः ॥' [महाभारत.] श्रीधरस्वामींनीं असा विग्रह केला आहे:–'सव्येन वामेन हस्तेन साचितुं शरान्संधातुं शीलं यस्य स सव्यसाची.' ६. सामाचा धिक्कार करणार नाहीं. ७. हें गीलर्थ सुभाषितरूप आहे. ८. कुत्र्याचें शेंपूट. ९. साहा. १०. महिने. ११. अध्याय २३ श्लोक ६-२८. १२. निधि=ठेव. १३. निर्धन. १४. दात्यातें. कर्णाचें दानशूरत्व सुप्रसिद्ध आहे. कर्णाच्या अनुपम औदार्याची प्रशंसा अनेक कवीनीं केलेली आहे. १५. तात+आज्ञेंत=बाप–धृतराष्ट्र+हुकुमांत. १६. विप्रांची उपजीविका. १७. युयुत्सु हा धृतराष्ट्राचा दासीपुत्र. हा मोठा धार्मिक आणि नीतिमान् होता. १८. बहुधा युयुत्सु (युद्धोत्सुक) दुसरा (दुसरा पुत्र दुःशासन)?=दुसरा पुत्र दुःशासन हा बहुधा रणोत्सुक आहे काय? तात (धृतराष्ट्र) रडत रडत भोजन करतो काय? असाही या अर्धाचा अर्थ कोणी कोणी करतात, तो येथें दर्शविला आहे. १९. दुसरा तात (विदुर) सदा साश्रु भक्त कालवितो=[पांडवाचें–आमचें–स्मरण होऊन भोजनकालींही] विदुर डोळ्यांतून आंसवें गाळून भात कालवितो काय? युयुत्सु आणि विदुर यांजविषयीं कुशल पुसतांना धर्मराजानें त्यांच्या मनोवृत्तीस अनुरूप अशाच संबधाचे प्रश्न केले आहेत. २०. अश्रुयुक्त, रडत. २१. भात. २२. जवळ असल्यानें.

काय पुसावें? पितृमन चिंतुनि दीना मुलांस कळकळतें.' ॥ ३७
सूत म्हणे, '[1]प्रभुजी! ते आहेत बरेच [2]तीरगत तरुसे, ।
तत्कुशल काय पुससी? बा! ज्यांवरि धर्मनीति सतत रुसे. ॥ ३८
ताताभिप्राय मला पुसतां जरि तरि समस्त [3]परिसा, हो! ।
परि [4]साहो मन, तुमचा [5]महिमा गुरु साच, मान्य हरिसा हो! ॥ ३९
त्वत्तातमनीं आहे [6]स्वापत्यशिवार्थ [7]सामकामुकता, ।
म्हणतो, 'सुखा दशमुख न धरिता [8]परविषयकाम कां मुकता? ॥ ४०
परि तुमचा भाग तुम्हां देउनियां शीघ्र संधि[9] करवीना ।
[10]इच्छी कुलहित [11]नाग विभाग न अर्पूनि [12]संधिकर वीना. ॥ ४१

---

१. प्रभुजी! ते [कौरव] तीरगत तरुसे बरेच आहेत=ते कौरव नदीतटावर असणाऱ्या वृक्षांसारखे बरे आहेत. ते वृक्ष जरी टवटवीत दिसतात, तरी सहज उन्मळून पडतात असें आढळतें. [नदीकांठचे वृक्ष केव्हां पाण्याच्या लोटानें पडतील आणि वाहून जातील याचा नेम नाहीं. ते वृक्ष उभे आहेत असें पाहून त्यांस क्षेम (कुशल) म्हणणें आणि या कौरवांस क्षेम म्हणणें सारखेंच आहे–असा भाव.] ज्यांवरि धर्मनीति सतत रुसे तत्कुशल बा! [बापा! धर्मा!] काय पुससी?=ज्यांवर धर्मनीतीचा कोप सर्वदा आहे, ज्यांस धर्मनीतीनीं टाकिलें आहे, धर्म आणि नीति यांची ज्यांवर कृपा नाहीं त्यांचें क्षेम काय विचारावें? तें न विचारतांही कळण्यासारखें आहे. तीरगततरुकुशलाप्रमाणें त्याचें कुशल अशाश्वत आणि अत्यंत चंचल समजावें. ते केव्हां पतन पावतील याचा नेम नाहीं. २. नदीच्या तटावर असणारे. ३. ऐका. ४. येथें 'लाटानुप्रास' आहे. ५. हो (अहो!) तुमचा महिमा गुरु साच, हरिसा मान्य=अहो तुमचा महिमा साच (खरोखर) गुरु (श्रेष्ठ) होय, तो हरिसा (विष्णूसारखा) मान्य आहे. परि मन साहो=तुमचें मन माझें वचन सहन करो, तुमचें मन माझे वचनानें क्रुद्ध न होवो. ६. स्व अपत्यशिवार्थ=आपल्या पुत्राच्या कल्याणार्थ. ७. साम करण्याची इच्छा. [तुझा तात] म्हणतो [जर] दशमुख परविषयकाम (दुसऱ्या वस्तूची–स्त्रीप्रभृति विषयांची–इच्छा) न धरिता [तर] सुखा कां मुकता?=दशमुखानें (रावणानें) दुसऱ्याच्या राज्यलक्ष्मीची इच्छा धरिली म्हणून तो सुखाला आंचवला, नाहीं तर तसें झालें नसतें. ८. परस्वलोभ. दुसऱ्याच्या वस्तूची इच्छा. ९. साम करवीत नाहीं. १०. नाग संधिकर वीना विभाग न अर्पूनि कुलहित इच्छी–असा अन्वय. संधिकर (साम करूं पाहणाऱ्या) वीना (वि+इन=पक्षी+प्रभु) (गरुडाला) विभाग न अर्पुनि (त्याचा अंश न देतां) नाग कुलहित इच्छी (साप आपल्या कुलाचें कल्याण करण्यास इच्छितो) तशी स्थिति धृतराष्ट्राची आहे. तुमचा भाग तुम्हांस द्यावयाचा नाहीं, आणि आपल्या पुत्रांचा नाश तर होऊं नये अशी स्थिति धृतराष्ट्राच्या मनाची आहे. ११. सर्प. १२. संधि करणाऱ्या गरुडास. संधिकर विभाग वीना अर्पूनि नाग कुलहित न इच्छी–असा अन्वय लाविला तरी चालेल.

आतां शीघ्र करावें स्वपरहित तुम्हींच साम साधूनी, ।
धरिला न कधींच [1]परास्वर्थघ्न स्वार्थकाम साधूंनीं. ॥ ४२
[2]स्पर्श जडहि हित करि जरि [3]अपराधांच्या रचो [4]अय शतातें, ।
बुध हो! युष्मद्योगें जोडावें काय जी! अयश तातें? ॥ ४३
जरि आग्रहें कराल [5]ज्ञातीसीं धरुनि राज्यकाम रण, ।
[6]धाम [7]रणन्मणिनूपुर यौ[8]वतहि गमेल [9]मसण [10]आमरण. ॥ ४४
राज्यश्री [11]मदिरेच्या निर्वृति[12] कवणासि हो! दिली [13]पानें? ।
त्यजिली कां [14]भरतानें? त्यजिली तैसीच कां [15]दिलीपानें? ॥ ४५
[16]श्री अनुभविली, आतां नित्यसुखयशोर्थ शांतिस वरा, हो! ।

---

१. पर+असु+अर्थ+घ्न=परप्राणार्थनाशक, दुसऱ्याचे प्राण व धन यांचा नाश करणारा. २. परिस=Philosopher's stone. ३. जरि अपराधांच्या शतातें अय रची [तरि] जडहि स्पर्श [त्याचें] हित करि–असा अन्वय. अर्थः—जरी अय (लोखंड) अपराधांच्या शतातें (शेंकडों अपराध) रची (करितें) तरी जडहि स्पर्श (तरी जड दगड असा ही स्पर्शमणि–परीस) हित करी (लोखंडाचें हित करतो—लोखंडाचें सुवर्ण करतो. [मग] [हे] बुध! हो! युष्मद्योगें तातें अयश जोडावें काय?=मग तुमच्या संबंधानें तातानें (तुमच्या प्रत्यक्ष वडिलांनीं–काकानें–धृतराष्ट्रानें) अयश (अपकीर्ति) मिळवावी काय? अयशाला पात्र व्हावें हें उचित काय? [परीस दगड असून परकीय अशा लोखंडाचे शेंकडों अपराध माफ करतो, तुम्ही अजड ज्ञाते–सचेतन आहां. लोखंडाचें आणि परीसाचें नातें कांहीं नाहीं, तुमचा काकापुतण्याचा संबंध आहे. परीस आपणाला घनानें फोडणाऱ्या लोखंडाचें सोनें बनवितो; तर परीसाचें उदाहरण मनांत आणून तुम्ही युद्धोद्योगाचा परित्याग करावा हेंच उत्तम–असा भावार्थ.] ४. लोह. ५. ज्ञाति=स्वजन. ६. गृह. ७. वाद्यायमान मणिनूपुरांनीं युक्त आहे यौवत (तरुण स्त्रियांचा समुदाय) ज्याचे ठायीं असें. ८. युवतीनां समूहः यौवतम्. [सि० कौ० १२४५ इनण्यनपत्ये. ६।४।१६४.] ९. श्मशान. १०. मरणपर्यंत. ११. राज्यलक्ष्मीरूप मद्याच्या. १२. सुख, तृप्ति. १३. प्राशनानें. १४. राज्यश्री भरतानें कां त्यजिली?–असा अन्वय. [रामानें राज्यश्री भरताच्या स्वाधीन केली असतांही भरतानें तिचा स्वीकार केला नाहीं, राम वनवासाहून परत येईपर्यंत भरत व्रतस्थ असा नंदिग्रामीं होता.] १५. दिलीप–इक्ष्वाकुकुलोत्पन्न राजा. यानें रघु पुत्र झाल्यावर त्याच्या स्वाधीन राज्यश्री करून सस्त्रीक वानप्रस्थाश्रम स्वीकृत केला. [रघुवंश सर्ग ३ श्लो० ७०.] वृद्धपणीं असें करणें हें या इक्ष्वाकुवंशांतील राजांचें कुलव्रतच होतें. १६. तुम्ही राज्यश्रीचा उपभोग पूर्वींच घेतला आहां. यास्तव आतां नित्य सुखार्थ आणि नित्य यशोर्थ (कायमचें सुख आणि यश मिळण्यासाठीं) शांतिस वरा हो! (अहो! शांतीचा स्वीकार करा, शांत व्हा, युद्ध करूं नका).

[1]परिणामशोककर हा [2]स्वगुरुप्रमुखाप्तशांतिसव राहो.' ॥ ४६
धर्म म्हणे, 'रे संजय! मी सिद्ध, न सिद्ध जनक, सामातें, ।
जाणोनि सर्व, दाटुनि [3]दूषिसि तूं साधुजन कसा मातें? ॥ ४७
निंद्य [4]स्वधर्मविच्युत, मी तरि युद्धासि सिद्ध उत्साहें, ।
[5]धर्मन्यायानुसरण पावाया योग्य काय [6]कुत्सा हें? ॥ ४८
[7]सदनुमतें [8]क्षिति अर्पुनि [9]सत्पुत्रकरीं [10]निवे दिलीप, तिला ।
[11]शोचूं नयेचि [12]सुज्ञें, जैसी कन्या [13]निवेदिली [14]पतिला. ॥ ४९
जरि हे न सोडवावी द्यूतजिता द्रौपदी तसी [15]महि म्या, ।
तरि [16]भरतकुलगुरूंच्या लागेना बोल काय गा! महिम्या? ॥ ५०
होइन निंद्य दहांत, न सोडवितां श्रीस संजया! परिस, ।
[17]कुलजा [18]यशचि, न विधिसहि बहुमत [19]हरिनाभिकंज यापरिस. ॥ ५१
हरि कुरुकुलहित इच्छी, [20]तोकांचें नित्य माय जेंवि हित, ।
करिन तसेंचि, [21]प्रभु हा सर्वज्ञ कथील काय जें [22]विहितें.' ॥ ५२

---

१. परिणामीं शोक उत्पन्न करणारा असा हा स्वगुरुप्रमुखाप्तशांतिसव (स्व+गुरु+प्रमुख+आप्त+शांति+सव=निज+वडिल पुरुष, श्रेष्ठ जन+थोर, मुख्य+स्वकीय+मरण+यज्ञ=आपले वडील ज्यांत मुख्य आहेत अशा आप्तांचा मरणरूप यज्ञ) राहो (न होवो). २. आत्मगुरुप्रमुख अशा आप्तांचा क्षयरूप यज्ञ. ३. दोष देतोस. ४. स्वधर्मभ्रष्ट. ५. धर्म आणि न्याय (नीति) यांचें अनुसरण (सेवन, पालन.) ६. निंदा. ७. सज्जनांच्या अनुमतानें. ८. पृथ्वी. ९. साधुपुत्राच्या हातीं (रघुराजाच्या हातीं). १०. शांत होई, समाधान मानी. ११. शोक करूं नये. १२. हें उत्तरार्ध सुभाषितरूप आहे. १३. निवेदणें=(१) देणें, अर्पण करणें. (२) सांगणें, निरूपण करणें. निवेदिली=दिलेली, अर्पण केलेली. १४. पतीला एकवार दिलेल्या कन्येविषयीं शोक करूं नये—असें पंताचें म्हणणें आहे, पण तें आमच्या आधुनिक समाजस्थितीस आणि लौकिकप्रगतीस कितपत अनुसरून आहे याचा विचार मार्मिक वाचकांनीं करावा. 'सकृत् कन्या प्रदीयते' ही नीति विद्यमानकाळीं कितपत मानवेल हें सांगतां येत नाहीं. १५. पृथ्वी. १६. भरतकुलोत्पन्न गुरुजनांच्या. १७. कुलीनास. १८. कुलजा यशचि बहुमत, यापरिस विधिसहि हरिनाभिकंज न [बहुमत]=सत्कुलोत्पन्न जो आहे त्याला यश फार आवडतें, तसें अन्य वस्तु आवडत नाहीं. [कुलजास यश इतकें आवडतें कीं] त्याहून विधिसहि (ब्रह्मदेवालाही) विष्णुनाभिकमल (स्वसंभवस्थान) बहुमत न (अधिक आवडत नाहीं). १९. विष्णूचें नाभिकमल. २०. बालकाचें. २१. कृष्ण. २२. उचित, योग्य. (अध्याय २८ श्लो० १४.)

श्रीकृष्ण म्हणे, 'सूता! सर्वांत गृहस्थधर्म सन्मत रे! ।
या आश्रमांत सर्व स्वपराचें सफल करुनि जन्म तरे. ॥ ९३
कर्म कसें टाकावें? जी अमृत मुखांत मायसी ओती ।

१. गृहस्थाश्रमधर्म साधुजनास मान्य (संमत) आहे. [अ० २९ श्लो० ७ यावरील नीलकंठीय 'भारतभावदीप' टीका पहा. या गार्हस्थ्याच्या श्रेष्ठपणाचा उल्लेख ७ व्या श्लोकाच्या टीकेंत आहे. यावरून पंत हे काव्यरचना करीत असतां नीलकंठाची टीका वारंवार पाहत असत असें अनुमान करण्यास जागा आहे. श्रीकृष्णाच्या प्रस्तुत भाषणास पुष्कळसा आधार टीकेंतच आहे. शोधक वाचकांनीं प्रस्तुत श्रीकृष्णोक्ति मूळाशीं ताडून पहावी.] २. या गृहस्थाश्रमांत. [या गृहस्थाश्रमाची थोरवी मनूनें फार गाइली आहे. मनु म्हणतो:—'यथा वायुं समाश्रित्य वर्तते सर्वजंतवः । तथा गृहस्थमाश्रित्य वर्तते सर्व आश्रमाः ॥ ७७ ॥ यस्मात्रयोऽप्याश्रमिणो ज्ञानेनान्नेन चान्वहम् । गृहस्थेनैव धार्यते तस्माज्जेष्ठाश्रमो गृही ॥ ७८ ॥ स संधार्यः प्रयत्नेन स्वर्गमक्षयमिच्छता । सुखं चेहेच्छता नित्यं योऽधार्यो दुर्बलेंद्रियैः ॥ ७९ ॥ ऋषयः पितरो देवा भूतान्यतिथयस्तथा । आशासते कुटुंबिभ्यस्तेभ्यः कार्यं विजानता ॥ ८० ॥' [अध्याय ३—मनुस्मृति] या श्लोकांचा भावार्थः—'प्राणवायूच्या आश्रयेंकरून जसे सर्व प्राणी सजीव राहतात, तद्वत् गृहस्थाश्रमीच्या आश्रयेंकरून सर्व आश्रमी निर्वाह करितात. ॥ ७७ ॥ गृहस्थाश्रमी हा सर्व आश्रमी यांला प्राणांसारखा श्रेष्ठ आहे असें जें सांगितलें तेंच पुन्हा उपपादन करितों. ब्रह्मचारी, वानप्रस्थ आणि संन्यासी हे तीन आश्रमी यांचें प्रत्यहीं पोषण गृहस्थाश्रमी ज्ञान, (वेदार्थव्याख्यान) आणि अन्नदान यांहींकरून करितात; यास्तव सर्वांहून गृहस्थाश्रमी श्रेष्ठ आहे. ॥ ७८ ॥ या कारणास्तव जो अक्षय स्वर्गसुखाची इच्छा करणारा, व इहलोकीं स्त्रीसंभोग, मिष्टान्नादि भोजनसुख, निरंतर इच्छिणारा त्यानें, जो गृहस्थाश्रम इंद्रियदमनरहितांस धारण करण्याला शक्य नाहीं, तो मोठ्या यत्नेंकरून धारण करावा. ॥ ७९ ॥ ऋषि, पितर, देव, भूतें आणि अतिथि हे सर्व, गृहस्थाश्रमी यांपासून आपणाला अन्न, उदक मिळावें असें इच्छितात, यास्तव शास्त्रज्ञ पुरुषानें त्या ऋष्यादिकांला संतुष्ट करावें. ॥८०॥' ३. आपलें व अन्याचें जन्म (कर्मद्वारा) सफल करून गृहस्थ तरतो (मोक्ष पावतो). [गृहस्थ आपलें, इतरांचें, पित्रादिकाचें तारण करतो, यतींचें पोषण करतो परंतु यति जो आहे तो फक्त आपलेंच तारण करतो, पित्रादिकांचें करीत नाहीं. तसेंच तो आपलें स्वताचें पोषणही करीत नाहीं, कारण तो भैक्षोपजीवी असतो, यास्तव गृहस्थ हा यतीपेक्षां श्रेष्ठ होय. याच कारणास्तव गार्हस्थ्य हें श्रेष्ठ होय.] ४. कर्माचा त्याग करणें योग्य कसें होईल? कर्मत्याग (नैष्कर्म्य) योग्य होणार नाहीं—असा भाव. ५. मायसी जी मुखांत अमृत ओती ती सद्विद्या कर्मत्याग न करतांचि फलवती होती—असा अन्वय. आईप्रमाणें जी सद्विद्या [उपासकाच्या] तोंडांत अमृत (सुधा—मोक्ष) घालते ती सद्विद्या (ब्रह्मविद्या) कर्मत्याग न केला असतां मात्र (कर्माचें आचरण केलें तरच) फलद्रूप होते. ज्ञान (ब्रह्मज्ञान) प्राप्त झालें तरी कर्माचा त्याग करतां येत नाहीं, योग्य कर्माचरण केलें तर मात्र तें ज्ञान

ती सद्विद्या, कर्मत्याग न करितांचि, फलवती होती. ॥ ९४
[1]रविशशिलोकपतिधराप्रमुख सकळ कर्मसिद्ध, हें समज, ।
[2]कर्मजल तृप्तिदायक, वाटे नैष्कर्म्य[3] जेंवि पळस[4] मज. ॥ ९५
दूषील कोण वर्णाश्रमनिरता[5] भरतसत्तमा[6] राया[7] ।
योग्यचि हा साधु सकल रक्षाया, सर्व मत्त[8] माराया. ॥ ९६
[9]दस्युदमन हा मुख्य क्षत्रियधर्म, प्रमाण थोरांस, ।
यास्तव मारावें या प्रभुनें दुर्योधनादि [10]चोरांस. ॥ ९७
दस्युदमनार्थ [11]शक्रें चापकवचशस्त्र निर्मिलें आहे, ।
आहेत घना चातक तैसे धर्मा करूनियां आ हे. ॥ ९८
हे अधिक [12]काय? दुर्बल ते रात्रौ घालिती दरवडा जे, ।

---

फलप्रद होतें. तात्पर्य हें कीं नुसत्या सद्विद्येनें (ब्रह्मविद्येनें, ब्रह्मज्ञानानें) फलप्राप्ति व्हावयाची नाहीं, त्यास कर्मांची आवश्यकता आहे. कर्मसाधक जी विद्या तिलाच फल प्राप्त होतें.

१. रवि (सूर्य–अ० २९ श्लो० ९), शशि (चंद्रमा–श्लो० १०), लोकपति (इंद्र, अग्नि, यम, वरुण इत्यादिक आठ लोकपाल), धरा (पृथ्वी–श्लो० ११) आहे प्रमुख ज्यांमध्यें असे सकल (देव–देवता) कर्मसिद्ध आहेत (कर्मानें सिद्धि पावले आहेत); सूर्य कर्मानेंच अहोरात्र नित्य उदयास्त पावतो; महिन्यानें आणि अर्धमासानें कर्मयोगानेंच चंद्र येतो जातो; अमितभार सहन करण्याची शक्ति पृथ्वीला प्राप्त होते. [लोकपति=दिक्पाल हे आठ आहेत. 'इंद्रो वन्हिः पितृपतिर्नैर्ऋतो वरुणो मरुत् । कुबेर ईशः पतयः पूर्वादीनां दिशां क्रमात् ॥.' १ इंद्र (पूर्वेचा), २ वन्हि (आग्नेयीचा), ३ यम (दक्षिणेचा), ४ निर्ऋति (नैर्ऋतीचा), ५ वरुण (पश्चिमेचा), ६ वायु (वायवीचा), ७ कुबेर (उत्तरेचा), ८ ईश (ईशान्यीचा).] २. कर्मरूप (क्रियारूप) जल तृप्ति देणारें आहे. क्रियेपासून फलसिद्धि आहे. ३. नैष्कर्म्य (क्रियेचा अभाव) हें पळसासारखें अफलदायक आहे. पळसवृक्ष पुष्कळ फुलतो परंतु त्याचा कांहीं उपयोग नाहीं तसें नैष्कर्म्य होय. प[illegible] जसा मूल्यहीन आहे तसें नैष्कर्म्य आहे. ४. वृक्षविशेष. ५. वर्ण आणि आश्रम यांच्या धर्माविषयीं परमदक्ष (आसक्त). ६. भरतश्रेष्ठास. ७. युधिष्ठिर राजाला. ८. माजलेले दुष्ट जन. [दुष्टांचें शासन आणि साधूंचें पालन करावें–हा क्षत्रिय धर्म आहे असें या गीतींत सूचविलें आहे. धर्मतः दुर्योधन नृशंस आहे, तेव्हां तो धार्मिक राजानें शासन करण्यास योग्य (वध्य) आहे–असें पुढील गीतींत दर्शविलें आहे.] ९. शत्रूचें अथवा चोराचें मर्दन. १०. जो राजा लोकांच्या राज्याचा अभिलाष करतो तो चोर जाणावा–या न्यायानें दुर्योधन चोर समजला पाहिजे. (अ० २९ श्लो० २९ टीका पहा.) ११. श्लो० ३० टीका पहा. १२. जे रात्रौ दरवडा घालिती ते दुर्बल काय? [आणि] हे अधिक काय?=जे रात्रीं दरवडा घालतात ते बिचारे गरीब चोर, पण हे (कौरव दिवसा ढवळ्या दरवडा घालतात तेव्हां) अधिक काय? ते चोर जसे शिक्षेस पात्र तसेच हेही पात्र आहेत, ते जसे वध्य तसेच हेही वध्य होत, पण त्या चोरांपेक्षां हे अधिक शिक्षेस

लुटिलें धन दुःख नसे, परि हृदयीं बहु [1]कुवादरव [2]डाजे. ॥ ५९
[3]स्तेन भले, न [4]स्त्रीचा [5]नग्न करिति हरुनि [6]सावलें [7]काय, ।
नव्हतों [8]सभेंत आम्हीं म्हणुनि लुटायासि फावलें काय? ॥ ६०
जा, सांग, [9]त्वद्वदनें ऐकावें हेंचि वाक्य [10]अंधानें, ।
आहेत सिद्ध पांडव सेवाया प्राण [11]बाणसंधानें. ॥ ६१
देतां [12]विभाग करितिल पांडव धृतराष्ट्रदास्य दास तसे, ।
नाहीं तरि खल मर्दुनि [13]हास्य, मज असें भविष्य भासतसे.' ॥ ६२
संजय निघे, तयाला धर्म म्हणे, 'आयका, यश [14]तगावें, ।
द्या पांच ग्राम, न दे [15]दासाला राय काय शत गावें? ॥ ६३
ताताला [16]भीष्माला सांगावीं पाय धरुनि [17]नतिमनें, ।
जोडुनि हस्त म्हणावें [18]साम करावेंचि सुप्रसन्नमनें. ॥ ६४
आचार्य द्रोण [19]कृप प्रार्थुनि, प्रथम [20]कथुनि मन्नमना, ।
म्हण साम [21]भलतसें मज बहुमत, [22]दुकाळांत जेंवि अन्न मना. ॥ ६५
सांग [23]कनिष्ठपित्यातें [24]बंधुविरोधासि चित्त भी [25]माझें, ।

---

पात्र होत. लुटिलें धन दुःख नसे=त्या कौरवचोरांनीं धन हरण केलें याचें दुःख तितकें नाहीं. परि हृदयीं कुवादरव बहु डाजे=परंतु अपवादशब्द हृदयांत फार खुपतात, त्यांच्या कटुभाषणाचा शब्द हृदयाला फार दुःख देतो.

१. अपवादशब्द. २. बोंचे, खुपे. ३. अध्याय २९ श्लो० ३३ पहा. ४. स्त्रीचा काय (देह) सावलें (लुगडें) हरुनि (घेऊन) नग्न न करिति (म्हणून) स्तेन (हे) भले (चांगले) होत—असा अन्वय. ५. अ० २९ श्लो ३७-३९ पहा. ६. वस्त्र. ७. शरीर. ८. कौरवसभेंत. ९. तुझ्या मुखानें. १०. प्रज्ञाचक्षु धृतराष्ट्रानें. ११. बाण धनुष्याच्या दोरीवर लावून प्राणाची सेवा करावयाला पांडव तयार आहेत. बाण मारून प्राण हरण करण्यास सिद्ध आहेत—असा भाव. कौरवांनीं विषप्रयोग लाक्षागृहदाह इत्यादि उपायांनीं पांडवांचे प्राण हरण करण्याचा यत्न केला, तसा प्रकार पांडवांचा नाहीं. समरांगणीं समोर उभे राहून कौरवांच्या प्राणांची सेवा बाण पाठवून करण्याची त्यांच्या आंगीं शक्ति आहे असें येथें सूचविलें आहे. १२. राज्यांश. १३. एक तर दास्य करतील, तसें न झालें तर खलमर्दन करून हंसतील. १४. राहावें. १५. राजा आपल्या सेवकाला शंभर गांवें देत नाहीं काय? अर्थात् देतो, तेव्हां आम्हाला पांच गांव देण्यास कांहींच हरकत नसावी—असा भाव. १६. अध्याय ३० पहा. तसेंच अ० ३१ श्लो० ८-१० पहा. १७. माझे नमस्कार. १८. सख्य, संधि. १९. अध्याय ३० श्लो० १४-१५ पहा. २०. सांगून. २१. कोणत्याही प्रकारचें साम, ज्या सामानें आमचें कांहीं नुकसान झालें तरी तशा प्रकारचें साम मला (धर्माला) फार मान्य आहे. २२. दुष्काळांत. २३. विदुरातें. २४. भावांच्या शत्रुत्वाला. २५. माझें.

करवा साम भलतसें देइल हरि इष्ट वित्त [1]भीमा जें. ॥ ६६
[2]कर्णासि वद [3]सख्याला आवर, [4]विजयासि आवरील हरी, ।
[5]समयीं [6]प्रवृत्ति आवरि थोर, जसा सिंधु आवरी [7]लहरी. ॥ ६७
सांग [8]नृपासहि हें कीं साम शुचि, [9]तयांत नाव रायाचें, ।
[10]सुगति वरायाचेंचि न, कर्म उचित यातना वरायाचें. ॥ ६८
गांधारीस म्हणावें [11]पंचोत्तरशत असोत तनय, शतें ।
तृप्ति नसोचि तुज, करीं जेणें गातील साधुजन यश तें. ॥ ६९
माझ्या सुयोधनादि भ्रात्यांच्या बायकांसि कळवावें, ।
कीं स्वहितार्थ तुम्हीं तरि एकांतीं [12]कांतचित्त वळवावें. ॥ ७०
क्लीबवृद्ध[13]द्वारपदासीजन[14]वामन[15]कुब्जदासदायातें ।
पुशिलें [16]अनामय असें सांग पुसावेंचि बा ! सदा यांतें. ॥ ७१
[17]कुरुकन्यांसि म्हणावें तातें पुशिलें तुम्हांसि, ज्या तातें ।
'[18]श्री देउनि, न [19]दिली [20]ऱ्ही [21]स्वःकन्याश्रीदपारिजातातें.' ॥ ७२

१. भीमा जें वित्त इष्ट [आहे] तें हरि देईल—असा अन्वय. २. अ० ३० श्लो० ३० पहा. ३. मित्र दुर्योधनाला. ४. अर्जुनाला. ५. समयीं (प्रसंग पडला असतां) थोर (श्रेष्ठ पुरुष) प्रवृत्ति (मनाची ओढ) आवरि (आवरून धरतो—मनाला आपल्या आटोक्यांत ठेवितो—मनाला कांहीं गोष्ट आवडत असली तरी ती अयोग्य असल्यास विचारानें मनाचें समाधान करून त्यास आपल्या ताब्यांत ठेवतो.) ६. मनाचा ओघ. ७. लाटा. जसा सिंधु लहरी आवरी (ज्याप्रमाणें सागर आपल्या लाटांस मर्यादेबाहेर जाऊं देत नाहीं) तसा (त्याप्रमाणें) थोर (पुरुष) प्रसंगीं मनाचा ओघ आवरून धरतो. ८. धृतराष्ट्राला. ९. त्या सामांतच राजाला कीर्ति मिळणार आहे. १०. तुझें कर्म सुगतिप्रापक नाहीं तर यातनाप्रद आहे, तुझ्या आचरणानें (कर्मानें) सुगति (मुक्ति) न मिळतां दुर्गति (यातना) मात्र प्राप्त होणारी आहे, तेव्हां तें कर्म त्याज्य होय, ज्या कर्माचे योगानें सुगति मिळते तें कर्म स्वीकारावें, परंतु ज्यापासून यातना प्राप्त होतात तें कर्म करणें योग्य नव्हे—असा भाव. ११. एकशें पांच. १२. नवऱ्यांचीं मनें. (अ० ३० श्लो० ३४-३६.) १३. द्वारपाळ. १४. खुजा, खंज. (अ० ३० श्लो० ३९). १५. कुबडा. १६. आरोग्य. १७. अध्याय ३० श्लो० ३७ पहा. १८. द्रव्य. १९. ज्या तातें [तुम्हाला] श्री देउनि स्वःकन्याश्रीदपारिजातातें ऱ्ही न दिली [त्या] तातें तुम्हांसि पुशिलें [असें] कुरुकन्यांसि [हे संजया!] म्हणावें—असा अन्वय. [बापानें मुलीला जी संपत्ति द्यावयाची ती इतकी कीं तिला पाहून कल्पवृक्ष जो पारिजात त्याला लाज वाटावी, पण मला—धर्माला—तसें करतां आलें नाहीं व याचें कारण कौरवांचें अन्यायाचरण होय असें सुचविण्यासाठीं धर्मराज म्हणतो. आपल्याकडून कन्यांस योग्य देणगी देण्याचें काम झालें नाहीं हें सुचवीत हो-

ऐसें [1]अजातरिपुमुख [2]शशिमंडल अमृत तेंवि [3]वांचिक वी ।
तें बहु असोचि, [4]विस्तरवद्ग्रंथ प्राकृतीं न वाचि कवी. ॥ ७३
गेला तेव्हां [5]वाटे ओढुनि दुर्दैव [6]संजया नेतें, ।
[7]धरिलें होतें जें [8]कविसुकवच [9]हरिपादकंज यानें तें. ॥ ७४
धृतराष्ट्रासि म्हणे, 'मी संजय आलों [10]तया सुताकडुन, ।
[11]वैरज्वरीहि म्हणती [12]यत्कीर्तिसुधाब्धिच्या उता कडु न. ॥ ७५
श्रमलों बहु, मज आज्ञा द्यावी [13]श्रितसुरतरो! निजायास, ।

---

त्साता धर्म मुलींस क्षेम पुसतो. ज्यापेक्षां मी देणगी देण्याचें काम केलें नाहीं तेव्हां मी तातपणास अपात्र आहें, पण ही अपात्रता कौरवांनीं अन्यायानें माझा राज्यभाग मला न दिल्यामुळें आली आहे असें येथें ध्वनित केलें आहे. आपल्या वडिलांनीं अन्यायाचरण केलें आहे या गोष्टीचें स्मरण कुरुकन्यांस होऊन खेद वाटावा असा धर्मोक्तीचा भाव दिसतो.] २०. लज्जा. २१. देवकन्यांस श्री देणारा जो पारिजातवृक्ष त्यास.

१. ऐसें अजातरिपुमुख वाचिक वी (प्रसवे–बोले). २. चंद्रमंडळांतून अमृताचा स्राव होतो हें सुप्रसिद्ध आहे. ३. निरोप. ४. या उक्तीवरून पंतांच्या काळीं मोठाले प्राकृत ग्रंथ वाचणें हें कविजनांस (पंडितांस) रुचत नसे असें भासतें. ५. ही उत्प्रेक्षा आहे. ६. [संजय इंद्रप्रस्थाहून परत गेला तेव्हां] संजयाला वाटे (वाटलें). ७. जें कविसुकवच हरिपादपंकज यानें (संजयानें) धरिलें होतें तें (त्या संजयापासून) दुर्दैव ओढूनि नेतें [असें संजय] गेला तेव्हां संजया वाटे–असा अन्वय. पंडितांचें उत्तम कवचाप्रमाणें संरक्षण करणारें असें जें हरिपादकमल [इंद्रप्रस्थीं पांडवांच्या समागमांत असतां] धरून ठेविलें होतें तें (कृष्णचरणकमल) दुर्दैव (पांडववियोगरूप दुर्भाग्य) आपणापासून बळातें ओढून नेत आहे–असें संजयाला हस्तिनापुरास परत जातांना वाटलें. पांडवांचा समागम सोडून जातांना संजयाला फार वाईट वाटलें. असा भाव. ८. ज्ञान्याला उत्तमकवचरूप. ९. कृष्णचरणकमल. १०. त्या मुलाकडून आलों, ज्या मुलाच्या कीर्तिरूप अमृतसागराच्या उताला वैरज्वरपीडित लोक कडू म्हणत नाहींत त्या मुलाकडून (धर्माकडून) आलों. ११. वैररूप ज्वर ज्यांना पीडा देतो ते वैरज्वरी. ज्वरांत सर्व पदार्थ कडू लागतात, पाणी कडू लागतें, दुग्ध कडू लागतें, पण हा वैरज्वर असा होता कीं त्यांत (धर्मराजाच्या) कीर्तिरूप क्षीरसागराचा ऊत कडू लागला नाहीं. द्वेषरूप ज्वरानें ज्यांस व्यापिलें होतें असे शत्रु देखील धर्मराजाच्या पवित्र कीर्तीला दोष देऊं शकले नाहींत. शत्रुसुद्धां धर्मराजाच्या कीर्तिरूप क्षीरसागराच्या उताला कडू म्हणत नाहींत. ज्वरानें तोंड कडू होतें व सर्व पदार्थ कडू लागतात, पण या धर्मवैरज्वरांत धर्मकीर्तिरूप सुधोदधि गोड लागला. १२. ज्याच्या कीर्तिरूप अमृतसागराच्या. १३. हे आश्रितांच्या कल्पवृक्षा.

सांगेन[1] सभेंत उद्यां प्रभुवाक्तरि[2], भय तरोनि, जायास.' ॥ ७६
जातां सूत, अनिद्राख्री[3] भेटे नूतनाचि रायास, ।
कीं संतोषा बाळा ये चिंतापूतना[4] चिरायास. ॥ ७७
स्मरतांचि[5] विदुर भेटे सद्वैराख्या[6] प्रजागरामाजी[7], ।
सेवुनि[8] वांचेल कसी म्हणत्या गुरुस[9] प्रजा गरा[10] माजी? ॥ ७८
विदुर म्हणे, 'हा आलों, आहें पायांसमीप, राजाजी[11]! ।
एथेंचि म्यां बसावें, तीच तया योग्यता[12] परा ज्या जी. ॥ ७९
कोणा कार्याकरितां रात्रौ स्मरला[13] तुम्हांस हा जन हो? ।
स्वस्थ अहां कीं? आज्ञा काय? प्रणत[14] प्रसादभाजन[15] हो?' ॥ ८०
धृतराष्ट्र म्हणे, 'वत्सा! तुजहुनि इतरास काय[16] सांगावें? ।

---

१. कुरुवीरांची सभा जमल्यावर पांडवांचा निरोप सर्वांसमक्ष सांगेन असें संजयानें सांगितलें. [अ० ३२ श्लो० ३०.] २. श्रीकृष्णवाचानौका. कृष्णाचें वचन हीच नौका. [प्रभु=धर्म, कृष्ण]. ३. धृतराष्ट्राला निद्रा आली नाहीं. ४. ज्याप्रमाणें पूतना कृष्णास मारण्यास आली होती त्याप्रमाणें चिंतारूप राक्षसी पूतना ही संतोषरूप मुलाला मारण्यासाठीं आली. संतोषरूप बाळकाला चिरायाला (फाडायाला) चिंतारूपिणी पूतना आली. चिंतेमुळें संतोष नष्ट झाला, व संतोष नसल्यामुळें धृतराष्ट्राला निद्रा आली नाहीं. ५. धृतराष्ट्रानें विदुराचें स्मरण करतांच. ६. साधुवैरनामक. ७. जागरणांत. प्रजागर=निद्रेचा अभाव. [अ० ३३ श्लो० १०.] ८. माझी प्रजा, गरा सेवून कसी वांचेल? ९. सद्वैराख्या गरा सेवुनि माजी प्रजा कसी वांचेल [असें] म्हणत्या (म्हणणाऱ्या) गुरूस विदुर भेटे—असा अन्वय. साधुजनवैरनामक विषाचें प्राशन करून माझी प्रजा (पुत्रसंतति) कशी वांचेल असें—म्हणणाऱ्या पित्याला तो जागा असतां, (धृतराष्ट्राला) [त्यानें स्मरण केलें तेव्हां] विदुर भेटला. धृतराष्ट्राच्या प्रासादीं विदुर रात्रीं आला तेव्हां राजा चिंतेनें, विनिद्र होता. येथें 'सद्वैराख्या' हें पद 'गरा' याचें विशेषण समजावें. थोडासा येथें दूरान्वय आहे, पण अर्थ सरस होतो. १०. विषास. ११. अध्याय ३३ श्लो० ८ पहा. १२. जी ज्या (मनुष्याला) योग्यता तीच तया (त्या मनुष्याला) परा (श्रेष्ठा-उत्तमा-मोठी) होय. ज्या मनुष्याची जी योग्यता असेल तीच त्याला उत्तम समजली पाहिजे. येथें पायांसमीप बसणें हीच माझी योग्यता आहे तेव्हां तीच मला उत्तम होय, मला अन्य स्थान उचित नाहीं—असा भाव. १३. आठवला. (हा जन—विदुर). विदुराचें स्मरण तुम्ही रात्रौ कशासाठीं केलें? १४. नतजन. १५. प्रसादास पात्र. १६. हेंच यमक 'कृष्णविजय' अध्याय ८७ गीति ७१ यांत आहे.

आलें असे कपाळा कीं निंदुनि [१]हंस [२]वायसां गावें. ॥ ८१
[३]तिकडुनि येउनि सूतें केलें [४]पाण्यापरीस पातळ तें, ।
सांगावें काय सख्या ! जें हृदया [५]गरलसेंचि [६]आतळतें. ॥ ८२
वदला सांगेन उद्यां धर्माचा [७]धर्मधाम [८]संदेश, ।
चिंतेंत बुडाला हा सुज्ञा ! त्वद्बंधु [९]सर्वमंदेश. ॥ ८३
निद्रा येईल कसी ? [१०]मच्चिंता होय काय सामान्या ? ।
शूर्पणखीसी हे बा ! तुज हा अतिभार [११]कायसा मान्या ! ? ॥ ८४
बहु [१२]धर्मार्थकुशल तूं वद या जें [१३]श्रेय [१४]असदवस्थागा, ।
निववू मज बोल तुझा, [१५]जैसा [१६]पीयूषरस [१७]दवस्थागा.' ॥ ८५
विदुर [१८]म्हणे, 'हो ! प्रभुजी ! [१९]बलवंतासीं प्रसंग ज्या पडतो, ।

---

१. हंस–हे पक्षी हिमालय पर्वताच्या कैलासशिखरावरील मानससरोवराकडे वर्षाकाळाच्या आरंभीं मोठ्या प्रेमानें गर्भधारणसमय आला असें जाणून राहण्यासाठीं जातात; हें सरोवर यांच्या प्रेमाचें स्थान आहे आणि यांना नीरक्षीरविवेक करण्याचें नैसर्गिक सामर्थ्य आहे, असें या पक्ष्यांविषयीं प्राचीन कवींच्या ग्रंथांत वर्णन दृष्टीस पडतें. तेव्हां हे वायसांपेक्षां फार श्रेष्ठ होत हें सांगावयास नको. २. कावळ्यांना. हंसाची निंदा करावी आणि काकाची स्तुति करावी असा प्रसंग कपाळीं आहे. जें करूं नये तें करण्याची पाळी आहे. येथें अर्थसंदर्भानें पांडव हंस आणि दुर्योधनादिमंडळ वायस असें समजावें. ३. पांडवांकडून. ४. पाण्यापरीस पातळ करणें=[हा शब्दसमूह कोशकारांस उपयोगी आहे.] खालीं पाहायास लावणें, फजीत करणें, लाजवणें, शरमिवणें. मूळांत 'गर्हयिला' असा शब्द आहे. [अ० ३३ श्लो० ९.] ५. विषासारखें. ६. स्पर्श करतें, लागतें. ७. धर्माचें धाम (स्थान, गृह) असा धर्मपरिपूर्ण. ८. निरोप. ९. सर्व मूर्खांचा पति, महामूर्खशिरोमणि. १०. मत्-चिंता. ११. [हे] मान्या! तुज हा अतिभार कायसा ?–असा अन्वय. तूं जो मान्य (वंदनीय, ज्ञानसंपन्न) आहेस त्या तुला माझ्या चिंतेचा भार कायसा ? तूं ही माझी चिंता सहज दूर करशील, माझ्या चिंतेचा परिहार करणें ही गोष्ट तुजसारख्या मान्य व ज्ञानी पुरुषास मोठी दुष्कर आहे असें नाहीं. तुजसारख्या महाप्राज्ञाला हा मोठा भार नाहीं, परंतु मला अज्ञाला हा अतिभार होय. [मूळांत तूं ह्या राजर्षिवंशांत प्राज्ञसंमत आहेस–असें धर्माचें वचन आहे. अ० ३३ श्लो० १५]. १२. धर्म व अर्थ यांजविषयीं निपुण. १३. कल्याण, हित. १४. अ-सद्+अवस्था+गा=वाईट+स्थिति+गेलेला=वाईट अवस्थेस पावलेला, वाईट अवस्थेस पोंचलेला. १५. ही उपमा किती तरी सरस आहे. १६. अमृतरस. ['पीयूषममृतं सुधा' इत्यमरः.] १७. दव+स्थ+अगा=वणवा+स्थित+वृक्षा=वणव्यांतील वृक्षास. १८. अध्याय ३३ श्लो० १३-१४ पहा. १९. बलवंताबरोबर शत्रुत्व करणाऱ्या हीनबल आणि हीनसाधन मनुष्याला प्रजागर घडतो (त्याला झोंप येत नाहीं).

स्पष्ट प्रजागर तया [1]हीनबला [2]हीनसाधना घडतो. ॥ ८६
कीं जो [3]हृतधन कामी [4]तस्कर रात्रौ न नीज ये त्याला, ।
देवा[5]! ऐसा कांहीं दोष[6] नसेल किं तुम्हांकडे आला? ॥ ८७
अथवा पर[7]वित्ताचा [8]अभिलाष नसेल कीं मना रुचला? ।
हा[9] बहु पापद तापद, यापरि [10]कटुकी न कटु न वा[11] [12]कुचला.' ॥ ८८
भूप म्हणे, 'प्राशूं दे [13]धर्मामृतकवलबोल [14]कानांहीं ।
त्वत्सम [15]सत्समयज्ञ [16]सुधर्मापतिजवळ बोलका[17] नाहीं.' ॥ ८९
विदुर म्हणे[18], 'जो [19]आस्तिक [20]गुरुवेदोक्तीं जयास विश्वास, ।
मीपणें[21] ज्यासि न शिवलें, तो 'पंडित[22]' मान्य होय विश्वास[23]. ॥ ९०

---

१. ज्याचें बल (सैन्य–सामर्थ्य) कमी आहे त्याला. २. ज्याचें साधन (सामुग्री) दुर्बल आहे त्याला. ३. ज्याचें धन चोरीस गेलें आहे त्याला, जो कामासक्त झाला त्याला व जो चोर आहे त्याला रात्रीस जागरण घडतें. ४. चोर. ५. 'देवा' या शब्दावरून व एकंदर विदुरोक्तीवरून त्याचा धृतराष्ट्राविषयीं पूज्यभाव व्यक्त होतो. विदुर फार सांभाळून आणि पदोपदीं धृतराष्ट्राचा गौरव करून त्याजपाशीं बोलत आहे. ६. वर वर्णिलेल्या चार प्रकारांपैकीं एखाद्या प्रकारचा दोष. ७. पराचें धन हरण करण्याची इच्छा झाली आहे काय? ८. लोभ. ९. परधनाभिलाष. १०. काडेकिराईत. ११. विकल्पार्थी (अथवा). १२. काजरा. १३. धर्मरूप अमृताचे ग्रास. १४. कानांहीं प्राशणें=आदरपूर्वक ऐकणें. १५. उत्तम समय जाणणारा. १६. इंद्राजवळ. [सुधर्मा=देवसभा; पति=स्वामी. देवसभेचा स्वामी इंद्र होय. जींत शोभन धर्म असतो ती सुधर्मा होय.] १७. 'बोल कानांहीं' 'बोलका नाहीं' ठरींव यमक. हेंच यमक वनपर्व अध्याय ६ गीति ४९ [काव्यसंग्रहग्रंथमाला–पृ० ९९] यांत आहे. बोलका=बोलणारा (फार बोलतो तो.) येथें हा शब्द वाग्मी Eloquent या अर्थी योजिला आहे. सांप्रत या शब्दांत थोडी निंदेची छटा मारते, परंतु ती पंतांच्यावेळीं नसावी. बोलका म्हणजे बहुभाषी–बडबड करणारा, Talkative, असा अर्थ झाला आहे. १८. धृतराष्ट्राला त्याचा अविचार दाखवून व पंडितांची लक्षणें दुर्योधन कर्ण इत्यादिकांच्या ठिकाणीं नाहींत असें सांगून नंतर 'पंडित' कोणाला म्हणावें व 'मूढ' कोणाला म्हणावें हें विदुरानें निवेदन केलें आहे. [अध्याय ३३ श्लो० ५-४०.] १९. धर्मबुद्धिसंपन्न, श्रद्धावान्. २०. गुरु आणि वेद यांच्या वचनावर विश्वास ठेवणारा. २१. ज्याच्या अंगीं मान्यमानिता नाहीं तो, आपण मानार्ह आहों असें जो मानितो तो मान्यमानी, ज्याला अहंपणा नाहीं तो. २२. 'तया साधुचिन्हाचिया प्रमेया । तुज सांगतों महाराया! । एकाग्र करोनी श्रोत्रेंद्रिया । धर्म परिसें सुजाणा! ॥ १ ॥ आत्मज्ञानीं अत्यादर । क्षमादयाशांतितत्पर । निंद्य कर्मांचा तिरस्कार । 'पंडित' बोलिजे त्या नांव ॥ २ ॥ आस्तिक आणि श्रद्धावंत । क्रोधदर्पहर्षरहित । निषिद्धाचरणीं लज्जा बहुत । 'पंडि-

दुर्लभ वस्तु न वांछी, न करी जो नेष्ट वस्तुचा शोक, ।
आपत्तींत न मोहे त्या 'पंडित' म्हणति जाणते लोक. ॥ ९१
विद्या नसोनि उद्धत, धन नसतां जो उदारपण वाहे, ।
अर्थासि नीचकर्में जो संपादावयासि जन पाहे, ॥ ९२
नसतां लाभ यशाचा, दाटूनि करी परार्थ जो यत्न, ।
मित्रार्थी कपट करी तो साक्षात् मूढजनशिरोरत्न. ॥ ९३

---

तवर्य' या नांव. ॥ ३ ॥ ज्याचें कृत्य न कळे कोणा । मंत्र आणि विचारणा । केलें असे सर्वजना । कळे तो 'पंडित' बोलिजे. ॥ ४ ॥ धर्म अर्थ आणि काम । संसारीं वर्ततां यथानुक्रम । पाळी यथाशक्ति दृढ नेम । 'पंडित' बोलिजे या नांव. ॥ ५ ॥ निश्चय करि काम चालण्या । कर्म वर्ततां आसक्त जाणा । सफळ काम आवरी मना । 'पंडित' बोलिजे या नांव. ॥ ६ ॥ आत्मस्तवनीं न पवे हर्ष । अपमानितां न करी रोष । जेंवी अक्षोभता गंगाहृजीवनास । 'ज्ञानी' बोलिजे त्या नांव. ॥ ७ ॥ व्यतिरिक्त नोहे पुष्पपरिमळ । तेंवी प्रज्ञामाजी ज्ञान निर्मळ । आर्य मर्यादासेतु अचळ । 'पंडितवर्य' या नांव. ॥ ८ ॥' [नरहरि मोरेश्वरकृत उद्योगपर्व–अध्याय ७ ओंव्या १७-२४.] २३. जगास.

१. ही आर्या मूळांतील श्लोक २३ याशीं ताडून पहा. मूळांत पंडितांचीं अनेक लक्षणें सांगितलीं आहेत, त्यांचा संक्षेप करून येथें पंतांनीं वर्णन केलें आहे. २. गेलेल्या, नसलेल्या. ३. विपत्तींत. ४. उन्मत्त, गर्विष्ट. ५. दुसऱ्यासाठीं. ६. मूर्खशिरोमणि. 'आतां मूर्खाचें लक्षण । ऐका श्रोते! विचक्षण । सांडोनि द्यावया अवगुण । साधकांलागीं बोलिलें. ॥ १ ॥ सर्वकाळ श्रद्धारहित । नेणे धर्मनिरोपणपंथ । कथाश्रवणीं नाहीं चित्त । तोचि 'मूर्ख' दुरात्मा. ॥ २ ॥ स्वधर्म आपुला सांडून । होवोनी वर्ते विषयाधीन । परस्त्री परधनीं घाली मन । तोचि 'मूर्ख' दुरात्मा. ॥ ३ ॥ जेथ अविद्या कल्पना । आवडी नसे ईश्वरभजना । नाइके श्रेष्ठांचिया वचनां । तोचि 'मूर्ख' दुरात्मा. ॥ ४ ॥ सदा प्रवृत्ति कल्पी चित्तीं । विषय सेवितां अतृप्ति । चित्तीं वसे विषयशक्ति । तोचि 'मूर्ख' दुरात्मा. ॥ ५ ॥ स्पर्धा करीं बळिष्ठातें । बळ न तुळे आपुल्या चित्तें । अकारण उदीत होय मरणातें । तोचि 'मूर्ख' दुरात्मा. ॥ ६ ॥ परस्त्रीपरहितअपाहार । करावया कुशलत्व फार । ईश्वरभजनीं अनादर । तोचि 'मूर्ख' दुरात्मा. ॥ ७ ॥ मानी संसार शाश्वत । त्या त्या ऐसे करी विषय स्वार्थ । न स्मरे न नेणे काळ आगात । तोचि 'मूर्ख' दुरात्मा. ॥ ८ ॥ साधूगुरूंची निंदा करी । देवब्राह्मणद्वेष धरी । मिथ्या अभिमान वाहे शरीरीं । तोचि 'कुपुत्र' दुरात्मा. ॥ ९ ॥ सांडोनी अनादि कुळाचार । आचरे परधर्म अनाचार । परनिंदा अनुवादें जागे वक्त्र । तोचि 'मूर्ख' दुरात्मा. ॥ १० ॥ स्वजन आपुले दुरावी । श्वशुरवर्ग घरीं सांठवी । याचकांप्रति कलह लावी । तोचि 'कुपुत्र' दुरात्मा. ॥ ११ ॥ क्षुधातुर आलिया कोण । नेदी त्यातें ग्रास कृपण । तो जाणिजे 'मूर्ख' पाषाण । पाहुणा वैवस्वताचा. ॥ १२ ॥ श्राद्धीं तृप्त करी पितर । अन्नें तृप्त न करी नर । ऐश्वर्यें नोळखी परोपकार । तोचि 'कुपुत्र' दुरात्मा. ॥ १३ ॥ सायासें एक मि-

मित्रत्व दे अमित्रा, जो मित्रद्वेष दुष्टकर्म करी, ।
तो 'मूर्ख,' असें म्हणती पुरुषपरीक्षा[1] कळे ज्यांसि बरी.' ॥ ९४
इत्यादि बहु वदे तें मोडुनि आली कथाचि आर्यांत, ।
निजपरिवार[3] त्यागुनि जसि भगवन्मूर्ति[4] गोपभार्यांत. ॥ ९५
धर्मार्थकाममोक्षप्राप्तीचे सिद्ध मंत्र ते बोल,[5] ।
मोल न करवे त्यांचें धनदासहि,[6] सिंधुहूनि जे खोल.[7] ॥ ९६
सत्य प्रिय हित सर्वश्रुतिशास्त्ररहस्य विदुर कवि बोले, ।
तो लेलिह[8] जाणो त्या प्रभुवेणुरवामृतें[9] निवे डोले. ॥ ९७
भूप म्हणे, 'बा! सुज्ञा! दे सर्व तमासि[10] भीति, परि सविता[11] ।

ळवितसे । लावलें तें सर्वां सरिसें । तेथ देहलोभ करी विशेषें । तोचि 'मूर्ख' दुरात्मा. ॥१४॥ भक्ष भक्षित पंथीं चाले । हांसत हांसत मुखें बोले । दोघे बोलतां ऐकों चाले । तो 'शत-मूर्ख' दुरात्मा. ॥ १५ ॥ श्रेष्ठीं वर्जितां करी दुष्कृती । कर्म प्रतिष्ठी अनाहुतीं । जपतप कर्मीं श्रद्धा हितीं । तोचि 'मूर्ख' दुरात्मा. ॥ १६ ॥ आपण करी अनाचार । दुजया करी भ्रष्टाचार । श्रेष्ठांप्रति फिरवी नेत्र । तोचि 'कुपुत्र' दुरात्मा. ॥ १७ ॥ आपण प्रतिष्ठित म्हणोन । करी अन्यायाचरण । धर्मनीति करी खंडण । तोचि 'पाषाण' दुरात्मा. ॥ १८ ॥ आपणामाजी दैवें करून । एकादा झाला संपन्न । त्यावरि अनुहित कल्पी मन । तोचि 'पाषाण' पापात्मा. ॥ १९ ॥ येवोनियां नरशरीरीं । आपली आपण ओळखी न करी । विषयीं लोळे श्वानापरी । तो निर्धारीं दुरात्मा. ॥ २० ॥ सदा कुपथ्य भोजन । निंदी देवसाधुब्राह्मण । ऐसिया पापात्मया अकाळमरण । लिहिलेंसे विधीनें. ॥ २१ ॥ एक वर्ततां अनाचार । तें जरि आपणा ठाऊक होऊनि सरे । तो उघड करी परस्पर । तो 'मूर्ख' दुरात्मा. ॥ २२ ॥' [श्रीसुभानंतस्वामीकृत उद्योगपर्व—अध्याय १८ ओंव्या ८१-१०२].

१. 'पुरुषपरीक्षा कळे न ज्यासि बरी' असाही पाठ आहे. २. विदुर पुष्कळ निरूपण करी. विदुरानें नीतिप्रतिपादन केलें आहे त्याचा समावेश या आर्यांत केला नाहीं, फक्त कथाभागाचा केला आहे. ३. आपल्या घरांतील मंडळी, बाप, आई, बंधु, भगिनी, इत्यादि मंडळी. ४. श्रीकृष्णमूर्ति. ५. विदुरोक्त वचनें. ६. कुबेरासहि. ७. जे बोल (विदुरोक्ति) सिंधुहूनि (सागरापेक्षां) खोल (गंभीर) होते. ज्या भाषणांतील अर्थ अत्यंत गहन होता, कारण त्यांत अध्यात्मज्ञानाचें प्रतिपादन केलें होतें. ८. सर्प. ९. नादरूप अमृतानें. १०. अंधकारास. ११. भूप म्हणे:—बा! सुज्ञा! [सविता] सर्व तमासि भीति दे, परि [त्या] सवित्या (त्या सूर्याला) गुहातम (गुहेंतील अंधकार) न भी (भीत नाहीं), तेंवि नीति परिसवित्या (नीति ऐकविणाऱ्या) तुज (तुला—विदुराला) पुत्रप्रेम [न भी]—असा अन्वय. ज्याप्रमाणें गुहेंतील काळोख सूर्याला भीत नाहीं, त्याप्रमाणें माझ्या हृदयांतील पुत्रप्रेम तुझ्या नीतिबोधास भीत नाही, तुझ्या नीत्युपदेशानें माझ्या मनांतील पुत्रप्रेम दूर होत नाहीं—असा भाव.

भी न गुहातम, तेंवि न तुज पुत्रप्रेम [1]नीतिपरिसविल्या. ॥ ९८
पांडव साधु यशस्कर, अयशस्कर सुत असाधु हें गमतें, ।
रमतें मन उपदेशीं, [2]पुत्रस्नेहासवें पुन्हा भ्रमतें. ॥ ९९
पुरुषप्रयत्न दुर्बळ, दैव बहु [3]प्रबळ, मज असें कळतें, ।
असता बलवंत [4]पुरुषकार, तरि कधींच चित्त हें वळतें. ॥ १००
कथिलें नसेल तें वद, सांगावें फार काय हो! [5]कवितें? ।
सेवावें सेव्य, जरी [6]पुत्रप्रेमाम्लपित्त ओकवितें.' ॥ १०१
विदुर म्हणे, 'राजेंद्रा! उरलें [7]अध्यात्म तें [8]सुजातानें ।
सांगावें, परिसावें, याकरितां [9]श्रीसनत्सुजातानें[10] ॥ १०२
केली असे प्रतिज्ञा, [11]मृत्यु म्हणति, परि नसे, असी कांहीं; ।
[12]तद्वदनें परिसावें, तें तत्व तुम्हीं विचाररसिकांहीं.' ॥ १०३
भूप म्हणे, 'तच्छ्रवणीं माझें अत्यंत मानस [13]त्वरतें, ।
सांगावें सर्वज्ञा! मज तें आतां तुवांचि [14]तत्वरतें.' ॥ १०४
विदुर म्हणे, 'आर्या! तें सांगावें ब्राह्मणें न अन्यानें, ।
ठावें, परि न वदावें स्वमुखें म्यां [15]शूद्रयोनिजन्यानें.' ॥ १०५
भूप म्हणे, 'या देहें त्या [16]मुनिचा [17]संग मज कसा घडतो? ।
केवळ [18]नीच मनुज [19]हा, अमृतफळांचा [20]समुच्चतर [21]घेंड [22]तो.' ॥ १०६
चित्तीं विदुर म्हणे, 'बा! तुज कथिलें तत्व जें तुझ्या [23]तातें, ।

---

१. नीतिपरिसविल्या तुज असा अन्वय लावावा. अथवा [हे] नीतिपरिसविल्या! असें संबोधन समजावें. २. पुत्रस्नेहरूप मद्यानें; अथवा पुत्रस्नेहाचे सोबतीनें माझें मन भ्रमतें, पुत्रस्नेहाकडे माझें मन वळतें—असा अर्थ केला तरी चालेल. ३. दैवच प्रधान, पौरुष निरर्थक [अ० ४० श्लो० ३२]. ४. प्रयत्न. ५. पंडिताला. ६. पुत्रप्रेमरूप आम्लपित्त (रोगविशेष). ७. ब्रह्मविद्या. ८. उत्तमकुलोत्पन्नानें. ९. सनत्सुजात हा ब्रह्मदेवाच्या चार मानसपुत्रांपैकीं एक, हा मोठा ऋषि होता. [सनत् सर्वदा सुष्ठु जातं जन्म यस्य नित्यकुमारत्वेन जरामरणविवर्जितः.] १०. सनत्कुमारानें. ११. जन्ममरणप्रवाहात्मक संसार. १२. त्या सनत्सुजाताच्या मुखानें, मृत्यु नाहीं अशी ज्यानें प्रतिज्ञा केली आहे त्या सनत्सुजाताच्या मुखानें. १३. त्वरायुक्त होतें. १४. अध्यात्मज्ञानसंपन्नानें, तत्त्वविचारकानें, ज्ञानविज्ञाननिष्ठानें. १५. शूद्र जातींत जन्मलेल्या म्यां विदुरानें. [अध्याय ४१ श्लो० ५-७.] १६. त्या सनत्सुजातनामक ऋषीचा. १७. समागम. (अ० ४१ श्लो० ७.) १८. हलका (नीच). १९. हा=राजा धृतराष्ट्र. २०. अत्यंत उंच, अतिमान्य. २१. घोंस. २२. सनत्सुजात मुनि. २३. ब्रह्मदेवानें.

या[1] दासासि कथावें त्वां करुनि कृपा सनत्सुजाता! तें.' ॥ १०७
येउनि सनत्सुजातें कथिलें अध्यात्मशास्त्र[2] अंधातें, ।
जें तत्काळ छेदी सुदृढतरानादिमोहबंधातें.[3] ॥ १०८

---

## अध्याय चवथा.

आले सभेंत सर्व[4] प्रातःकाळींच, त्यांत संदेश[5] ।
सांगे संजय, परिसति भीष्मादि सुधीश[6] तोहि[7] मंदेश.[8] ॥ १
संजय म्हणे, 'अजी! धृतराष्ट्र! महाराज! सानुजें[9] धर्में, ।
द्रोणादिकांसह तुम्हां वंदुनि, तुमचीं विचारिलीं शर्में.[10] ॥ २
वदला जिष्णु[11] असें कीं माझ्या तातासमक्ष, मंदेशा, ।
दुर्योधना, सभेंत स्पष्ट समग्राहि सांग संदेशा. ॥ ३
सावध होउनि सत्वर आम्हां अस्मद्विभाग[12] ओपावा,[13] ।
कोपावा न वृकोदरअहि,[14] न तुझा आयुवायु[15] लोपावा. ॥ ४

---

१. या सेवक धृतराष्ट्राला. २. अध्यात्मविद्या, ब्रह्मविद्या. [विदुरानें सनत्सुजाताची प्रार्थना केल्यावर त्यानें धृतराष्ट्राला अध्यात्मविद्येचा बोध केला. या प्रकरणास उद्योगपर्वांत 'सनत्सुजातपर्व' असें नांव आहे. अध्याय ४२-४६ यांत धर्मराज व सनत्सुजात यांचा प्रश्नोत्तरपर संवाद आहे व त्यांतच ब्रह्मज्ञानोपदेश आहे. 'हे सनत्सुजात! तुम्हीं मृत्यु नाहीं असें म्हणतां असा तुमचा प्रवाद मीं ऐकिला आहे हें सत्य आहे काय?' (अ० ४२ श्लो० २) असा धृतराष्ट्राचा पहिला प्रश्न आहे. त्याजवर सनत्सुजाताचें उत्तर आहे. धृतराष्ट्राला उपदेश करून सनत्सुजात अदृश्य झाला व ती रात्र तशीच गेली. दुसरे दिवशीं सर्व राजे प्रातःकाळीं संजयमुखानें धर्माचा व कृष्णाचा निरोप ऐकण्यासाठीं सभेस आले.] ३. अतिदृढ व अनादि (आदिरहित) अविद्यारूप बंधास. ४. सर्व राजे. (भीष्म, द्रोणाचार्य, कृपाचार्य, शल्य, कृतवर्मा, जयद्रथ, अश्वत्थामा, विकर्ण, सोमदत्त, विदुर, दुःशासन, चित्रसेन, शकुनि, कर्ण, धृतराष्ट्र, दुर्योधन, इत्यादि. अध्याय ४७ श्लो० ६-१०). ५. कृष्णाचा व धर्माचा निरोप. [आर्या १७ पहा.] ६. सुधी+ईश=ज्ञात्यांमध्यें श्रेष्ठ. ७. 'तेहि मंदेश' असाही पाठ आहे. ८. मंद+ईश=मूर्ख+राजा=मूर्खशिरोमणि. ९. स+अनुजें=सहित+धाकट्या भावानें=धाकट्या भावांसह. १०. कुशलें. ११. अर्जुन. [अर्जुनानें काय निरोप सांगितला असें धृतराष्ट्रानें विचारिल्यावर संजय म्हणतो.] १२. आमचा वांटा. १३. द्यावा, आमच्या स्वाधीन करावा. १४. भीमरूप सर्प. [सर्प वायुभक्षक होत हें ध्यानांत असावें.] सापाला 'पवनाशन' असें नांव अमरकोशांत आहे. १५. आयुष्यरूप वायु.

साचें, [1]याची, [2]काळाहूनि उणी एक तिळहि न गदा, हें[3]; ।
न मरावे बहु बंधु [4]त्वन्नाशें जेंवि [5]नाग [6]नगदाहें. ॥ ५
लोभदुरभिमानातें, रक्षाया प्राण यश [7]कटक, टाकीं; ।
**य**मसम [8]यम समरीं हे पाहुनि म्हणसील तूं [9]कटकटा कीं. ॥ ६
जागवितो हितहस्तें [10]सुता तुजलाहि हा निरोपानें, ।
**ध**र्मक्षोभें होइल, तसि न हराच्याहि, हानि [11]रोपानें. ॥ ७
हा श्रीकृष्ण प्रभु जरि काय क्रोधेंकरूनि पाहेल? ।
राहेल कोण कटकीं भट, कीं **का**ळासही न साहेल. ॥ ८
सोसेल **रु**द्रचक्षु [12]प्रस्फुट जरि वरिल [13]शोणतेला तें, ।
[14]दीप्तालय विझवाया दाटुनि घालील कोण तेलातें? ॥ ९
**गां**डीव [15]ज्यांत तो [16]सुरपतिसहि [17]नेदील विजयलाभ [18]रणं; ।
**कु**रुराज्य तुज न साजे, प्रभुचें चोरास जेंवि [19]आभरण. ॥ १०
स्पष्ट बुडवितिल शिकवुनि कुमति **श**कुनि **क**र्ण हे तुम्हां, तारा, ।
कां शोकांत बुडवितां [20]बालिश हो! [21]जन्महेतु [22]म्हातारा. ॥ ११
**धृ**ष्टद्युम्न **शि**खंडी **सा**त्यकि **अ**भिमन्यु हे न सामान्य, ।
[23]वृद्ध **द्रो**ण [24]पितामह शतहि खळ तुम्हीं [25]दहां नसा मान्य. ॥ १२
द्यूत न **अ**जातरिपुसीं, **भी**मासीं [26]जीवनघ्न [27]संगर हा, ।

१. या भीमाची. २. यमाहून. ३. (गदा काळासारखी आहे) हें साचें (खरें) आहे. ४. तुझ्या नाशानें. ५. हत्ती. ६. पर्वतदहनानें. ७. सैन्य. ८. नकुल सहदेव. ९. हायहाय. १०. निजलेल्या (तुजला). ११. बाणानें. १२. स्पष्ट. १३. आरक्ततेस. १४. पेटलेलें (दीप्त) घर (आलय). हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. १५. ज्या रणांत गांडीव आहे तो रण इंद्राला देखील जय मिळवूं देणार नाहीं. १६. इंद्रासही. १७. न देईल. १८. तो रण. ('रण' शब्द पुल्लिंगी आहे.) १९. भूषण. २०. अज्ञ हो. २१. जन्मकारण. २२. धृतराष्ट्र. २३. धृतराष्ट्र. २४. भीष्म. २५. दहां=दहा ही संख्या समुदायवाचक समजावयाची. दहा म्हणजे 'चारचौघे' असा अर्थ घेणें इष्ट आहे. **पं**तांनीं अशाच अर्थानें या शब्दाची योजना केल्याचें आढळतें:— (१) 'त्यासि कृप म्हणे, 'कर्णा! सुज्ञांहीं ऐकतांच डोलावें । ऐसेंचि बोलणें जरि तरि पुरुषानें **दहांत** बोलावें.' ॥ [विराटपर्व–अध्याय ४ गीति २५], (२) भीष्म म्हणे, 'धृतराष्ट्रा! देईल **दहांत** दैन्य हें मत रे । खलमलसंसर्गास्तव न रणकसीं गुरुहि सैन्यहेम तरे.' ॥ [उद्योगपर्व–अ० ४ गीति ३४]. या उदाहरणांवरून या शब्दाचा उपयोग लक्ष्यांत येण्यासारखा आहे. अर्जुन म्हणतो:—दहांत तुमच्या पराक्रमाविषयीं गोष्ट निघाली असतां कोणी मान डोलविणार नाहींत, अशी तुमची स्थिति आहे ती मनांत आणा. २६. प्राणनाशक. २७. युद्ध.

[1]रंग [2]रहाया धरुनि **द्रोण**वि**दुर**भी**ष्मबुद्धिसंग रहा. ॥ १३
दे [3]भाग, अभय देइल **धर्म** महाराज हा [4]अवनतातें, ।
न गणुनि दोषशतातें, करिल करावें जसें [5]अवन तातें. ॥ १४
युद्धचि करीन म्हणसी, परि [6]पश्चात्ताप बहुत बाधेल, ।
धर्मन्यायविरोधें कोणाचेंही न [7]इष्ट साधेल. ॥ १५
जरि तूं [8]सानुज [9]साप्त प्राप्तमहोत्कर्ष आजि [10]सामरसा, ।
[11]पामरसाम्य वराया इच्छिसि कलह, त्यजूनि [12]सामरसा.' ॥ १६
ऐसें **धर्मा**नुमतें **कृष्णा**नुमतें [13]उदंड [14]वदला, हो! ।
तें बहु काय वदावें? शीघ्र [15]**अ**जातारि राज्यपद लाहो. ॥ १७
**भी**ष्म [16]म्हणे, '**कु**रुराया! ऐक करुनि सावधान कान मन, ।
दोघेचि देव[17] न करिति पूर्वी [18]**श्री**सत्यनायका नमन. ॥ १८
तेव्हां[19] पुसे **बृ**हस्पति **वि**धिला कीं, '[20]सर्वसिद्धिसदन मुनी, ।

---

१. रणरंग रहाया (थांबावा, न व्हावा) यासाठीं तुम्ही भीष्म द्रोण विदुर इत्यादिकांची सल्ला मसलत घेऊन रहा (असा). २. रहाया–आपली शोभा राहावी म्हणून. रंग घालविला अथवा गमाविला याचा अर्थ शोभा गमाविली, घालविली असाच आहे. हे सुयोधना! तुझी शोभा राहावी असें असेल तर द्रोणविदुरभीष्म यांच्या मसलतीनें चाल, कर्णाची बुद्धि ऐकूं नको. ३. राज्यभाग. ४. शरणागतातें, नम्रातें. ५. रक्षण. ६. अध्याय ४८ श्लो० १४-२१ पहा. ७. अभिमत, हित, कल्याण. ८. स+अनुज=धाकट्या भावांसह. ९. स+आप्त=आप्तजनांसह. १०. स+अमरसा=अमरसहित असा. ११. हलक्या मनुष्याची बरोबरी. हलकटपणा संपादण्यासाठीं कलहाची इच्छा करतोस. हे दुर्योधना! तूं धाकटे बंधु आणि आप्तजन यांनीं युक्त असल्यामुळें देवांनीं वेष्टित असा जरी दिसतोस, व महोत्कर्ष प्राप्त झालेल्या सारखा भाग्यवान् आहेस, तरी पामरत्व (नीचत्व) पावण्याच्या बुद्धीनें, संधि करण्याचें टाकून, युद्धाची इच्छा करतोस हें मोठें आश्चर्य आहे! आजि तूं सानुज साप्त जरि सामरसा प्राप्तमहोत्कर्ष [दिसतोस, तरी] सामरसा त्यजूनि पामरसाम्य वराया कलह इच्छिसि–असा अन्वय. १२. संधिरूप रसास. १३. पुष्कळ. १४. संजय वदला–असा भाव. १५. धर्मराज. १६. अध्याय ४९ श्लो० १-६ पहा. १७. नरनारायण ऋषि हे दोन देव. [ब्रह्मदेवाच्या सभेंत त्याला बृहस्पति, अष्टवसु, द्वादशादित्य इंद्र, साध्यदेव इत्यादि सर्व नमस्कार करतात, पण नर आणि नारायण हे ऋषि वंदन करीत नाहींत. नर हा अर्जुन आणि नारायण हा कृष्ण होय. हे शरीरानें मात्र दोन, परंतु यांचा आत्मा व मन एक होय.] १८. ब्रह्मदेवास. १९. जेव्हां नर व नारायण यांनीं विधिला वंदन केलें नाहीं असें बृहस्पतीनें पाहिलें तेव्हां २०. सकल सिद्धींचें सदन (घर) असे.

शक्राद्यखिलसुरहि[1] कृतकृत्यचि[2] होती त्वदीयपद[3] नमुनी. ॥ १९
विश्वगुरो! कां गेले? न नमुनि दोघेंचि देव हे, तूतें, ।
कुतुकीं[4] सभा बुडतसे, याच्या स्वमुखेंचि सांग हेतूतें.' ॥ २०

वदला **विधि**[5] कीं, 'ते श्री**नरना**रायण तपोनदीन[6] मुनी, ।
होती विज्वर[7] सद्यः[8] प्रेमें ज्यां[9] भवमहागदी[10] नमुनी. ॥ २१
मत्तेज[11] त्यांपुढें किति? कीं ते प्रभु मुख्य विश्वपाळक हो! ।
महिमा अनंत त्यांचा, त्यांसम[12] ते त्रिभुवनांत, बाळक हो[13]. ॥ २२
जाय सुरेश्वर[14], होते ज्या स्थानीं तपत ते प्रभू[15] तरणी, ।
मागे वर, कीं द्यावें साह्यें मजला यश प्रभूत[16] रणीं. ॥ २३
शरणागत शक्रा[17] यश देती होउनि सहाय बहुदा ते, ।
तदुदारत्वें[18] गतमद[19] मग म्हणतिल कां न 'हाय!' बहु दाते? ॥ २४
जे प्रभु **नर नारायण** ते अर्जुन[20] **वा**सुदेव अवतरले, ।
वदला असेंचि **नार**द ज्याच्या बोलें असंख्य भव तरले.' ॥ २५
यांसीं विरोध करिती जे जे ते वेचिती असु[21] खलेश[22], ।
जे यांसि हात[23] जोडिति त्यांसि स्वप्नीं नसे असुखलेश[24]. ॥ २६
दुर्जात[25] कितव[26] खल जे, ज्यांच्या लाविति यशास डाग मती, ।
आम्हांहुनि **कर्ण शकुनि दु**ःशासन हितें[27] तुला जडा[28]! गमती. ॥ २७
**गांडीवसु**दर्शनधर **नरना**रायण समर्थ अमरांत, ।
वसतिल एकरथीं रथिसारथिभावेंकरूनि[29] समरांत. ॥ २८

---

१. शक्र+आदि+अखिल+सुर=इंद्र+प्रमुख+सकल+देव. २. धन्यजीवित. ३. तुझे चरण. ४. आश्चर्यांत. ५. ब्रह्मा. ६. तपस्+नदी+इन=तप+नदी+स्वामी=तपःसागर. ७. ज्वररहित. ८. तत्काल. ९. ज्या नरनारायणांला. १०. संसारमहारोगी. ११. माझें (विधीचें) तेज. १२. हें 'अनन्वय' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. (पृष्ठ १४ टीप १० पहा.) १३. अहो! देव हो! १४. देवासुरांचें युद्ध प्रवृत्त झालें असतां, जेथें नरनारायण तप करीत होते तेथें बृहस्पतिप्रमुख देवांसह इंद्र वर मागण्यासाठीं गेला. १५. नरनारायण देव. १६. बहुत. १७. त्यांनीं इंद्राचें साहाय्य करून अनेक असुरांचें मर्दन केलें. [अ०४९ श्लोक१३-१४ पहा.] १८. तत्=उदारत्वें=त्यांच्या औदार्यानें. १९. हीनगर्व. २०. अ० ४९ श्लो० १८-२१ पहा. २१. प्राण. २२. दुष्टश्रेष्ठ. २३. वंदन करितात. २४. दुःखाचा लेश. हें ठरींव यमक आहे. २५. नीचकुलोत्पन्न (कर्ण). २६. शठ. २७. हितेच्छु मित्र. २८. मूर्खा. २९. अ० ४९ श्लो० २३-२४ पहा.

मेरुहि खचेल, राया! श्रीधर्माच्या उलोन[१] कोपानें, ।
हो सावधान या श्रीमदमद्याच्या[२] भुलों नको पानें[३]. ॥ २९
तुज काय? शत्रुसहि मी न स्वप्नांतहि कथीन अहितातें[४], ।
मणिहार[५] घालिजे तो शिशुकंठीं कीं महोग्र[६] अहि तातें?' ॥ ३०
कर्ण[७] म्हणे, 'हो! पंडित! करिता सद्धर्मनिरतकुत्सा[८], हें ।
अनुचित, मी पांडववध करुनि, करिन मित्रकार्य उत्साहें. ॥ ३१
हा क्षत्रधर्मनिष्ठ स्तुत्य तिळहि अघ[९] नसोनि, यास कसा ।
निंदिसि? न दोष लाविति सुजन[१०] न लावून सोनियास कसा[११]. ॥ ३२
अजि पूर्वविरुद्धांसीं[१२] करिती कोणीहि तरि शम[१३] नयज्ञ[१४]? ।
राज्यस्वर्गफलार्थी[१५] सिद्धिस नेतीच अरिशमनयज्ञ[१६].' ॥ ३३
भीष्म म्हणे, 'धृतराष्ट्रा! देईल दहांत दैन्य हें मत[१७] रे! ।
खलमलसंसर्गास्तव[१८] न रणकसीं[१९] गुरुहि सैन्यहेम[२०] तरे. ॥ ३४
दावील सूतसुत[२१] हा हित ऐसें लेखिल्या विनाशपथा[२२], ।

---

१. उपटोन, पडून. २. राज्यलक्ष्मीमदरूप मद्याच्या. ३. प्राशनानें. ४. अकल्याणातें. ५. बापानें मुलाच्या गळ्यांत मणिहार घालावा किंवा महाभयंकर सर्प घालावा? ६. महान् क्रूर सर्प. ७. अ० ४९ श्लोक २९-३२ पहा. ८. सत्यधर्मनिष्ठाची निंदा. [मी कर्ण दुराचरणासक्त नसतांही माझी निंदा करतां हें अनुचित होय.] ९. पातक. १०. हा गीतिभाग सुभाषितरूप आहे. सज्जन कसोटीस लाविल्यावांचून सोन्याला दोष लावीत नाहींत असा न्याय आहे, मी (कर्ण) जर युद्धांत कसोटीस उतरलों नाहीं तर माझी निंदा करा, परंतु त्या आधीं माझी निंदा करणें तुम्हाला अयोग्य होय. मी क्षत्रियधर्मनिष्ठ आहें, माझें आचरण स्तुत्य आहे, मला पाप तिळभरही शिवलें नाहीं, असें असतां, माझी निंदा करतां हें अनुचित होय. ११. कसोटीस. १२. पहिल्यानेंच जे विरुद्ध त्यांशीं. पूर्वींपासून ज्यांच्याशीं विरोध पडला आहे अशा शत्रूंशीं. १३. साम, संधि. १४. नय जाणणारे, नीतिज्ञ जन. १५. राज्य किंवा स्वर्ग याची इच्छा करणारे. १६. शत्रुसंहाररूप यज्ञ. १७. कर्णाचें मत, कर्णाचा उपदेश. १८. खलरूप मळाचा संबंध झाल्यामुळें. १९. युद्धरूप कसाचे ठायीं. २०. सेनारूप सुवर्ण. २१. कर्ण. २२. लेखिल्या (निश्चितपणें मानलेल्या) विनाशपथा (अकल्याणाच्या मार्गाला) हित ऐसें (हितकारक असें) हा (कर्ण) सूतसुत (कोळ्याचा पोर) दावील (दाखवील)=जो मार्ग अहिताचा आहे असें भीष्मादिक वीर यांनीं मानिलें आहे तो हिताचाच आहे असें हा कोळ्याचा पोर कर्ण सिद्ध करून देईल.

विधि[1]च्याहि [2]पतंग खळहि न वळति, फल देखिल्याविना, [1]शपथा. ॥ ३५
[3]हा पावला असे निज[4]गुरुपासुनि [5]भंगजनकशापातें, ।
[6]पापातें [7]वाग्दंडें ताडिति गुरु, [8]भूपजन [9]कशापातें. ॥ ३६
[10]अवलंबिला तव सुतें [11]भीमाब्धि तरावयासि [12]हा [13]प्लवें, गा! ।
[14]मारुतिभंग घडेल [15]प्रचुरचणकचर्वणोद्धता [16]प्लवंगा? ॥ ३७
[17]एकैकें पांडुसुतें केलें जें कर्म, [18]यासि दुष्कर तें; ।
[19]वाचाळनीचसख्यें न फळ, जसें [20]वंध्यंदारशुष्करतें. ॥ ३८
सिंहें मृगसा, पार्थें [21]गोग्रहणीं गांठिल्या, स्वभावातें, ।

---

१. ब्रह्मदेवाच्या शपथेस. २. विधिच्याहि शपथा, फळ देखिल्याविना, पतंग [व] खळहि न वळति–असा अन्वय. ब्रह्मदेवानें शपथ घेऊन सांगितलें तरी, परिणामाचा अनुभव आल्याशिवाय, पतंग आणि खळ हे घातक वस्तूपासून वळत नाहींत. पतंग दिव्यावर झडप घालून नाश पावतात आणि खलही नष्ट होतात, कारण ते आधीं विचार करीत नाहींत. ३. हा कर्ण. ४. परशुरामापासून. ५. नाशास कारणभूत अशा शापातें. भंग (पराभव) उत्पन्न करण्याऱ्या अशा शापातें. [कर्ण अस्त्रविद्या शिकण्यासाठीं परशुरामाजवळ गेला. तो क्षत्रियांस विद्या पढवीत नसे असा त्याचा नियम जाणून 'आपण ब्राह्मण आहों' असें कर्णानें परशुरामास मिथ्या सांगितलें. पण कर्णाचें हें कपट फार दिवस गुप्त राहिलें नाहीं. एकदां राम कर्णाच्या मांडीवर मस्तक ठेवून निजला असतां, कीटकयोनिगत दंश नामक दैत्यानें त्याची मांडी कोरिली, तथापि गुरुनिद्रेचा भंग न व्हावा म्हणून कर्ण वेदना सोसून तसाच होता. चावलेल्या जाग्यांतून निघालेल्या रक्तप्रवाहानें रामाच्या मस्तकास स्पर्श केला, तेव्हां तो जागा झाला. कर्णाच्या मांडीस कीटकानें मोठेंच क्षत केलें आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें यामुळें कर्ण हा मृदुहृदय ब्राह्मण नसून वज्रहृदय क्षत्रिय असावा असा त्यास संशय आला. पुढें चौकशी करतां तेंच खरें ठरलें. यामुळें रामाला फार राग आला व युद्धप्रसंगीं शिकलेल्या अस्त्रांची स्मृति होऊं नये असा त्यानें कर्णास शाप दिला. उद्योगपर्व–अध्याय ५ गीति २७-२९ पहा.] ६. पाप्यांस. ७. गुरु पापी मनुष्याला वाग्दंडानें ताडितात (शाप देतात) आणि भूपजन (राजे लोक) कशापातें (चाबुकाच्या मारण्यानें) ताडितात. पापी कर्णाला गुरु परशुरामानें शाप देऊन दंड केला असें येथें सूचविण्यासाठीं सामान्य विधान केलें आहे. ८. राजे लोक. ९. चाबुकानें. १०. स्वीकारिला. ११. भीमरूप सागर. १२. हा कर्ण. १३. लहान नौका. हें रूपकाचें उदाहरण होय. १४. मारुतीचा पराभव. १५. बहुत चणे खाऊन उन्मत्त झालेल्या. १६. वानरास. १७. अध्याय ४९ श्लो० ३७ पहा. १८. तें कर्म या कर्णाला दुष्कर आहे. १९. 'वाचाल' या शब्दाचा रूपापभ्रंश 'चावट' असा झाला आहे. २०. 'कृष्णविजय'-अध्याय ८९ गीति ३९ यांतही हेंच यमक आहे. २१. विराटनगरांत धेनुहरणप्रसंगीं.

त्यजुनि पळाला कैसा? स्मरत नसे या मॅलस्वभावातें. ॥ ३९
कोठें गेला तैं हा? पार्थे हरितां सुकीर्तिसह वासें, ।
बुडतीच अकुलजांच्या सत्कुलजांचीहि कीर्ति सहवासें. ॥ ४०
रे! धृतराष्ट्र! जनितसुतशतमिषविषविषमखरतराधे! या ।
'गंधर्वबद्धदुर्योधनमोचनवृत्त पूस राधेया. ॥ ४१
पाडव दया न करिते, तरि ते अरि तेज सर्वही हरिते, ।
होते मुनिपीतजलधिकुक्षि तसे विगतसार कां न रिते? ॥ ४२
आतां बहु गर्जतसे मत्तवृषभसा सभेंत वित्रप हा, ।
याच्याचि बळें पांडवपरिभव करणार पुत्र, चित्र पहा.' ॥ ४३
द्रोण म्हणे, 'हेंचि करा, भरतर्षभ सत्यसार वदला हो! ।
पद लाहो धर्म उचित, शुचितम शम, यशचि घ्या न वदला हो.॥४४
शूर रणक्रूर सकळ कालतसे, तदपि ते दयाळु बरे, ।
पांडव सुयोधना सुख देतील अपार, खेद यां लुंबरे. ॥ ४५

---

१. अर्जुनानें गाई सोडवून नेल्या व वस्त्रें घेतलीं तेव्हां हा शूर कर्ण कसा पळाला? [मोरोपंत—विराटपर्व—अ० ४ गी० ९७.] २. पापाचारातें (कर्णातें) त्या पलायनवृत्ताची स्मृति नाहीं. ३. हा कर्ण तेव्हां कोठें पळून गेला? [अध्याय ४९ श्लोक ३९-४० पहा.] ४. वस्त्रें. [मोरोपंत—विराटपर्व—अ० ६ गी० २८-३३.] हेंच यमक पंतांनीं विराटपर्वांत योजिलें आहे. [अ० ६ गी० ३३.] ५. नीच कुलांतल्यांच्या सहवासानें. ६. समागमानें. हें गीत्यर्ध उत्तम सुभाषित आहे. ७. उत्पन्न केला सुतशतरूप विषानें विषम आणि प्रखरतर आधि (मानसिक रोग) ज्याला अशा धृतराष्ट्रा! ८. घोषयात्रेंत गंधर्वांनीं दुर्योधनाला बांधून नेलें तेव्हां त्याची सुटका पांडवांनीं केली हा वृत्तांत. [मोरोपंत—वनपर्व—अध्याय ७ गीति २९-४४.] ९. कर्णास. [राधा नांवाच्या स्त्रीनें पाळिलेला तो—राधेय. येथें 'राधेय' या नांवाचा उल्लेख सहेतुक आहे असें दिसतें. मातृनामानें कर्णाचें रणभीरुत्व आणि पलायनपटुत्व दर्शविलें आहे.] १०. गंधर्व. ११. अगस्त्यमुनीनें प्राशन केलेल्या सागराच्या एका भागासारखे. १२. बलहीन, निःसार. १३. माजलेल्या बैलासारखा गर्जना करतो. १४. निर्लज्ज. [त्रपा=लज्जा.] १५. कर्णाच्या जोरावर. १६. दुर्योधन. १७. आश्चर्य, चमत्कार. १८. अध्याय ४९ श्लोक ४३-४६ पहा. १९. भरतश्रेष्ठ भीष्म. २०. सत्याचा मुख्यांश. २१. या सुयोधनाला अर्थप्रेप्सु कर्णादिक खेदच देतील, सुख देणार नाहींत. २२. हितबुद्धि न ऐकून हट्ट करणारे कर्णादिक.

असति बहु धनुर्धर[1] परि पार्थ[2] सदा नव्यसाची[3], समरा या, ।
हटकाया भट काया[4] सजिल कवण सव्यसाचिसम[5], राया!' ॥ ४६
अंधापासुनि पावे भीष्मद्रोणोक्तही अनादर तें, ।
जेंवि अनादरिजे हरिहरकीर्तन सुबधिरें[6] अनादरतें[7]. ॥ ४७
सभ्य म्हणति, 'हा[9]! हांही[10] धरितो, जसि धरिति कामना सद्वैरी[11], ।
ह्रां[12]! जनरीति असी मग कविच्या येइल न कां मनास[13] 'दरी[14]. ॥' ४८
वृद्ध म्हणे, 'रे! संजय! अकरा अक्षौहिणीचमू[15]श्रवण, ।
करुनि अजातरिपु कसें वदला[16], नृप बोलिले कसे कवण? ॥ ४९
आम्हांकडे मिळालें बहुबल[15], हें परिसतां, अनीचेष्टा[17] ।
धर्मा कैसें गमलें? केली तेणें कसी जनीं चेष्टा[18]? ॥ ५०
रतला[19] जरि मोहप्रद[20]राज्यश्रीसीं बळेंचि मंद[21] रतो, ।

---

१. धानुष्क, धनुर्धारी वीर. २. हे राया (धृतराष्ट्रा!) बहु धनुर्धर असति (अनेक धनुर्धारी वीर आहेत) परि (परंतु) पार्थ सदा नव्यसाचि (अर्जुन सदा नवाच होय, सदासर्वदा युद्धास तयार असाच असावयाचा, त्याला कधीं थकवा आला असें व्हावयाचें नाहीं.) सव्यसाचिसम कवण भट या (अर्जुनाला) समरा हटकाया काया सजिल?—असा अन्वय. अर्जुनासारखा कोणता योद्धा या अर्जुनाला युद्धाला बोलाविण्यासाठीं आपला देह सजून तयार करील? अर्जुनाच्या तोलास उतरणारा असा कोणता वीर त्याला युद्धाला ये असें म्हणून सिद्ध होऊन अंगानें पुढें सरसावेल? अर्थात् कोणीही नाहीं. अर्जुनाची बरोबरी करणारा असा इतर वीर कोणीही नाहीं. ३. नवीनसाच. ४. शरीर. ५. अर्जुनासारखा. ६. अत्यंत बहिऱ्यानें. ७. अरसिकानें, जो नादलुब्ध नाहीं त्यानें. ८. भीष्म द्रोण हे सदुपदेश करीत असतां, व संजय जवळ कानउघडणी करीत असतां, धृतराष्ट्रानें दुष्टबुद्धि धारण केली असें पाहून सभ्य म्हणाले. ९. हाय! हाय! १०. हा धृतराष्ट्र देखील दुष्टवासना धरितो. साधुद्वेष्टे जशी वासना धरतात तशीच याचीही आहे. ११. साधूंचे शत्रू. १२. हाय! हाय! जनांची रीति (लोकव्यवहारपद्धति) अशी (दुष्ट) आढळते [तेव्हां] कवीच्या मनास दरी कां न येईल? साधूंच्या मनाला अरण्यांतील गुहा कां पसंत पडणार नाहीं? अशा दुष्ट लोकांचा सहवास सोडून अरण्यांत जाऊन वास करण्याचें ते अर्थात् पसंत करतीलच. १३. मनास येणें=पसंत पडणें, मान्य होणें, आवडणें. १४. गुहा. १५. सैन्य. १६. अध्याय ५० श्लोक १ पहा. १७. साधूंस इष्ट ऐशा. १८. वर्तन. १९. आरक्त झाला. २०. मोह उत्पन्न करणाऱ्या अशा राज्यलक्ष्मीशीं. २१. मूर्ख (दुर्योधन). मूर्ख दुर्योधन बळजोरीनें राज्य घेऊन राज्यश्रीशीं जर रत झाला आहे तर होऊं द्या, यांत त्याचेंच अकल्याण आहे, कारण राज्यश्री मोहप्रद आहे, असें कोणी धर्मास उपदेशिलें नाहीं काय?

कोणी असें म्हणे कीं न शमाया शत्रुसिंधु[१]मंदर[२] तो[३]. ॥ ९१
[४]आज्ञार्थ युधिष्ठिरमुख [५]कवण पहाती धरून [६]समरेहा? ।
[७]सम रे! हा! त्या यांच्या ओपुनि आधींस मानस मरे हा[८].' ॥ ९२
[९]संजय म्हणे, 'नृपाळा! [१०]सद्दात्याचें धनेच्छु [११]संसारी, ।
देखति जसें मुख तसें धर्माचें भीम जिष्णु [१२]कंसारी. ॥ ९३
आज्ञेचीच पहाती वाट स्तविती नृपाळ [१३]भाटतसे, ।
[१४]क्षिप्रं जयार्थ निघावा [१५]प्रभु [१६]बाळांसहि असेंचि वाटतसे.' ॥ ९४
[१७]भूप म्हणे, 'कलह नव्हे [१८]कार्य, तरि तयासि कार्य कां गमला? ।
आम्हांसीं [१९]कोणांच्या सामर्थ्यें भांडणार सांग मला?' ॥ ९५
[२०]ऐसें सभेंत पुसतां, तो [२१]काळग्रस्तबुद्धि जाणोनी, ।
पडला मूर्छित संजय, चित्तीं [२२]भावी अनर्थ आणोनी. ॥ ९६

---

१. शत्रुसागर. २. मंदर पर्वत. ३. शत्रूंचें मथन करणारा असा जो धर्म तो शमाया (शांत होण्यासाठीं, त्यानें युद्ध करण्याचा प्रयत्न सोडावा म्हणून) कोणी असें न म्हणे कीं (धर्माला कोणीं असा उपदेश केला नाहीं काय कीं राज्यश्रीशीं रत होणें हें मूर्खपण आहे, व शांत राहणें हें शहाणपण आहे. दुर्योधन मूर्ख आहे, त्याला घेऊं द्या राज्य, तुम्ही युद्ध न करतां शांत असा–असा बुद्धिवाद धर्माला कोणी सांगितला नाहीं काय?) तो शत्रुसिंधु-मंदर (धर्म) शमाया कोणी असें (पूर्वार्धांत वर्णिल्याप्रमाणें) न म्हणे कीं?–असा अन्वय. ४. युद्धाची इच्छा धरून आज्ञा मागण्यासाठीं धर्मराजाच्या मुखाकडे कोण पाहत होते? ५. अध्याय ५० श्लोक २-३ पहा. ६. युद्धाची इच्छा. ७. आपण केलेलें भाषण एकतर्फी आहे अथवा आपल्या प्रश्नावरून कोणी विरुद्ध अनुमान काढील, तर तसें होऊं नये म्हणून धृतराष्ट्र आणखी म्हणतो:—रे (संजया) हा! (हाय! हाय! काय सांगूं?) हा (मी धृतराष्ट्र) त्या यांच्या (त्या पांडवांच्या आणि या कौरवांच्या–उभय पक्षांच्याही) आधींस (दुःखांस, चिंतेला) मानस (माझें अंतःकरण) सम (सारखेंच) ओपुनि (देऊन, दोघांचींही दुःखें सारखींच मानून, उभयपक्षांची काळजी सारखीच वाहून) मरे (मरतों आहें. दुःखास पात्र झालों आहें) कौरवांप्रमाणेंच पांडवांच्या काळजीनें माझ्या मनास सारखेंच दुःख होत आहे. ८. हा (धृतराष्ट्र.) ९. अध्याय ५० श्लोक ४-८ पहा. १०. उत्तम दानशूरांचें. ११. संसार करणारे जन. १२. कृष्ण. १३. भाटांप्रमाणें. १४. लौकर. १५. धर्म. १६. प्रतिविंध्यादिक लहान लहान बालवीरांस. १७. धृतराष्ट्र. (अ० ५० श्लो० ९.) १८. करण्यास उचित. १९. कोणत्या राजांच्या अथवा बंधूंच्या बळावर. २०. धृतराष्ट्रानें असा प्रश्न (गीति ५५) केला असतां, तो धृतराष्ट्र कालग्रस्तमति आहे असें समजून. २१. कालानें साधिली बुद्धि ज्याची तो. २२. पुढें होणारा कौरवकुलनाशरूप अनर्थ. [अ० ५० श्लो० १०-११.]

विदुर [1]म्हणे, 'राजेंद्रा ! त्वच्चि[2]त्ताला असत्य न गमो हा, ।
[3]संजय पडला कीं जी ! झाला वश जरि [4]महाजनग मोहा.' ॥ ५७
भूप म्हणे, 'बहुधा हा भ्याला भीमादियोधतेजानें, ।
[5]भ्यावाचि तो निरखिले सहसा सक्रोध योध ते ज्यानें.' ॥ ५८
[7]सूत उठोनि [8]म्हणे, 'हो ! करणार [9]प्रभु तुम्हांसवें कलहा, ।
धृष्टद्युम्नबळानें, द्रो[10]णवधोत्पन्न कीं महाबळ हा. ॥ ५९
जो बकहिडिंबमागधकीचककिर्मीरशमन[11] भीम रणा, ।
चिंती, बहु न विलासा[12], ज्याचें स्वप्नींहि न मन भी मरणा. ॥ ६०
जो गं[13]धमादननगीं [14]क्रीडे [15]प्रभु, जेंवि एकला [16]भवनीं, ।
[17]क्रोधवशा [18]वधुनि [19]वंदे मज मोठा हाचि एक लाभ वनीं. ॥ ६१

---

१. अध्याय ५० श्लो० ११-१२, संजयास मूर्च्छा आली ती सभाकंप होऊन आली असें नव्हे, असें सुचविण्यासाठीं विदुर बोलतो. २. या संजयाचा मोह खोटा आहे असें तुला (धृतराष्ट्राला) वाटूं नये. ३. जरि महाजनग संजय [आहे तरी] मोहा वश झाला [आणि] पडला कीं जी ! (धृतराष्ट्राय !)–असा अन्वय. यद्यपि संजयानें मोठमोठे लोक पाहिले आहेत, तरी [तुझे दुष्ट विचार ऐकून व उद्वेग उत्पन्न होऊन, आणि तुला काळानें पुरा ग्रासला आहे असें जाणून] त्याला मोह उत्पन्न झाला आणि अहो धृतराष्ट्राय ! (कुरुसभेंत) पडला कीं, येथें 'महाजनग' हें मोहाचें विशेषण केलें तरी चालेल. ४. महाजनांत गमन ज्याचें (असा मोह.) ५. मूर्च्छेस. ६. ज्यानें (ज्या संजयानें) सक्रोध योध सहसा निरखिले तो (संजय) भ्यावाचि–असा अन्वय. (श्लो० १३.) ७. संजय सावध होऊन बोलतो. ८. अध्याय ५० श्लो० १५-५० पहा. ९. धर्म. १०. द्रोणाच्या वधासाठीं उत्पन्न झालेला हा धृष्टद्युम्न मोठा बळी आहे. (श्लो० १६.) [द्रुपदानें तपश्चर्या करून द्रोणवध करील असा पुत्र मिळावा असा वर मागितला–अशी कथा आहे.] ११. बकादि राक्षसांचा शमन (यमरूप). १२. क्रीडेस. १३. गंधमादन नामक पर्वतावर. गंधमादन हें हिमालयाच्या उंच उंच शिखरांपैकीं एक आहे. याच्या उत्तरेस प्रख्यात मानससरोवर आहे. अनेक तीर्थें पाहत पाहत सानुज सदार धर्मराज येथें आला. अर्जुन येथें इंद्रलोकाहून परत येऊन त्यांना भेटला. येथें त्या सर्वांनीं चार वर्षें वास केला. (मोरोपंत–वनपर्व–अध्याय ५ पहा.) १४. यथेच्छ विहार करी. १५. भीम. १६. घरांत. १७. क्रोधवश झालेल्या कुबेर सेवकांस (मोरोपंत–वनपर्व–अ० ५ गीति ७४-७९.) १८. अध्याय ५० श्लो० २४ पहा. १९. वदे–शत्रूंचा संहार करणें ही भीमाची मोठी आवडती क्रीडा होय. युद्ध करून अरिहनन करणें हा त्याचा अत्यंत आवडीचा खेळ होय, इतर सर्व व्यवसाय त्यास तुच्छ वाटत. तेव्हां क्रोधवश कुबेरसेवकांचा प्राण घेणें हा भीमाला मोठा लाभच झाला असें तो म्हणतो.

[1]त्याच्या बळें तुम्हांसीं धर्म प्रभु भांडणार, बा! [2]राजा! ।
जपला विराटनगरीं बहु, बहुत वनींहि [3]अब्द [4]वारा ज्या. ॥ ६२
ज्या श्रीगांडीवधनुर्वल्लीतें [5]सत्यपांड वानी ती, ।
[6]देवी देती युद्धोत्साह, दुजी सत्य पांडवा नीती. ॥ ६३
[7]जो भांडला शिवासीं प्राप्त हरिहरप्रसाद [8]होरा[9] ज्या, ।
त्याच्या बळें तुम्हांसीं धर्म प्रभु भांडणार हो! राजा! ॥ ६४
[10]यक्षें [11]पुरुषत्व दिलें ज्याला, जो धैर्यसन्नग[12] शिखंडी,[13] ।
करणार तद्बळें रण, कीं तो [14]गांगेयपन्नगशिखंडी. ॥ ६५
जो वासुदेव भगवान् [15]सर्वाश्रितकामकल्पनग, राया! ।
त्याच्या बळें [16]सुरपुरा घेइल, मग कां न अल्प [17]नगरा या? ॥ ६६

---

१. त्या भीमाच्या. [येथें तीन गीतींचा ६०-६१-६२ यांचा अन्वय आहे म्हणून हें 'संदानितका'चें अथवा 'गुणवती'चें उदाहरण होय. तीन श्लोकांचा संबंध एकत्र असला म्हणजे त्या पद्यत्रयास 'संदानितक' अथवा 'गुणवती' अशी संज्ञा आहे. याविषयीं प्रमाणाचे श्लोकः—'द्वाभ्यां तु युग्मकं संदानितकं त्रिभिरिष्यते । कलापकं चतुर्भिश्च पंचभिः कुलकं मतम् ॥' इति, 'एकः श्लोको मुक्तकं स्यात् द्वाभ्यां युगुलकं स्मृतम् । त्रिभिर्गुणवती प्रोक्ता चतुर्भिस्तु प्रभद्रकम् । वाणावली पंचभिः स्यात् षड्भिस्तु करहाटकः ॥' [काव्यादर्श—टीका.] २. हे धृतराष्ट्रा! ३. वर्षें. ४. ज्या भीमाला धर्म विराटनगरांत आणि वनांत बहुत जपला त्याच्या बळावर इत्यादि. ५. ब्रह्मांड. ६. ती गांडीवधनुर्वल्लीरूपिणी देवी पांडवांस युद्धोत्साह देते आणि दुसरी नीतिदेवी ही त्यांस रणोत्साह देते. ७. जो अर्जुन (मोरोपंत—वनपर्व—अध्याय ३ पहा.) शिवाबरोबर होरा (मुहुर्तभर—कांहीं काळपर्यंत) भांडला. ८. अ० ५० श्लो० २७ पहा. ९. मुहूर्त. १०. स्थूणाकर्ण नामक यक्षानें आपलें पुरुषत्व शिखंडीला दिलें. ११. अध्याय ५० श्लोक ३७ पहा. १२. धैर्याचा उत्तम पर्वत. १३. अंबा या नांवाची काशीराजाची ज्येष्ठ कन्या भीष्मानें विचित्रवीर्याकरितां जिंकून आणिली. परंतु तिचें प्रेम शाल्व राजावर जडलें असल्यामुळें तिला परत पाठविलें. त्यानें अंबा ही परजिता असल्यामुळें तिचा स्वीकार केला नाहीं. तेव्हां ती परत येऊन 'मला वरा' असें भीष्मास म्हणूं लागली. ती गोष्ट भीष्मानें नाकबूल केली. तेव्हां तिनें परशुरामाकडून आपला अंगीकार करण्याविषयीं बोलणें लाविलें. भीष्म परशुरामाचें ऐकेना म्हणून त्या दोघांचें युद्ध झालें. त्यांत परशुरामाचा पराभव झाला. अखेरीस अंबेनें भीष्माला मारण्याकरितां रुद्राचें आराधन करून, त्याच्या प्रसादानें पुढील जन्मीं द्रुपदाचे घरीं शिखंडिनी कन्यावतार घेतला. हिलाच 'शिखंडी' असें नांव पुरुषत्वलाभानंतर प्राप्त झालें. १४. भीष्मरूप सर्पाविषयीं मयूर. १५. सर्व आश्रितांच्या मनोरथांविषयीं कल्पवृक्ष. १६. अमरावतीला. १७. या लहानशा हस्तिनापुराला.

करिल [1]न्यायब्राह्मणसत्पुरुषाशीर्बळेंचि कलहातें, ।
होतिल **अजातरिपुच्या** भग्न रणांत क्षणांत खल हातें.' ॥ ६७
[2]प्रज्ञाचक्षु [3]म्हणे, 'हे सर्वहि एकीकडे महाबाहू, ।
एकीकडे **वृकोदर** मत्पुत्रातें रणीं न हा [4]बाहू. ॥ ६८
**भीमा**पासुनि [5]भीतों मी, [6]हरिपासूनि जेंवि [7]काळविट, ।
घेइल हा न वधाचा विट, घेइल एकवेळ **काळ** [8]विट. ॥ ६९
अस्त्रीं [10]गुरुसम, कोपीं [11]हरसम, वेगींहि **वात**सम जो गा! ।
दे[12]वा! मंद **सुयोधन** **भीम**विरोधें स्वघात समजो गा! ॥ ७०
नीज न ये रात्रिदिवस, **भीमा**चें लागलेंचि मतिला भें, ।
आजूनि वांचलों कीं [13]उरले द्यूतांत, याचि अतिलाभें. ॥ ७१
[14]म्हणतों मरूं नका रे! **भीम**करें मारवूं नका राजे, ।
परि न [15]वळती, कसे तरतिल [16]गुरुच्या लंघिती [17]नकारा जे? ॥ ७२
[18]देवासुरांहि दुःसह **भीम**, असो [19]सगद, कीं असो [20]अगद, ।
[21]अगदर्पाला [22]वज्री अरिदर्पालाहि होय हा [23]अगद. ॥ ७३
[24]राजर्षिवर **युधिष्ठिर** त्याचा ब्रह्मास्त्रसाचि [25]निःश्वास, ।
याची काय कथा? तो भस्म करील क्षणांत [26]विश्वास. ॥ ७४
**भीष्मद्रोणकृ**पांहीं परमाप्तांहीं सदा [27]सहायांहीं, ।
भुजबुद्धिबळें दिधला व्यसनांत पडों न [28]दास हा यांहीं. ॥ ७५

---

१. न्यायाच्या आणि ब्राह्मणाच्या व सत्पुरुषांच्या आशीर्वादाच्या बलानें. २. धृतराष्ट्र. ३. अध्याय ५१ श्लो० १-६१ पहा. ४. बोलावू. ५. अध्याय ५१ श्लो० २-३ पहा. ६. सिंहापासून. ७. हरिण. ८. कंटाळा. हा भीम प्राण्यांचा वध करण्यास कधींही कंटाळावयाचा नाहीं, या भीमाला वधाचा कंटाळा यावयांचा नाहीं, कदाचित् एखाद्या प्रसंगीं यमाला प्राणहरण करण्याचा कंटाळा येईल, पण भीमाला यावयाचा नाहीं. ९. अ० ५१ श्लो० ७ पहा. १०. द्रोणासारखा. ११. रुद्रासारखा, महेश्वरसम. (अ० ५१ श्लो० १४.) १२. हे कृष्णा! १३. माझे पुत्र जिवंत राहिले. (अ० ५१ श्लो० १६.) १४. मी धृतराष्ट्र दुर्योधनप्रभृति पुत्रांस म्हणतों. १५. माझे पुत्र वळत नाहींत. १६. हा अर्धांश सुभाषितरूप आहे. यांत प्रश्नालंकार आहे. १७. निषेधास. १८. देवांला आणि असुरांला (दैत्यांला). १९. गदेसहित. २०. गदारहित. (अ० ५१ श्लो० ४४.) २१. पर्वतगर्वाला. [अग=शैल, पर्वत. 'शैलवृक्षौ नगावगौ' इत्यमरः.] २२. इंद्र. (अ० ५१ श्लो० ४२.) २३. औषध. २४. ब्रह्मनिष्ठ राजांमध्यें श्रेष्ठ. २५. श्वास. २६. जगताला. २७. सहचरांनीं. २८. हा सेवक धृतराष्ट्र.

आतां यांहीं[1] आर्यव्रत[2] कैसें जीवितार्थ सोडावें? ।
मोडावें कैसें मन? अपयश कैसें नवेंचि जोडावें? ॥ ७६
**कर्ण** सदय[3] प्रमादी[4], गुरु[5] **भी**ष्महि वृद्ध[6], **पार्थ** तरणा रे! ।
आहेत काय कोठें तरि बाहुबळें समुद्र तरणारे? ॥ ७७
**भीमार्जुना**च्युत[7] रणीं मथितिल **अ**[8]दितितनयां संकटकातें[9]. ।
आलें येइलही जें नृपबळ वधितिल न यांसकट कां तें? ॥ ७८
तें सत्य होत आलें **वि**दुरें[10] जें भावि[11] घातलें कानीं, ।
केला पहा! कसा हा येउनि पोटासि घात लेंकांनीं? ॥ ७९
जो मज ताप कुपुत्रें गिरिसहि 'पविच्या[12] न दाविला पातें[13], ।
न तरेन वृद्ध मी सुतशोकघनजविषनदा[14] विलापातें[15].' ॥ ८०
**सं**जय म्हणे[16], 'पहावा स्वतनुजपरिणाम जो भला तातें, ।
नाचों दिला सुत गृहीं धरुनि द्यूताभिधा[17] अलातातें[18]. ॥ ८१
तेव्हां स्मितें[19] ये वदनीं, न मनीं ये कीं करील हा हानी, ।
झालें दीप्त अलातें जें गेहें[20] विझेल काय हाहानीं[21]? ॥ ८२
आजुनि तरि टाका कीं प्रभु[22] हो! कारालयांत[23] हा[24] कोंडा[25], ।
प्रेमकरें एखादे ते कण सांराल[26] यांत हा कोंडा. ॥ ८३

---

१. गीति ७५ यांत वर्णिलेल्या जनांनीं. २. स्वदासांला व्यसनांत पडूं न देणें हें उत्तम व्रत. [अ० ५१ श्लो० ४६.] ३. घृणी. (अ० ५२ श्लो० ५.) ४. असावध. ५. द्रोण. ६. स्थविर. ७. भीम-अर्जुन-अच्युत (श्रीकृष्ण). ८. देवांला. (अ० ५२ श्लो० ७-१३ पहा.) ९. सैन्यसहित. १०. विदुरानें मोठ्यानें बोलून सांगितलेलें भावि दुःख. [अ० ५१ श्लो० ५३.] ११. होणारें. १२. वज्राच्या. १३. प्रहारानें, आघातानें. १४. पुत्रशोकरूप मेघापासून उत्पन्न झालेल्या विषाच्या नदाला. १५. मी म्हातारा पुत्रशोकरूप नदींतून पार पडेन असें दिसत नाहीं—असा भाव. पुत्रशोकरूप नद अशा विलापातें तरून जाणार नाहीं. १६. अध्याय ५४ श्लो० १-२२ पहा. १७. द्यूतनामक. 'अप्राणिभिः कृतं यत्तु तल्लोके द्यूतमुच्यते । प्राणिभिः क्रियते यत्तु स विज्ञेयः समाह्वयः ॥' इति; म्हणजे—निर्जीव वस्तूंनी (सोंकट्या, फांसे इ०) जें खेळणें त्यास लोकांमध्यें **द्यूत** म्हणतात. आणि सजीव वस्तूंनीं (एडके, कोंबडे इ०) जें खेळणें त्यास **समाह्वय** म्हणतात. [नामलिंगानुशासन—पृष्ठ ८८.] १८. ज्वलित काष्ठास, कोलिताला. ['अलातमुल्मुकम्' इत्यमरः.] १९. अध्याय ५४ श्लोक ५ पहा. २०. गृह. २१. हायहाय करून. २२. अहो धृतराष्ट्रादिक राजे हो! २३. बंदिशाळेंत. २४. हा पापपुरुष दुर्योधन. (अ० ५४ श्लोक २०.) २५. कोंडून ठेवा. २६. हा (दुर्योधन) कोंडा (आहे), यांत (या कोंड्यांत) प्रेमकरें (प्रेमाच्या हातांनीं, प्रेमाचे

होय न तें शंखशतें जें शिंव[1] एकेंचि दक्षिणावर्तें[2]; ।
लोकद्वयीं सुखें, श्री पात्रीं देऊनि दक्षिणा, वर्ते[3]. ॥ ८४
लटिक्याचि अनीशत्वा[4] धरिसी, न[5] बघेल या सभा सोंगा, ।
हितकर परि परसे[6] तुज जरि आम्हीं आप्त दास भासों, गा!' ॥ ८५
तेव्हां सुयोधन म्हणे[7], 'अजि तात! मदुक्तिलाहि[8] परिसा, हो! ।
तुमच्या सभेसि यद्यपि मन्मत बहुतचि असह्य परि साहो[9]. ॥ ८६
पांडवभय न धरावें, झाले पांडव कुळांत ते ज्या, तें ।
आम्हासहि प्रसवलें, जाणे जग आमुच्याहि तेजातें. ॥ ८७
धर्मासि भेटले जैं कृष्णादि[10] श्याल[11] सर्व हे रानीं, ।
वदले राज्यहरण मद्वध तें कथिलें समस्त हेरांनीं[12]. ॥ ८८
तेव्हां अभय दिलें मज भीष्मद्रोणादि सर्व गुरुगुरुनीं[13], ।
देवीहरि[14]श्रिताचें वनहरि हरितील काय[15] गुरुगुरुनीं? ॥ ८९
स्वाधीनमृत्यु[16] भीष्म, द्रोणहि उग्रप्रताप, हा रविला[17] ।
जिंकिल, याच्या तेजें कोणाचा न प्रताप हारविला[18]? ॥ ९०

---

योगें अंध होऊन) एखादे (कदाचित्) ते कण (ते पांडव) साराल (मिसळ कराल), तर अशी कोंड्यांत कण मिसळण्याची चूक होऊं देऊं नका. कोंडा तुच्छ आणि कण श्रेष्ठ हें वाचकांस सांगण्याची जरूरी नाहीं.

१. कल्याण. २. दक्षिणावर्त=सव्य मुखाचा शंख, ज्याचें वलन दक्षिणाकृति असून ज्याच्या शरीरावर भोंवरे असतात तो. हा शंख मंगलप्रद समजतात. हें गीत्यर्ध सुभाषितरूप समजलें पाहिजे. ३. श्री (धन) पात्रीं दक्षिणा देऊनि (सत्पात्र ब्राह्मणास दक्षिणा देऊन) लोकद्वयीं (या लोकीं आणि परलोकीं) सुखें (आनंदानें) वर्त (वाग, रहा.) दोन्ही लोकीं सुख पावून स्वस्थ रहा. ४. सामर्थ्यहीनत्वास, अप्रभुत्वाला, परवशतेला. ५. या तुझ्या पराधीनतेच्या सोंगाला ही सभा भाळणार नाहीं, या तुझ्या सोंगानें सभा फसणार नाहीं, तूं ईश असून अनीशत्वाचें जें सोंग आणतोस त्यानें ही सभा फसणार नाहीं. ६. शत्रूसारिखे. ७. अ० ५५ श्लो० १-६८ पहा. ८. मद्+उक्तिला=माझ्या+वचनाला. ९. सहन करा. १०. कृष्ण, धृष्टद्युम्न, धृष्टकेतु. ११. मेहुणे. 'श्याल' याचा अपभ्रंश 'साला' असून त्याची योजना शिव्या देण्यांत मात्र होते. १२. दूतांनीं. १३. द्रोण, भीष्म, कृप, द्रौणि इत्यादि गुरुजनांनीं. (अ० ५५ श्लो० १७-१९.) १४. पार्वतीच्या सिंहाच्या आश्रिताचें. १५. वनसिंह कांहीं करण्यास समर्थ नाहींत—असें अपेक्षित उत्तर आहे. १६. इच्छामरणी, स्वाधीन आहे मृत्यु ज्याचा तो. १७. सूर्याला. १८. हें प्रश्नालंकाराचें उदाहरण आहे. सर्वांचा प्रताप हारविला—असें उत्तर आहे.

[१]वाखाणिलें मज [२]**बळें भीम** मजपुढें धरील **न** गदेतें ।
गुरुचा प्रताप बहु दे, याहुनि [३]अत्यल्प [४]कल्पनग दे तें. ॥ ९१
[५]भ्याले **पां**डव आम्हां कीं प्रार्थुनि पांच मागती गावें, ।
यश आमुचें कवीला वाटे गाऊनि [६]मागती [७]गावें. ॥ ९२
[८]ज्याचा तात [९]अयोनिज, [१०]मायहि, हा वीर काय सामान्य? ।
**अ**श्वत्थामा, सर्वां [११]धन्वधरां [१२]**रा**मरायसा मान्य. ॥ ९३
सहज [१३]कवचकुंडलधर रविसा तेजोनिधान **कर्ण**; [१४]वहा ।
चिंता यास, [१५]यशोस्त्रामृतरत्नार्चित[१६]नृकाय अर्णव हा. ॥ ९४
कांपत असेल **श**क्रहि परिसुनि माझ्या [१७]सुयोधनामातें, ।
[१८]बाहेल कोण योद्धा समरीं राया! **सु**योधना! मातें? ॥ ९५
[१९]**के**शव **सा**त्यकि दोघे, **पां**डुतनय पांच, सात हे तिकडे, ।

---

१. अध्याय ५५ श्लो० ३०-३५ पहा. २. बलरामानें. (गदायुद्धामध्यें दुर्योधनासारखा कोणी नाहीं असें बलदेवानें वर्णन केलें आहे.) ३. फार थोडें. ४. कल्पवृक्ष. गुरुप्रसाद जें देतो त्याहून कल्पवृक्ष फार थोडें देतो. ५. पांडवांनीं पांच पुरें मागावयाचीं टाकून पांच गांव मागतात म्हणून ते भयग्रस्त होत—असा भाव. ६. पुनः ७. वर्णावें. ८. ज्या अश्वत्थामवीराचा. ९. शुक्रशोणितांच्या मिश्रणानें न झालेला. [द्रोण हा द्रोणीसंज्ञक यज्ञपात्रांत भरद्वाजरेतापासून उत्पन्न झाला, म्हणून याला 'द्रोण' असें नांव पडलें. घृताची नामक अप्सरेला पाहतांच भरद्वाजमुनीचें कामविकारानें अमोघ रेत पतन पावलें व त्यापासून द्रोण झाला. तेव्हां द्रोण अयोनिज (योनीपासून उत्पन्न न झालेला) होय.] १०. कृपी, कृपाचार्याची भगिनी आणि द्रोणाची पत्नी. शरद्वान् ऋषीला मोहित करण्यासाठीं इंद्रानें जानपदी नामक अप्सरा पाठविली. तिच्या दर्शनानें मुनीचें रेत स्खलन झालें. त्यापासून एक कन्या व एक पुत्र अशीं दोन मुलें झालीं. यांस शंतनु राजानें कृपेनें रक्षिलें म्हणून 'कृपी' आणि 'कृप' अशीं नांवें प्राप्त झालीं. कृपीला 'शारद्वती' असेंही म्हणतात. ही अश्वत्थाम्याची जननी. [अ० ५५ श्लो० ५०; मोरोपंत—आदिपर्व—अ० २१ पृ० ११७-१२०.] ११. धनुर्धरांस, क्षत्रियांस. १२. येथें दुर्योधन दाशरथिरामाचा उल्लेख करीत आहे हें वाचकांनीं ध्यानांत ठेवावें. यावरून दुर्योधनाला रामायणकथा विदित होती असें होतें. १३. जन्मतः कर्णाला कवचकुंडलें प्राप्त झालीं होतीं, तीं इंद्रानें शचीसाठीं म्हणून बहाणा करून मागून घेतलीं. [श्लो० ५४-५६; मोरोपंत—वनपर्व—अ० १४ पृ० २१२-२१८.] १४. यास चिंता वहा=या कर्णाच्या ठिकाणीं सगळा चिंताभार ठेवा, आणि निष्काळजी व्हा. हा कर्ण तुमची काळजी दूर करण्यास समर्थ आहे. १५. यश आणि अस्त्रें हींच अमृत आणि रत्नें यांनीं अर्चित (भूषित असा). १६. नरदेहधारी. १७. उत्तम वीराच्या नांवातें. १८. कोणींही बोलावणार नाहीं—असें उत्तर. १९. येथें मूळांत 'केशवा'बद्दल 'धृष्टद्युम्न' आहे. [अ० ५५ श्लो० ६१.]

त्यांतहि ह[१]रिप्रतिज्ञा असि कीं पाहूं नयेचि हे[२]तिकडे. ॥ ९६
भगदत्त शल्य भीष्म द्रोण कृप द्रौणि कर्ण हे तिपट, ।
वीर मजकडे, यांचे रविसहि आच्छादितील [३]हेतिपट. ॥ ९७
भ्यालां कां हो तात! स्वस्थ रहा, पांडवांसि गिळितील, ।
[४]खिळितील वायुसहि हे, चारिदिवस ते मि[५]शांसि पिळितील. ॥ ९८
भीमातें मारिन मी, वधितिल कर्णादि [६]फाल्गुनासि पणें, ।
रिपुरक्ताचें खेळों पाहुनियां स[७]मरफाल्गुना सिपणें.' ॥ ९९
धृतराष्ट्र [८]म्हणे, '[९]सूता! युद्धकथा कोण काय वदतात? ।
वद, परिसो सुत, परिसो [१०]गुरु, परिसो '[११]कीर्तिनीतिपद तात.' ॥ १००
संजय म्हणे, 'शिखंडी [१२]म्हणतो भीष्मासि ठेविना सत्य.' ।
धृष्टद्युम्न [१३]म्हणे, 'मी [१४]द्रोणा, रोगासि जेंवि [१५]नासत्य. ॥ १०१
निज भाग कल्पिलासे [१६]मद्रेश युधिष्ठिरें [१७]अहीनकुलें, ।
शतहि सुत तुझे भीमें [१८]स्वविभागत्वें, जसे अही [१९]नकुलें.' ॥ १०२
अर्जुन वदला, 'येतिल [२०]दुर्जयवैरीभनक्रसम राजे ।
[२१]कर्णजयद्रथमुख सुखकर माझा भाग, शक्त समरा जे.' ॥ १०३
[२२]अभिमन्यु बोलिला, कीं 'मोडा वाटूं नयेचि इतरांनीं, ।
द्यावा मज [२३]दुर्योधनदुःशासनपुत्रभाग पितरांनीं.' ॥ १०४
नकुळ असें वदला कीं, 'भाग [२४]उलूकादि आपले खावे ।

---

१. श्रीकृष्णाची प्रतिज्ञा. २. शस्त्राकडे. [मी हातीं शस्त्र धरणार नाहीं ही प्रतिज्ञा. उद्योगपर्व–अ० १ गी० ४०.] ३. शस्त्ररूप वस्त्रें. ४. बद्ध करितील. ५. मिशा पिळणें=मिशांवर ताव देणें, शेखी मिरविणें. ६. अर्जुनास. ७. युद्धरूप फाल्गुनमासास. ८. अ० ५७ श्लो० १ पहा. ९. हे संजया. १०. द्रोण. ११. कीर्ति व नीति यांचें स्थान असा. (भीष्म.) १२. अ० ५७ श्लो० १२ पहा. १३. अ० ५७ श्लो० २० पहा. १४. मी द्रोणाला जीवंत ठेवणार नाहीं असें धृष्टद्युम्न म्हणाला. १५. अश्विनीकुमार. १६. शल्य. १७. उत्तम कुलें. (उत्तमकुलोत्पन्नानें.) १८. तुझे शंभर पुत्र हा आपला भाग असें भीमानें मानिलें आहे. १९. मुंगुसानें. २०. दुर्जय+वैरी+इभ+नक्र+सम=अजिंक्य+शत्रु+हत्ती+नक्र+समान=अजिंक्य शत्रुगजांला नक्रासारखे. २१. कर्ण आणि जयद्रथ हे ज्यांत मुख (प्रमुख) आहेत असा भाग. (अश्वत्थामा, विकर्ण इत्यादि.) २२. सौभद्र. (अ० ५७ श्लो० १९.) २३. दुर्योधनाचे पुत्र लक्ष्मणप्रभृति, दुःशासनाचे पुत्र दौःशासनिप्रभृति. २४. उलूक, कैतव्य, सारस्वतप्रभृति राजे. [श्लो० २३.] उलूक हा शकुनीचा पुत्र. याला दुर्योधनानें युद्ध होण्याच्या पूर्वी उपप्लव्यनगरीस पांडवांकडे पाठविलें होतें. याला मारण्याची नकुळानें प्रतिज्ञा केली होती, त्याप्रमाणें हा त्याच्याच हातून मरण पावला.

[1]मद्बाणांनीं नाहीं तरि त्यासम हेहि पाप लेखावे.' ॥ १०५
[2]नकुलानुजप्रतिज्ञा ऐसी ही परिशिली मुखानें, हो ! ।
कीं, 'शकुनि आपुल्याचि [3]व्यसु, पापी परि शिली[4]मुखानें हो.' ॥१०६
आवश्यकक्रिया जी शीघ्र तुम्हीं ध्याच उरकुनी तीतें, ।
कोणा[5]चें आचरतां लोकांत उरेल उर कुनीतीतें ?' ॥ १०७

अंध म्हणे, '[6]दे त्यांचें त्यांला, केल्या जरि प्रतिज्ञा, ते ।
सज्जन करितिल करुणा, रक्षिति [7]नम्रा अरिप्रति ज्ञाते. ॥ १०८
ज्यांच्या बळें उडसि ते तिकडेचि मनेंहि, तुजकडे देहें, ।
साम करावें त्यांसीं बा ! मज वृद्धासि एवढें दे हें.' ॥ १०९

'ते[9] हेहि [10]एकजाती, ते हेहि क्षोणि[11]वरि [12]रहातात, ।
मग ! [13]त्यांचाचि विजय कां ? काय म्हणावें तुम्हां अहा ! तात ! ॥ ११०
न बळें तुझ्या न [14]गुरुच्या, न गुरुसुताच्या, न याहि [15]आजाच्या, ।
स्वबळें कर्णबळें मी हरणार [16]असूंसि धर्मराजाच्या. ॥ १११
करितिल समरीं माझ्या ते, मी त्यांच्या करीन, मथना कीं, ।
भोगीन भाग्य एथें, कीं हाचि धरूनि [17]भव्यपथ [18]नाकीं. ॥ ११२
अतिसूक्ष्में [19]सूच्यग्रें जितुका भूभाग होतसे विद्ध, ।
युद्धाविना न देइन जरि ते तितुकाहि ध्यावया सिद्ध[20].' ॥ ११३
प्रज्ञाचक्षु म्हणे, 'रे ! देईल न एकवेळ विष मरण, ।

---

१. माझ्या शरांनीं. नकुल असें म्हणाला कीं, माझ्या बाणांनीं राजांचें भक्षण करावें. हें काम माझ्या बाणांनीं न केलें तर, हे माझे बाणही त्यासम (त्या उलूकादि राजासारखे) पापी लेखावे (गणावे). २. सहदेवाची प्रतिज्ञा. ३. प्राणरहित. ४. बाणानें. [शिलीमुख=(१) भ्रमर, (२) बाण. 'अलिबाणौ शिलीमुखौ' इत्यमरः. शिली शल्यं मुखे आनने यस्य सः शिलीमुखः.] ५. कुनीतीतें आचरतां (दुष्ट आचरण केलें असतां) लोकांत (या जगांत) कोणाचें उर उरेल? (दुष्ट आचरण करणारांचें 'उर छिन्नभिन्न झाल्याशिवाय कसें राहील?) अर्थात् कोणाचेंही उर उरणार नाहीं—हें उत्तर. ६. जें पांडवांचें देणें योग्य आहे तें देऊन टाक. ७. शरणागता. [जो शरण आला तो शत्रु असला तरी त्याला अभय देऊन राखावें असें नीतिशास्त्र आहे.] ८. ज्यांच्या बळांवर तूं मोठमोठ्या उड्या मारतोस; ज्यांच्या प्रतापांचा भरंवसा धरून तूं जयाची आशा बाळगतोस. ९. ते=पांडव; हे=दुर्योधनप्रभृति. १०. एकजातीय. [अ० ५७ श्लो० ३६] ११. पृथ्वीवरि. १२. असतात, वसति करतात. १३. त्या पांडवांचा. १४. अ० ५८ श्लो० १०-१५ पहा. १५. भीष्माच्या. १६. प्राणांस. १७. कल्याणमार्ग. १८. स्वर्गीं. १९. सुईच्या अग्रें. २०. हें दुर्योधनाचें वचन आहे.

[1]अशनिहि [2]दहनहि, [3]परि जो **भी**मासीं तो [4]अतीव विषम रण. ॥ ११४
न करीं दुराग्रह, अरे! वत्सा! हो! सावधान, रे [5]शम रे! ।
त्यजितां जळ मीन तसा [6]धर्मनय त्यागितां नरेश मरे. ॥ ११५
खवळेल **भी**म [7]हरिसा, मन्मतिला तों असें गमे [8]रुरुसे ।
व्हाल तुम्ही, कीं **वि**[9]धिवरि [10]त्यांचें ऐकोनि सत्व **मे**रु रुसे. ॥ ११६
[11]नग जगतीवरि न तसे तुटतील [12]धृतायुधा [13]सुतारा जे, ।
**भी**मा भी माझें मन, दुःसाध्य न या [14]पृथासुता राजे. ॥ ११७
ज्या [15]अहित [16]पितृ [17]पितामह, सांगावें काय त्या मग दहांनीं? ।
[18]स्मरसिल मद्वच जेव्हां प्राणाची करिल तो [19]सगद हानी. ॥ ११८
**सं**[20]जय! [21]कंजयशोहरनयन कसें काय बोलिला [22]वदे, रे! ।
[23]आइक, हो सुखपद, रे! [24]मदरेचितसद्यशोनिधे [25]सदरे!' ॥ ११९

---

## अध्याय पांचवा.

**सं**जय [26]म्हणे, 'पुसाया गेलों लोकैकनायका [27]यदुजा, ।
तेव्हां वदला प्रभु तें कथितों, सांगों [28]रहस्य काय दुज्या? ॥ १

---

१. वज्र. २. अग्नि. ३ परंतु भीमासीं जो रण (संग्राम) तो अतीव (अत्यंत) विषम (कठीण) दुष्कर, आपत्तिजनक, भयंकर होय. ['रण'शब्द युद्धार्थीं पुंनपुंसक आहे. 'रणः कोणे क्वणे पुंसि समरे पुंनपुंसकम्' इति मेदिनी.] ४. फारच. ५. थंड हो, शांति (साम) कर. ६. धर्म आणि नीति यांचा त्याग केला असतां नरेश (राजा) मरतो. ७. सिंहासारखा. ८. मृगासारिखे. [रुरु=मृग.] ९. ब्रह्मदेवावर. १०. त्याचें (भीमाचें) सत्व ऐकोनि (बल जाणून) मेरु (मेरुपर्वत) रुसे (रुष्ट झाला). मेरुपर्वतापेक्षांही भीमाचें सत्व मोठें म्हणून मेरुपर्वत ब्रह्मदेवावर रागावला. विधात्यानें भीमाला आपणापेक्षां अधिक सत्व दिलें ह्मणून मेरुपर्वताला राग आला. ११. वृक्ष. १२. हत्यार धारणकर्त्यास. १३. सुतारास, शिल्प्यास. १४. या पृथासुता (या भीमाला) राजे (नृप) वश करणें अगदीं सहज आहे. १५. शत्रु. १६. धृतराष्ट्र. १७. भीष्म. १८. अ० ५८ श्लो० २८ पहा. १९. गदाधर. २०. हे संजया! कमललोचन श्रीकृष्ण काय बोलला तें सांग. [मूळांत वासुदेव व धनंजय काय म्हणाले तें सांग असा धृतराष्ट्राचा प्रश्न आहे. अ० ५९ श्लो० १.] २१. कमलयश हरण करणारीं नेत्रें ज्याचीं तो कृष्ण. २२. अध्याय ५९ श्लोक १ पहा. २३. हे दुर्योधना! श्रवण कर, तूं सुखाचें स्थान हो. २४. मद+रेचित+सद्+यशस्+निधे=गर्व+रिक्त+उत्तम+यश+सागरा=गर्वानें रिकामा केला आहे यशाचा समुद्र ज्यानें अशा. २५. सत्+अरे=हे साधूंच्या शत्रो. २६. अध्याय ५९ श्लो० २-३१ पहा. २७. कृष्णास. २८. हें. रहस्य इतरांना कसें सांगावें?

एकीं शयनीं होते **न**र **ना**रायण पिऊनि[1] हाला[2] हो ! ।
तद्दर्शनामृताचा आज्ञेनें घे भिऊनि हा[3] लाहो[4]. ॥ २
जेथें[5] **अ**भिमन्यु **न**कुल **स**हदेव अशासही न शिरवेच, ।
तेथें शिरतां कवणा न म्हणेल स्वापराध[6] 'शिर वेच ?' ॥ ३
ध्याउनि[7] ज्यासि निवाले सज्जन अमृतें जसे न हालें तें ।
कृष्णाख्य[8] तेज निजलें होतें, राया ! पिऊनि हालेतें. ॥ ४
कृष्णा[9] **भा**[10]मा देवी साक्षात् देवीच ज्या जना दिसती, ।
होत्या **कृ**ष्णापाशीं, **ह**रि**ह**रनिकटीं जशा अनादि[11]सती. ॥ ५
जेणें किरात[13]रूपिप्रभुसीं केला प्रसिद्ध बोंढ[14] कली[15], ।
[16]तो मजकडे स्वपादें कांचनमय पादपीठ बा ! ढकली. ॥ ६
शरणागताधिगिरि[17]चें बा ! केलें ज्या कृपाकरें पीठ[18] ।
प्रभुयुग[19] वंदुनि महिवरि बसलों स्पर्शुनि नृपा ! करें पीठ[20]. ॥ ७
वदलों वाचिक[21] सांगा, आलासे दास हा निरोपाला, ।
**कु**रुसंततितुलसीच्या स्पर्शों द्यावी न हानि रोपाला[22]. ॥ ८
मद्वचनातें परिसुनि, पाहूनि **द्रौ**पदीवदन, रगडी ।
वदवाया स्वांकस्थ[23] [24]श्री**भा**माजानिचें पद **न**रगडी. ॥ ९

---

१. मधु, आसव सेवून. [अ० ५९ श्लो० ५.] २. मद्य. ['सुरा हलिप्रिया हाला' इत्यमरः.] ३. हा मी संजय. ४. लाभ. ५. ज्या अंतःपुरांत. ६. निज अपराध. आपलें शिर (मस्तक) वेंच (खर्च कर) असें कोणाला म्हणणार नाहीं ? जेथें शिरलें असतां त्या शिरण्याच्या अपराधाबद्दल शिर खर्चीं घातलें पाहिजे. अशा अंतःपुरांत मी संजय शिरलों—असा भाव. ७. ध्यान करून. ८. कृष्णनामक दैवत. ९. द्रौपदी. १०. सत्यभामा. ११. योगमाया लक्ष्मी पार्वती. १२. या पद्यांत 'पर्यायोक्त' अलंकार झाला आहे. येथें अर्जुनानें' असें न म्हणतां पर्यायानें वर्णन केलें आहे. १३. भिल्लरूपी महादेवाशीं. १४. मोठा, भयंकर. १५. कलह, संग्राम. (मोरोपंत—वनपर्व अ० ३ यांत या किरातार्जुनांच्या संग्रामाचें वर्णन आहे.) काव्यसंग्रहग्रंथमाला—पृ० २७-३८ पहा. १६. तो अर्जुन मला बसण्यासाठीं कांचनमय आसन पायानें मजकडे ढकली. [अ० ५९ श्लो० ८.] १७. शरण+आगत+आधि+गिरिचें=शरण आलेल्याच्या मनोव्यथारूप पर्वतांचें. १८. पिष्ट. १९. कृष्णार्जुन. २०. आसन. २१. बोलावयाचें (निरोप.) २२. रोपा=कोंवळा वृक्ष, माडा. 'हानि रोपाला'—'हा निरोपाला' हें पंतांचें आवडतें यमक आहे. २३. आपल्या मांडीवरील श्रीकृष्णाचें पद (चरण) नरगडी (अर्जुन) वदवाया (त्यानें बोलावें म्हणून) रगडी (चुरी). २४. भामापतिकृष्णाचें. भामा जाया यस्य सः भामाजानिः (कृष्णः) त्याचें. 'जाया'शब्दाला बहुव्रीहिसमासांत 'जानि' असा आदेश 'जायाया निङ्' (पाणिनि ५-४-१३४) या सूत्रानें होतो; जसें—जानकीजानि (राम), पार्वतीजानि (शिव).

पार्थ म्हणे 'यदुराया! वाचिक या संजयासि सांगावें, ।
पिकपति[1]पुढें वसंतीं पृथुकानें[2] त्यजुनि पान[3] कां गावें[4]? ॥ १०
श्रीकृष्ण उठोनि म्हणे, 'संजय! दुर्योधनासि सांग असें, ।
वारासार[5] करुनि यमसदना जायास साप्त[6] सिद्ध असें[7]. ॥ ११
'गोविंदा[8]! धांव' असें व्यसनीं मारुनि सभेंत हाकेला, ।
या कृष्णेनें तेव्हांपासुनि केवळ ऋणीच हा[9] केला. ॥ १२
फेडायास्तव करितों तेरा वर्षेंहि जप तप रिणा मी, ।
वाहों न शकें, असतें[10] हें द्याया दुःख जपत परिणामीं. ॥ १३
जे त्वत्सहाय आम्हीं भीमार्जुनशौरि हे तिघे, त्यांतें ।
मारूं रणांत, सोडूं तृण घेत्यांतें, न हेतिघेत्यांतें[11].' ॥ १४
भूप म्हणे, 'पुत्राचा[12] अभिमान पिता धरील हा नियम, ।
धर्मप्रियार्थ, वत्सा[13]! त्वत्कटकांची करील हानि यम[14]. ॥ १५
मारुत[15]हि कसपटेंसीं कटकें कुतुकें करूनि उडवील, ।
विजयध्वजस्थ[16] मारुति सर्वांसहि सागरांत बुडवील. ॥ १६
शक्र त्रिदशांकरवीं[17] त्वद्वीरशिरोंबुजांसि खुडवील, ।

---

१. कोकिळापुढें. २. बालकानें. ३. पिणें. ४. गाऊं नये—हें उत्तर. ५. कामाची व्यवस्था, कामाचा बंदोबस्त. ६. स+आप्त=आप्तांसहित. ७. रहा. ८. वस्त्रहरणसमयीं द्रौपदीनें दीन होऊन 'हे गोविंदा!' असा आक्रोश केला, तेव्हांपासून तिच्या ऋणांतून मी मुक्त झालों नाहीं. वस्त्रप्रदानानें तिचें ऋण फिटावयाचें नाहीं, कौरवांचा उच्छेद केल्याशिवाय तिचें ऋण या हृदयांतून निघावयाचें नाहीं—असा भाव. [मोरोपंत—सभापर्व—अध्याय ५ गी० ६९-७९ पहा. काव्यसंग्रहग्रंथमाला पृ० ४४-४५.] ९. मी कृष्ण. १०. हें रीण मी वाहूं शकत नाहीं. हें रीण परिणामीं दुःख द्याया जपत असतें—असा अन्वय. ११. शस्त्र घेणारांस. रणांत आम्ही सर्वांना मारून टाकूं, पण जे तृण घेतील त्यांला सोडून देऊं आणि जे शस्त्र घेतील त्यांला सोडणार नाहीं. १२. अ० ६० श्लो० ४ पहा. १३. हे दुर्योधना! १४. यमाचा पुत्र धर्म होय. [मोरोपंत—आदिपर्व—अ० १८ गी० ६३-६६ पृ० १०८-१०९ पहा.] १५. वायु. [वायुदेवाचा पुत्र भीम होय असें लक्ष्यांत असावें.] १६. अर्जुनाच्या रथावर असणारा हनुमान्. १७. त्रिदश—तीन आहेत दशक ज्यांच्या संख्येंत ते 'त्रिदश' या रीतीनें विग्रह केला असतां तीसपासून एकूणचाळीसपर्यंत अंकांचा बोध होतो. परंतु आठ वसु, बारा आदित्य, अकरा रुद्र, दोन आश्विन, मिळून तेहतीस देव असल्यामुळें वरील विग्रहावरून तेहतीस देव समजावयाचे. 'अदित्यां जज्ञिरे देवास्त्रयस्त्रिंशदरिंदम ॥ १४ ॥ आदित्या वसवो रुद्रा अश्विनौ च परंतप ॥ १५ ॥

चिंतुनियां ऐरावत वैरा, [1]बत! वादिवीर तुडवील. ॥ १७
संरक्षितील [2]नानोपायें त्यां वैद्यराज [3]नासत्य ।
ज्यांच्या बळें [4]उडसि तूं [5]दैवबळ नसेचि त्यां [6]जनां सत्य.’ ॥ १८
हांसुनि म्हणे **सुयोधन**, ‘धरितिल [7]सुर काय जी नवी प्रकृती? ।
ऐसें न म्हणति **नारदमार्कंडेयादि** [8]जीन विप्र [9]कृती. ॥ १९
जरि कामक्रोधलोभद्वेषातें सुर मनुष्यसे धरिते, ।
तरि कां न [10]काननाप्रति जातां [11]प्रियपुत्रसाह्य ते करिते? ॥ २०
माझ्याठायीं केवळ मनुजबळ न, दैवबळहि बहु वसतें, ।
[12]नानोत्पात [13]शमवितों मीहि असें मच्चरित्र [14]बहुवस तें. ॥ २१
गडबड बडबड करितिल जरि तीव्र[15] न पावतील परि [16]भूतें, ।
[17]परिभूतें होतीलचि मन्मंत्रबळें पळांत [18]अरिभूतें. ॥ २२
जें [19]शुभ अशुभ ध्यातों सिद्धिप्रति पावतेंचि ताता! तें, ।
मेघातें [20]दहनातें वर्तवितों मी तसेंचि वातातें. ॥ २३

---

[वाल्मीकिरामायण–अरण्यकांड–सर्ग १४; निर्णयसागर छापखान्याची आवृत्ति–पृ० ४७० पहा.] १८. त्वद्+वीर+शिरस्+अंबुज=तुझ्या+योधा+मस्तक+कमल=तुझ्या वीरांची शिरः-कमलें.

१. बत! ऐरावत वैरा चिंतुनियां (तुमच्याशीं शक्राचें वैर आहे हें मनांत आणून) वादिवीर तुडवील–असा अन्वय. पांडवांस त्यांचे शक्रादिक पिते साहाय्य करतील. कौरवांनीं आपल्या स्वामीच्या (इंद्राच्या) मुलाचा (अर्जुनाचा) छळ केला, या वैरा (विरोधाला) मनांत आणून ऐरावत नामक इंद्रगज वादिपक्षीय (विरुद्धपक्षीय) वीरांचा नाश करील. इतर देव (वायु, यम इत्यादि) आणि अश्विनीकुमार हे पांडवांला मदत करतील. २. अनेक उपाय योजून. ३. अश्विनीकुमार. हें ठरींव यमक आहे. पुढें गीति ४५ पहा. ४. ज्याच्या बळावर तूं उड्या मारतोस. ५. दैवाची अनुकूलता. ६. त्यांच्यावर दैव फिरलें आहे. ७. देव (अग्नि, वायु, धर्म, इंद्र इत्यादि) नूतन स्वभाव धारण करतील काय? ८. वृद्ध. ९. प्रवीण. १०. वनाला. ११. आवडते मुलगे (पांडव) यांचें साह्य. [देव हे मनुष्यांसारखे कामक्रोधवश असते तर ते पांडवांचें साहाय्य करते, पण ते तसे नाहींत म्हणून त्यांचें साहाय्य करणार नाहींत. अ० ६१ श्लो० ४-५.] १२. नाना+उत्पात=अनेक अनर्थ. १३. झंझावर्त, वायुप्रचंडप्रवाह, इत्यादि उत्पातांचें मी शमन करूं शकतों. १४. पुष्कळ, विचित्र. १५. तीव्र अत्यंत गडबड किंवा बडबड पांडव करतील, परि (परंतु) भूतें (पृथ्वीतें) न पावतील. अरिभूतें (पांडव शत्रुरूप भूतें–पिशाचें) मन्मंत्रबळें (माझ्या मंत्रसामर्थ्यानें–या दुर्योधन मांत्रिकाच्या प्रभावानें) पळांत (क्षणांत) परिभूतें होतीलचि (पराभव पावतील). १६. पृथ्वीतें. १७. पराभव पावलेलीं. १८. शत्रुरूप भूतें. १९. अध्याय ६१ श्लो० २१ पहा. २०. अग्नीतें. अग्नि वायु आणि मेघ हे माझ्या आज्ञेप्रमाणें वागतात, ते माझ्या स्वाधीन आहेत.

स्नेह तुम्हांसि भिववितो आच्छादुनि निरुपमाहि मन्महिम्या, ।
उद्धरिजेल [१]वराहें जसि तसि लीलेंकरूनि [२]मन्महि म्यां. ॥ २४
[३]स्वल्पें काळें पुत्रें पांडव [४]मैथिले असेंचि परिसाल, ।
काढिन [५]दगडाचीही मी कोणाहि न निघेल परि साल. ॥ २५
[६]स्वश्लाघा न बरी, परि तुमच्या [७]आश्वासनार्थ हे राहो, ।
इतरां पुसों नका हें [८]प्रज्ञानेत्रें तुम्हींच [९]हेरा हो!' ॥ २६
कर्ण [१०]म्हणे, 'त्यजिजेतो जो [११]दुर्लभवस्तुकाम तो भानें, ।
[१२]गुरुपासीं 'ब्राह्मण मी' ऐसें [१३]वदलों महास्त्रलोभानें. ॥ २७
कळतांचि कपट [१४]वदला कीं, 'अस्त्रस्मृति नसेल तुज [१५]अंतीं,' ।
भस्मचि करिता, परि [१६]बहु कारुण्यामृत न कोपविष संतीं. ॥ २८
आयुष्य असे तोंवरि अस्त्रस्मृति मन्मनांत राहेल, ।
[१७]गुरुशापार्थ असा, मग कोण मजकडे रणांत पाहेल? ॥ २९

---

१. वराहें=डुकरानें. यज्ञवराहानें. विष्णूनें वराहाचें रूप धारण करून हिरण्याक्ष दैत्याचा संहार करून रसातळीं गेलेल्या पृथ्वीला आपल्या दाढेनें वर ओढून आणून उद्धार केला–या पुराणकथेकडे कविकटाक्ष आहे. [मोरोपंतकृत–अवतारमाला–गीति १२; मंत्रभागवत–द्वितीयस्कंध–गीति ४०.] २. मत्+महि=माझी पृथ्वी. ३. सु+अल्पें=अत्यंत थोड्या. ४. जिंकिले. (अ० ६१ श्लो० २५.) ५. झाडाची साल काढतां येते, पण दगडाची साल निघत नाहीं. तर दगडाची साल काढणें हें अत्यंत दुर्घट कर्म देखील करण्यास मी समर्थ आहें, असें दुर्योधन म्हणतो. येथें 'अतिशयोक्ति' अलंकार समजावा. ६. आत्मस्तुति. (अ० ६१ श्लो० २३.) ७. हें भाषण तुमच्या समाधानार्थ राहो (असो) यापेक्षां मी ज्यास्त कांहीं सांगत नाहीं. माझ्या सामर्थ्याचा तुम्हीच विचार करा, दुसऱ्यास पुसण्याचें कारण नाहीं. ८. ज्ञानदृष्टीनें. ९. पहा. १०. कौरवांच्या सभेंत हर्षानें कर्ण म्हणतो. (अ० ६२ श्लो० १-६.) ११. जो दुर्लभवस्तुकाम (जो पुरुष अप्राप्य वस्तूची इच्छा धरतो तो पुरुष) भानें (स्मृतीनें, भानानें, बुद्धीनें) त्यजिजेतो (टाकला जातो). त्याला आपण काय करतों याचें भान राहत नाहीं, ज्याला अप्राप्य वस्तुप्राप्तीचीं इच्छा असते त्याला भान राहत नाहीं, त्याची स्मृति नष्ट होते. [मीं अप्राप्य ब्रह्मास्त्राची इच्छा धरिली यास्तव अंतकालीं माझी अस्त्रस्मृति नष्ट होईल–असा भाव.] १२. परशुरामापाशीं. १३. खोटें बोललों. १४. माझा गुरु परशुराम वदला. १५. ही शापोक्ति आहे. १६. सज्जनांमध्यें दयामृत पुष्कळ असतें, क्रोधरूप विष असत नाहीं, म्हणून त्या सज्जन गुरूनें माझें क्रोधाग्नीनें भस्म केलें नाहीं. हा भाग सुभाषितरूप समजावा. १७. परशुरामाच्या शापाचा अर्थ असा आहे, यास्तव मला जोंपर्यंत अस्त्रस्मृति आहे तोंपर्यंत मजकडे कोण वीर टवकारून पाहण्यास समर्थ आहे?

गुरुचा प्रसाद नसता [1]मज्जीवित [2]निमिषमात्र न रहातें, ।
उरलों अद्यापि म्हणुनि निश्चित माझ्या मरेल [3]नर हातें. ॥ ३०
न [4]स्वभ्यस्तास्त्राची स्मृति मजला [5]यावदायु सोडील, ।
जोडील कीर्ति द्याया मज माझें मन कधीं न [6]मोडील. ॥ ३१
द्रोणहि भीष्महि राहो, राजेहि तुम्हासमीप राहोत, ।
पार्थासि मीच वधितों, [7]मद्विक्रम [8]लोकपाळ पाहोत.' ॥ ३२
भीष्म म्हणे, 'रे कर्णा! कां स्वाश्रित [9]धार्तराष्ट्र बुडवाया ।
इच्छिसि? दुष्टा! दाटुनि [10]दृष्टिदहन [11]दंदशूक तुडवाया. ॥ ३३
[12]कृष्णाच्या दृष्टिपुढें जातांचि तुझा पडेल [13]आव रिता, ।

---

१. माझें आयुष्य. २. पळभर. ३. अर्जुन. ४. चांगल्या अभ्यासलेल्या अस्त्राची. ५. यावत् आयु=जों आयुष्य तों. ६. अस्त्रस्मृति माझें मन हताश, भग्नाश करणार नाहीं. ७. माझा पराक्रम. ८. आठ लोकपाळ हेच आठ दिक्पाल होत. यांजविषयीं पुढील कोष्टकांत सविस्तर माहिती आहे. ती पहा:—

| दिशा. | दिक्पाळ. | दिग्ग्रह. | दिग्गज. | दिग्गजस्त्रिया. |
|---|---|---|---|---|
| पूर्वा | इंद्र | सूर्य | ऐरावत | अभ्रमु |
| आग्नेयी | अग्नि | शुक्र | पुंडरीक | कपिला |
| दक्षिणा | यम | मंगळ | वामन | पिंगला |
| नैर्ऋती | राक्षस | राहु | कुमुद | अनुपमा |
| पश्चिमा | वरुण | शनि | अंजन | ताम्रकर्णी |
| वायवी | वायु | चंद्र | पुष्पदंत | शुभ्रदंती |
| उत्तरा | कुबेर | बुध | सार्वभौम | अंगना |
| ऐशानी | महादेव | गुरु | सुप्रतीक | अंजनावती |

(नामलिंगानुशासन—पृष्ठ १०.) ९. धृतराष्ट्रपुत्र. १०. दृष्टीनें जाळणारा सर्पाच्या दंशाची तीव्रता दाखविण्यासाठीं 'दृष्टिदहन' हें विशेषण योजिलें आहे. ११. सर्प. ['दर्वीकरो दीर्घपृष्ठो दंदशूको बिलेशयः' इत्यमरः; 'दंदशूकस्तु पुल्लिंगो राक्षसे च सरीसृपे.'] १२. कृष्णाच्या. (कृष्ण आणि अर्जुन यांच्या. सर्पांमध्यें कृष्णसर्प फार भयंकर म्हणून येथें पंतांनीं 'कृष्ण' हा शब्द मुद्दाम योजिला असावा.) दृष्टिपुढें जातांचि तुझा (कर्णाचा) आव (पराक्रम, अवसान) रिता पडेल (रिक्त होईल, नाश पावेल). आम्हां नावरसी जरि (जरी आम्ही तुला, हे कर्णा! आवरूं शकत नाहीं तरी) आयुष्यशेष असता (तर तो तुला) आवरिता. (हे कर्णा! तुझें आयुष्य अधिक असतें, तुला लौकर मरण येऊं नये असें तुझें प्राक्तन असतें तर तें तुला आवरून धरितें, तुला जगवितें. तुझें आयुष्य अल्प आहे, तेव्हां

आम्हां नावरसी जरि असता आयुष्यशेष आवरिता. ॥ ३४
जरि खांडवदाह श्रुत तरि तुज कां चित्त नावरे घे तें ।
विजयाचें सद्गणनीं जें ये पहिल्याचि नांव रेघेतें. ॥ ३५
या हरिच्या शक्तिपुढें त्या हरिची काय पामरा! शक्ती? ।
तेज अजितभक्तिपुढें मिरवील क्षुद्रदेवताभक्ती? ॥ ३६

---

तूं फार जगावयाचा नाहींस–असा भाव. तुझा आयुष्यशेष नाहीं तेव्हां तुला आवरिता कोणी नाहीं.) १३. धैर्य.

१. खांडववनदाहाची कथा [अर्जुनानें अग्नीला भक्षण्यासाठीं खांडववन देऊन संतुष्ट केलें हें अर्जुनपराक्रमवृत्त] जर तुला हे कर्णा! माहीत आहे तर, तुज चित्त कां नावरे? (आपलें चित्त आंवरून कां धरीत नाहींस? अर्जुनाशीं युद्ध करण्याची उमेद कशी येते?) घे (ग्रहण कर, लक्षांत ठेव.) जें विजयाचें नांव सद्गणनीं पहिल्याचि रेघेतें ये तें घे–असा अन्वय. उत्तम वीरांची गणना करितेसमयीं विजयाचें (अर्जुनाचें) नांव पहिल्याच ओळींत येतें ही गोष्ट लक्षांत ठेव. [खांडववनदाहाची कथा अशी आहेः–श्वेतकी नामक एका प्रख्यात राजानें असंख्य यज्ञ केले; शेवटीं शतसंवत्सरात्मक यज्ञ दुर्वासा ऋषीच्या आश्रयानें केला. या अनेक यज्ञांत हविर्भक्षण केल्यामुळें अग्नीला इतकें जाड्य आलें कीं, 'त्याचा प्रतिकार कसा करावा?' असें विचारण्यासाठीं त्याला ब्रह्मदेवाकडे जावें लागलें. अनेक वर्षें घृतधारा सेवन केल्यानें अग्नि निस्तेज आणि म्लान झाला. 'खांडववन भक्षण करून अग्नीनें आपलें जाड्य निरस्त करावें' असा उपाय पितामहानें सांगितला. पण हें वन इंद्ररक्षित होतें म्हणून तें अग्नीस सुप्राप्य नव्हतें. तेव्हां पितामहाच्या अनुमतानें अग्नि विप्रवेष घेऊन मनुष्यलोकीं कृष्णार्जुनांस शरण आला. त्या उभयतांनीं खांडववन भक्षणार्थ देण्याचें कबूल केलें, पण अर्जुनाशीं रथादियुद्धसाहित्याची कांहींशी उणीव असल्यामुळें अग्नीनें वरुणापासून मागून घेऊन अर्जुनाला गांडीव धनुष्य, अक्षय्य इषुधि, कपिध्वजयुक्त दिव्यरथ इत्यादि सामुग्री दिली आणि कृष्णास वज्रनाभ नामक चक्र आणि कौमोदकी नामक गदा देऊन उभयतांस संतुष्ट केलें. नंतर अग्नि तें वन भक्षण करूं लागला, आणि कृष्णार्जुन रथारूढ होऊन वनाच्या दोन्हीं बाजूंस सर्व प्राणिनाश करूं लागले. हें वर्तमान कळतांच इंद्र अग्नीचें निवारण करण्यासाठीं सकलदेवांसह आकाशांत येऊन जलवृष्टि करूं लागला, तेव्हां कृष्णार्जुनांनीं त्याचा पाडाव करून त्यास परत लाविलें. नंतर अग्नि तें वन पंधरा दिवस यथेच्छ भक्षण करून व्याधिनिर्मुक्त झाला. (आदिपर्व–अध्याय २२३–२२५; मोरोपंत–आदिपर्व–अध्याय ३७.) २. विष्णूच्या (कृष्णाच्या). मूढजनाचीं दुखें जो हरण करितो तो 'हरि.' ['हरि' या शब्दाची वामनपंडितांनीं अशी व्याख्या दिली आहेः–'हरि जडदुःख म्हणूनि कीं 'हरि' तो.' जटायुस्तुति–३६] 'हरि' या शब्दाचे अनेक अर्थ आहेत तेः–'हरिश्चंद्रार्कवाताश्वशुकभेकयमाहिषु । कपौ सिंहे हरेऽजेंऽशौ शक्रे लोकांतरे पुमान् ॥' इति मेदिनी. ३. इंद्राची. ४. हे क्षुद्रा कर्णा! ५. कृष्णभक्तीपुढें.

जिंकील देवसेना निजतेजें सिंहवाहसा सूतें, ।
शक्तिधरावरि जासी घेउनि तूं इष्टसाहसा! सूतें. ॥ ३७
तुजसह होइल भस्म व्यालमुख शैरहि धैनंजयशरांनीं, ।
न तुम्हीं पुरीं मिळविलें जें तेणें मिळविलें सुयश रांनीं. ॥ ३८
मारिन ज्यासि म्हणसि तो शर्वप्रतिमल्ल काय नर काचा? ।
तद्रक्षक तो, केला ज्या प्रभुनें भस्म कांय नरकाचा. ॥ ३९
तुजहुनि कोटिगुणाधिक वीरवधीं जे समर्थ ते ज्यातें ।
प्रभुभुज रक्षिति, त्यांच्या केंवि सहासी समर्थ तेजातें?' ॥ ४०

---

१. [हा अर्जुन] निजतेजें (आपल्या पराक्रमानें) [व] सूतें (सारथी कृष्ण याच्या द्वारें) सिंहवाहसा (महादेवासारखा) देवसेना जिंकील (देवाचें सैन्यही जिंकील, मग इतर सैन्यांची काय कथा?) [हे कर्णा!] (इष्ट आहे साहस ज्याला अशा हे साहसप्रिय कर्णा!) तूं सूतें (शिवणकामांतील जी सू तीतें) घेउनि शक्तिधरावरि जासी. (हातांत शक्ति नामक आयुध धारण करून लढाईस उभा राहिलेल्या वीराचा पाडाव करण्यासाठीं तूं हे कर्णा! सुई घेऊन जातोस यास काय म्हणावें? हा तुझा केवढा वेडेपणा आहे? [अध्याय ६२ श्लोक ९ यांत 'केशवेन' असें पद आहे तें 'सूतें' या शब्दानें या आर्येंत दर्शविलें आहे.] २. सिंहवाह, सिंहवाहन=शिव; सिंहवाहिनी=दुर्गा. ३. सर्पमुख. ४. बाणहि. [अ० ६२.] ५. अर्जुनाच्या बाणांनीं. ६. शहरांत. ७. अर्जुनानें अरण्यांत महादेवास जिंकून पाशुपतास्त्र मिळविलें—या वनपर्वातील कथेचा येथें संदर्भ आहे. [मोरोपंत—वनपर्व—अध्याय ३.] ८. महादेवासारिखा मल्ल, महादेवाचा प्रतिस्पर्धी योद्धा. ९. ज्या प्रभुनें नरकासुराचा काय भस्म केला तो (प्रभु) तद्रक्षक (त्या अर्जुनाचा पालक) [होय]—असा अन्वय. १०. देह. ११. नरकासुराचा. हा भूमीचा पुत्र होता म्हणून याला 'भौमासुर' असें म्हणत. हा प्राग्ज्योतिषपुरीचा राजा होता. त्याच्या आईनें विष्णूस प्रसन्न करून त्याजपासून आपल्या मुलासाठीं वैष्णवास्त्र मागून घेतलें होतें. त्यामुळें भौमासुर अत्यंत बलिष्ठ होऊन गेला. तो देवांस पीडा देऊं लागला. त्यानें इंद्राची अपार दौलत व अदितीचीं कुंडलें हरण केलीं. ह्या त्याच्या अनिवार्य त्रासामुळें इंद्रादि सर्व देव श्रीकृष्ण सत्यभामेच्या मंदिरांत असतां त्यास शरण जाते झाले. कृष्णानें सत्यभामेसह त्याचेवर स्वारी करून त्याचा वध केला. भौमासुराचा पुत्र भगदत्त कृष्णाला शरण गेला, आणि त्यानें अदितीचीं कुंडलें व इंद्रादिकांची संपत्ति परत केली, म्हणून कृष्णानें त्यास त्याचे बापाचें राज्य दिलें. भौमासुरानें बंदींत ठेवल्या सोळा हजार राजकन्यांस कृष्णानें मुक्त केलें व त्यांनीं आपण होऊन कृष्णास वरिल्यामुळें त्यानें त्यांस द्वारकेस आणून त्यांचें पाणिग्रहण केलें—अशी कथा आहे. भौमासुराचा हंता वासुदेव अर्जुनाचें रक्षण करतो—असा भाव. १२. ते प्रभुभुज. १३. प्रभुभुजांच्या प्रबळ तेजातें कसें सहन करशील?

कर्ण[1] म्हणे, 'मज आहे विदित बहुसमर्थ यदुप[2] हा साचा, ।
महिमा वर्ण्य[3], परि बहु प्रेमा भीष्मासि मदुपहासाचा[4]. ॥ ४१
उपहासाचें फळ मी दाखवितों रोकडेंचि अन्यास[5], ।
वृद्ध[6] अलंघ्य असे हा, तों[7] म्यां केलाचि शस्त्रसंन्यास[8]. ॥ ४२
त्यजिली सभाहि[9] आजिहि[10], जेव्हां होसील काय शांत, नवा ।
समरचमत्कार जनां दाविन मी वीरराय शांतनवा[11]!' ॥ ४३
ऐसें वदोनि मानी तेजस्वी कर्ण जाय गेहाला, ।
बुध म्हणति मनीं, 'कुमते! अधिका तुजहूनि काय गे! हाला[12]?' ॥ ४४
स्मित करुनि सभेंत नदीतनय म्हणे, 'रे! सुयोधना! सत्य ।
रिपुगदनाशार्थ[13] बरे मेळविले हे सुयोध[14] नासत्य[15]. ॥ ४५
हा सूतात्मज[16] आधीं वदला कीं, मी करीन अर्यंत[17], ।

---

१. अध्याय ६३ श्लोक १२-१३ पहा. २. यदुपति, वृष्णिपति. ३. वर्णनीय. ४. मत्+उपहासाचा. माझी हंसून अवहेलना करण्याचा. ५. भीष्माहून इतराला. ६. हा भीष्म वयोवृद्ध (म्हातारा) आहे, तेव्हां याचें उल्लंघन करणें उचित नाहीं. जे वृद्ध आहेत ते मान्य आणि पूज्य होत यास्तव त्यांची अमर्यादा करणें योग्य नाहीं. ७. भीष्म पितामह जोंपर्यंत आहे तोंपर्यंत युद्धांत मी शस्त्र धरणार नाहीं–असा भाव. ८. शस्त्रत्याग. ९. ज्या सभेंत भीष्म आहे तिचा व ज्या आजींत (लढाईत) भीष्म आहे तिचा मी त्याग करतों. जेव्हां काय शांत होसील (जेव्हां हे भीष्मा! तूं मृत होशील तेव्हां) हे शांतनवा! (भीष्मा!) मी वीरराय (वीरांचा राजा) जनां (लोकांला) नवा (पूर्वीं न पाहिलेला असा) समरचमत्कार (युद्धचमत्कार) दाविन (दाखवीन.) अहो भीष्म! तुम्ही मरण पावल्यानंतर सकल भूमिपाल माझा समरप्रभाव पाहतील. १०. युद्ध. ११. हे भीष्मा! १२. मद्य. मद्याच्या त्याज्यतेविषयीं **मो**रोपंताचे वारंवार असेच उद्गार आढळतातः—(१) 'न करील कां पित्याची, दुर्गतिची माउली सुरा माती.' (२) 'न प्राशावी कोणी सद्विद्येची सुरा करी माती.' मुक्तेश्वराचेही उद्गार असेच आढळतात. [मुक्तेश्वर–सभापर्व–अध्याय १० ओंवी १००; अध्याय १४ ओंवी १०८ पहा.] १३. शत्रुरूप रोगनाशार्थ. १४. भीष्माचें हें भाषण उपरोधपर आहे. १५. अश्विनीकुमार. नासत्य=अश्विनीकुमार, आश्विनेय; वडवा (अश्विनी) रूपधारिणी सूर्यपत्नी **संज्ञा** (त्वाष्ट्री) हिला अश्वरूपधर सूर्यापासून झालेल्या दोन पुत्रांस अश्विनीकुमार असें म्हणतात. यांतील ज्येष्ठाचें नांव **नासत्य** आणि कनिष्ठाचें **दस्र.** हे देवांचे वैद्य होत, म्हणून यांस 'स्वर्वैद्य' अशी संज्ञा आहे. हे सप्तविध देवांपैकीं होत. हे दोन भाऊ असल्यामुळें यांस नासत्यौ, अश्विनौ, दस्रौ, आश्विनेयौ, वाडवेयौ असें साधारण नांव आहे. हे नकुलसहदेव यांचे जनक होत. १६. कर्ण. (अ० ६२ श्लो० १५.) १७. अरि+अंत=शत्रुनाश.

आतां म्हणतो, [1]संगर न वरीन [2]मदंतकाळपर्यंत. ॥ ४६
[3]सत्यप्रतिज्ञ लोकीं हाचि, नसे यासमान [4]राजन्य, ।
सांगा घडेल कैसें यासीं [5]नारायणा [6]नरा [7]जन्य, ॥ ४७
मज्जीवनक्षयावधि जे स्पष्ट उपेक्षिणार तव नाशा ।
ते मित्र[8] काय? त्यांच्या वचनें धरितोसि काय [9]अवनाशा? ॥ ४८
करुनि श्री[10]गुरुवंचन सर्व बुडविलें स्वपुण्यतप [11]यानें, ।
ऐसें नसतें, तरि कां याला घडतीं रणांत [12]अपयानें?' ॥ ४९
'[13]गांधार म्हणे, '[14]तज्जय कां त्यां आहेत काय बा! सिंगें? ।

---

१. युद्ध. २. मज्जीवनपर्यंत. ३. सत्यसंध. [संधा=प्रतिज्ञा.] पूर्वीं मी सर्वांचा संहार करीन असें म्हणून आतां भीष्म जीवंत आहे तोंपर्यंत शस्त्र धरणार नाहीं असें म्हणणारा खरोखरच सत्यप्रतिज्ञ होय असें उपहासपूर्वक भीष्म म्हणतो. ४. क्षत्रिय. ५. नारायण या नांवाच्या उत्पत्तीविषयीं पुढील श्लोक अवलोकनीय आहेत:—'नराज्जातानि तत्त्वानि नराणीति विदुर्बुधाः । तस्य तान्ययनं पूर्वं तेन नारायणः स्मृतः ॥ १ ॥ आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः । अयनं तस्य ताः पूर्वं तेन नारायणः स्मृतः ॥ २ ॥' अर्थ— पंडित लोक नारापासून उत्पन्न झालेल्या तत्वांना 'नर' असें समजतात. तीं नारें (तत्वें) पूर्वीं परमेश्वराचीं अयनें (आश्रमस्थानें) झालीं होतीं म्हणून त्याला 'नारायण' असें नांव पडलें ॥ १ ॥ उदक नरापासून (परमात्म्यापासून) उत्पन्न झालें म्हणून त्याला 'नार' असें म्हणतात. तें 'नार' (उदक) पूर्वीं ईश्वराचें अयन (वसतिस्थान) होतें म्हणून परमेश्वराला 'नारायण' असें नांव पडलें ॥ २ ॥ [मनुस्मृति १।१०] नारायण=नराणां समूहो नारम् । तदयनं यस्य । 'अथ नारायणो विष्णुरूर्ध्वकर्मा नरायणः' इति शब्दार्णवः. ६. अर्जुनाला. ७. जन्य=युद्ध. ['जन्यं निर्वादयुद्धयोः' इति धणिः; 'जन्यं हट्टे परीवादे संग्रामे च नपुंसकम्' इति विश्वः.] ८. अध्याय ६२ श्लोक १५ टीका पहा. ९. अवन+आशा=संरक्षणाची आशा. १०. परशुरामाशीं प्रतारणा. ११. या अधमपुरुष वैकर्तन कर्णानें मी ब्राह्मण आहें असें गुरूला सांगून फसविलें म्हणून याचें तप व पुण्य (धर्म) नष्ट झालें. [अ० ६२ श्लो० १७.] १२. पलायनें. कर्ण रणांतून पळून गेला असें वर्णन विराटपर्वांत आलें आहे. [मोरोपंत–विराटपर्व–अध्याय ४ गीति ९३-९७, काव्यसंग्रहग्रंथमाला–पृष्ठ ९९-१००.] १३. दुर्योधन. गांधार म्हणजे गांधारीबंधु (शकुनि) असाही अर्थ होतो, पण तो येथें इष्ट नाहीं. [अ० ६३.] १४. तज्जय कां? (त्या पांडवांचाच जय व्हावयाचा असें कां? हे पितामह! पांडव व आम्हीं समजातीय, समपराक्रम, समकौशल आणि समवयस्क असून पांडवांचाच जय होईल असें तुम्ही मानितां याचें कारण काय?) [अ० ६३ श्लोक १४.] बा! (हे पितामह!) त्या (पांडवांला) सिंगें आहेत काय? (त्यांना आमच्यापेक्षां ज्यास्त काय आहे? कीर्तिवर (सुयशाचे पति) म्हणुनि (ते पांडव कीर्तिचे पति, त्या पांडवांची कीर्ति ही वधू असें निश्चित करून) त्यासिं (त्या पांडवांला) विधिनें (ब्रह्मदेवानें, विधात्यानें)

कीर्तिवर म्हणुनि विधिनें बांधियलीं त्यांसि काय बासिंगें? ॥ ९०
न तुझा, न द्रोणाचा, न कृपनृपांचाहि[1] भरंवसा धरिला, ।
दुःशासनकर्णबळें स्वबळें म्यां युद्धयज्ञ आदरिला. ॥ ९१
मारूनि पांडवांतें यज्ञ[2] करीन, द्विजांसि तर्पीन, ।
मणि कांचन हय रथ गज गृह गो ग्राम प्रकाम[3] अर्पीन[4].' ॥ ९२
विदुर म्हणे[5], 'दम[6] तारक सुज्ञांसि[7] गमे, खलांसि न दम हित, ।
दमसम अमृताचाही होईल न सज्जनासि नद[8] महित. ॥ ९३
जो सोडिला दमें तो पावेल ध्रुवपदा[9] न वेदांतें, ।
विजयसुखोत्कर्ष[10] बरे अनुभविले बहु सदा नवे दांतें[11]. ॥ ९४
पाश[12] पसरिता झाला गहनांत[13] धरावयासि खग नीच[14] ।
दोघे पत्री[15] पाशीं गुंतुनि भरले उडोनि गगनींच[16]. ॥ ९५

---

बासिंगें (विवाहकार्यसूचक मंगलचिन्हें) बांधियलीं काय? पांडवांचाच जय व्हावा असें नाहीं, व विधात्यानें त्यांनाच कीर्तीनें वरावें असाही त्यांच्यांशीं करार केला नाहीं, तेव्हां आम्हासही जय आणि कीर्ति यांचा लाभ होईल—असा सुयोधनाच्या भाषणाचा हृद्गताभिप्राय होय.

१. कृपाचार्यांचा आणि बाल्हिकादिक राजांचा. [अ० ६३ श्लो० ४-५.] २. अनेक भूरिदक्षिण यज्ञ. ३. पुष्कळ, विपुल. ४. देईन. [अ० ६३ श्लो० ६-८.] ५. अध्याय ६३ श्लो० १०-२४ पहा. अदांत पुरुष स्वकुलक्षय करतो असें दाखविण्यासाठीं विदुर दमाची प्रशंसा करीत आहे. ६. बाह्येंद्रियनिग्रह. ७. वृद्ध आणि निश्चितदर्शी पुरुषांला दम (इंद्रियनिग्रह) हा गुण तारक (कल्याणप्रद) गमे (वाटतो) [परंतु] खलांस (दुष्ट पुरुषांला—दुर्योधनासारख्या दुर्जनांला) दम हित (कल्याणप्रद) न (वाटत नाहीं). [जो ब्रह्मजिज्ञासु आहे त्याचा दम हा मुख्य व सनातन धर्म आहे. जो दांत असून दानादिक करतो तो दानफल, क्षमा, सिद्धि मिळवितो. दमानें तेजोवृद्धि होते. दमानें पुरुषाला ब्रह्मपद मिळतें. क्षमा, धृति, अहिंसा, समता, सत्य, आर्जव, इंद्रियाभिजय, धैर्य, मार्दव, ऱ्ही, अचापल (स्थैर्य), अकार्पण्य, असंरंभ, संतोष, श्रद्धधानता हे गुण ज्या पुरुषापाशीं वास करतात त्याला 'दांत' म्हणतात.] ८. पूज्य. ९. ब्रह्मपदाला. [अ० ६३ श्लो० ११.] १०. विजय+सुख+उत्कर्ष=जय+सौख्य=अभ्युदय. ११. इंद्रियदमन करणारानें, शमपरायणानें. १२. उभयतांचा कलह हा उभयतांस नाशकारक होय याविषयीं विदुर एक गोष्ट धृतराष्ट्राला सांगतो. [अ० ६४.] १३. वनांत. १४. क्षुद्र. (पारधी, व्याध, शकुनि.) १५. पक्षी. या कथांचा उल्लेख पुढील उताऱ्यांत आहे:—'पंचतंत्रादि गद्य ग्रंथांत ज्या प्रकारच्या पशुपक्ष्यांच्या गोष्टी गद्यरूपानें लिहिलेल्या आढळतात त्या प्रकारच्या कांहीं गोष्टीही [महाभारतांत] पद्यरूपानें लिहिल्या आहेत. उदाहरणार्थ, उद्योगपर्वाच्या ६४ व्या अध्यायांत

मग [१]गगनग खग देखत धांवे जो व्याध त्यास पाहोनी, ।
[२]कोणी तापस पावुनि आश्चर्य पुसे समीप [३]बाहोनी. ॥ ९६
व्याध म्हणे, 'मानावा मद्यत्न व्यर्थसा न हा [४]तातें, ।
[५]कलहें गळतिल गगनग खग, मग येतील कां न हातातें ?' ॥ ९७
सांपडले व्याधाला घेउनि पाशासि जे बहु पळाले, ।
ते कलह करुनि गुंतुनि खग गगनींहूनि भूवरि गळाले. ॥ ९८
[६]व्याधा खगसे, काळा सांपडति करुनि कलिप्रति [७]ज्ञाती, ।
भूमि न द्याया केली जी काय नव्हे भली प्रतिज्ञा ती ? ॥ ९९
[८]मेले [९]किरात पाहुनि मधुतेंचि, न पाहुनि [१०]प्रपातातें, ।

(श्लोक १-१०) जाळ्यांत सांपडलेले दोन पक्षी जाळ्यासह उडून गेले व ते कलह करूं लागले तेव्हां ते पारध्याला सांपडले ही गोष्ट आहे. याच पर्वाच्या १६० व्या अध्यायांत (श्लोक १५-४१) बकध्यानी मांजराची गोष्ट आहे. कर्णपर्वाच्या ४१ व्या अध्यायांत (श्लोक १०-७१) बढाईखोर कावळा व हंस यांची गोष्ट आहे. आदिपर्वाचे १४० वे अध्यायांत (श्लोक २५-४९) लबाड कोल्ह्याची गोष्ट आहे.' [ज० बा० मोडककृत 'महाभारतावरील निबंध'—पृष्ठ ३२.] १६. आकाशांत. (अ० ६४ श्लो० २-३.)

१. खेचर, गगनांत जाणारे, आकाशगामी. २. कोणी एक आश्रमस्थ मुनि. ३. बोलावून. (आकाशगामी पक्ष्यांच्या पाठीमागून तूं जमिनीवरून चालला आहेस, तर हा यत्न सफळ कसा होणार असें त्या शाकुनिकाला बोलावून पुसे.) ४. त्वां तापसानें. येथें 'तात' शब्द मान्यार्थवाचक जाणावा. ५. वादविवादानें, विग्रहानें. ६. व्याधा पक्षी जसे [सांपडले तसे] जे सजातीय लोक आपसांत कलह करतात ते कालाच्या भक्ष्यस्थानीं पडतात. [यास्तव हे दुर्योधना!] भूमि न द्याया जी काय प्रतिज्ञा केली, ती [प्रतिज्ञा] भली नव्हे. भूमि देणार नाहीं म्हणून जी तुम्ही प्रतिज्ञा केली आहे ती कल्याणकारक नव्हे. त्या प्रतिज्ञेमुळें आपसांत कलह माजून कुलक्षय होईल—असा भावार्थ. ७. स्वजातीय जन जर अर्थाविषयीं कलह करतील तर ते खगांप्रमाणें कालाच्या पाशांत सांपडून नाश पावतील. 'प्रति ज्ञाती,' 'प्रतिज्ञा ती' हें ठरींव यमक आहे. ८. गंधमादन गिरीवर पाहिलेली दुसरी एक गोष्ट विदुर धृतराष्ट्राला सांगतो. गंधमादनपर्वतावर फिरत असतां विदुराबरोबरच्या किरातांनीं एका खोल प्रदेशांत मधुमक्षिकांचें मोहोळ पाहिलें, यांतील मधाचें सामर्थ्य इतकें मोठें होतें कीं त्याच्या सेवनानें मर्त्याला अमरत्व प्राप्त होई, अचक्षु सनेत्र आणि वृद्ध तरुण होई. तें ओढून आणण्यासाठीं ते किरात खालीं गिरिगव्हरांत गेले तेव्हां सापांनीं त्यांस चावून गतायु केलें. याप्रमाणें धृतराष्ट्राच्या पुत्रांची अवस्था व्हावयाची—असा भाव. [अ० ६४ श्लो० १६-२२.] ९. भिल्ल. १०. कड्यातें. किरातांची दृष्टि मधुर मधु पाहून मोहित झाली, परंतु तो मधु हातीं येण्यास केवढ्या भयंकर कड्यावरून जाणें भाग होतें याचा विचार त्यांनीं केला नाहीं. ['प्रपातस्त्वतटो भृगुः' इत्यमरः.]

हे तेच घातली त्वां स्पष्ट [1]कुसंततिविषप्रपा [2]तातें. ॥ ६०
अंकीं [3]धर्मचि घ्यावा, न शिरीं त्वां दोष हा कुलीना! गा!।
अल्पाहि सच्चमू बहु खळां, न हरिमूर्ति धाकुली [4]नागा.' ॥ ६१
वृद्ध म्हणे, 'वत्सा! त्वां [5]गणिला अतिहित अतिस्वनाशपथ,।
[6]हा! यासि वारिता मी निष्फळ जेंवि [7]प्रतिस्वना [8]शपथ. ॥ ६२
संजय! काय [9]धनंजय [10]वदला? वद, लागला मला [11]आधी,।
होत्ये मूर्छित माझी या संतापें करूनियां आ धी.' ॥ ६३
'[12]अर्जुन कृष्णमुखातें पाहत वदला अशाचि वचना कीं,।
[13]मंदासि सांग, रडसिल आठवुनि [14]अनादृतार्यवच [15]नाकीं. ॥ ६४

---

१. कुत्सित संततिरूप विषपोई. प्रपा=पाणपोई. 'प्रपा पानीयशालिका' इत्यमरः. प्रपिबंत्यस्यामिति प्रपा. साधारणतः लोक तृषितपांथसमाधानार्थ पाणपोई घालतात आणि अनेक लोकांस जीवन देतात. पण धृतराष्ट्रानें विषप्रपा घातली असें म्हणून त्याचें मूर्खत्व आणि दौर्जन्य दाखविलें आहे. २. धृतराष्ट्रानें. ३. युधिष्ठिर राजाला. (अ० ६४ श्लो० २७.) गा कुलीना! (बा! सत्कुलोत्पन्न धृतराष्ट्रा!) त्वां हा दोष (परस्पर कलहाग्नि पेटवून कुलक्षय केल्याचा दोष) [आपुल्या] शिरीं न घ्यावा [पण] धर्मचि (युधिष्ठिर राजाला) अंकीं (मांडीवर) घ्यावा. (धर्माला उत्संगावर घेऊन त्याचें समाधान करावें) [कारण सच्चमू अल्पाहि खलां बहु (साधुसैन्य संख्येनें कमी थोडें असलें तरी दुष्टांचा पराजय करण्यास पुरे आहे). नागा (गजाला) हरिमूर्ति (सिंहाचा बच्चा) धाकुली न (लहान नव्हे, गजाला मारण्याला सिंहबालक लहान असला तरी समर्थ आहे). या पदांचा दुसरा अर्थ संभवनीय दिसतो तो असाः—नागा (कालिय सर्पाला) [पराभूत करण्यास] हरिमूर्ति (कृष्णाची बालमूर्ति) धाकुली न (लहान असमर्थ झाली नाहीं, कृष्णाची बालमूर्तिच कालियनागाला मारण्यास समर्थ झाली). ४. गजाला. ५. हे बाला दुर्योधना! जो अत्यंत कल्याणाचा मार्ग आहे तो आपल्या अत्यंत नाशाचा मार्ग होय असा तुझा समज झाला आहे. ६. हा! (हाय! हाय!) यासि (या दुर्योधनाला) वारिता (कलहापासून निवारूं पाहणारा) मी (धृतराष्ट्र) निष्फळ (व्यर्थ झालों कीं) जेंवि प्रतिस्वना शपथ (निष्फल)=प्रत्येक शब्दास शपथ घेऊन बोललें असतां त्या शपथेला जशी कांहींच किंमत नसते त्याप्रमाणें या दुर्योधनाला मी इतका उपदेश केला तो सर्व निष्फळ झाला. ७. प्रतिशब्दास. ८. शपथ—हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आहे. ९. अर्जुन (वासुदेवाच्या भाषणानंतर) काय बोलला तें सांग. [अ० ६६ श्लो० २.] १०. या अर्धातील वर्णावृत्ति फार मनोहर आहे. ११. मानसिक चिंता रोग. १२. हें संजयाचें उत्तरादाखल भाषण आहे. १३. मूर्खाला, दुर्मति दुर्योधनाला. [अ० ६६ श्लो० १०.] १४. अनादरिलेलें असें श्रेष्ठाचें वचन. ज्याचा आदर (स्वीकार) केला नाहीं असें आर्यांचें (भीष्मद्रोणविदुरादिकांचें) वचन आठवुनि (स्मरून) नाकीं (स्वर्गांत) रडशील (रोदन करशील) [असें] मंदासि सांग (मूर्ख दुर्योधनाला विदित कर.) १५. स्वर्गीं.

अन्यायें मेळविलें देतें, न करूनि वाणि[1], हानि[2] धन, ।
**ध**र्मविभाग न देतां करिलचि **गां**डीवपाणि[3] हा निर्धन[4]. ॥ ६५
प्राणघ्न पैरार्थाची[5] चित्तांत धरूनि काय हो! माया? ।
धाना[6], तरि तुमचे शरदहनीं[7] आलोंचि काय[8] होमाया'. ॥ ६६
न वदे किमपि **सु**योधन, बैसुनियां बहुतकाळ मग राजे ।
गेले उठोनि तेथुनि[9], ते सांपडणार **कां**लमगरा[10] जे. ॥ ६७
एकांतीं अंध म्हणे, 'इकडे तिकडे असे किती बळ[11] हें, ।
वद **सं**जया! तयां[12] हे किंवा ते जिंकितील यां कलहें?' ॥ ६८
**सं**जय म्हणे, 'नृपाळा! प्रायः प्रभु ते समर्थ करिशील[13], ।
नसतां **वि**दुर पितामह, परिसोनि मदुक्त[14] कोप करिशील. ॥ ६९
केवळ **द**शमुखमतिसचि न कपिवच रुचे, न सर्व **लं**केला, ।
**गां**धारीहि असावी, मग बोलेन त्यजूनि शंकेला'. ॥ ७०
आणवितां एकांतीं **गां**धारी **वि**दुर आणि **शां**तनव, ।
**व्या**स प्रगटे जैसा राकेचा[15] भव्यकाय कांत नव. ॥ ७१
**व्या**स म्हणे, 'रे! **सं**जय! सांग सुतें[16] जें विचारिलें कांहीं.' ।
बुडविति[17] वळें, भुलविले हे **का**ळें जेंवि चारिलें कांहीं.' ॥ ७२
**सं**जय म्हणे[18], 'नृपा! मज तिकडिल इकडिल किती कसें बळ[19] हें ।
पुससी, पुनः पुन्हा[20] यांकरवीं त्यां मारवावया कलहें. ॥ ७३

---

१. उणेपणा, कमीपणा. न करूनि वाणि=कमीपणा न करतां, विपुलपणानें, पुष्कळपणानें. अन्यायानें मिळविलेलें धन पुष्कळ हानि केल्यावांचून कधींही राहत नाहीं. २. हें ठरींव यमक आहे. ३. अर्जुन. गांडीव आहे पाणींत (हातांत) ज्याच्या तो अर्जुन. गांडीवपाणि हें 'व्यधिकरण बहुव्रीहि' समासाचें उदाहरण होय. चक्रपाणि, चंद्रमौलि, इत्यादि अन्य उदाहरणें. [मराठी व्याकरणावरील निबंध—पृष्ठ २२६.] ४. नाश. ५. प्राण हरण करणाऱ्या अशा परकीयाच्या धनाची माया (आशा) मनांत बाळगून काय उपयोग आहे? ६. जर पदार्थ देत नसाल तर. ७. शररूप अग्नींत. ८. देह. ९. सभेंतून उठून राजे गेले. [अ० ६७ श्लो० १.] १०. कालरूप नक्राला. ११. सैन्य. १२. त्या पांडवांला. १३. मत्त हत्तीच्या स्वभावाचे. १४. माझें भाषण. १५. पौर्णिमेचा, संपूर्णद्युतिथींचा. १६. पुत्रानें (धृतराष्ट्रानें). [अ० ६७ श्लो० १०.] १७. हे (कौरव) बळें बुडविति (मुद्दाम आपण होऊन स्वतःला बुडविणार. कालानें यांना भांग इत्यादि मादक पदार्थ चारून भुलविलें आहे असे हे झाले आहेत. १८. अ० ६८ श्लो १-१५ पहा. १९. बल=तेज, रूप. ['बलं गंधरसे रूपे स्थामनि स्थौल्यसैन्ययोः । पुमान् हलयुधो दैत्यप्रभेदे वायसेऽपि च. ॥'] २०. श्लो० ६ पहा.

तरि परिस पुन्हा कथितों वीरांनीं अर्जुनाच्युत नमावे, ।
त्यांचें ब्रह्मांडांतहि तेज [1]ब्रह्मेश्वरस्तुत न मावे. ॥ ७४
वधिले इहीं प्रतियुगीं प्रकटुनि [2]दुर्जन सदानव [3]सदवना, ।
यांसि पहाया [4]वाहति सुर करुनि शिवा सदा नवस [5]दवना. ॥ ७५
जिंकिल [6]चक्रधराला कवण? तयाचा अगाध महिमा गा! ।
कोण [7]स्वालंध्यत्वें लाजविल दुजा [8]अगाधम [9]हिमागा? ॥ ७६
प्राणापरीस परमप्रिय पांडव [10]पुंडरीकनयना त्या ।
बहु जपतो तो [11]आश्रितकल्पद्रुम [12]विश्वगीतनय [13]नात्या. ॥ ७७
कथितों तुला [14]समासें, तिकडिल बहु फार काय बोलून? ।
‘विश्वाधिक [15]कृष्ण प्रभु’ कथिले वेदें मनेंचि तोलून. ॥ ७८
[16]ह्री [17]सत्य धर्म [18]आर्जव जिकडे, तिकडेचि कृष्ण जाणावा, ।
जिकडे प्रभु तिकडे [19]जय जाय, न लागे स्तवूनि आणावा. ॥ ७९
मिष करुनि पांडवांचें [20]भस्मचि करणार या तव सुतातें, ।
[21]द्यावें शीलचि, द्यावें केवळ व्हाया न घात [22]वसु [23]तातें. ॥ ८०

---

१. विधिशंकरकीर्तित. २. नरक, शंबर, कंस, रावण, इत्यादि. ३. सत्+अवना=साधूंच्या रक्षणार्थ. ४. अर्पण करतात. ५. दवणा–सुगंधिकलताविशेष. दवणा (दमनक) हा शिवाला प्रिय आहे. बिल्वपत्र आणि तुलसीपत्र हींही शिवाला प्रिय आहेत. ६. कृष्णाला. ७. स्व+अलंध्यत्वें=आपल्या+अलंध्यपणानें. ८. अग+अधम=पर्वत+क्षुद्र=क्षुद्र पर्वत. ९. हिमाचलास. १०. कमलनेत्रा (कृष्णाला). [पुंडरीक=पांढरें कमल, सितांभोज.] ११. आपल्या भक्तांचा कल्पतरु (कृष्ण). १२. विश्वानें गीत (स्तुत) नय (नीति, आचार) ज्याचा तो. १३. आपल्या संबंधाला. आश्रितपालकत्वरूप अथवा भक्तवत्सलत्वरूप परस्पर संबंधाला. १४. संक्षेपें. १५. सर्व जगताहून कृष्ण श्रेष्ठ आहे. (अ० ६८ श्लो० ८.) १६. लज्जा, अकार्यनिवृत्ति. १७. यथार्थभाषण. १८. अकुटिलत्व, सरलत्व. १९. असेंच संजयाचें वचन गीतेच्या अखेरीस आहे. ‘यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः । तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम. ॥ ७८ ॥ [गीता–अ० १८ श्लो० ७८.] मला निश्चयेंकरून वाटतें कीं, जेथें योगेश्वर कृष्ण, आणि जेथें धनुर्धर पार्थ, तेथेंच राज्यलक्ष्मी, तेथेंच विजय, तेथेंच उत्तरोत्तर अभिवृद्धि, आणि तेथेंच न्यायनीति ही गोष्ट निश्चित आहे. (सुबोधचंद्रिका.) २०. अधर्मनिरत आणि मूढ अशा तुझ्या पुत्रांतें जाळूं इच्छितो. [अ० ६८ श्लो० ११.] २१. घात न व्हाया (घात होऊं नये म्हणून) तातें (बापानें–धृतराष्ट्रानें) [पुत्राला] केवळ वसु न द्यावें (नुसतें धन देऊन स्वताला कृतार्थ मानूं नये, तर) शीलचि द्यावें (मुलाचें अकल्याण होऊं नये म्हणून बापानें त्याला शील (सुस्वभाव) सदाचरण शिकवावें.) २२. द्रव्य. ह्या पंतोक्तीप्रमाणें वागणारे किती बाप सांपडतील? हें अर्ध उत्तम सुभाषितरूप आहे. ‘बाप’ म्हण-

परमाधर्मनिरत तव सुत केवळ हा न मान्य [1]बालिशता, ।
दशमुखशताहि, याला याचीच करील भस्म [2]बालिशता. ॥ ८१
[3]सद्रक्षण, खलमर्दन, नारायणसा न तो नर विसरला, ।
सर्वस्व तेज लोकांमाजि विखरितां सदा न रवि सरला.' ॥ ८२
भूप म्हणे, 'मी नेणें, तुज ईश्वर कृष्ण हें कैसें कळलें?[4]' ।
संजय म्हणे, 'मदीय ज्ञान [5]अविद्यामळें नसे मळलें'. ॥ ८३
राजा म्हणे, '[6]अविद्या [7]ज्ञानहि कैसें यथार्थ बोलावें? ।
त्वद्भाषणें सुरांच्या [8]गुरुनें असुरांचियाहि [9]डोलावें.' ॥ ८४
संजय म्हणे, '[10]अविद्या 'मी' 'माझें' म्हणसि हेचि, गा! राया! ।
विद्या असें न म्हणणें जें हेंचि समर्थ होय ताराया. ॥ ८५
ज्यांचें मन सच्छ्रुतिमतपथ सोडुनि दुष्पथीं कदा न रते, ।
पावति भगवंताच्या जाणुनि [11]सद्भक्तिनें पदा नर ते. ॥ ८६

---

विणाऱ्या प्रत्येकानें हें अर्ध आपल्या हृत्पटलावर कोरून ठेवण्यायोग्य आहे. अशा उल्लेखांवरून प्राचीन लोकांची सामाजिक स्थिति आणि त्यांचे नीतिविचार यांची अटकळ बरीच करतां येते. २३. हें अर्ध सुभाषितरूप आहे.

१. तव सुत (हे धृतराष्ट्रा! तुझा पुत्र दुर्योधन हा) परमाधर्मनिरत (इतका अत्यंत अधर्माच्या ठायीं आसक्त आहे कीं) केवळ शंभर वालि (याचें आचरण पाहून मान डोलवितील इतकेंच नव्हे, तर तो शंभर रावणांसही मान्य होईल). शंभर रावणांपेक्षांही याचा दुष्टपणा अधिक होय, यास्तव याला याचीच बालिशता (मूर्खता) जाळून टाकील. २. मूर्खता. ३. साधुसंरक्षण आणि दुष्टशासन हें कार्य तो नर (तो अर्जुन) नारायणसा (नारायणाप्रमाणेंच, नारायण जसा विसरला नाहीं तसा) विसरला नाहीं. [साधूंच्या रक्षणासाठीं आणि दुष्टांच्या संहरणासाठीं मी युगीं युगीं जन्म घेतों—इत्यादि भगवद्वचनावरून नारायण प्रत्येक युगांत आपलें काम करण्यास जसा सिद्ध असतो तसा अर्जुनही आहे असें सूचविलें. गीता—अ० ४ श्लो० ८.] ४. कोणत्या साधनांनीं कृष्ण तुला ओळखितां आला? असा प्रश्न धृतराष्ट्र करतो. ५. अविद्येच्या मळानें माझें ज्ञान मळलें नाहीं, मला विद्या प्राप्त आहे म्हणून कृष्ण कळला, तुला विद्या नाहीं म्हणून तो तुला कळत नाहीं. [अ० ६९ श्लो० २.] ६. अज्ञान. ७. अज्ञानाचें आणि ज्ञानाचें खरें स्वरूप कसें जाणावें? ८. बृहस्पतीनें आणि शुक्राचार्यानें. ९. डोलणें—हें अनुमोदन, पसंतीस पडणें, मर्जीस उतरणें या अर्थाचें द्योतक आहे. १०. माया, पुत्रकलत्रादिरूपानें परिणत झालेली जी ती अविद्या. हा मुलगा माझा, ही बायको माझी, हें माझें, हें तुझें, असें म्हणणें ही अविद्या होय. ११. अध्याय ६९ श्लो० ५ पहा.

[1]माझी विद्या वाढे, त्वद्विद्या निंद्य गारसी विवरे, ।
दीप्तालयसम दुर्जनसंगांतुनि झडझडोनि बा! निघ रे!' ॥ ८७
अंध म्हणे, 'रे! पुत्रा! त्यजुनि दुराग्रह, [2]यदूद्वहा नम, रे! ।
[3]अमरेश मरे ईशा न विनत, जो विनत [4]मर्त्यही न मरे. ॥ ८८
जा शरण ईश्वरा श्रीकृष्णा बा! लोभ हट पुरे, [5]शम रे! ।
करुनि असाचि दुराग्रह [6]अमरमहित [7]कनकमयपुरेश मरे. ॥ ८९
जें त्या श्रीकृष्णाचें चरित मनीं आपल्या पहा रे! तें ।
[8]अशुचिस्पृष्टा [9]सच्छ्री म्हणवि भली तापल्या [10]पहारेतें.' ॥ ९०
[11]भूप म्हणे, 'त्या कृष्णा शरण मरणभय धरोन [12]जाईन ।

---

१. माझी विद्या वाढे (हें माझें असें न म्हणणें ही माझी विद्या दिवसेंदिवस दृढ होत चालली आहे, ही विद्या माझ्या अंतःकरणांत ज्यास्त ज्यास्त ठसत आहे). त्वद्विद्या (तुझी विद्या, तुझी धृतराष्ट्राची विद्या, परांच्या उपदेशानें प्राप्त झालेली विद्या) निंद्य गारसी (ज्या गारेंत घट्टपणा, दार्ढ्य नाहीं तिच्या सारखी, जींत दगडाचे गुणधर्म नाहींत त्या गारेसारखी) विघरे वितळत आहे, विरळ होत आहे असें होण्यास कारण दुर्जनसमागम होय. बा! (धृतराष्ट्रा!) दीप्तालयसम (पेटलेल्या घरासारखा) [जो] दुर्जनसंग (दुष्टसमागम) त्यांतून झडझडोनि (निश्चयपूर्वक, धीटपणें) निघ रे (अरे बाहेर पड.) २. यदु+उद्वह=यदु+पुत्र=कृष्णाला (शरण जा). ३. ईशा अमरेश (जर) विनत न [तर] मरे=इंद्र ईश्वराला शरण जाणार नाहीं तर त्याचाही नाश होईल. जो मर्त्य [ईशा] विनत [तो] ही न मरे=पण जो मनुष्य ईश्वराला शरण जातो तो नाश पावत नाहीं. [अ० ६९ श्लो० ६.] ४. मृत्युलोकवासी. ५. शांत हो, शांति धर, संधि कर, विग्रह करूं नको. ६. अमर+महित=देव+पूजित=देवांनीं स्तुत. ७. रावण. [कनकमय+पुर+ईश=सुवर्णमय+नगर+प्रभु=लंकापति. येथें पर्यायानें रावणाचें वर्णन केलें आहे म्हणून हा 'पर्यायोक्त' अलंकार होय.] ८. अपवित्रानें स्पर्शिलेली. ९. सच्छ्री (सत्+श्री=साधूची श्री—लक्ष्मी) अशुचिस्पृष्टा (अशुचि+स्पृष्टा=अपवित्र मनुष्यानें+स्पर्श केलेली, हरण केलेली) साधूची संपत्ति जर अपवित्र दुष्ट मनुष्यानें हरण केली तर ती इतकी उग्र, तीव्र आणि चंड होते कीं ती तापलेल्या पहारेतें भली (बरी) म्हणवि (म्हणविते), तापलेल्या लोखंडाच्या पहारेपेक्षांही साधूची संपत्ति अपहार करणाऱ्या दुष्टाला अधिक दाहक वाटेल. साधुधनापहारानें अपवित्र झालेल्या माणसास त्या धनापासून तापलेल्या लोहाच्या पहारेपेक्षां ज्यास्त ताप होईल. अशा लक्ष्मीपुढें तापलेली पहार बरी. १०. जमीन खोदण्याकरितां लोखंडाची करितात तीतें. ११. दुर्योधन म्हणतोः—मरणभय धरोन त्या कृष्णा (सुप्रसिद्ध वासुदेवाला) [मी] शरण जाईन [काय?] अर्थात् जाणार नाहीं. [कलह करून] सुयशें तरोनि जाईन (युद्धांत यश मिळवून मी तरून जाईन); कीं (किंवा, कलहांत सुयश न मिळाल्यास) मरोन

सुयशें तरोनि जाइन, कीं स्वर्गाप्रति मरोन जाईन.' ॥ ९१
त्या ईश्वरासि जावें शरण अनेकत्र सदय हित सम जो, ।
कृष्ण महेश, परि नवा, हें सत्य तुम्हां पित्यासहित समजो. ॥ ९२
ईश्वर तरि कां तिर्सेन्या त्या पांडुसुतासि मात्र काखेला ।
व्राहे, पाहे हेमासह तोलाया बळेंचि लाखेला.' ॥ ९३
अंध म्हणे, 'गांधारि! त्वत्सुत जातो बळेंचि नरकास, ।
नरकासह्यबळ यदुप, घाली हा तज्जयार्थ नर कास.' ॥ ९४

---

स्वर्गाप्रति जाईन. [अ० ६९ श्लो० ७.] १२. उत्तरार्धांतील आणि पूर्वार्धांतील यमक साधलेलीं अक्षरें समानार्थक नसायाचीं असा एक पंतांचा साधारण नियम आहे. ह्या नियमास हें स्थल अपवादक नसल्यास 'जाई न' असा पदच्छेद करून निर्वाह केला पाहिजे.

१. 'दुर्योधन म्हणे ताता । म्यां पाचारिलें तया देवकीसुता । तेणें वर दीधला पार्था । अर्जुनसारथी तो झाला. ॥ १ ॥ जरि तो येता मजप्रती । त्यासि मी देतों बहु संपत्ती । दैवहीन तो श्रीपती । शरण निश्चितीं मी न वचें. ॥ २ ॥ मी सामर्थ्यें मारीन त्यातें । अथवा तो मारू मज कोणाही हातें । परि त्या गोवळ्या कृष्णातें । शरण ताता मी न वचें. ॥ ३ ॥' [सुभानंतस्वामीकृत उद्योगपर्व–अ० २८ ओव्या १६१-१६३.] २. त्या ईश्वरासि शरण जावें जो (ईश्वर) अनेकत्र सदय हित आणि सम (होय)=जो ईश्वर सर्वांवर दया करणारा, सर्वांचें हित करणारा आणि सर्वांस समान होय त्याला शरण जाणें उचित. [कृष्ण हा असा ईश्वर नाहीं असें या भाषणानें सुचविलें, कारण कृष्णानें अर्जुनसारथ्य पत्करिलें हें दुर्योधनाच्या मनांत सलत होतें.] कृष्ण महेश (परमेश्वर) [आहे असें अहो तात! तुम्ही म्हणतां आणि तुम्हांस पसंत असेल तर या पुढेंही म्हणा] परि (पण, परंतु) नवा (जुना नव्हे–या शब्दानें तो पूर्वीचा ईश्वर तो हा नव्हे असें उपहासपूर्वक दर्शविलें आहे) हें (सत्य=खरी गोष्ट) पित्यासहित तुम्हां (सर्व श्रोत्यांना) समजो (कळो), आजपर्यंत जें तत्व तुम्हांस कळलें नाहीं तें आतां तरी माझ्या या भाषणानें कळो. हा कृष्ण पुराण परमेश्वर नव्हे, तर हा नूतन असून गोपपुत्र आहे ही गोष्ट तुम्हास आतां तरी विदित होवो. ३. हा कृष्ण जर खरोखर ईश्वर होय–असें गृहीत केलें तर. ४. अर्जुनाला. ५. हें अत्यंत मौर्ख्य होय असें सुचविलें आहे. ६. हा दाखला मूळग्रंथांत नाहीं, हा पंतांच्या पदरचा आहे. ७. नरकासुराला सहन करण्यास अशक्य ज्याचें बल (असा यदुप). नरकासुर हा भूमीचा पुत्र होता म्हणून याला 'भौमासुर' असें म्हणत. हा प्राग्ज्योतिषपुरीचा राजा होता. त्याच्या आईनें विष्णूस प्रसन्न करून त्याजपासून आपल्या मुलासाठीं वैष्णवास्त्र मागून घेतलें होतें. त्यामुळें भौमासुर अत्यंत बलिष्ठ होऊन गेला. तो देवांस पीडा देऊं लागला. त्यानें इंद्राची अपार दौलत व अदितीचीं कुंडलें हरण केलीं. ह्या त्याच्या अनिवार्य त्रासामुळें इंद्रादि सर्व देव श्रीकृष्ण सत्यभामेच्या मंदिरांत असतां त्यास शरण जाते झाले. कृष्णानें सत्यभामेसह त्याचेवर

अंध मनिं म्हणे, 'अंधा! [1]सुखलीला दाविल्या पहा रेतें, ।
न कुसंततितें द्यावें आलिंगन; ताविल्या [2]पहारेतें.' ॥ ९५
[3]देवी म्हणे, 'मजकडे कारुण्य करूनि [4]गाढ बा! [5]हेरें, ।
[6]शोकांधकूपपतितां आम्हां अंधांसि काढ बाहेर. ॥ ९६
जा शरण ईश्वराला, दे ज्याचें त्यासि राज्य, [7]जोड कर; ।
जोड कर सुकीर्तीची, तूंचि कसा **कुरु**कुलांत खोडकर? ॥ ९७
तूं काय? **भीम** मोडिल [8]अमरवराचीहि तट्टकर [9]मान, ।
या अनया भरणार [10]स्वांसुधनें [11]काळभट्टकर [12]मान. ॥ ९८
[13]प्रभुनमनें सुखशोभा, होतां [14]अंगाष्टकांत आठवण, ।
**भीम** वधिल तैं करिसिल मद्वचनाची मनांत आठवण.' ॥ ९९
**व्यास** म्हणे, '**धृ**तराष्ट्रा! [15]ज्ञानें या [16]संसृतीसि तरशील, ।
[17]वरशील साधुसंगें जोडावें; त्यजुनियां इतर शील. ॥ १००

---

स्वारी करून त्याचा वध केला. भौमासुराचा पुत्र भगदत्त कृष्णाला शरण गेला, आणि त्यानें अदितीचीं कुंडलें व इंद्रादिकांची संपत्ति परत केली, म्हणून कृष्णानें त्यास त्याचे बापाचें राज्य दिलें. भौमासुरानें बंदींत ठेवलेल्या सोळा हजार राजकन्यांस कृष्णानें मुक्त केलें व त्यांनीं आपण होऊन कृष्णास वरिल्यामुळें त्यानें त्यांस द्वारकेस आणून त्यांचें पाणिग्रहण केलें–अशी कथा आहे. ८. हा दुर्योधन. ९. कास घालणें=तयारी करणें, सिद्ध होणें.

१. धृतराष्ट्र आपणापाशींच बोलतोः–हे अंधा! धृतराष्ट्रा! तुझ्या रेतें (पुत्रोत्पत्तिजनक वीर्यें) सुखलीला दाविल्या, पहा=सुखाच्या गोष्टी अनुभवास आणिल्या, पहा. हें भाषण पश्चात्तापजनित आहे. आलिंगन कुसंततितें न द्यावें, [पण] ताविल्या पहारेतें [आलिंगन द्यावें]. कुपुत्राला आलिंगन देण्यापेक्षां तापलेल्या पहारेला आलिंगन देणें अधिक सुखप्रद होय. ३. गांधारी दुर्योधनाला म्हणते. ४. अत्यंत, विपुल, सांद्र. ५. पहा. ६. शोकरूप अंधारकूपामध्यें पडलेल्यांस. ७. नमस्कार घाल, हात, जोड. ८. देवश्रेष्ठाचीहि. ९. मान मोडणें=मान वांकवणें, जेरीस आणणें, जमीनदोस्त करणें, मारून चुना करणें, पराजित करणें. १०. स्व+असु+धनें=आपल्या प्राणधनानें. ११. काळरूप ब्राह्मणहस्त. १२. समज. १३. कृष्णाला नमन केल्यानें आठ भागांत आठवण (घट्टे) होतां (झाले असतां) ते सुखशोभा देतात. १४. अष्टांगांत, आठ अंगांनीं युक्त अशा. अष्टांग नमस्काराचें लक्षण दिलें आहे तें असें:– 'जानुभ्यां च तथा पद्भ्यां पाणिभ्यामुरसा धिया । शिरसा वचसा दृष्ट्या प्रणामोऽष्टांग ईरितः ॥.' १५. अ० ६९ श्लो० १०. केशवाचें ज्ञान जें तुला संजयापासून प्राप्त होईल त्या ज्ञानानें तूं यमभयापासून मुक्त होशील. १६. संसारास. १७. सुस्वभाव.

संजय हित कथिल तुला, [1]बहुमत याहुनि न अर्थ दुसरा, [2]या, ।
[3]सुसरा [4]याद तसा तूं पाव ब्रह्मा, उपाय पुस, राया!' ॥ १०१
भूप म्हणे, 'संजय! वद हित, मज हें दुःख बा! पहावेना, ।
पुत्र नव्हे, 'दुर्योधन रिपु, जोडा होय पाप हा [5]वेनो,' ॥ १०२
जाणोनि [6]हृषीकेशा जेणें पावेन मुक्तिसि, [7]कवीना! ।
तें सांग; कोण सज्जन पुसतां हितहेतुयुक्ति सिकवीना?' ॥ १०३
संजय म्हणे, 'न जाणे [8]अजितेंद्रिय सर्वथा हृषीकेशा, ।
केंवि पिकेल [9]ढेका जी लेशहि लागों न दे [10]कृषी केशा? ॥ १०४
भेदें न हो कुरुक्षय म्हणुनि [11]सदय [12]देवदेव येणार, ।
घेणार जो खलाचें [13]सर्वस्व प्रभु भल्यास देणार.' ॥ १०५
अंध म्हणे, 'कृष्ण प्रभु आपण येणार काय गा! इकडे? ।
योग्यचि त्या, हो! वत्सप्रेमें लंघिति न काय [14]गाइ कडे? ॥ १०६
ते धन्य भाग्यवंत प्रभुला अवलोकितात डोळस जे, ।

---

१. दुसरा अर्थ (अधिक) बहुमत नाहीं. जें संजय सांगेल तेंच अत्यंत मान्य आहे. संजय जो ज्ञानमार्ग सांगेल तोच बहुमत होय. २. या सुसरा (या संजयरूप चांगल्या सरोवराला) तूं याद तसा (तूं जलचर प्राण्यासारखा). सरोवरांत याद जसे जीवन धरतात तसें या संजयांत तुझें जीवन (मोक्षमार्गज्ञान) आहे. यास्तव हे राया! धृतराष्ट्रा! (संजयाला) उपाय पुस (विचार आणि) ब्रह्मा (ब्रह्मपदाला) पाव (परमपद जोड). ३. उत्तम सरोवरास. ४. जळजंतु. ५. वेनराजाला. वेन=हा चक्षुर्मनूचा प्रपौत्र (निपणतू) आणि अंगराजाचा पुत्र. हा अत्यंत दुष्ट राजा होता. याच्या दुष्टाचरणामूळें याचें नांव सुप्रख्यात झालें. ऋषीनीं याला शापदग्ध केलें. पृथु राजा हा वेनराजाचा पुत्र होय. ६. कृष्णाला. ७. हे कविराज. [कवि+ईना!=पंडित+स्वामिन्!] ८. अकृतात्मा, अजितमनस्क, ज्यानें आपल्या इंद्रियांचें दमन केलें नाहीं असा पुरुष (हृषीकेशा—इंद्रियप्रभु जो कृष्ण त्याला) न जाणे (कधींही जाणत नाहीं.) [अ० ६९ श्लोक २१.] ९. धक्का, इजा. जी कृषी (जी शेतजमीन) लेशहि ढका केशा न लागों दे, (आपल्याला नांगराचा फाळ लागून आपल्या केशाला यत्किंचितही धक्का लागूं देत नाहीं) ती केंवि पिकेल? (त्या जमिनींत पीक कसें येईल? कधीं यावयाचें नाहीं). केशा=केंसास, लवेला, आंगाला. १०. शेत. ११. अ० ७० श्लो० १५ पहा. १२. कृष्ण. १३. सर्व+स्व=सगळें+धन=सकल धन. १४. हा अर्धांश सुभाषितरूप आहे. वांसरांच्या प्रेमानें गाई कड्यांवरून उड्या मारून जात नाहींत काय? अर्थात् जातात, तसा कृष्ण पांडवरूप वत्सांच्या प्रेमानें प्रवासदुःख सोसून इकडे येत आहे—असा भाव.

मी तेंवि [1]उशीरासह ध्याया बहुमान जेंवि मोले [2] सजे. ॥ १०७
[3]जरि मी केवळ अंध, न गंध नयाचा असे [4]मदाचरणीं, ।
करिल [5]भवबीजरंधन, बंधनहर गुण वसे सदा चरणीं. ॥ १०८
प्रभु लो[6]कसंग्रहार्थ **द्रो**णा **भी**ष्मा मलाहि वंदील, ।
[7]वंदी लक्ष निगम ज्या यत्पदरज **शं**भुचेंहि [8]मंदील. ॥ १०९
निववील सत्य प्रियहितवचनें स्पर्शे मला ससभ्यास, ।
त्या विश्वपालका बहु आहे सद्रीतिचाचि अभ्यास. ॥ ११०
मी त्या जगद्गुरुप्रति गेलों [10]शरण स्मरोनि महिमा, गा! ।
म्हणतों राजेच्छा तरि, सुत हो! त्याचि प्रभूसि महि मागा.' ॥ १११

---

## अध्याय सहावा.

**धर्म** म्हणे, '**श्रीकृ**ष्णा! बुडतों मी सत्य जाण [11]तीर मला, ।
[12]भव बुडवी म्हणुनिच तव भजनीं [13]**स**नकादि जाणता रमला. ॥ १
बुडतें [14]**कु**रुकुळ **भीमा**र्जुनकोपें, त्यांचि वांचवावें हो! ।
[15]गांवें पांच बहु, नको स्थळ पांचा काय पांच वांवें हो? ॥ २

---

१. वाळ्याबरोबर. २. मोळ=एका जातीचें गवत. हें वाळ्यासारखें असतें व वाळ्याचे जागीं वाढतें. वाळा (उशीर) सुगंधामुळें मानपात्र आहे, पण मोळाला वास नसतो म्हणून त्याला मानार्हता नाहीं. डोळस मनुष्य=वाळा, अंध मनुष्य=मोळ. वाळ्याबरोबर मान घेण्यास मोळ जसा सजतो तसा डोळसांबरोबर मानपत्र जें कृष्णदर्शन तें घेण्यास मी अंध सजतों. ३. यद्यपि मी जरी आंधळा आहें आणि माझ्या आचरणांत नयाचा गंध (नीतीचा लेशही) नाहीं, (तरी) चरणीं (प्रभुपदीं) बंधनहर गुण सदा वसे (भवपाशहरण करण्याचा गुण सदा राहतो) (म्हणून तो प्रभू) भवबीजरंधन करिल. ४. माझ्या आचरणीं. ५. संसारबीजदहन. ६. लोकांस उत्तम मार्ग लागावा म्हणून. ७. ज्या (ज्या प्रभूचे) लक्ष निगम (अनंत वेद) बंदी (स्तुतिपाठक, भाट) आहेत, यत्पदरज (ज्या प्रभूच्या चरणाची धूळ) महादेवाचें मस्तक शोभविणारें मंदील होय. या गीतींत दोन अर्धांस जोडणारें 'दामयमक' आहे. ८. वेद. ९. 'वंदील–मंदील' हें पंताचें ठरींव यमक आहे. १०. अ० ७१ श्लोक ७ पहा. येथें 'यानसंधिपर्व' समाप्त होऊन 'भगवद्यानपर्वा'स आरंभ होतो. ११. अ० ७२ श्लो० २-४ पहा. १२. संसार. १३. सनक आहे आदि (प्रथम) ज्यांत असा जाणता (सुज्ञ साधुजन). १४. कुरुराजाचें सकल कुल, कुरुवंशांतील सर्व सजातीय जन. १५. युद्धाचे पूर्वी शेवटचा निरोप घेऊन श्रीकृष्ण दुर्योधनाकडे गेले आणि पांडवांकरितां पांच गांव मागून म्हणाले कीं, 'इतकें दिलें तरी पांडवांची समजूत पडेल!' ते पांच गांव हे होतेः—"इंद्रप्रस्थं यम-

भुलला पुत्रप्रेमें, येथें नाहींच संशय, शमाया ।
कथितो बा ! दाखवितो, बुडवाया सर्व वंश यश, माया. ॥ ३
जेणें न बुडे कुरुकुळ, धर्म, यश, न्याय, त्याचि सदुपाया ।
सांग, सख्या ! भ्रमला हा जन, केवळ तूंचि आप्त यदुपा ! या.' ॥ ४
श्रीकृष्ण म्हणे, 'देवा ! जातों मी त्यांकडे हित वदाया, ।
काय सुयोधन ? न शके पचवाया वृत्रहाहि तव दाया.' ॥ ५
धर्म म्हणे, 'हितहि तया अहित, अहि तसाचि तो परम खळ गा !, ।
व्यसनीं भल्यासि पाडी, दुष्टगजा जेंवि पिहितमुख खळगा.' ॥ ६
शौरि म्हणे, 'राजेंद्रा ! यद्यपि बलवान् तथापि शुनकानें ।
हरिचें काय करावें ? परिसो तो हितकथा पिशुन कानें. ॥ ७
या त्वद्दूतीं अरि जरि भलतेंचि करावयासि पाहेल, ।
राहेल पळ न तो, हे खलकृतनिजलंघना न साहेल. ॥ ८

---

अस्थं जयंतं वारुणावतम् । देहि मे चतुरग्रामान्पंचमं हस्तनापुरम् ॥' ह्या पांच गांवांचीं हल्लींचीं नांवें:—दिल्ली, कलकत्ता, जयपूर, प्रयाग आणि पाणिपत हींच होत असें म्हणतात. परंतु दुर्योधनानें सांगितलें कीं, 'सुईचे अग्रावर बसेल इतकी मृत्तिकाही येथें मिळवयाची नाहीं !' भाऊबंदकीच्या कज्जेकफावतींचा हाच उगम दिसतो, व प्रस्तुत तर तो सर्वत्र अनुभवास आहे." [ऐतिहासिक गोष्टी—भाग २—गोष्ट २३२, पृष्ठ १६८.]

१. पुत्रांच्या लोभानें, दुर्योधनादिक पुत्रांच्या प्रीतीनें. २. धृतराष्ट्र पुत्रप्रेमानें भुलला (स्वकर्तव्य विसरला) यांत संशयाला जागा नाहीं. ३. बाप धृतराष्ट्र. ४. सद्+उपाया=उत्तम+युक्तीला. ५. 'सखा' कोणाला म्हणावें हें मोरोपंतानें 'कृष्णविजय' उत्तरार्ध—अध्याय ८२ गीति २६ उत्तरार्ध यांत सांगितलें आहे. तें असें:—'शोकीं पडल्या चित्ता, दे बोधकराशि तो **'सखा'** लोकीं. म्हणजे:—जो शोकग्रस्ताच्या मनाला उपदेशरूपी हात देऊन सांभाळतो तो लोकांत 'सखा' होतो—तोच खरा मित्र होय. येथें धर्म शोकग्रस्त असून कृष्ण त्यास उपदेशाच्या गोष्टी सांगत आहे तेव्हां धर्माच्या तोंडून कृष्णास 'सखा' म्हणविण्यांत पंतानें मोठी मार्मिकता दर्शविली आहे असें म्हणावें लागतें. ६. मी धर्म. ७. आप्त=सखा, मित्र, स्नेही, खरें हित सांगणारा. ८. यदुपते ! कृष्णा ! ९. मला धर्माला. १०. हे धर्मराजा ! ११. त्या धृतराष्ट्रपक्षीय जनांकडे. १२. सुयोधनाची काय छाती आहे ? सुयोधन क्षुद्र पुरुष होय. १३. इंद्रही. [वृत्र नामक असुराला मारणारा जो इंद्र तो देखील.] वृत्रहा=वृत्रहन्=इंद्र=वृत्रासुरवधाची कथा वनपर्वांत आहे. [अध्याय १००-१०१.] १४. पितृधनाला. १५. सर्पसा. १६. आच्छादितमुख, गवतानें वगैरे झांकलेलें तोंड ज्याचें असा. १७. 'खळगा' या प्राकृत विशेष्याला 'पिहितमुख' हें संस्कृत विशेषण अर्थतः समुचित होय. १८. कुत्र्यानें. १९. सिंहाचें. २०. तो खल दुर्योधन. २१. नीच, दुर्जन, खल. २२. तुझ्या या दूताच्या ठिकाणीं. २३. इच्छा धरील, यत्न करील. २४. मी कृष्ण. २५. अमर्यादा.

जिंकिल काय हरा तो? जिंकी कुतुकेंचि [1]मन्मथ [2]नरा ज्या, ।
करिल [3]हरिमथन [4]शश, तरि करिल **सुयोधनहि** मन्मथन, राजा! ॥ ९
योजीन युक्ति सामीं [5]**सांदीपिनिच्या**, तुझ्या बहु नव्याही, ।
प्राणापरीस बहु मज जेंवि तुम्हीं [6]तेंवि तो बहु न [7]व्याही. ॥ १०
[8]माय करी बाळाचें नित्य श्रमवूनि [9]काय जेंवि हित ।
तेंवि करितसे मन्मति, होय निजदयेसि काय जें [10]विहितं. ॥ ११
देइल [11]अंश **सुयोधन**, तरि आम्हा पावला [12]**सदाशिव** हो!, ।
म्हणतोसि तूंहि, [13]मीही, कीं, '[14]प्रज्ञाचक्षुचें सदा [15]शिवें हो.' ॥ १२
हो सिद्ध अंश द्याया, द्याया स्वप्राण सिद्ध अथवा हो, ।
कथवा हो! [16]त्यांकरवीं यश नाकीं, [17]वीरलोकपथ वाहो. ॥ १३
अंश न देइल जरि अरि, तरिहि **महादेव** पावला नवसा, ।
न [18]वैसावासि पराक्रम न करुनि, केवळ अशक्त मानवसा.' ॥ १४
**श्रीराम** जसा प्रेषी शिकवुनि [19]सामोक्ति [20]**अंगदा** साच्या, ।

---

१. मदन. मनाचें मथन करतो तो मन्मथ. २. ज्या नरा मन्मथ (मदन) कुतुकें (सहज लीलेनें) जिंकी (जिंकितो) तो (नर) हरा (महादेवा) जिंकील काय? अर्थात् जिंकूं शकणार नाहीं. ३. सिंहाचें मर्दन. ४. ससा. ५. कृष्णगुरूच्या. ६. 'तेंवि तोहि नच व्याही' असाही पाठ आहे. ७. दुर्योधन याची मुलगी लक्ष्मणा ही कृष्णाचा मुलगा सांब ह्याला दिली होती म्हणून कृष्णदुर्योधन हे व्याही होत. [मोरोपंत—बृहद्दशम—उत्तरार्ध—अध्याय ६८ काव्यसंग्रहग्रंथमाला—पृ० १३५—१४६.] ८. जेंवि माय बाळाचें हित काय श्रमवूनि करी तेंवि निजदयेसि जें काय विहित [तें] मन्मति करितसे—असा अन्वय. याचा भावार्थ असाः—ज्याप्रमाणें नित्य देह झिजवून आई मुलाचें हित करिते, त्याप्रमाणें माझ्या दयाळु स्वभावास जें कांहीं शोभेल तें तो करीत आहे. ९ शरीर. १०. योग्य. ११. राज्यांश, राज्यभाग. १२. शंकर. १३. मी कृष्णही म्हणतों. १४. धृतराष्ट्राचें. प्रज्ञा (बुद्धिच) आहे चक्षु (नेत्र) ज्यास म्हणजे अंध त्याचें. १५. कल्याण. १६. दुर्योधनाकरवीं. त्याकरवीं नाकीं यश कथवा=युद्धांत दुर्योधन मरून स्वर्गास गेला म्हणजे तेथें तुमचें यश त्याजकरवीं तुम्ही वदविलें असें होईल. हो=अहो पांडव हो!. १७. वीरजनांचा जो मार्ग तो वाहत असो (चालू असो). रणांगणीं युद्ध करून मरून स्वर्गीं जाणें हा मार्ग चालू असो, युद्धांत मरण पावणाऱ्या वीरांस प्राप्त होणारा जो उत्तम लोक त्याचा मार्ग सुरू होवो. अर्थात् युद्धाचा प्रसंग आला तरी त्यांतही आम्हांस आनंदच आहे. १८. हें दोन अर्धास जोडणारें 'दामयमक' आहे. १९. सामाविषयीं उक्ति (भाषणें). २०. अंगदाला सामोक्ति शिकवून रावणाकडे रामानें पाठविलें होतें. [काव्यसंग्रहग्रंथमाला—रामायणें भाग १—मंत्ररामायण—युद्धकांड—गीति २८३-३१६, पृ०११२-११४.]

धर्म तसा प्रभुला,[1] जो[2] कार्या देणार अंग दासाच्या. ॥ १५
भीम म्हणे, 'केशवजी! मृदु बोला, उग्र तो सुयोधन हो! ।
बा! त्यासीं सख्यचि हो[3] युद्धीं हँत[4] एकही सुयोध[5] न हो. ॥ १६
इतर असो,[6] लाजेलचि त्या नित्य मदांध सुरगज[7] गदीशा,[8] ।
दुर्योधना 'गुरु' असें म्हणतिल गरलांध उरग[9] जगदीशा!' ॥ १७
श्रीकृष्ण म्हणे,[10] 'हा! रे! भीमा! जरि तूं महाभुज[11] गदीन[12] ।
भ्यालासि, होय जैसा चिंतुनि गरुडा महाभुजग[13] दीन. ॥ १८
आम्हां तुझा भरंवसा बहु कीं खळ मर्दिसील तूं अगदीं, ।
निर्वीर्यत्व[14] चिकित्सासमयीं[15] आलें चिरार्जितीं[16] अगदीं.[17] ॥ १९

---

१. कृष्णाला. २. जो (प्रभु) दासाच्या (धर्माच्या) कार्या अंग (आपलें आंग) देणार—असा अन्वय. ३. होवो. ४. मारलेला. ५. उत्तम वीर. ६. इतर [मदांध] असो (बाकी मदांध असोत, परंतु नित्य मदांध (सदा मदानें अंध असा जो) सुरगज (ऐरावत—इंद्राचा हत्ती तो) त्या गदीशा (त्या सुप्रसिद्ध अशा गदाधरवर्य दुर्योधनाला) लाजेलचि (खचितच लाजेल, दुर्योधनाचें मदांधत्व पाहून ऐरावताला आपल्या मदांधत्वाची लाज वाटेल). [हे] जगदीशा! (जगत्पालका कृष्णा!) गरलांध (विषानें अंध असे जे) उरग (सर्प, साप ते) दुर्योधना गुरु (तूं आमचा गुरु आहेस) असें म्हणतील. हे दुर्योधना! तूं आम्हापेक्षां श्रेष्ठ विषारी आहेस असें सदा उग्रविष जे साप ते देखील म्हणतील. ७. सुर+गज=देव+हत्ती=ऐरावत. इंद्राचा गज हा सर्व गजांचा राजा होय. याचा रंग शुभ्र आहे. 'वारणं शुभ्रमिंद्रस्य' [वाग्भटालंकार—परिच्छेद १—श्लोक १९—काव्यमाला, अंक १०५.] साधारणतः गजांचा वर्ण कृष्ण असतो; परंतु सुरेंद्राच्या गजाचा (ऐरावताचा) वर्ण शुभ्र आहे. ब्रह्मदेशांत मात्र शुभ्रवर्ण हत्ती आहेत व भोळे लोक पांढऱ्या हत्तीची पूजा करितात व त्यास पूज्य समजतात. ८. गदाधरपति. गदी+ईश=गदाधर+श्रेष्ठ=गदाधरांत श्रेष्ठ अशा दुर्योधनाला. ९. उरसा गच्छतीति उरगः=उरानें सरपटत जातो तो उरग. १०. भीमाच्या भाषणावरून (गीति १६) तो भयानें घाबरला आहे असें समजून त्याच्या ठिकाणीं स्वाभिमानबुद्धि जागृत व्हावी या हेतूनें कृष्ण त्यास निर्भर्त्सनपर मर्मभेदक भाषणानें चिडवितो. ११. महाबाहु. १२. गदी+इन=गदाधरामध्यें मुख्य. १३. मोठा साप. १४. निःसारपणा. १५. रोगप्रतिकारसमयीं, रोग दूर करण्याच्या प्रसंगीं. १६. चिर+अर्जित=पुष्कळ दिवस+संपादन करून ठेविलेल्या अगदीं (औषधांत)= प्रसंगास खात्रीनें उपयोगीं पडेल अशा भरंवशानें फार कालापासून संपादिलेल्या औषधाच्या ठायीं उपयोगाच्या वेळीं निःसारत्व (गुणाभाव) दिसून आलें. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १७. अगद=औषध. औषधाचें ठायीं.

देवी[1] गदा द्रुपदजा [2]अवलंबुनिया भुजाप्रति ज्ञाल्या ! ।
लज्जेंत बुडाल्या कीं झाल्या [3]वंध्या तुझ्या प्रतिज्ञा [4]त्या.' ॥ २०
भीम म्हणे, '[5]हा घाया [6]सुतशोक [7]पित्यासि [8]यादवा ! लाजे, ।
भस्मचि होतील सकळ ते सांपडतील या [9]दवाला जे. ॥ २१
देवा ! तुझ्या प्रसादें [10]विजयश्रीकंठरत्नहार [11]गडी ।
हा [12]काळाचा हरसखकटकें, न करूनि यत्न, हा रगडी. ॥ २२
माझ्या या बाहूंचें स्मरण करुनि तूं मनीं पहा [13]शील, ।
अथवा [14]रथवाजिद्विपभटकोटिप्रशमनीं पहाशील. ॥ २३
वर्णूं काय स्वमुखें ? स्वपराक्रम वर्णितील सुर साधू, ।
म्हणतिल सकळ, '[15]बलिमदा' [16]भगवज्जन 'भीमकीर्तिसुरसा ! धू.' ॥ २४
यदुनाथ म्हणे, 'भीमा ! [17]खळकालाच्या महाभुजा भावा ! ।
तुज निंदिलें न; [18]तैसें वदलों जाणावया [19]तुझ्या [20]भावा.' ॥ २५

---

१. देवी गदा आणि देवी द्रुपदजा. येथें देवी हा शब्द पूज्यत्वद्योतनार्थ योजिला आहे. २. आश्रय करून. ३. निष्फळ, विफळ. ४. त्या=पूर्वीं केलेल्या सुप्रसिद्ध अशा (प्रतिज्ञा). ५. हा भीम. ६. पुत्रमरणनिमित्तक शोक. ७. कौरवांचा बाप धृतराष्ट्र त्याला. ८. हे यदुपते कृष्णा ! ९. दावाग्नीला. हा मीच जो दव (वणवा) त्याला. १०. विजयश्रीच्या कंठांतील रत्नहार. असा हा भीम. ११. मित्र. १२. यमाचा. देवा ! (कृष्णा !) तुझ्या प्रसादें हा काळाचा गडी (यमाचा मित्र, परकीयांस यमासारखा नाशक असा) विजयश्रीकंठरत्नहार (जयरूप लक्ष्मीच्या गळ्यांतील ताईत असा) न करुनि यत्न (अप्रयासानें, सहज, फार श्रम न करतां) हा (हा भीम) हरसखकटकें (शंकराचा सखा जो कुबेर त्याचीं सैन्यें) रगडी (जिंकिता झाला). [सौगंधिक कमलें आणण्यासाठीं भीम सरोवरावर गेला असतां तेथें त्याला कुबेराचे यक्ष (रक्षक) आडवे आले, तेव्हां भीमानें त्यांस जर्जर केलें या कथेकडे कविकटाक्ष आहे. मोरोपंत—वनपर्व—अध्याय ७—काव्यसंग्रहग्रंथमाला—पृ० १०८-११४.] १३. स्वभाव, तेज, पराक्रम, आचरण. १४. रथ, घोडे, हत्ती, वीर यांच्या अनेक कोटींच्या प्रशमनीं (मर्दनांत) माझ्या बाहूंचें (भुजांचें) शील (स्वभाव, सत्व) तुझ्या नजरेस येईल. १५. बलिष्ठाच्या गर्वास. १६. भगवज्जन म्हणतिल:—[हे] भीमकीर्तिसुरसा ! (भीमकीर्तिरूप उत्तम उदका !) सकलबलिमदा (सर्व बलवान् जनांचा गर्वाला) धू (धुवून टाक, नाहींसा करून टाक). १७. खलजनाच्या नाशकाच्या भावा ! (बंधो !). १८. त्या प्रकारचें भाषण केलें. (गीति १८-२० पहा.) १९. तुझ्या. २०. अभिप्रायास.

अर्जुन म्हणे[1], 'सख्या! जें कीर्तिकर असेल तेंचि कर, जा गा! ।
सांगावें काय? तुझा प्रणतत्राणीं[2] असेचि कर[3] जागा[4].' ॥ २६
नकुल[5] म्हणे, 'जगदीशा[6]! रक्षाया हा स्वधर्म जें विहित ।
तेंचि करितां, करितसे न विनवितां वृद्ध माय जेंवि हित'. ॥ २७
सहदेव[7] म्हणे, 'देवा! दे वात्सल्येंकरूनि युद्धवर ।
उत्सव रणसम[8] कैंचा क्षत्राला[9]? हाचि धर्म शुद्ध वरं[10]'. ॥ २८
कृष्णाहि[11] म्हणे[12], 'कृष्णा! म्हणसि जिला[13] प्रियसखी, पहा हे ती, ।

---

१. अध्याय ७८ श्लो० १-१९ पहा. २. शरणागतांच्या रक्षणीं. ३. हस्त. ४. सावध, अनिद्रित, जागरूक, दक्ष. ५. अध्याय ७९ श्लो० ४-७ पहा. ६. नकुल म्हणे:-[हे] जगदीशा! स्वधर्म रक्षाया (स्वधर्माचें रक्षण करण्यासाठीं) जें विहित (योग्य) तेंचि करितां हा [हित] करितसे, जेंवि वृद्ध माय न विनवितां हित [करिते]-असा अन्वय. ७. अ० १ श्लो० १७ पहा. ८. रणासारखा क्षत्रियाला उत्सव (आनंद) कोठून प्राप्त होणार? ९. क्षत्रियांला. १०. श्रेष्ठ. ११. या प्रसंगाचें वर्णन एका अन्य कवीनें केलें आहे तें असें आहेः—'हें ऐकोनी पांचाळपुत्री। देवी द्रौपदी पवित्रगात्री । रोषें जाकळोनी अञ्जनेत्री । ढाळिती झाली जळातें. ॥ १ ॥ कंठ सद्गदित बाष्पपूर्ण । रुदन करी अधोवदन । म्हणे, 'जगत्पालका! प्राण । तुझ्या आश्रयीं ठेविला. ॥ २ ॥ पांडव असतां वर्तमान । दुरुक्ति बोलिला दुर्जन । वस्त्रें हरितां दुःशासन । नाहीं कोणी वारिला. ॥ ३ ॥ मोकळी धरूनि वीरगुंठी । बळें झोंकी मारी कपटी । तें दुःख सांगतां जगजेठी । मूर्च्छा मातें येतसे. ॥ ४ ॥ दुर्योधन पापखाणी । 'बैसें' म्हणे 'अंकासनीं' । सभा विनवितां ग्लानी । चित्र जाहली मत्कर्मे ॥ ५ ॥ भीमार्जुनाचें प्रतापबळ । समयीं निर्फळ झालें फोल । पाहोनि नैराश्यकाळवेळ । तुझे पाय चिंतिले. ॥ ६ ॥ तूं विश्वात्मा त्रैलोक्य कुक्षा । धांवोनी माझे धरिलें पक्षा । दुर्जनमनोरथाची करूनी रक्षा । लज्जा माझी रक्षिली. ॥ ७ ॥ जैसी वस्त्रांची पांचाळी । बाह्य अंतरीं वसनें व्यापिली । तैसी मातें करूनि वनमाळी । वैरीयांतें लाजविलें.॥८॥चमत्कार दावोनी सभास्थानीं। आच्छादिली आपुली करणी । पुढें कपटीयें गोवोनी वचनीं । वनप्रयाणा धाडिलें. ॥ ९ ॥ तेथें विविध क्लेश देवा! । साहोनि सुदेष्णेची केली सेवा । ऐशा क्लेशीं जन्म आघवा । गेला वृथा, सुख नेणों. ॥ १० ॥ वैरी दुष्कर्माची दीपिका जळी । हृदयगेहीं झगटला बळी । मानस आहाळोनियां समूळी । मसी लागली पुरुषार्था. ॥ ११ ॥ सख्योपचारतुषारजीवन । उपचारें न वाटे शीण । वैरी व्याघ्राचें करूनि हनन । रक्तमांसा मर्दिजे. ॥ १२ ॥ मच्छस्नेह काढितां युक्ती । तात्काळ होय दुःखशांती । तो तव काळ कमळापती! । ययालागीं दिसेना. ॥ १३ ॥ तुझा आश्रय बहु माधवा! । होता भरंवसा माझिया जीवा । पांडवशक्ती आमुच्या दैवा । गलित जाहली पूर्वींची ॥ १४ ॥ आतां न धरूनि कवणाची आस । आपलेनि बळें घालीन कास । मम

विसरो तुझी न समयीं ईस श्रितभव्यदा[1] महा हेती.[2]' ॥　२९
बहु गर्हिवरोनि, दाउनि दुःशासनपाणिकृष्टकेश,[3] वदे,[4] ।
बहु दीर्घ उष्ण सोडुनि सुसकारा, तीस अभय केशव[5] दे. ॥　३०
श्रीमद्युधिष्ठिराच्या दूतत्वा परम लाभ मानुनि घे, ।

---

तनयबळचंडांश । प्रतिविंध्यादि सुभद्र. ॥ १५ ॥ युवतरश्वीं बलोन्नत । धनुर्वेद पारंगत । क्षत्रियांमाजी रणपंडित । शिक्षा करिती कृतांता. ॥ १६ ॥ पांचाळतनय धृष्टद्युम्न । क्षत्रियांमाजी पंचानन । समरीं एकाग्रता सात जाण । वज्रपाणी माघारे. ॥ १७ ॥ कीं ते प्रळयकाळींचे सप्त उदधी । क्षोभती पुरलिया कालावधी । तैसे निर्वाण यया संधी । घालीन कौरव पालथे. ॥ १८ ॥ आड निघतां विरूपाक्षा । त्यासी कदनीं लावीन शिक्षा । कौरवकुळाची करीन रक्षा । तरि मी बहिण पैं तुझी.' ॥ १९ ॥ रागें चुरी दोन्ही कर । थरथरा स्फुरती दोन्ही अधर । नयन आरक्त खदिरांगार । नेणो जाळी विश्वातें. ॥ २० ॥ कीं कृतायुगीं भद्रकाळी । शुंभनिशुंभाची केली होळी । तैसी क्षोभली देखोनी पांचाळी । जाहली हडबड सभेतें. ॥ २१ ॥ हें देखोनियां वनमाळी । धांवोनी धरिलें हृदयकमळीं । नेत्र परिमार्जुनी पीत सावुलीं । स्नेहें हनुवटी स्पर्शिली. ॥ २२ ॥ सांवरूनि कवरीभार । म्हणे 'स्थीर' म्हणे 'धीर, । तुझिया दुःखाचे डोंगर । वोझें माझे मस्तकीं. ॥ २३ ॥ धराभार उतरावया । मी अवतरलों तुमचिया कार्या । साहणें पडिलें त्या अभिप्राया । गांधारीच्या सुकृतें. ॥ २४ ॥ आतां न करी क्षमा माया । सत्य देवकीचे शिवतों पायां । स्वकुळीं कौरव यमालया । वसते करीन अघोरी ॥ २५ ॥ कौरवांच्या स्त्रिया सकळी । विना गळसूत्र कुंकुमाभाळीं । देखसी सत्वर नेत्रकमळीं । दीर्घ स्वरें विलपतां. ॥ २६ ॥ कुरुवर्यांचे घेऊनि भेटी । आलिया पुढां हेची गोष्टी । न करीं तरी माझिया गांठीं । असत्य कोटी आतुडे.' ॥२७॥ संतोषोनी भगवती कृष्णा । म्हणे, 'सत्वरा जाईं कृष्णा ! । माझिया मनोरथाची तृष्णा । पूर्ण करीं कृपाळा !' ॥ २८ ॥ मस्तक तुकोनी रमाधव । म्हणे, 'सर्व कर्ता सदाशिव' । घेवोनी सर्वांचा अभिप्राव । सिद्ध जाहला सख्यार्थीं. ॥२९॥ [नरहरीमोरेश्वरविरचित उद्योगपर्व–अध्याय १२ ओंव्या १३०-१५८ ] १२. अध्याय ८२ श्लोक १-१२ पहा. १३. ज्या द्रौपदीला.

१. श्रित+भव्य+दा=आश्रितजन+कल्याण+देणारी=आश्रितहितकर्ती. २. तलवार. ३. दुःशासनाच्या हस्तानें आकर्षित केश. ४. अध्याय ८२ श्लोक ४४-४५ पहा. ५. 'केशव' याचा अर्थ असा आहेः–'केशीला मारणारा तो केशव, किंवा 'क' (ब्रह्मा) 'अ' (विष्णु) व 'ईश' (महादेव, शंकर) ह्या तीन मूर्ति ज्याच्या तंत्रानें वागतात तो केशव,' अशी श्रीमच्छंकराचार्यांनीं विष्णुसहस्रनामटीकेंत व्युत्पत्ति दिलेली आढळते. "उत्तम केश ज्याचे किंवा हरिहरविधीहि वश ज्याला । अथवा केशिनिहंता, यास्तव 'केशव' असें म्हणति त्याला ॥ २३ ॥ [पृ० ३.] सूर्यादिकांत असती, जे अंशू

दुर्योधनप्रमुखखलखद्योततदन्यपद्मभानु[1] निघे. ॥ ३१
प्रभुला पूजिति निघतां वाल्मीकिवसिष्ठवामदेवादी ।
नारदहि, जया निजयश माथां घेऊनि वाम दे वादी[2]. ॥ ३२
जो जाय दूर पोंवित[3] सानुज नृप धर्म त्या अपापरता[4] ।
प्रभुवर म्हणे, 'रहा, या कार्याच्या सिद्धिला जपा, परता[5].' ॥ ३३
धर्म म्हणे[6], 'शीघ्र सुखें ये जोडुनि सिद्ध कीर्तिसह, देवा! ।
मातेसि[7] नमुनि वद कीं आहे आरोग्य साधु सहदेवा. ॥ ३४
तूं जेंवि देवकीला भेटसि, तैसाचि भेट आतेला, ।
आम्हांहुनि तूंचि अधिक[8], वृंत[9] सोडुनि कोण करिल आ तेला? ॥ ३५
स्वपदभ्रष्टसुताचा[10] भाजितसे तीस नित्य नव्याधी[11], ।
व्याकुळ करी जसा हा तैसा शूलज्वरादि न व्याधी[12]. ॥ ३६

---

केश ते असति ज्याला । यास्तव सर्वज्ञानीं 'केशव' हें नाम योजिलें त्याला ॥ ४८ ॥" [पृ० ७३] [नामार्थदीपिका.]

१. दुर्योधन+प्रमुख+खल+खद्योत+तत्+अन्य+पद्म+भानु=सुयोधन+मुख्य+दुष्ट+काजवे+ते+इतर+कमल+सूर्य=दुर्योधनादिक दुष्ट कौरवरूप काजवे त्यांहून अन्य पांडवादिक प्रियदास हींच कमळें त्यांच्या आनंदाला सूर्य=दुर्योधनादि जे दुष्ट हेच काजवे त्यांस (सूर्य—त्रास देणारा) व त्या दुष्टांहून इतर (सुजन, पांडवासारखे साधुजन) तींच पद्में (कमळें) त्यांस भानु (सूर्य, सूर्यासारखा आनंददाता, दुष्टांचें शासन करणारा व साधूंचें संतोषप्रद संरक्षण करणारा असा कृष्ण. २. जया (नारदा] वादी (भांडखोर मनुष्य, भांडकुदळ्या) निजयश (नारदाची कीर्ति—ख्याति) [आपल्या]—माथां घेऊनि (शिरसा मान्य करून) वाम दे=डावी दे=हार मानी, मानतो—असा अर्थ कृष्ण शिष्टाईला चालले असतां त्यांस नारद (भांडखोरांचा राजा) देखील [ब्रीदाविरुद्ध] पूजी. भांडण मिटविण्याकरितां जाणाऱ्या मनुष्याची पूजा नारदासारख्या कलहप्रिय मनुष्यानें करावी हें आश्चर्य म्हणून 'हि' या पदाची योजना विरोध दाखविण्याकरितां केली आहे. व नारदाचें कलहप्रियत्व व्यक्त करण्यासाठीं 'जया निजयश माथां घेऊनि वाम दे वादी' या वाक्याची योजना केली आहे. ३. पोंचवीत. ४. पुण्यकर्मांत निमग्न अशाला, पुण्याच्या ठायीं रत जो त्यास. ५. परत जा. ६. अध्याय ८३ श्लोक ३७-४८ पहा. ७. आई कुंतीला. [सहदेव हा सर्वांत धाकटा म्हणून तो कुंतीचा अत्यंत आवडता होता. बाळ सहदेव सुखरूप आहे असें सांग.] ८. हें 'अधिक' नामक अलंकाराचें उदाहरण आहे, कारण येथें पांडवापेक्षां कृष्णाचें आधिक्य वर्णन केलेलें आहे. ९. हा चरण सुभाषितरूप आहे. १०. राज्यपदापासून पतन पावलेल्या पुत्रांचा. ११. नूतन मनोव्यथा. १२. या पद्यांत 'व्यतिरेक' अलंकार झाला आहे.

कृष्णा! कळेल तैसें वद [1]कुंतीला, न दुःख बाधावें, ।
[2]पंकीं धेनु श्रमती, पुण्यश्लोका! मुरारि! बा! धावें. ॥ ३७
धृतराष्ट्र भीष्म बाल्हिक विदुर कृप द्रोण सर्व शुचि [3]तज्ज्ञ ।
जे त्यासि भेट वद हित, सांगों तुज काय? तूंचि [4]उचितज्ञ. ॥ ३८
म्यां पुसिलें कुशल असें कर्णासि सुयोधनासि सांगावें, ।

---

१. कुंतीविषयीं पुढील उतारा धर्मोक्तींतून घेतला आहे तो पहाः—बोलत बोलतां चालतां पंथीं । धर्मासि आठवली कुंती । हृदय फुटलें दुःखावर्तीं । अश्रुपातीं लोटलें. ॥ १ ॥ म्हणे, 'देवा! नारायणा! । आतां ऐकें माझिया वचना । हारवोनि सर्व द्यूतपणा । वल्कलेंसीं वनीं जातां. ॥ २ ॥ दीर्घ स्वरें शोक करितां । कुंती देवी आमुची माता । तीतें त्यागूनि सर्वथा । वनप्रयाण म्यां केलें. ॥ ३ ॥ न होतां तिचें समाधान । ती दुःखसागरीं झाली मग्न । आज्ञेंत जन्मवेरीं पूर्ण । दुःख संपूर्ण अनुभविलें ॥ ४ ॥ पंडुसंगें सेविलें वन । तेथ भोगिले कष्ट दारुण । पांचहि कुमर आम्ही अदृष्टहीन । झालों निर्माण वनवासी ॥ ५ ॥ आमुतें होतां देहीं क्लेश । नवसोनी करी उपवास । कल्याण व्हावया आम्हांस । सेवा करी अतिथींची ॥ ६ ॥ फलमूलभक्षणीं देह स्वार्थ । त्यागुनी पुरवी आमुचें आर्त । शुश्रूषा करितां अहोरात्र । रात्रंदिवस नीज नाहीं. ॥ ७ ॥ पिलीं झांकुनी जेंवि कुक्कुटी । पंडु निमालिया पाठीं । बालत्वापासूनि परिपाठीं । आमुतें कुंतीनें वाढविलें. ॥ ८ ॥ आम्हां अपाय करील म्हणून । दुर्योधनाचें भय दारुण । लाखाजोहरीं रक्षण । करोनी वनवास हिंडविलें ॥ ९ ॥ कांडणें कुटणें परिघाटणें । कष्टें आम्हां परिपाळणें । किंचित् दिवस समाधानें । असतां आलें अरिष्ट ॥ ॥ १० ॥ शकुनिसवें खेळूनि द्यूत । सर्व ऐश्वर्य करोनी हत । आम्ही होवूनि संतप्त । वना जातां केशवा! ॥ ११ ॥ त्यागोनि दिव्यालंकार । रक्षेनें लेपोनि शरीर । वल्कलवेष्टित पांचही कुमर । कुंती लोळे गडबडां. ॥ १२ ॥ एक वस्त्रें आमुची जाया । गांजिली देखोनि द्रुपदतनया । दीर्घस्वरें मोकळी धाया । कुंती जननी अच्युता! ॥ १३ ॥ वृद्ध श्रमेल वनीं म्हणोन । तिसी विदुरें घेतली ठेवोन । अद्यापि तिचा शोक शमन । नाहीं झाला अनंता! ॥ १४ ॥ चौदा वरुषें आजिपासोनी । पुत्रवियोग वडवाग्नि । जाळितां सुखार्ता अमृतजीवनीं । जीवविं तीतें अनंता! ॥ १५ ॥ तीतें कुशळ वर्तमान । देवा! करिसी निरूपण। सुखशब्दें समाधान। किजे तियेसीं केशवा! ॥ १६ ॥ ऐकोनि कौरवयुद्धवार्ता । जळावीण मीन ऐशी भगवंता! । तळपेल यालागीं श्रीकृष्णनाथा! । भविष्यवार्ता निवेदीं. ॥ १७ ॥" [सुभानंत–उद्योगपर्व–अध्याय २९ ओव्या २४-४१]. २. चिखलांत. ३. तत्वज्ञाते. ४. योग्य जें आहे तें जाणणारा. उचितं जानातीति उचितज्ञः.

येतां[1] पंचम[2] दाटुनि कर्णकटु पिकें[3] शिकोनि कां गावें?' ॥ ३९
ऐसें अजातरिपु[4] नृप सूचित[5] सुचवूनि शौरिला परते, ।
मग विजय[6] म्हणे, 'देवा! येऊं द्यावे न मजपुढें पर[7] ते. ॥ ४०
कर जोडिले तुज, पहा साम घडो, राहवीन कोदंड[8], ।
आर्या! भीमापासुनि अंधसुता[9] आहवी[10] नको दंड[11].' ॥ ४१

---

१. [कावळ्यास कानास गोड लागणारा असा स्वर काढितां येत नाहीं, तेथें त्याचा उपाय नाहीं, पण तशी गोष्ट कोकिलाची नाहीं; त्यास गोड स्वर काढितां येतो.] पंचम येतां (कोकिलास पंचम स्वर (मधुर स्वर) येत असतां आणि कर्णकठोर स्वर येत नसतां) पिकें (कोकिलानें) दाटुनि (मुद्दाम) कर्णकटु शिकोनि (कानाला कडू लागणारा स्वर अभ्यासानें शिकून) कां (कशासाठीं) गावें? (गायन करावें?) ईश्वरानें मनुष्यास गोड बोलण्यासाठीं मधुर वाणी दिली असतां त्यानें तिचा दुरुपयोग करून कडु भाषण कां करावें? २. पंचम स्वर. स्वर सात आहेतः—'निषादर्षभगांधारषड्जमध्यमधैवताः । पंचमश्चेत्यमी सप्त तंत्रीकंठोत्थिताः स्वराः ॥' (अमरकोश). 'षड्जं रौति मयूरस्तु गावो नर्दंति चर्षभत् । अजाविभे च गांधारं क्रौंचो नदति मध्यमम् । पुष्पसाधारणे काले कोकिलो रौति पंचमम् । अश्वस्तु धैवतं रौति निषादं रौति कुंजरः ॥' १ नि–निषाध–हा शब्द हत्तीचा, याचें नाभिस्थान; २ रि–ऋ-षभ–हा शब्द गाईचा, याचें नासिकास्थान; ३ ग–गांधार–हा शब्द शेळीचा, याचें स्थान गाल; ४ सा–षड्ज–हा शब्द मोराचा, याचें नाभिस्थान. ['नासाकंठमुरस्तालु जिव्हां दं-तांश्च संस्पृशन् । षड्भ्यः संजायते यस्मात्तस्मात्षड्ज इति स्मृतः ॥' नाक, कंठ, ऊर, तालु, जिव्हा आणि दांत या सहा स्थानांपासून होणारा तो षड्ज.] ५ म–मध्यम–हा शब्द क्रौंच पक्ष्याचा, याचें हृदयस्थान; ६ ध–धैवत–हा अश्वाचा. याचें ललाटस्थान; ७ प–पंचम–हा शब्द वसंतकालांत कोकिलाचा–याचें कंठस्थान; [नाभीपासून उत्पन्न झालेला जो वायु, ऊर, हृदय, कंठ आणि मूर्धा यांमधून जातो तो पंचम.] हे सात स्वर तंत्रीपासून आणि कंठांतून उत्पन्न होतात. ३. कोकिलानें. ४. अजात (न उत्पन्न झालेला) रिपु (शत्रु) ज्याला असा (धर्मराज). ५. सु+उचित=अत्यंत योग्य. ६. अर्जुन. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–विराटपर्व–अध्याय ३ गीति २०९ पृष्ठ ७८-७९.] ७. शत्रु. (दुर्योधनादिक शत्रु.) ८. धनुष्य. (गांडीवचापाचा उपयोग करणार नाहीं, बाणोत्सर्ग करणार नाहीं.) ९. अंधाच्या (आंधळ्या धृतराष्ट्राच्या) मुलाला. १०. युद्धरूप. आहव=युद्ध. ११. दंड् धातूपासून निघा-लेल्या शब्दांकडे लक्ष दिलें असतां मूळच्या अर्थाचा थोडथोडा संबंध ठेवून कशीं अर्थांतरें होतात तें ध्यानांत येईल. दंड म्हणजे शिक्षा, ती करण्याचें साधन म्हणून काठीलाही दंड नांव पडलें, त्यापासून दांडा शब्द निघाला. काठीचा उपयोग आडवी बांधून धोतर वगैरे वाळत घालण्यास करतात त्यामुळें दांडी हा शब्द झाला. आतां उद्दंड याचा अर्थ उंच आहे दांडा ज्याचा तें म्हणजे उंच छत्री वगैरे. यावरून उदंड म्हणजे पुष्कळ असा अर्थ झाला. 'मी खलदंडें उदंड तापतसें' मोरोपंत—धेनुहरण. (व्युत्पत्तिप्रदीप.)

खलबलमथनोत्साहें[1] भीमें गर्जोनि लोक कांपविला, ।
खचले[2] रवें नग[3] मग; न म्हणतिल तद्बाहु[4] तोकें[5] कां पविला[6]?' ॥ ४२
प्रभु पांडवांसि फिरवुनि जातां पाहे[7] पथांत नाकर्षी[8] ।
राजर्षि[9] ब्रह्मर्षि[10] स्वयश[11] ज्यांच्या[12] मनासि आकर्षी. ॥ ४३
उतरोनि रथाखालीं साधूंचे वंदिले अनेक थवे, ।
प्रभुनें दिलें तया सुख, मुखलक्षें[13] करुनिही न तें कथवे. ॥ ४४
इच्छा पुसतां वृंदले[14], 'बा! तुजसम अन्य बोलका[15] नाहीं; ।
प्राशूं[16] धृतराष्ट्रसभेमाजि तुझे धन्य बोल कानांहीं[17]. ॥ ४५
दे या अयास[18] याया[19] आज्ञा सदया[20]! महोदया परिसा. ।'
यापरि साधुमनोरथ जाणोनि म्हणे मुकुंद, 'यां[21], परिसा.' ॥ ४६
'सामार्थ[22] प्रभु येतो' ऐसें धृतराष्ट्र आयके कानीं, ।
बहुतृषित[23] अंधचातक[24] मेघागम[25] जेंवि काय केकांनीं[26]. ॥ ४७
मार्गी सभादि सर्वहि बहु साहित्य प्रतिस्थळीं करवी[27], ।
कीं आपणावरि दयादृष्टि करावी यदूत्तमें बरवी. ॥ ४८
देव न पाहे तिकडे कीं तें करणें नव्हेचि निष्कपट, ।

---

१. दुष्टांच्या सैन्याच्या संहार करण्याच्या उत्सुकतेनें. २. पडले. [मोठा ध्वनि झाला असतां त्याच्या दणक्यानें मोठमोठालीं झाडें इमारती इत्यादिक पतन पावतात ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आणि अनुभवसिद्ध आहे.] ३. पर्वत. ४. तद्+बाहु=त्या भीमाचे+भुज. ५. लहान मूल. ६. वज्राला. त्या भीमाच्या भुजांपुढें इंद्राचें वज्र पोरासारखें क्षुल्लक होय—असा भाव. ७. अध्याय ८३ श्लो० ६०-६१ पहा. ८. नाक+ऋषि—देवर्षि. ९. ब्रह्मनिष्ठ राजे. १०. ब्रह्मनिष्ठ मुनि. ११. कृष्णयश. १२. ज्या ऋषिजनांच्या. १३. लाख मुखांनीं, (लाख मनुष्यांनीं). ही अतिशयोक्ति आहे. १४. ऋषिजन. (अध्याय ८३ श्लो० ६५-७२.) १५. वक्ता, वाग्मी. मागें पृष्ठ ४८ टीप १७ पहा. १६. कानांहीं प्राशणें=सादर ऐकणें. १७. हें पंताचें ठरींव यमक आहे. हेंच यमक वनपर्व—अध्याय ६ गीति ४९ व उद्योगपर्व—अध्याय ३ गीति ८९ यांत आलें आहे. १८. लोहास. १९. यावयास. २०. [हे] सदया! (दयालो!) महादेवा! (भक्तांचा अभ्युदय करणाऱ्या!) परिसा! (परिसरूपा श्रीकृष्णा!) या अयास (ह्या लोखंडास, या लोहरूप मुनिजनांला—आम्हाला) याया (येण्यास) आज्ञा दे. २१. चला आणि माझें भाषण ऐका. २२. साम करण्यासाठीं. २३. अत्यंत तान लागलेला. २४. आंधळा धृतराष्ट्र ह्याच चातकपक्षी. २५. मेघांचें येणें. २६. मयूरस्वरांनीं. केका=मयूरवाणी. २७. दुर्योधन साहित्य करवी.

[1]मैंदाचें स्वीकारिल कवण [2]विचक्षण अमूल्य [3]निष्कपट? ॥ ४९
तें सर्व [4]डावलूनि प्रभु गेला गजपुरासि परभारा, ।
हाचि [5]भल्याचा आप्त, [6]स्वशिरीं घेईल कोण [7]परभारा? ॥ ५०

## अध्याय सातवा.

धृतराष्ट्र [8]म्हणे, 'विदुरा! जो [9]साधुमनें स्वसद्गुणें [10]हरितो ।
येइल [11]वृकस्थलाहुनि आम्हां भेटावया [12]उद्यां हरि तो. ॥ १
[13]दासी शत दासहि शत आठ [14]महानाग [15]रुक्मरथ [16]सोळा ।
देईन तोहि [17]सन्मणि शुचितेजाचाचि जो गमे गोळा. ॥ २
जें [18]मनुयोजनगामी [19]स्वस्वानें [20]व्रीडदान दे [21]वाद्या, ।
माझ्या आज्ञेनें तें [22]अश्वतरीयुक्त [23]यान देवा द्या. ॥ ३
सद्भूषणें सुवस्त्रें पुष्कळ येतांचि हरिस अर्पावीं, ।
सैन्यें [24]सदन्नपानें बहु बहुमानेंकरूनि [25]तर्पावीं. ॥ ४

---

१. फांसेगाराचें, ठगाचें. २. सुज्ञ, शहाणा, ज्ञाता. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ३. पदक आणि वस्त्र. ४. त्याग करून, टाकून. डावलणें=दूर करणें, उल्लंघणें. ५. साधुजनांचा हा (कृष्ण) आप्त (मित्र) होय. ६. आपल्या डोक्यावर. हा चरमपाद सुभाषितरूप आहे. ७. परभाराला, दुसऱ्याच्या भाराला. दुसऱ्याचें ओझें आपल्या शिरावर घेईल असा साधुजनाचा मित्र एक कृष्णच होय—असें तात्पर्य. ८. अ० ८५ पहा. ९. सज्जनांचीं चित्तें. १०. आकर्षण करतो. ११. वृकस्थल नामक गांवाहून. [कृष्ण मार्गामध्यें सायंकाळीं वृकस्थल नामक गांवीं एक रात्र वसति करून व तत्रस्थ ब्राह्मणांची पूजा ग्रहण करून पुढें निघाला असें मूळांत आहे. अ० ८४ श्लो० २०-२९.] १२. अ० ८६ श्लो० १ पहा. १३. अ० ८६ श्लो० ८ पहा. १४. मोठे नाग (गज, मातंग.) १५. सुवर्णरथ. १६. प्रत्येक रथाला बाल्हिकदेशोद्भव चार चार उत्तम घोडे जोडले आहेत असे सोळा रौक्मरथ. (अ० ८६ श्लो० ६.) १७. उत्तम मणि; रात्रंदिवस तेजानें चमकणारा असा मणि. १८. चवदा योजनें. (छपन्नकोश) जाणारें. एका दिवसांत चवदा योजनें जाणारें असें (यान). १९. स्वशब्दानें. २०. लज्जादान. २१. ज्या वाहनाचा स्वर वाद्याच्या स्वराहून मधुर होता—असा भावार्थ. हा दुसरा चरण पंतांच्या पदरचा आहे, यास मूळांत आधार नाहीं. २२. ज्या (यानाला) अश्वतरी (खेचरी) योजिल्या आहेत असें (यान). [श्लो० ११.] गाडीला खेचर लावण्याचा प्रचार या देशांत सांप्रत जरी प्रचलित नाहीं, तरी इंग्लंडादिक देशांत तो अद्याप चालू आहे. २३. वाहन. २४. सद्+अन्न+पानें=उत्तम+भोज्य—अष्टगुण भोज्य+पेयद्रव्यें. २५. तृप्तिसाठीं द्यावीं.

दुः[1]शासनमंदिर द्या उतराया माधवासि पौरव! हो! ।
[2]स्वाप्तासि प्राप्त तुम्हांपासुनि बहुपरमपूर्ण गौरव हो.' ॥ ५
विदुर म्हणे, '[3]कपट मनीं, प्रेम वरि असें करूं नको, पावें, ।
तुजवरि न ईश्वरानें करुणा [4]परती करून कोपावें. ॥ ६
सर्वस्व प्रभुचरणीं अर्पिति बुध होउनी [5]शुचि तराया, ।
देणार हें किति? [6]क्षिति दे, या पूजेसि तो उचित, राया! ॥ ७
पांचां पुत्रां द्यावीं [7]पांच, न होउनि खळासि वश, गावें, ।
तें तूं न करिसि जेणें [8]प्रभुनें स्वमुखेंकरूनि यश गावें. ॥ ८
गुळखोबरें विलोकुनि भलत्याहि जनासि बाळक [9]वेळावा, ।
सत्य प्रेमचि दाउनि [10]सुज्ञें तो विश्वपाळ कवळावा. ॥ ९
[11]कपटादरें वळो [12]परें, परि परमेश्वर [13]कसा वळेल हरी? ।
[14]कृष्णकृपामृतनिधिची [15]अकपटविनताकडे वळे लहरी; ॥ १०
येतो साम कराया, होय [16]यशोर्थीच, तो यशा [17]लाहो, ।
देणार तुम्हीं [18]हय गज, रथ दासी दास हे कशाला हो!? ॥ ११
[19]समजाल तरि करिल हरि हर्षे पावोनियां [20]विडा [21]लास्य, ।

---

१. अ० ८६ श्लो० १९ पहा. [दुःशासनाचें गृह दुर्योधनाच्या गृहाहून चांगलें होतें.] २. स्व+आप्तास. (कृष्णास.) ३. छद्म. (अ० ८७ श्लो० ८.) ४. उलट, परत. ५. शुद्ध. ६. पृथ्वी. (अ० ८७ श्लो० ६.) ७. पांच गांवें. (पंच ग्रामक असें मूळांत आहे. श्लो० ९.) ८. कृष्णानें. ९. गुळ खोबरें पाहून बालक (मूर्ख, लहान पोर) कोणत्याही पुरुषाला वश होईल. ही गीति सुभाषितरूप आहे. १०. त्यां जाणत्या धृतराष्ट्रानें. ११. कपट+आदर=कपटयुक्त आदरानें. १२. ईश्वराहून अन्य. १३. परमेश्वर कपटादरें वळणार नाहीं—असा भाव. १४. कृष्णकृपारूप अमृतसागराची. १५. निष्कपट नम्राकडे. १६. यश इच्छिणारा. १७. त्या कृष्णाला साम करण्यांत यश मिळो. १८. गीति २ पहा. १९. तुमची समजूत पडेल तर, तुमच्यामध्यें कलह न होतां साम होईल तर. २०. नुस्ता विडा मिळाल्यानें कृष्णाला मोठा आनंद होईल व त्या आनंदाच्या भरांत तो नाचूं लागेल. [कोणी पाहुणा, अभ्यागत, नातलग, अथवा थोर मनुष्य घरीं आला असतां त्याला त्याच्या योग्यतेप्रमाणें आदरसत्कार केला असतां तो आनंदित होतो—असा व्यवहार अनुभवसिद्ध आहे. विडा देऊन, नारळादि महाफळ देऊन, शेलापागोटें बांधून अभ्यागत पाहुण्याची संभावना करणें हा शिष्टाचार आहे.] २१. नृत्य.

नाहीं तरि खेदद[१] त्या सर्व जसें[२] प्रस्थिता[३] विडालास्य[४]. ॥ १२
प्राणहि सोडिल परि हरि पांडवसख्य न पलार्ध सोडील, ।
कृष्णप्रीति[५] न मोडिल पटु[६] कोणी ब्रह्मलिपिहि खोडील.' ॥ १३
तेव्हां[७] सुयोधन म्हणे, 'सत्य न सोडील सख्य हरि त्याचें[८], ।
न पुरेल कृष्णमानसहरणीं[९] बळ मेरुच्याहि हरित्याचें. ॥ १४
कृष्णासि वस्तु संप्रति किमपि न द्यावें तुम्हीं अहो! तात! ।
भ्याले[१०] म्हणेल, मान्य न अवमानाला कुलीन[११] होतात. ॥ १५
त्रिभुवनपूज्यतम[१२] प्रभु[१३] सत्यचि, हें किंच[१४] तो असे व्याही[१५], ।
परि संप्रति सेव्य नव्हे, सेवूं कृष्णेतरा[१६] असेव्याही[१७]. ॥ १६
जें वैर वाढलें तें आतिथ्येंकरुनि काय हो! शमतें? ।
अवमान नव्हे जेणें तें क्षत्रोचित[१८] असें मला गमतें.' ॥ १७
भीष्म म्हणे, 'रे! पुत्रा! धृतराष्ट्रा! ईश्वर[१९]प्रभावज्ञा! ।
[२०]जीवपतंगा योग्या न प्रभु[२१]दीपार्हणाप्रभावज्ञा. ॥ १८

---

१. खेद देणारें. २. बाहेर जाणाराला जसें मांजराचें तोंड (मांजर) वाटेंत आडवें आलें असतां तें खेद देणारें होतें. मांजर आडवें येणें हा मोठा हानिकारक अपशकुन होय, अशी समजूत आहे. मांजर, कावळा, चासपक्षी, घुबड, कवडा इत्यादि प्राणी शुभाशुभसूचक मानले आहेत. ३. प्रयाण करणाराला. ४. बिडाल+आस्य=मार्जाराचें मुख. ५. ही अतिशयोक्ति आहे. ६. चतुर. ७. अध्याय ८८ श्लो० १-६ पहा. ८. त्या पांडवांचें. ९. कृष्णमानसहरणीं (पांडवांविरुद्ध कृष्णाचें मन वळविण्याचें कामीं.) मेरूच्याही हरित्याचें बळ न पुरेल (मेरुपर्वत उचलून नेणाराचें सामर्थ्य पुरें पडणार नाहीं, मेरुही चलन पावेल, परंतु कृष्णाचें मन चलन पावणार नाहीं.) १०. दुर्योधनानें भयामुळें नजराणा दिला असें कृष्ण म्हणेल. (अ०८८श्लो०३.) ११. सत्कुलोत्पन्न जन. हा अर्धांश सुभाषितरूप आहे. १२. त्रिलोकांमध्यें पूजेला अतियोग्य. १३. ही गीति मूळांतील पांचव्या श्लोकाशीं ('स हि पूज्यतमो लोके' याशीं) ताडून पहा. १४. दुर्योधनाची कन्या लक्ष्मणा सांबाला दिली होती म्हणून कृष्ण हा त्याचा व्याही होय. [काव्यसंग्रहग्रंथमाला–कृष्णविजय–उत्तरार्ध–अध्याय ६८ पृ० १३५-१४६.] १५. आणि. १६. कृष्णाहून अन्याला. १७. सेवेला अयोग्य. १८. क्षत्रियाला योग्य. हें अर्ध सुभाषितरूप आहे. १९. ईश्वरशक्तिज्ञात्या. २०. जीवरूप पतंगाला. २१. प्रभु+दीप+अर्हणा+प्रभा+अवज्ञा=स्वामी+दिवा+पूजा+तेज, कांति+अमर्यादा. प्रभुरूप दीपाची पूजारूप कांतीची अमर्यादा. दीपप्रभावज्ञा करणें पतंगाला योग्या न=दीपाचे (तेजाची) अवज्ञा करणें पतंगाला योग्य नाहीं, दिव्याच्या ज्योतीवर झडप घालून तिचा अपमान करणें जसें पतंगाला श्रेयस्कर नाहीं, त्याप्रमाणें प्रभूच्या अर्हणेची (पूजेची) अवज्ञा करणें जीवाला (प्राण्याला) उचित नाहीं. ईश्वराच्या पूजेची

मधुर वदा, प्रियचि करा, प्रभु पूजा परम शुद्धभावानें, ।
तत्प्रिय हें कीं, भावांसह न करावेंचि युद्ध भावानें.' ॥ १९
तों [१]दुर्योधन बोले, 'ताता! मज हेंचि युक्त भासतसे, ।
अन्नाच्छादन देउनि पाळावे पांडुपुत्र [२]दासतसे. ॥ २०
उडतात शत्रु ज्याच्या सामर्थ्यें [३]त्यासि [४]आंकळायाचा ।
योग उद्यांचि असे, [५]हा मं[६]त्र नव्हे केशवा कळायाचा. ॥ २१
[७]बलिविवरवसति जसि तसि चिर अनुभवु कृष्ण एकला खोली, ।

---

हेळसांड करणें हें प्राण्यांस हितकर नाहीं. कृष्णाचा सत्कार करा अथवा नका करूं, परंतु त्याची अवज्ञा करूं नका—असा भाव. (अ० ८८ श्लो० ८.)

१. या प्रसंगींचें दुर्योधनाचें भाषण पुढील उताऱ्यांत विस्तारानें दिलें आहे तें असें:— "ऐकोनी भीष्मवाक्य ऐसें । बोले दुर्योधन आवेशें । रायें निरोपिलें जैसें । कृष्ण-उपचारालागोनी ॥ १ ॥ त्यांतील मी एकचि अर्थ । नेदीं कृष्णासी मी यथार्थ । नेदीं ग्राम देश सत्य । पार्थमित्रा श्रीकृष्णा. ॥ २ ॥ मीं न मनीं कृष्णवचन कानीं । नेदीं पांडवालागीं मेदिनी । मातें मारोनियां धरणी । पांडव सुखें भोगिती. ॥ ३ ॥ कृष्णासी दिधलिया कांहीं । तो समर्पील पांडवांलागीं मही । पांडव मारिलिया पाहिजे तें ही । निवेदीन श्रीकृष्ण. ॥४॥ पांडव असतां जीवें जीत । त्याचा मित्र हा कृष्ण-नाथ । यासि न भजें किंचित । कार्य अद्भुत असे येथें. ॥ ५ ॥ याचिया कुविद्याकौटाळें । पांडव झुंज बांधिती काळें । याचेनि महिमान आगळें । पांडवांहूनि सर्वथा. ॥ ६ ॥ हाचि तयाचा धैर्यदाता । हाचि त्यां संकटीं रक्षिता । पैं द्रौपदी नग्न करितां । याणेंचि लज्जा रक्षिली. ॥७॥ दुर्वास देतां शापवचन । याणेंचि रात्रीं रचिलें अन्न । लाखागृहीं संरक्षण । याणेंचि केलें तयांतें. ॥ ८ ॥ पुढां हाचि त्यां धैर्यदाता । हाचि कारण कौरवांच्या घाता । जय सर्वदा पांडवहिता । याचेनि हस्तें येतसे. ॥ ९ ॥ याचेनि वळें पांडव सबळ । हा येथ गोविल्या एक वेळ । काय भीष्मादिक सकळ । पांडवांचें चालेल. ॥ १० ॥ हा स्व-भावें आला येथें । येथेंचि बांधलिया यातें । पक्ष भंगितां पक्ष्यांतें । तैसी गति पांडवां. ॥ ११ ॥ बंध करोनी मागील करीं । यासि घातलिया कारागारीं । पांडव पडती देशां-तरीं । वैरी परस्परें निमाले. ॥ १२ ॥ हाचि यत्न समर्थ ताता! । आठव झाला माझ्या चित्ता । पार नाहीं आमुच्या सुकृता । शत्रु अनायासें सांपडला. ॥ १३ ॥ गुप्त राखा सर्व चित्तीं । ऐकतां पळेल तो यदुपति । कार्य साधावें आजचे रातीं । सिद्धांत केला कौरवीं. ॥ १४ ॥" [मुभानंतस्वामी—उद्योगपर्व—अध्याय ३० ओंव्या ८७-१००.]
२. अ० ८८ श्लो० १२ पहा. ३. त्या कृष्णास. ४. बांधायाचा. ५. श्रीकृष्ण आमचे सभेंत आला असतां, त्याचें बंधन आम्ही करणार आहों हा मंत्र. ६. मसलत. ७. ब-लिचें (बलिनामक दैत्याचें विवर (पाताल) त्यांतील वसति=अत्यंत अंधकारप्रचुर स्थान.

वाहो शिवा शिव्यांची, [1]स्तुतिची मज नित्य एक लाखोली.' ॥ २२
[2]धृतराष्ट्र म्हणे, 'पुत्रा! न वद असें, कृष्ण सोयरा, ज्याला ।
पूजावें त्या बंधन, हें कर्म अयोग्य होय [3]राजाला. ॥ २३
[4]बंधार्ह नव्हे, आला सामार्थ वरूनि दूतपण साचें, ।
बाहेरि गमे नीरस परि अंतर मधुर [5]पूत [6]पणसाचें.' ॥ २४
भीष्म म्हणे, '[7]दुर्मंत्रित परिसावें काय यापरी तातें? ।
भजसी भस्म कराया शोकीं कुल काय या [8]परीतातें ॥ २५
प्रभुचा किजेल येणें भंग, [9]विपतिचा न कां नवा टोळें? ।
हा! हा! हा ऐसा खळ [10]सुयशाचें करिल कां न वाटोळें? ॥ २६
[11]हरसा [12]हरि प्रतापी, [13]हा होय स्पष्टदुष्ट [14]अंधकसा, ।

---

१. मज (दुर्योधनाला) [कृष्ण]स्तुतिची (मी मोठें कारस्थान रचून कृष्णाचें बंधन केलें यास्तव प्रशंसेची, माझ्या शहाणपणाच्या स्तवाची) लाखोली वाहो. [आणि आपण अंधारकोठडींत कैदेंत पडलों म्हणून कृष्ण] शिवा (देवाला, शंकराला) शिव्यांची लाखोली वाहो. भक्त देवाला बेल, तुलसीदल इत्यादिकांची लाखोली वाहतात त्याप्रमाणें कृष्ण शिवाला लाखोली वाहो, कारण स्वबंधन हें ईश्वराच्या करणीचें फळ होय. २.अध्याय ८८ श्लोक १७-१८ पहा. ३. प्रजापालकाला. ४. बंधनास योग्य. ५. पवित्र. ६. फणस नामक फळाचें अंतर मधुर आणि पूत (शुद्ध, चीक नाहीं असें) असतें. बाहेरि गमे नीरस =फणसास बाहेरून कांटे असतात त्यावरून तो आंत रसाळ असेल असें नजरेनें पाहणाराला कळत नाहीं. परि=तथापि त्याचा अंतर्भाग रसाळ असतो. कृष्णाचें बाह्य आचरण जरी मधुर आणि शुद्ध न दिसलें, तरी त्याचें अंतःकरण चांगलें आहे असें येथें धृतराष्ट्रानें दृष्टांतद्वारा सूचविलें आहे. ७. दुष्ट मसलत. ८. जो परीत (वेष्टिलेला) आहे त्यातें, ज्याचें ज्ञान दुष्टबुद्धीनें वेष्टिलें आहे त्यातें. शोकीं (शोकरूप अग्नींत) कुल (कुरुवंश) भस्म कराया या परीतातें (दुष्टबुद्धीनें घेरलेल्या दुर्योधनातें) भजसी काय?—असा अन्वय. मूळांत ही 'परीत' असाच शब्द योजिला आहे. [अ० ८८ श्लो० १९.] ९. पक्षिपति गरुडाचा. १०. सुयशाचें वाटोळें करणें=यशाचा नाश करणें, यश बुडविणें. 'वाटोळें करणें=सत्यानाश करणें. हा शब्दसमूह कोशकारांनीं लक्षांत ठेवण्यासारखा आहे. मराठी भाषेच्या विस्तृत कोशांत विशिष्ट शब्दसमूहाचें उदाहरण म्हणून या गीतीचा अथवा अर्धाचा समावेश अवश्य झाला पाहिजे. पंताच्या काव्यांत आणि विशेषतः महाभारतांत कोशकारांस उपयुक्त अशीं अनेक सुंदर पद्यें आहेत. ११. शंकरासारखा. १२. कृष्ण. १३. दुर्योधन. १४. अंधकासुरासारिखा.

[1]कुसुतहि अमृतरसचि तरि सेवुनि तूं अंतरींहि अंध कसा[2] ? ॥ २७
तुटतो [3]यन्नामें भवबंध तया हा[4] करील बंध कसा ? ।
सभ्यें सोडावाचि [5]स्वपरविकृतिकर कुसंग गंधकसा[6].' ॥ २८
'न भलें [7]भगवदवज्ञाफळ' ऐसें कळकळोनि आयकवी, ।
परि [8]न वळे, म्हणुनि [9]निघे तेथूनि, खळासि करिल काय कवी ?॥२९
[10]वृष्णिप वृकस्थलाहूनि येतां [11]भीष्मादि सुज्ञ ते सर्व ।
जन सामोरे गेले, [12]अंदुक झाला सुयोधना [13]गर्व. ॥ ३०
धरलें असतें जरि तें [14]कृष्णांबरकर्षणादि [15]आग मनीं ।
[16]आगमनिगमनुत प्रभु आदर करिता कशास आगमनीं ? ॥ ३१
'दिन[17] धन्य धन्य' ऐसें प्रभुला पाहोनि सर्व पौर वदे, ।
सर्वांसि योगिदुर्लभ दर्शन तारावयासि पौर्व[18] दे. ॥ ३२
धृतराष्ट्रगृहा नेली राजपथीं हळुहळूच [19]हरि हरितें, ।

---

१. कुसुतहि (दुष्ट पुत्र, दुर्योधनासारखा दुष्ट पुत्र) अमृतरसचि (अमृतरसाप्रमाणें) सेवुनि (मानून, समजून). २. उत्तरार्ध—पूर्वी धृतराष्ट्रानें दुष्ट मुलगा देखील अमृतरसासारखा आहे असें म्हटलें आहे त्यावर कटाक्ष ठेवून भीष्म म्हणाले— अरे धृतराष्ट्रा! जर तूं म्हणतोस तसा कुपुत्र देखील जर अमृतरसासारखा आहे तर त्या अमृतरसास सेवुनी तूं अंतरीं (आंतल्या भागीं) आंधळा कसा राहिलास?' बाहेरून तूं आंधळा आहेस पण आंत तरी उजेड पडायाचा होता, कारण अमृतरसाचें सेवन झालें होतें. ३. ज्याच्या (ज्या कृष्णाच्या) नामानें (नामग्रहणानें, नामोच्चरणानें) भवबंध (संसारपाश) तुटतो (तुटून जातो.) ४. दुर्योधन. ५. आपणाला आणि अन्याला विकार करणारा दुष्ट समागम. ६. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ७. भगवत्+अवज्ञा+फळ=श्रीकृष्ण+अमर्यादा, अपमान+परिणाम. ८. दुर्योधन भीष्मादिकांच्या उपदेशानें वळला नाहीं. ९. भीष्म तेथूनि (कौरवसभेपासून) निघे (निघाला). भीष्माचें वचन दुर्योधनानें मानिलें नाहीं म्हणून तो रागावून सभेंतून निघून गेला. (अ० ८८ श्लो० २३.) १०. यदुपति कृष्ण. ११. भीष्म, द्रोण, कृप, पौरजन, दुर्योधनरहित सकल धृतराष्ट्रपुत्र इत्यादि. १२. सांखळी. १३. गर्वानें सुयोधन कृष्णदर्शनास गेला नाहीं. वृथाभिमान हा सुयोधनास बंधरूप अंदुक (सांखळदंड) झाला. १४. द्रौपदीचें वस्त्रकर्षण इत्यादि. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत—सभापर्व—अध्याय ५ पृ० ३७-५१.] १५. अपराध. १६. वेदशास्त्रांनीं स्तुत. १७. दिवस. १८. कृष्ण. १९. घोडे.

त्यां पशु म्हणेल तो पशु, त्यांचें सकृपत्व अतुल हरि! हरि! तें.॥ ३३
भेटे धृतराष्ट्राला, तत्कृतपूजेसि बहुत भाउनि घे, ।
मग जगदीश्वर तेथुनि त्याचा निववावयासि भाउ निघे. ॥ ३४
'हरि न म्हणतां स्वधीतें ही होतीं वाणि! देवि! दुरधीतें.' ।
ऐसें म्हणतीतें सुख भेटुनि अरिपाणि दे विदुरधीतें. ॥ ३५
विदुर म्हणे, 'अमृतकरा! निववूं आलासि या चकोराला, ।

---

१. त्यां (अश्वांना) पशु (घोडे) असें जो म्हणेल तो पशु (मूर्ख) होय. कृष्णाच्या अश्वांना जो कोणी पशु असें म्हणेल तो पशु (मूर्ख) होय. त्यांचें (त्या घोड्यांचें) तें सकृपत्व (तें कृपाळुपण, रस्त्यांतून हळू हळू मंदगतीनें चालून अश्वांनीं दर्शविलेलें सदयत्व) अतुल होतें (तुलना नाहीं असें होतें). घोडे हळूहळू राजमार्गात चालत होते म्हणून पौरांला कृष्णदर्शन झालें, तेव्हां अशा कृपाशील अश्वांस जो कोणी पशु म्हणेल त्यासच 'पशु' हें विशेषण शोभतें–असें तात्पर्य. २. हे शब्द आश्चर्यबोधक आहेत. ३. त्यानें केलेल्या सत्काराला. धृतराष्ट्राच्या पुरोहितांनीं कृष्णाचा समधुपर्क सत्कार केला. [अ० ८९ श्लो० १९-२१ पहा.] ४. मानून. ५. धृतराष्ट्रगृहाहून कौरवांसह कृष्ण विदुरगृहास आला. ६. त्या धृतराष्ट्राच्या भावाचें (विदुराचें) सांत्वन करण्यासाठीं आला. ७. बंधु विदुर. ८. [हे] वाणि! देवि! (हे देवि सरस्वति!) 'हरि' न म्हणतां ('हरिः ॐ' असें वेदमंत्राच्या आरंभीं जें म्हणतात तें न म्हटलें तर) स्वधीतें ही दुरधीतें होती (उत्तम पठन केलेलीं शास्त्रें इत्यादि मंत्र देखील वाईट रीतीनें पढलेल्याप्रमाणें होतात). [सु+अधीतें=उत्तम+पढलेले (मंत्र), दुर्+अधीतें=वाईट+पढलेले; चांगले पढलेले मंत्र दुष्टमंत्रपठनाप्रमाणें अनिष्टफलदायक होतात] ऐसें म्हणतीतें विदुरधीतें (याप्रमाणें म्हणणारी जी विदुराची बुद्धि तीतें, वर सांगितलेल्याप्रमाणें बोध करणारी जी विदुरमति तिला) अरिपाणि (चक्रपाणि कृष्ण; अरि=चक्र) भेटुनि सुख दे (देता झाला). सान्वयार्थ—'स्वधीतें (सु+अधीतें) चांगलीं अध्ययनें, ही देखील, हरि न म्हणतां–देवाच्या नांवाचा उच्चार न केल्यास, दे देवि वाणि! दुरधीतें (दुर्+अधीतें) वाईट, अनिष्टफलद अध्ययनें होतीं' ऐसें म्हणतीतें (म्हणणाऱ्या) विदुर-धीतें विदुराच्या बुद्धीला (मनाला) अरिपाणि भेटुनि सुख दे. टीपा—स्वधीतें हें विशेषणाचें नाम मानून प्रथमेचें बहुवचन आहे. विवक्षाभेदेंकरून विशेषणाचें नाम मानणें व तसा प्रयोग करणें व्याकरणशुद्ध आहे व सर्व अभियुक्त भाषांतून हा प्रकार आढळतो. स्वधीत=स्वाध्याय. स्वाध्यायारंभीं 'हरिः ॐ' म्हटलें पाहिजे, नाहींतर तें अध्ययन निष्फळ होतें या संप्रदायावर प्रथमार्धांत कटाक्ष आहे. विदुर हा अत्यंत भगवद्भक्त होता ही गोष्ट प्रथमार्धाच्या योगानें सांगण्याचा कवीचा उद्देश आहे. ९. विदुरधीचें विशेषण. १०. चक्रपाणि कृष्ण. ११. हे चंद्रा. १२. या गीतींत 'रूपक' अलंकार आहे. 'अलंकारशेखरा'प्रमाणें रूपकाचे पांच भेद आहेतः—विरुद्ध, समस्त, व्यस्त, रूपकरूपक आणि श्लिष्टरूपक. [अलंकारशेखर–द्वादशमरीचि–श्लो० १.] चकोर=या शब्दाचा विग्रह असा आहेः–'चकति चं-

[1]मुक्तार्पितमालाश्री देतें त्वदास्य [2]याचकोराला. ॥ ३६

त्वद्दर्शनें सुख [3]विभो! झालें जें काय मी [4]कथूं तुज तें? ।
वा! [5]यावरीच [6]टकळा घालूनि ज्ञानिचित्तही सुजतें! ॥ ३७

[7]सुरभीच्या [8]कांसेसिं न सुखें होऊनि वत्स लागावें, ।
[9]तुझियाचि दास होउनि लागावें, तुजचि [10]वत्सला! गावें. ॥ ३८

आहेत सुखी **पांडव**? देवा! आलासि काय [11]सामास? ।
खळ न वळेल झिजविला जरि करितां बोध [12]काय [13]सामास. ॥ ३९

सर्वज्ञा! जगदीशा! देवा! आलासि काय सामास? ।
[14]सा मास हंस मौक्तिक वर्णू, प्रिय फार वायसा मास. ॥ ४०

---

द्रामृत पायित्वाद्विषं प्रतिहंति । चक् तृप्तौ प्रतिघाते च चकोरः । चकति तृप्यते ज्योत्स्नाया इति **चकोरः** ॥ इति स्वामी' [काश्मीरमहाकविश्रीजगद्धरभट्टकृत स्तुतिकुसुमांजलि–पृष्ठ १२३ स्तोत्र ९ वें श्लोक ४९ राजानकरत्नकंठविरचित टीका.]

१. मुक्ता+अर्पित+माला+श्री=मोत्यें+ओंविली, दिली+माला+लक्ष्मी, शोभा=मोत्यें जींत ओंविलीं आहेत अशा माळेची शोभा; मोत्यांच्या माळेची शोभा. येथें 'मुक्ताफलमालाश्री' असें पद असतें तरी चाललें असतें. २. याचकांचे उराला. ३. हे सर्वव्यापका देवा! [विभु='त्रैलोक्याचा स्वामी किंवा व्यापून सर्व जो राहे । यास्तव कवि म्हणति तया विभु ऐसें नाम जाहलें आहे. ॥ ८० ॥' नामार्थदीपिका–पृ० ९८.] ४. अ० ८९ श्लो० २४ पहा. ५. त्वद्दर्शनावरच. ६. प्रियवस्तूचा वेध. पदार्थांवरील आसक्ति, इच्छा, छंद, ध्यास. वा! (कृष्णा!) यावरीच (त्वद्दर्शनावरच) टकला घालूनि (इच्छा ठेवून, ध्यास लागून) ज्ञानिचित्तही (सर्वसंगपरित्याग ज्यानें केला अशा ज्ञानी पुरुषाचें अंतःकरणही) सुजतें (आसक्त होतें). [एखादा खाण्याचा पदार्थ भक्षणाची इच्छा झाली आणि तो पदार्थ न मिळाला तर त्या कारणानें पोटास बेंबीलगत सूज येते. या कारणानें बोलण्याचा असा संप्रदाय पडला आहे कीं, 'त्या पदार्थासाठीं तो सुजला आहे.' सुजणें=खवखवणें, खवखव सुटणें, आशा लागणें, छंद घेणें, सोस घेणें, जीव टांगला असणें, लुब्ध होणें.] ७. कामधेनूच्या. ८. स्तनास. ९. तुझियाचि कांसेसीं दास होउनि लागावें–असा अन्वय. १०. हे दयालो! कृष्णा! वत्सल=दयालु. अंस आणि वत्स या शब्दांपुढें अनुक्रमें बल आणि दया हे अर्थ गम्य असतां 'ल'प्रत्यय होतो; जसें–अंसल=बळकट, वत्सल=दयालु, स्निग्ध. 'वत्सांसाभ्यां कामबले' (५।२।९८) असें सूत्र आहे. या आर्येंत सुरभिवत्सापेक्षांही भगवद्दासाचा महिमा थोर आहे असें कवीनें दर्शविलें आहे. सुरभीचा वत्स होण्यापेक्षां देवाचा दास होऊन तद्गुणगायक होणें श्रेयस्कर होय असें विदुरोक्तीचें तात्पर्य आहे. ११. संधि करण्यास. १२. शरीर. १३. साहा महिने. पुष्कळ दिवस–असा भाव. १४ सहा महिनेपर्यंत जरी हंसानें मोत्यांची स्तुति केली तरी तें वायसाला प्रिय व्हावयाचें नाहीं, त्याला

तव अवमान करावा ऐसें याच्या असे मनीं कांहीं, ।
परि होसि प्रेमांनीं बद्ध, न दुष्टाचिया अनीकांहीं. ॥ ४१
भीष्मद्रोणव्यासप्रभृति सकळ भागले महाभाग, ।
विश्वगुरो! करुणाब्धे! तूंहि खळा कथुनि हित पहा, भाग.' ॥ ४२
विदुरासि भेटल्यावरि भेटे सर्वाप्तराज कुंतीतें, ।
जीस असुख सह्य गमे दे जें भेदूनि हृदय कुंती तें. ॥ ४३
वैकुंठाच्या कंठीं घालूनि मिठी रडे पृथा आर्या; ।
ब्रह्मासहि गहिंवरवी महिवरवीरेंद्र पांडुची भार्या. ॥ ४४
प्रभुला म्हणे, 'मुकुंदा! बा! तूं करिसी सुखी सखेदास, ।
संप्रति आहेत कसे मद्बालक जे तुझे सखे दास? ॥ ४५
म्हणती, 'नृपर्षि पुण्यश्लोक कवि शरण्य' वासरा ज्याला ।
आहे कैसा? झाला ज्या प्राप्त अरण्यवास राजाला. ॥ ४६
खळमलजलबल विश्रुतवीर्य वृकोदर कसा असे आजी? ।

---

मांसच गोड वाटावयाचें. बिचाऱ्या कावळ्याला मोत्यांची चव काय कळणार? पक्षीं; दुष्ट दुर्योधनपक्षीय जनाला साम रुचणार नाहीं—असा भाव.

१. सेनांहीं. २. प्रमुख. ३. थकले. ४. थोर, श्रेष्ठ, ज्ञानी, महामनस्क, उदारधी, महानुभाव. ५. श्रम कर. ६. सर्व+आप्त+राज=सकल+हितचिंतक+श्रेष्ठ. (कृष्ण.) ७. दुःख. ८. सोसण्याजोगें. ९. कुंत (भाला) ज्याच्या हातांत तो. भाला धारण करणारा, भालेकरी. १०. कृष्णाच्या. ११. ब्रह्मस्वरूपी श्रीकृष्णास. निर्विकार अशा ईश्वरालाही. १२. महि+वर+वीर+इंद्र=पृथ्वी+पति+शूर+श्रेष्ठ=राजांत श्रेष्ठ व वीरांत श्रेष्ठ (अशा पांडुनृपाची पत्नी). १३. कुंती कृष्णाला म्हणाली. [अ० ९०.] १४. मुक्ति देतो तो मुकुंद. (मुक्तिं ददातीति मुकुंदः.) येथें 'मुकुंद' हें पद योजण्याचें स्वारस्य वरील अर्थावरून स्पष्ट कळून येतें. कृष्ण हा पांडवांला अथवा भक्तांला दुःखापासून मुक्त करणारा म्हणून 'मुकुंद' होय. ['भक्तांस मुक्ति देतो म्हणवूनि मुकुंद नाम हें त्याला.' नामार्थदीपिका—पृ० ५८.] १५. खेदयुक्तास. हें पंतांचें ठरींव यमक आहे. १६. मित्र. १७. नृप+ऋषि=राजन्+ऋषि=राजर्षि. १८. वत्साला. १९. धर्मराजाला. ज्या राजाला अरण्यवास प्राप्त झाला [तो] कैसा आहे?—असा अन्वय. ज्या माझ्या वासराला (वत्साला—धर्मराजाला) [लोक] नृपर्षि, पुण्यश्लोक, कवि (पंडित), शरण्य (शरणागताचें रक्षण करणारा), असें म्हणतात तो धर्मराज सुखरूप आहे ना?—असें म्हणण्याचें तात्पर्य. २०. दुष्टशत्रुरूप मलाविषयीं उदकरूप बल ज्याचें असा, दुर्जनरूप मलाला जलरूप बल (सामर्थ्य) ज्याचें असा. (भीमाचें विशेषण.) २१. श्रुत (प्रसिद्ध) आहे वीर्य (पराक्रम) ज्याचें. २२. आज.

[1]आ जीवना पसरित्ये विकला अभिमन्युची जया [2]आजी. ॥ ४७
ज्याचा [3]प्रतापपावक [4]खळदितिदनुतनुजबलयवस खातो, ।
आहे कसा? [5]कसा जो [6]पुररिपुच्या [7]उतरला तव सखा तो. ॥ ४८
जे म्हणती, 'स्वर्गाला गेली कुंतीच, [8]मीय हे माद्री,' ।
आहेत कीं सुखी [9]ते वत्स [10]गुणामरनिकाय [11]हेमाद्री? ॥ ४९
[12]प्रियसुतविरह सुदुःसह, [13]देहविरह बहु बरा सुसह, [14]देवा! ।

---

१. जया (ज्या भीमाला, भीमापाशीं) जीवना (उदकाला) विकला (व्याकुळ झालेली, दुःखिता, पीडिता) अभिमन्युची आजी (कुंती) आ पसरित्ये (आ पसरून उदक मागते). २. कुंती. येथें 'पर्यायोक्त' अलंकार आहे. ३. हें 'रूपक' अलंकाराचें उदाहरण आहे. या पद्याच्या उत्तरार्धांत अर्जुनाचें वर्णन पर्यायानें केलें आहे म्हणून हें 'पर्यायोक्त' अलंकाराचें उदाहरण समजावें. ४. दुष्टदैत्यदानवबलरूपतृण. ५. कसोटीस. ६. पुर राक्षसाचा शत्रु (शिव) त्याच्या. शिवाला 'त्रिपुरांतक' अशी संज्ञा आहे. तीन धातूंच्या पुरांचा अंतक (संहारक) तो त्रिपुरांतक. पुरांचा (तीन पुरांचा) रिपु (शत्रु) त्याच्या. ७. कसा उतरणें= कसाला उतरणें, कसोटीला उतरणें, खात्रीलायक, पुरा ठरणें. ८. ही कुंती माद्रीच होय. जी आहे हीच माद्री होय. ९. नकुल सहदेव. १०. गुणरूप देवाचें गृह. ११. मेरुपर्वत. १२. पूर्वार्धांत 'ह'काराची आवृत्ति अनेकवार झाली आहे म्हणून 'ह'काराचा 'वृत्त्यनुप्रास' आहे. तसेंच 'विरह–सह, विरह–सह' ही छेकानुप्रासाची जोडी आहे. उत्तरार्धांत 'स्व-बहिश्वरासु सहदेवा' हें रूपक आहे. 'देहविरह बहु बरा (कारण) तो सुसह (आहे)' हा 'अनुज्ञा' नामक अलंकार समजावा. सर्व गीति ही तर उत्तम स्वभावोक्ति आहे. याप्रमाणें या गीतींत शब्दालंकार आणि अर्थालंकार यांचें मिश्रण होऊन तिला अत्यंत चित्तवेधकत्व प्राप्त झालें आहे. एकंदर कुंतीचें भाषण स्वभावोक्ति असून तें फार हृदयंगम उतरलें आहे. [अनुज्ञा=जेव्हां दोषयुक्त वस्तूंत गुणाचा भास होतो आणि ती दोषयुक्त वस्तु त्या गुणामुळें इष्ट अशी वाटते, तेव्हां 'अनुज्ञा' नामक अलंकार होतो. याचें लक्षण 'रसगंगाधरां'त दिलें आहे तें:—'उत्कटगुणविशेषलालसया दोषत्वेन प्रसिद्धस्यापि वस्तुना प्रार्थनमनुज्ञा' [काव्यमाला १२; रसगंगाधर–पृष्ठ ५१०.] (२) 'दोषस्याभ्यर्थनानुज्ञा तत्रैव गुणदर्शनात्' [कुवलयानंद.] दोषामध्यें गुण आहे असें समजून त्या दोषाची इच्छा करणें असें जेथें वर्णन असतें तेथें 'अनुज्ञा' अलंकार होतो. जसें 'विपत्तींत ईश्वरनामस्मरण घडतें म्हणून आम्हाला विपत्ति सदां असो' या वाक्यांत विपत्तीच्या ठिकाणीं गुण आहे असें वाटून ती असावी अशी इच्छा दर्शविली आहे. "भीम म्हणे, 'दादाजी! केली दुर्योधनें दया वाटे, । हे पाय पाहतों मी कैसे? जरि लागतों न या वाटे.' ॥ ६७ ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–वनपर्व–अध्याय ५ पृष्ठ ८३.] हा अलंकार फारसा व्यापक नाहीं.] १३. देहाचा नाश. १४. हे श्रीकृष्णा!

पावेन मी कधीं? बा! म्हणतें [1]स्वबहिश्चरासु सहदेवा? ॥ ९०
वत्सा! सहदेवा! मी मेल्या, त्वां 'हाय!' नच वदावें हो! ।
तेरा पळेंहि नसती माता, हें [2]हायन [3]चवदावें हो. ॥ ९१
श्रीकृष्णा! [4]श्रीकृष्णा कैसी आहे? [5]असें मज न पुसवे, ।
कीं तीच्या [6]कुसव्यानें लाजविलें स्पष्ट आमुचे कुसवे. ॥ ९२
ते काय रक्षिती त्या व्यसनीं पांचहि न एकलीला जे? ।
बहु लाजल्या [7]सुतवती, तीस न, हे मात्र एकली लाजे. ॥ ९३
तूं नाथ रमानाथ प्रद्युम्नहि नाथ सत्य हें नातें ।
असतां पृथा रडावी, [8]व्हावें धड एक सत्य हें ना तें. ॥ ९४
बहु येतें [9]तेज म्हणुनि तुझिया रमतात विप्र भजनातें ।
[10]खलहृतसर्वस्व तुझे सेवक गमतात [11]विप्रभ जनांतें. ॥ ९५

---

१. स्व+बहिश्चर+असु=माझ्या बाहेर फिरणाऱ्या प्राणरूप (सहदेवास). २. वर्ष. ३. मुलाचा विरह सहन करून तेरा पळें इतका अवकाशपर्यंतही खरी आई जीवंत राहूं शकणार नाहीं आणि मी तर तेरा वर्षेपर्यंत जीवंत आहें. अशी निर्दय आई जर मृत झाली तर तिच्यासाठीं मुलानें कां रडावें? अर्थात् रडूं नये. माझा प्रकार तसाच आहे, यास्तव मी मेल्यें असतां सहदेवानें 'हाय हाय' असा शोकोद्गार काढूं नये. मी पुत्रवियोगानंतर तेरा वर्षे वांचल्यें म्हणून मी 'माता' या पूज्यतम नांवाला योग्य नाहीं–असें तात्पर्य. ४. द्रौपदी. 'श्रीकृष्णा! ती कृष्णा' असाही पाठ आहे. ५. हें इंग्लिश साहित्यशास्त्राप्रमाणें Paralepses नामक अलंकाराचें उदाहरण आहे. ६. कुशीनें. ७. पुत्रवती. 'जे पांचही एकलीला त्या व्यसनीं न रक्षिति ते काय? तीस सुतवती बहु लाजल्या, न हे एकली मात्र (बहु) लाजे. कुंती म्हणते–मला मुलगे पांच. पण ते पांच असूनही त्या एकटीचें (द्रौपदीचें) त्या (वस्त्रहरणरूप) व्यसनीं (संकटीं) त्यांच्यानें रक्षण न झालें तेव्हां ते मुलगे काय कामाचे? सुतवती स्त्रिया त्या द्रौपदीस बहु (पुष्कळ) लाजल्या नसतील जितकी हे (ही) एकली (एकटी) मात्र, म्हणजे मी स्वतः लाजतें व लाजलें. कुंतीचा म्हणण्याचा आशय स्पष्ट आहे. ८. चतुर्थ चरण–हें किंवा तें यांपैकीं एकही धड सत्य ना व्हावें (याला काय म्हणावें?) हें म्हणजे माझें व तुमचें नातें आहे ही गोष्ट. तें म्हणजे तुमचें (कृष्ण व प्रद्युम्न यांचें) समर्थत्व (नाथत्व) ही गोष्ट. या दोन्ही गोष्टींपैकीं एकही गोष्ट धड खरी झाली नाहीं. ९. तुझिया भजनातें बहु तेज येतें म्हणुनि विप्र रमतात= तुझें भजन केल्यानें पुष्कळ तेज प्राप्त होतें यास्तव तुझ्या भजनांत पुष्कळ द्विज रममाण होतात. १०. दुष्टांनीं सर्वस्व (सकल धन) ज्यांचें हरण केलें असे (तुझे सेवक=दास पांडव). ११. निस्तेज.

[1]मृत्युंजयाश्रितांच्या प्राणांहीं बा! कसा रमे यम रे!? ।
दैवें[2] तुजपुढें प्रभु हें, चित्र[3] हरि[4]पुढें न सारमेय[5] मरे.' ॥ ९६
प्रभु अश्रु[6] पुसोनि म्हणे, 'जें संकल्पित[7] घडेल सत्वर तें. ।
आत्याबाई! कवणें ऐसे श्रम भोगिले न सत्वरतें[8]. ॥ ९७
मच्चित्त कौरवांचे चिंतूनि असाधुवाद[9] तळमळतें, ।
असतों मीं तैं[10], तरि न व्यसनमळें[11] धर्मपादतळ[12] मळतें[13]. ॥ ९८
आहेत त्वत्पुत्रा पुण्यश्लोका[14] बुधा सुर सहाय, ।
होइल कीर्ति, म्हणेल त्रिदशानादृतसुधासुरस[15] 'हाय!'[16] ॥ ९९

---

१. मृत्युंजयाच्या (शंकराच्या) आश्रितांच्या (भक्तांच्या). येथें 'मृत्युंजय' हा शब्द साभिप्राय आहे म्हणून हा 'परिकर'नामक अलंकार समजावा. जेथें विशेषण सहेतुक किंवा साभिप्राय असतें तेथें 'परिकर' नामक अलंकार होतो. याचीं उदाहरणें:-(१) कीं पतित पति त्यागुनि विश्वशरण्याकडे रडत वाटे । आली जी लंकाश्री तीचा तो सांजनाश्रु पथ वाटे. ॥ १४ ॥ [वनपर्व-अ० १२ पृ० १७१], (२) 'मी बाहुक सूत' असें सांग, रहा, तत्समीप सेवकसा । या व्यसनीं सेव्य नव्हे रविवंशज तो मनुष्य देव कसा? ॥ १६८ ॥ [वनपर्व-अ० ४ पृ०५७], (३) होतें सद्धर्माच्या कासेला लागतां सदा शिव, हो! । येतों, बसा, प्रसन्न प्रभु मृत्युंजय तुम्हां सदाशिव हो. ॥ २७ ॥ [वनपर्व-अ० १३ पृ० २००.]. २. हें आमुचें दुर्दैव. ३. आश्चर्य. ४. सिंहापुढें कुत्रा मरत नाहीं हें आश्चर्य आहे. ५. कुत्रा. ६. पृथेचें अश्रु. ७. इष्ट वांच्छित, जें योजिलेलें आहे तें. ८. सत्वगुणसंपन्न पुरुषानें. जसे सात्विक धर्मराजानें कष्ट सोसले तसे कोणीही सोसले नाहीं. ९. दुर्भाषणें. १०. त्या कपटद्यूतप्रसंगीं. ११. संकटरूप मळानें. १२. धर्माच्या पायांचा तळ. १३. हें 'संभावना' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. 'संभावनं यदीत्थं स्यादित्यूहोऽन्यस्य सिद्धये'=असें झालें असतें तर असें होईल अशी सतर्क कल्पना करणें यास संभावना असें म्हणतात; जसें:—(१) जर शेष वक्ता असता, तर तुझ्या गुणाचें वर्णन झालें असतें, (२) आत्याबाईला मिशा असत्या तर तिला काका म्हटलें असतें, (३) मी जर ब्रह्मदेव असतों, तर कस्तूरिकामृगाच्या अंडांतून गंधगुण काढून खलाच्या जिव्हेमध्यें ठेविला असता, (४) 'तेज तुम्हां असतें तरि, उरता हाणोनि न विट लातेला, । अहितायुला न पीतां तेजस्वी दीप न विटला तेला. ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला-मोरोपंत-विराटपर्व-अध्याय १ गीति १०१ पृष्ठ २४.] १४. पुण्यकारक कीर्ति ज्यांची अशा. १५. त्रिदश+अनादृत+सुधा+सुरस=देवांनीं अनादरिलेला अमृतरूप रस तो. १६. तुझ्या मुलांची कीर्ति अशी होईल कीं ती गातांना देव सुधारसाचा अनादर करतील आणि तो अपमानिलेला सुधारस 'हाय! हाय!' असें म्हणूं लागेल. देवांना पांडवकीर्ति अमृतरसापेक्षां गोड लागेल-असें तात्पर्य. चतुर्थ चरण-[तेव्हां] सुधासुरस त्रिदशानादृत (होत्साता किंवा झाल्यामुळें) 'हाय!' [असें] म्हणेल. सुधा=अमृत. सुधेचा रंग पांढरा. कीर्तीचा रंग पांढरा. पांडवांची कीर्ति इतकी उज्वल

'आहेत [1]सदार सुखी देवि! नमस्कार हे तुला [2]सा जे.' ।
ऐसें सांगुनि वंदी, तें त्या [3]श्रितशर्महेतुला साजे. ॥ ६०
समजावुनि कुंतीतें, भेटे दुर्योधना [4]असेव्याही, ।
कीं [5]तो [6]स्वसुता [7]स्वसुता देउनियां जाहला असे व्याही. ॥ ६१
[8]लघु म्हणति जे सुयोधन दुःशासन शकुनि कर्ण [9]वेनातें, ।
[10]परिरंभपात्र केले; प्रभुचें [11]सौजन्य वर्णवेना तें. ॥ ६२
[12]पूजुनि घे प्रभु, होइल जलनिधिला तृप्तिदायक विहीर? ।
थोरपण अनंताचें अनंत वर्णील काय [13]कविहीर? ॥ ६३
'[14]भोजन करा' म्हणे शठ. देव म्हणे, 'मज कशास [15]होकरितां? ।
जेवा तुम्हींच; [16]दौटुनि आदर आग्रह कशास हो! करितां? ॥ ६४
असतों जरि [17]अन्नार्थी प्रथमचि म्हणतों 'अवश्य' मीं तुजला, ।

---

होईल कीं तिच्या पुढें देवांना सुधेचा रंग आवडणार नाहीं (अनादृत होईल) म्हणून ती सुधा 'हाय!' म्हणेल. अतिशयोक्ति.

१. सपत्नीक. २. सहा. द्रौपदीसहित त्या पांडवांचे जे तुजला सहा नमस्कार आहेत ते हे–असें म्हणून कृष्णानें कुंतीला सहादां वंदन केलें. व त्यापूर्वी पांडव सपत्नीक सुखी आहेत–असें सांगितलें. कुंतीला प्रदक्षिणा घालून कृष्ण दुर्योधनगृहीं गेला. [अध्याय ९१ श्लो० १.] ३. आश्रितांच्या सुखाला कारण. या चतुर्थ पादांत सुंदर 'पर्यायोक्त' आहे. ४. सेवावयास अयोग्य ऐशासही. ५. दुर्योधन. ६. आपली कन्या. (लक्ष्मणा.) ७. आपल्या पुत्रास. (सांबास.) ८. जे सुयोधन, दुःशासन, शकुनि, कर्ण, वेनातें (वेन नामक अत्यंत दुष्ट राजातें) लघु म्हणती (हलका म्हणती, तो वेनराजा आमच्या पुढें काय असें म्हणती) [ते कृष्णानें] परिरंभपात्र केले–असा अन्वय. ९. वेनराजातें. १०. आलिंगनाला पात्र. परिरंभ=आलिंगन. ('परिरंभः परिष्वंगः संश्लेष उपगूहनम्' इत्यमरः.) ११. सुजनत्व. १२. कृष्णानें आपली पूजा दुर्योधनाकडून करविली. कौरवांनीं केलेला सत्कार कृष्णानें स्वीकारला. [पण] जलनिधिला (सागराला) विहीर [कधीं तरी] तृप्तिदायक (तृप्ति देणारी) होईल [काय?] अर्थात् सागराची तृप्ति विहीर करूं शकणार नाहीं. असें असूनही पूजेचा स्वीकार प्रभु करतो हें त्याचें थोरपण होय. अनंताचें (कृष्णाचें) हें अनंत (अंतरहित असें) थोरपण (महत्त्व) कविहीर (कविगणांतील श्रेष्ठ असा) वर्णूं शकेल काय? [अध्याय ९१ श्लोक ८-११.] १३. कविश्रेष्ठ. १४. अध्याय ९१ श्लोक १२ पहा. १५. बलावितां. १६. 'दावुनि' असा अन्य पाठ आहे. १७. अन्नार्थी=अन्नाची याचना करणारा भिकारी. ज्यास आपत्काल प्राप्त झाला आहे तो कोठेंही अन्न घेण्यास तयार असतो तसा अन्नार्थी मी नाहीं. एकमेकांची एकमेकांवर अत्यंत प्रीति असेल तर तेथें भोजन करावें, अथवा आपत्ति आली असेल तर कोठेंतरी भोजन करावें–असा भोजननियम आहे. त्यास अनुसरून कृष्णाचें भाषण आहे. [अध्याय ९१ श्लोक २५.]

प्रेमार्थी **पां**डवसख हा अन्नाकारणें नसे सुजला.' ॥ ६५
**प्र**भुला म्हणे **सु**योधन, 'तिकडे[1] इकडेहि सम असे नातें, ।
ज्या कारणें करावा अस्मदनादर[2] तुवां असेना तें.' ॥ ६६
**दे**व म्हणे, 'केवळ ते न सोयरे, मदसु[3] सर्व वसु[4] देव, ।
मान्य जसे **अ**क्रूरोद्धवबळभद्रो**ग्र**सेनवसुदेव. ॥ ६७
जे तत्सख[5] तद्रिपु ते मत्सख मद्रिपु खरे अगा! राया! ।
द्विषदन्न[6] न सेवावें, म्यां येऊंही नये अगारा[7] या. ॥ ६८
हें काय बरें? खल हो! साधु तुम्ही सर्वकाळ जाचावे[8]? ।
सदरि असह्य मज, असा अहिहि[9] न जो सर्व काळजा चावे.' ॥ ६९
खोटा **सु**योधन म्हणुनि[10] **वि**दुरगृहा[11] जाय, देव नच खोटा, ।
गोपोच्छिष्टा[12] वळला, वळता कां **वा**सुदेव न चखोटा[13]? ॥ ७०
तैसीही तरली जी स्तन्यमिषें[14] दे बकी[15] सुतापचि[16] ती, ।
ठावी कथा, परि घडे न खळाला **दे**वकीसुतापचिती[17]. ॥ ७१

---

१. पांडवांकडे व आम्हांकडे. [आम्ही उभयतां तुम्हांस समान, उभयतांच्या कल्याणावर तुमची समदृष्टि आहे. अध्याय ९१ श्लोक १४.] २. आमचा अनादर. ३. मद्+असु=माझे प्राण. ४. द्रव्य. ते पांडव केवळ आमचे सोयरे आहेत इतकेंच नव्हे, तर ते माझे प्राण आणि सकलधननिधि आहेत, ते देव आहेत आणि वसुदेवादिकांप्रमाणें मला वंदनीय आहेत. ५. त्या पांडवांचे स्नेही. [अ० ९१ श्लो० २८] 'सखि'शब्दाला तत्पुरुषसमासांत 'सख' असा आदेश 'राजाहःसखिभ्यष्टच्' (पाणिनि–५-४-९१) या सूत्रानें होतो. ६. द्विषत्+अन्न=शत्रूंचें अन्न. ७. गृहास. हें पंतांच्या ठरींव यमकांपैकीं एक आहे. ८. साधूंचा शत्रु. ९. सर्प. १०. येथें 'म्हणून' हें कारणबोधक उभयान्वयी अव्यय समजावें. ११. अध्याय ९१ श्लोक ३३-३४ पहा. १२. गोप+उच्छिष्टा=गोपाळांच्या उष्टयाला. १३. चांगल्यास. हें प्रश्नालंकाराचें उदाहरण आहे. १४. दुग्धपानाच्या निमित्तानें. १५. बकी=पूतना. १६. अत्यंत दुःख. १७. पूतनेची कथा अशी आहेः—पूतना ही कंसाची अनुचर राक्षसी होय. हिलाच बकी अशी संज्ञा आहे. ही कंसाच्या आज्ञानुसारें गोकुलांतील लहान बालकांचा संहार करीत असे. एकदां हिनें लावण्यवती तरुणीचें रूप धारण करून नंदाच्या घरांत प्रवेश केला. परंतु तिला यशोदा आणि रोहिणी यांनीं आंत जाण्याची मनाई केली नाहीं. कारण ही कोणी सभ्य गौळण असावी असें त्यांस वाटलें. हिनें घरांत शिरल्यावर बालकृष्णाला आपल्या अंकावर घेतलें आणि त्याला स्तनपान दिलें. तिच्या स्तनांत विष भरलें होतें, हें दुग्ध प्राशन करणाऱ्या कृष्णास समजतांच त्यानें विषप्राशनाबरोबर तिच्या प्राणांचेंही प्राशन आरंभिलें. त्या योगानें तिला असह्य वेदना झाल्या आणि ती मरण पावली. हिची कथा श्रीमद्भागवताच्या दशमस्कंधाच्या सहाव्या अध्यायांत सविस्तर दिली आहे. [मोरोपंत–बृह-

द्रोण कृप भीष्म बाह्लिक सर्वस्व निवेदिती, परि न परते, ।
खलसंसर्गें प्रभुच्या अंतरले पूजना, जरि न पैर ते. ॥ ७२
प्रभु त्यांसि म्हणे, 'केली मैंदपचिति तुम्हीं, गृहासि जाच कसे? ।
चित्त प्रसन्न नसतां उँपचाराग्रह नव्हेत जाचकसे?' ॥ ७३
दुः संगनक्रदत्तक्लेश निवारूनि सर्व विदुरगजा ।
मुक्त करी हरि, लाजे गातां गुणकीर्ति सर्व विदुरग जा. ॥ ७४
विदुर प्रेमें जेंवि ब्रह्मादि कवि प्रसन्न यज्ञानें ।
प्रभुला तेंवि न करिती व्यासादिक विप्र सन्नयज्ञानें. ॥ ७५
शतसंख्य वाजवी ज्या जेववितां मायदेवकी चिटक्या, ।
तो नित्यतृप्त भगवान् विदुरगृहीं भोजनांत दे मिटक्या. ॥ ७६
आले ढेंकर, दिधल्या मिटक्या बहुसाल मारिले भुरके, ।
उरके सर्वांमागुनि अशन, परि न ताट चाटणें उरके. ॥ ७७
ज्याच्या चरणें स्वरजाकरविं प्रणतांसि मोक्ष देवविला ।
देव विलासमनुजतनु विदुरप्रेमें यथेष्ट जेवविला. ॥ ७८
भग रात्रौ एकांतीं सर्वज्ञालाहि साधुराय कवी ।

---

द्दशम–पूर्वार्ध–काव्यसंग्रहग्रंथमाला–पृ० १६-१९.] १८. कृष्णाची पूजा. [अपचिति=पूजा. 'क्षयार्चयोरपचितिः' इत्यमरः, 'भवेदपचितिः पूजाव्ययनिष्कृतिहानिषु' इति मेदिनी.]

१. द्रोणादिकांनीं कृष्णाची परत येण्याविषयीं प्रार्थना केली परंतु तो परतला नाहीं. [अ० ९१ श्लो० ३५-३६.] २. शत्रु. ३. मत्+अपचिति=माझी पूजा. ४. वाह्यात्कारीं बरें वाटण्यासाठीं केलेले आग्रह. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ५. जाचणारेसे. ६. दुःसंगरूप नक्रानें दिलेले क्लेश. ७. विदुररूप गजेंद्राला. हें 'रूपका'चें उदाहरण आहे. ८. विद्+उरग= ज्ञाता+सर्प=सर्वज्ञशेष. ९. विदुर आपल्या प्रेमानें प्रभुला जसा प्रसन्न करतो तसा ब्रह्मदेव किंवा व्यास यज्ञानें किंवा उत्तम नीतीनें प्रसन्न करीत नाहीं. १०. उत्तम नीति व ज्ञान यानें. ११. शत (शंभर) आहे संख्या ज्यांची अशा (चिटक्या=चुटक्या). १२. फार वेळ. १३. फुरके. १४. भोजन. १५. शरणागतांस. १६. लीलेसाठीं मानुषदेही. लीलेनें मनुष्यदेह ज्यानें धारण केला आहे असा. १७. गीति ७४-७८ यांतील रसाळ आणि भक्तिरसपूर्ण वर्णनास मूळांत फारसा आधार नाहीं. या ठिकाणीं लक्ष्मीसुतानें मूळ ग्रंथकारावर (व्यासावर) ताण केली आहे असें विचक्षण वाचकांस दिसून येईल. अ० ९१ श्लो ४०-४१ पहा. १८. कृष्णाला. [सर्वज्ञ हें विष्णूचें नांव आहे. 'सर्वज्ञ नाम त्याला झालें कीं तोच जाणतो सर्व' [नामार्थदीपिका–गीति १५ पृ० ९१.] 'सर्वहि जाणे यद्वा सर्वात्मा असुनि जाणता जो कीं । यास्तव सर्वज्ञ असें, कवि म्हणती नाम जाहलें लोकीं' ॥ [नामार्थदीपिका–गीति ५३ पृ० ५१]. १९. साधुवर्य पंडित (विदुर).

पाय रगडितां दुर्जनदुर्योधनदुर्मतास[1] आयकवी[2]. ॥ ७९
‘खलमंडलप्रवेश[3] प्रभुचाहि मला प्रशस्त भासेना, ।
बहुत मिळाल्या असती शत्रूंच्या दुःसहप्रभा[4] सेना. ॥ ८०
भासति पांडव जैसे तैसा मज तूंहि वत्ससा स्नेहें, ।
अनुकारितसे[5] सतत सकंपत्वें[6] हृदय वत्ससास्ना[7] हें.’ ॥ ८१
देव म्हणे, ‘वांछिसि हित, वांछावें जेंवि मायबापानीं, ।
जें शिव[8] सदुक्तिपानीं[9] तें अमृताच्याहि काय बा! पानीं[10]? ॥ ८२
सुख यश नसे विरोधीं, सुमति[11] रमति सुखयशोजनकसामीं[12], ।
आलों करावया उपदेश, उपेक्षूं सुहृज्जन कसा मीं? ॥ ८३
वळतील[13], अपयशें तरि या सर्वांचीं मुखें न मळतील, ।
चळतील नीतिमार्गीं, धर्मक्षोभानळांत[14] जळतील. ॥ ८४
म्हणतां सुहृदुत्तम[15] मज, मग म्यां समयीं कसें न राखावें? ।
विदुरा! वाइट वाटे कुलजाहि[16] असद्रसें[17] नरा खावें[18]. ॥ ८५
बहुकामकोपलोभां उग्रां असुरां समस्त सुर भीती, ।

---

१. या अर्थात ‘द’काराची आणि ‘र’काराची अशी दोन व्यंजनांची आवृत्ति तीनदां झाली आहे म्हणून हा छेकानुप्रास समजावा. २. कळवी. अध्याय ९२ यांत श्रीकृष्णविदुरसंवादाचें वर्णन आहे. ३. दुष्टांच्या मंडळांमध्यें शिरणें. [हे कृष्णा! ह्या पापचेतस कौरवांच्या सभेमध्यें तुझें शिरणें मला रुचत नाहीं—असें मूळांत आहे. अ० ९२ श्लो० १६-१७.] गीति ८०-८१ यांत विदुरोक्ति आहे. कृष्णानें कौरवमंडळांत जाऊन त्यांस साम करण्याविषयीं उपदेश करणें ठीक नाहीं असें विदुर कृष्णाला सांगत आहे. ४. असह्य तेज ज्यांचें ऐशा. ५. समान होत असे, अनुकरण करतें. ६. चंचलपणानें. हें माझें विदुराचें हृदय सतत सकंपत्वें (सदा कंपित झाल्यामुळें) वत्ससास्ना अनुकारितसे—असा अन्वय. हें माझें हृदय भीतीनें सतत कंपित होत आहे व तें वासरांच्या गळ्याखालील कातड्याचें अनुकरण करीत आहे. ७. वासराच्या गळ्याखालचे हालणारे कांबळेला. सास्ना=गोजातीच्या गळ्यास लोंबणारें जाडें चांमडें, कांबळ, पोळी, गळकंबळा. [‘सास्ना तु गलकंबलः’ इत्यमरः.] ८. कल्याण, हित. ९. साधूच्या भाषणाच्या प्राशनांत. १०. प्राशनांत. जें शिव सदुक्तिपानीं आहे तें अमृताच्या पानीं नाहीं—असें तात्पर्य. हें प्रश्नालंकाराचें उदाहरण होय. ११. उत्तम मती ज्यांची. १२. सुख-यश-उत्पन्न करणाऱ्या एकोप्यांत. १३. जर हे दुर्योधनादि कौरव वळले तर. १४. धर्मराजाच्या क्षोभरूप अग्नींत. १५. उत्तम स्नेही. १६. कुलीन पुरुषाला वाईटाच्या गोडीनें घेरून टाकावें याचें मला वाईट वाटतें. १७. वाईट रसानें, असत्याच्या प्रीतीनें. १८. ग्रासावें, घेरून टाकावें.

हे व्याघ्रचि बा! विदुरा! जी कीर्ति स्पष्ट होय सुरभी[1] ती.' ॥ ८६
पंगुहि मेरुवरुनिहि न माथां धरितां यदंघ्रिरज[2] निसरे, ।
त्या दीनबंधुची ती चिंता[3] न सरे, परंतु रजनि[4] सरे. ॥ ८७
प्रात:काळीं सशकुनि दुर्योधन ये स्वयें बहायाला[5], ।
प्रातर्विधि[6] करुनि प्रभु जाय प्रज्ञांवका[7] पहायाला. ॥ ८८
स्वस्वीकृति[8] करितां शुचि यश फोडिल कां न हाक विदुरापें[9]? ।
कीं त्यासि घे रथीं तो यच्चरणरजें महाकविदुरापें[11]. ॥ ८९
जनदृष्टि चातकी जी तूर्यरवेंकरुनि[12] देत ओ तीतें, ।
प्रभुमेघ[13] दर्शनामृत[14] दुर्लभ जें तन्मुखांत[15] ओती तें. ॥ ९०
ज्याच्या दयातरीनें[16] स्वमनोरथसागरांत[17] सुरभि[18] तरे[19], ।
केले धीट जयाच्या स्मृतिकवचें[20] वासवादि[21] सुरे[22] भितरे, ॥ ९१

---

१. कामधेनु. २. ज्याचें चरणरज. यदंघ्रिरज माथां धरितां पंगुहि मेरुवरुनिहि न निसरे–असा अन्वय. ३. कौरवांच्या हिताविषयीं कृष्णाची चिंता. ४. विदुर व कृष्ण हे कौरवपांडवांचा विग्रह न होतां साम व्हावें याविषयीं बोलत असतां रात्र सरली. [अ० ९३ श्लो० २२ व अ० ९४ श्लो० २-३.] ५. बोलावण्याला. ६. प्रातर्विधि=स्नानाचमनादि, अनुजप्य, संध्योपासनादि कर्म. [अ० ९४ श्लो० ६ टीका.] ७. धृतराष्ट्राला, प्रज्ञाचक्षूला. (प्रज्ञा+अंवक=बुद्धि+नेत्र.) ८. आपला स्वीकार. ९. [शुचि यशाचा स्वीकार जर कोणी करील तर त्याजपाशीं शुचि यश हांक मारीत धांवत कां येणार नाहीं? अवश्य येईलच.] स्वस्वीकृति करितां (आपला स्वीकार विदुरानें केला असतां) विदुरापें (विदुरापाशीं) शुचि यश (विमल यश) हांक कां न फोडिल? (हांक मारीत कां येणार नाहीं?) [अर्थात् हांक मारीत विदुराकडे शुचि यश अवश्य येईल.] यच्चरणरजें (ज्या प्रभुचीं चरणरजें) महाकविदुरापें (मोठ्या ज्ञात्यालाही दुष्प्राप) तो (कृष्ण) त्यासि (त्या विदुराला) रथीं घे (आपल्या रथांत घेता झाला) कीं (कारण असें कीं) विदुरानें शुचि यशाची स्वीकृति केली होती. १०. विदुरापाशीं. ११. ज्ञान्यालाही दुष्प्राप. १२. वाद्यांच्या शब्दानें. १३. श्रीकृष्ण हाच मेघ. १४. दर्शन हेंच अमृत (उदक). १५. त्या जनदृष्टिरूप चातकीच्या तोंडांत. जनदृष्टि जी चातकी तीतें प्रभुमेघ तूर्यरवें करुनि 'ओ' देत जें दुर्लभ दर्शनामृत तें तन्मुखांत ओती–असा अन्वय. हें रूपकाचें उदाहरण आहे. १६. कृपारूप नौकेनें. १७. आपल्या वासनांच्या समुद्रांत. ज्याच्या कृपेनें कामधेनु सफलमनोरथ होते–असा भावार्थ. येथें परमेशाच्या दयेची महती कामधेनूपेक्षां थोर आहे असें सूचविलें आहे. १८. कामधेनु. १९. गीति ९१-९२ यांचें युग्म आहे असें समजावें. २०. स्मरणरूप कवचानें. (चिलखतानें). २१. इंद्रादि. २२. देव.

[1]जो [2]पर-महित, [3]परम-हित-[4]पर महितरि[5]कर्णधार, [6]यदुपकृती, ।
बहु जीवांवरि,—पावे तो त्या **कौरवसभेसि यदुप** [7]कृती. ॥ ९२
जातांचि [8]सभेंत नभीं [9]देवर्षिप्रमुख देखिले विप्र, ।
प्रभुनें [10]सत्कारविले **भी**ष्माकरवीं महामुनि [11]क्षिप्रें. ॥ ९३
**भी**ष्में धांवोनि पुढें जाउनि अत्यादरें पदीं नमुनी, ।
पूजुनि [12]वरासनीं बहु तोषविले ते [13]दयानदीन मुनी. ॥ ९४
मग जी [14]जलदश्यामा [15]करुणा बसली [16]नवासनावरि ती, ।
[17]जीच्या उपासकजनाप्रति विषयाच्या न वासना वरिती. ॥ ९५
केवळ जवळ बसविला **विदुर** प्रेमें करूनि [18]**मा**पानें, ।
तद्यश न मोजवेल ब्रह्मांडायेवढ्याहि मापानें. ॥ ९६
झाले प्राप्त **कुरु**सभेमध्यें त्या दुर्लभा [19]अवसरा जे, ।
आले शतजन्म करित ते [20]**श्री**गौरीश्वरा नवस राजे. ॥ ९७

---

१. सान्वय अर्थ—जो पर-महित=मोठमोठ्या लोकांनीं स्तविलेला, पूजिलेला; [परैः महद्भिः महितः पूजितः] जो परम-हित-पर=उत्कृष्ट, आत्यंतिक जें हित=श्रेय, त्याविषयीं तत्पर=तयार, लोकांचें अत्युत्कृष्ट कल्याण करण्याविषयीं जो तयार; जो महितरिकर्णधार=पृथ्वीरूप तरि=नौका, तिचा कर्णधार=सुकाणूं चालविण्यास, या भवसमुद्रांतून पृथ्वीरूप नौका पैलतीरास नेऊन पोंचविण्यास, समर्थ असा नावाडी; [महि=पृथ्वी; कर्णधार=नाविक.] यदुपकृती जीवांवरि बहु=या जीवांवर=जीवकोटीवर ज्याचे उपकार अनंत झाले आहेत;—असा तो यदुप=यदुनाथ कृष्ण कृती=शहाणा, हुशार, कुशल असा त्या कौरवसभेसि पावे=पोंचला. पूर्वार्धांत अनुप्रास पाहण्याजोगे आहेत. २. श्रेष्ठांनीं पूजित. ३. अत्यंत हितकारक. ४. आसक्त, तयार. ५. नावाडी. ६. ज्याचा उपकार. ७. कुशल. ८. कौरवसभेंत जाऊन जांबूनदपरिष्कृत सर्वतोभद्र आसनावर बसून पूजा घेतल्यावर. ९. नारदप्रमुख ऋषि. (अध्याय ९४ श्लोक ४१.) १०. पार्थिवांच्या सभेला पाहण्यास उत्सुक अशा ऋषिजनांचा सत्कार भीष्माला सांगून कृष्णानें करविला. ११. तात्काळ. १२. उत्तम आसनीं. १३. दयासागर. दया+नदी+इन=करुणा+नदी+स्वामी=कृपासागर. १४. मेघश्यामा. १५. करुणेची मूर्तिच जो कृष्ण. १६. नव्या आसनावरि. १७. ज्या करुणेच्या (कृपामय कृष्णाच्या) उपासकजनाप्रति (सेवकजनाला) विषयाच्या वासना (ऐहिक सुखभोगेच्छा) न वरिती (न स्वीकारती)=ज्या कृष्णाच्या भक्तांस विषयभोगेच्छा नसतात—असा भावार्थ. १८. मा+प=लक्ष्मी+पालक=माप; मापानें=लक्ष्मीपतीनें. १९. समयास. २०. श्रीगौरीपतीला, श्रीशंकराला.

[1]टकमक पाहत होते प्रभुमुखचंद्राकडेचि [2]चातकसे, ।
नसतील जोडिले [3]श्रवणांहिं बसाया मनासि हात कसे? ॥ ९८
सभ्य [4]श्रुतिवदनातें पसरिति सेवावया [5]भगवदुक्ती, ।
[6]प्राशावयासि जेंवि [7]स्वच्छस्वात्यंबुला [8]जलधिशुक्ती. ॥ ९९

---

## अध्याय आठवा.

देव [9]म्हणे, 'धृतराष्ट्रा! राया! मोठी जगीं तुझी पदवी, ।
[10]पदं विद्यांचें तूं, परि [11]परिस, मज बळेंचि आप्तता वदवी. ॥ १

---

१. 'टकमक' या शब्दाला अनुकरणवाचक शब्द म्हणतात. अशा शब्दांचीं अनेक रूपें असतात–जसें चरचरां, चराचर, इत्यादि. "या अशा अनुकरणरूप शब्दांचा या महाराष्ट्र भाषेंत जितका भरणा असेल तितका, मला वाटतें, आणखी कोणत्याही भाषेंत नसेल, आणि तो या भाषेचा केवळ असाधारण जिव्हाळा होऊन राहिला आहे; गति, वेग, मांजुल्य, कार्कश्य, सौंदर्य, परिमिति इत्यादि क्रियेचे शतावधि प्रकार दाखवायाचे असतां, त्या त्या अनुकरणरूप शब्दांचा प्रयोग होतो. जसें:—**झटझट** चालतो; **चमचम** लवलें; **टकमक** पाहलें; **झणझण** वाजतें; **बद्बद** पडतें; **टपटप** झरतें; **भडभड** ओकतो; **तडतड** बोलतो; 'छडी वाजे **छमछम,** विद्या येई **घमघम.**" (दादोकृत व्याकरण.) **पं**तांनीं असे अनुकरणवाचक शब्द योजून कोठें कोठें मोठी बहार करून दिली आहे. अशा स्थळीं अर्थ आणि ध्वनि हे परस्परांस इतके अनुरूप आणि अनुगुण आहेत कीं त्यांवरून **पं**तांचें समर्पक शब्दरचनाचातुर्य आणि भाषापतित्व हे गुण सुव्यक्त होतात. २. 'येथें चंद्राच्या संबंधानें चकोर पद पाहिजे; परंतु प्रास साधण्याच्या व्यवधानांत चातकपद योजण्याचा प्रमाद कवीच्या हातून झाला असावा.' [नवनीत.] 'प्रभुमुखचंद्राकडे' या स्थानी 'प्रभुमुखमेघाकडे' असें पद असतें तर चातकाचा संबंध नीट जुळता. ३. उत्तरार्ध–त्या वेळीं श्रवणांहिं (कानांनीं) मनास (स्वस्थ) बसायास हात कसे नसतील जोडले? खचित जोडले असतील. मन चंचल असल्यामुळें तें स्वस्थ बसणार नाहीं म्हणून त्या वेळीं कृष्ण काय बोलतो तें ऐकावें म्हणून मनाला कानांनीं विनवलें नसेल काय? ४. कान आणि मुख यांतें. कर्णविवराला, कान हींच वदनें त्यांतें. ५. भगवंताचें भाषण. ६. पिण्यासाठीं. स्वातिनक्षत्राच्या निर्मल उदकाला पिण्यासाठीं ज्याप्रमाणें समुद्रांतील शुक्ति आ पसरतात त्याप्रमाणें भगवान् कृष्णाचें भाषण ऐकण्यास सकल सभ्य (सभाजन) उत्सुक होते. ७. स्वच्छ+स्वाति+अंबु=स्वच्छ स्वातीच्या उदकाला. निर्मल अशा स्वातीच्या उदकाला. ८. समुद्रांतील शिंपी. ९. अध्याय ९५ यांत श्रीकृष्णोक्ति आहे. १०. स्थान, आधार. ११. ऐक.

[१]श्रुतवृत्तादिसुगुणगणमंडितकुळसन्नृपांत हे [२]महित, ।
जे झाले, त्यांत तयां गमलें बहु यशचि हित, न हेम[३] हित. ॥ २
जें मेळविलें चंदनसम झिजवुनि [४]परसुखार्थ आंगातें, ।
केवळ कृपाळु [५]पूर्वजसद्यश [६]मळविसि बळेंचि कां गा! तें? ॥ ३
[७]आल्हाद तुम्हां होतो, वडिलां परदुःखदर्शनें त्रास, ।
तूं [८]दाविसि अनुकंपा न, शशिकळा जेंवि [९]दर्श नेत्रांस. ॥ ४
[१०]कौरव करीत आले बहु यत्न [११]परासुखप्रहाणातें, ।
ऐसें [१२]कारुण्यकुलव्रत सोडिल कोण गा! शहाणा तें? ॥ ५
दुःख परासि न द्यावें, सत्य वदावें, क्षमा न सोडावी, ।
जोडावी कीर्ति, असी [१३]कुलरीति तुम्ही कधीं न मोडावी. ॥ ६
केले गुप्त प्रकट व्यवहार [१४]अनर्थहेतु [१५]तनयानें, ।
ते कां न वारिले त्वां? कैसें होईल कुशल [१६]अनयानें? ॥ ७
जी वेश्या बुध वरिल [१७]त्यजुनि [१८]अमर्यादरा जनीं तीतें? ।

---

१. श्रुत (शास्त्रज्ञान) वृत्त (सदाचार) आदि (प्रमुख) सुगुणगण (उत्तमगुणसमुदाय) [यानें] मंडित (भूषित, अलंकृत) [जें] कुळ [त्यांतील] उत्तम राजांत. २. पूज्य. ३. सुवर्ण (धन). ४. दुसऱ्याच्या सुखासाठीं, परोपकारार्थ. ५. वाडवडिलांचें उत्तम यश. ६. दूषित करिशी. ७. परदुःखदर्शनें तुम्हां आल्हाद होतो [आणि] वडिलां (तुमच्या पूर्वजांना) [दुसऱ्याचें दुःख पाहून] त्रास [होत असे.] येथें 'परदुःखदर्शनें' हें पद उभयान्वयी आहे. ८. जेंवि दर्श (अमावास्या) शशिकला (चंद्राची कला—कोर) नेत्रांस (डोळ्यांला) [दाखवीत नाहीं] [तेंवि] तूं (हे धृतराष्ट्रा!) [पांडवासारख्या शीलसंपन्न जनाला] अनुकंपा (दया) न दाविसि—असा अन्वयार्थ. अमावास्येच्या दिवसीं जसें चंद्रदर्शन होत नाहीं तसें तुझ्या आंगीं दयेचा लवलेश दिसत नाहीं असें म्हणण्याचें तात्पर्य. ९. अमावास्या. १०. कुरुवंशीय राजे. ११. पराचें असुख (दुःख) त्याचें प्रहाण (नाश) त्याविषयीं. १२. दुसऱ्यावर करुणा करण्याचें कुलव्रत. १३. कुलाचार. १४. अनर्थास कारण असे (व्यवहार). १५. पुत्रानें (दुर्योधनानें). १६. अन्यायवर्तनानें. येथें प्रश्नालंकार जाणावा. हा चतुर्थ पाद सुभाषितरूप आहे. या व अशा उक्तीवरून पांडवाच्या काळांतील समाजिक स्थिति व नीतिनियम यांचें दिग्दर्शन होतें. १७. अमर्यादरा (अमरींचा आदर—अंगीकार, स्वीकार) त्यजुनि (टाकून—देवांगनेचा स्वीकार करण्याचें टाकून) बुध (शहाणा मनुष्य, पंडित) जनीं जी वेश्या तीतें (लोकांत जी वारांगना म्हणून प्रसिद्ध आहे तिला) वरिल? (स्वीकारील काय?) [कधीं वेश्येचा आदर करणार नाहीं, परंतु] हा अमर्याद (हा मर्यादाहीन, दांडगा, दुर्वृत्त दुर्योधन) राजनीतीतें त्यजुनि (राजनीतीचा त्याग करून) अनीतितें भजतो (अन्याय मार्गाचें सेवन करतो). १८. अमरी+

भजतो अनीतितें हा त्यजुनि अमर्याद राजनीतीतें. ॥ ८
मुख्य स्वबंधु पांडव, तन्नाशातेंचि हे [1]अकवि टपती, ।
[2]विश्वस्ता [3]मीनांतें [4]परदारांतें जसे [5]बक [6]विटपती. ॥ ९
[7]त्वन्नंदनदुर्मति हे क्षिति बुडवायासि, तापदा, [8]आली ।

---

आदर=देवांगनेचा आदर. अन्वय–अमर्यादरा (अमरी+आदरा) त्यजुनि बुध जी वेश्या (असे) तीतें जनीं वरिल (काय?) हा राजनीतीतें अमर्याद त्यजुनि अनीतीतें भजतो. अर्थ–बुध (शहाणा विचारी मनुष्य) त्याचा अप्सरा किंवा देवांगना आदर करीत असतां त्या आदरास झुगारून देऊन जी वेश्या म्हणून गाजलेली आहे तिचा जनीं (उघड उघड) स्वीकार करील काय? कधींही करणार नाहीं. पण हा (दुर्योधन) राजनीतीतें सोडून अत्यंत अनीतीतें भजतो तेव्हां हा बुध नव्हे. राजनीतीतें सोडून अनीतीतें भजणें हें अमरीकृत आदराचा त्याग करून पण्यांगनेचा स्वीकार करण्यासारखें होय. व तें दुर्योधन करतो म्हणून तो बुध नव्हे. 'अमर्याद' हें विशेषण अथवा क्रियाविशेषण समजून अर्थ केला पाहिजे.

१.मूर्ख. (दुर्योधन, कर्ण, शकुनि, इत्यादि )२.विश्वास पावलेल्या.३.मत्स्यांतें.४.परस्त्रियांतें. ५. बक जसे विश्वस्ता मीनांतें टपती व विटपती जसे परदारांतें टपती–असा येथें अनुक्रम आहे. हें 'यथासंख्य' नामक अलंकाराचें उदाहरण समजावें. जेव्हां पदार्थांचें वर्णन ज्या क्रमानें पहिल्यानें झालेलें असतें त्याच क्रमानें त्यांचा संबंध (अन्वय) पुनः दुसऱ्या पदार्थांशीं लागत असला म्हणजे **'यथासंख्य'** अलंकार होतो. शत्रूंस, मित्रांस आणि विपत्तीला जिंक, राख आणि पिटाळ' या वाक्यांत शत्रु, मित्र, आणि विपत्ति या शब्दांचा ज्या क्रमानें उल्लेख झाला आहे त्याच क्रमानें जिंक, राख, आणि पिटाळ, या शब्दांशीं त्यांचा संबंध लागला आहे म्हणून हा **'यथासंख्य'** झाला. याचीं अन्य उदाहरणें:—(१) जयभीमवधाविषयीं कर्णसुयोधन करोत बकबक रे । कैसे करितील तिमिग्रास दहनमेषभंग बक बकरे ॥ [द्रोणपर्व–अध्याय १२ गीति ९१], (२) कीचकरहित विराट स्पष्ट जसा सर्प नीरदन दीन, । अल्प अनल्प बळें तो तूं संप्रति, जेंवि नीरद नदीन. ॥ [विराटपर्व–अध्याय २ गीति ३१ पृष्ठ ४९], (३) कर्णखचरार्जुनां कां म्हणति न खद्योतरात्रिकरसविते [वनपर्व–७-९५], (४) मानी मनोजशर हार तुरे फुलांचे, कंदर्पकोपवचनें ध्वनि कोकिलांचे। राकाशशी मदनदर्पण भाविलाहे, नेघेचि तो न परिसे न तयासि पाहे ॥ [रघुनाथपंडित–नलदमयंतीस्वयंवराख्यान], (५) प्रथमचि तुम्ही तुला, शतजन्मेंहि सुदुर्लभा परा सुकृतें। संप्रति तव कर्मे परकर्मे जीवत्कृतें परासुकृतें ॥ [वनपर्व–अध्याय ६ गीति ४३, काव्यसंग्रहग्रंथमाला–वनपर्व–पृष्ठ ९८.] ६. जारश्रेष्ठ. ७. त्वन्नंदनदुर्मति हे=तुझे नंदन (पुत्र) हेच दुर्मति (दुष्ट बुद्धि) कालाच्या क्रीडेची आली (यमाच्या लीलेची सखी, यमाची मैत्रीण) क्षिति बुडवायासि (राज्याचा नाश करण्यासाठीं) तापदा आपदा (त्रास देणारी आपत्ति) तुझिया सदनांत आली (तुझ्या–धृतराष्ट्राच्या घरांत शिरली)–असा अन्वयार्थ. ८. सखी.

काळाच्या क्रीडेची, तुझिया सदनांत आपदा आली. ॥ १०
या व्यसनातें चिंतुनि मन कुदशेला भिऊनि हळहळतें; ।
शमवावें त्वां[१] प्रभुनें जेंवि शमविलें[२] पिऊनि हळहळ[३] तें. ॥ ११
स्वसुतासि शमीव नृपा[४]! स्वसख्यासह[५] शमविजेल भीमहि म्यां, ।
पुत्रा अजातरिपुच्या [६]तूं साक्षाद्गुरुहि तरिहि भी महिम्या[७]. ॥ १२
पांडव [८]करूत तुजला, त्यांही[९] सिंहांसि हे[१०] ससे नमनें, ।
देतील मत्करीं स्वप्राणासह जरिहि ते[११] ससेन[१२] मनें. ॥ १३
तूं प्रभु, सुयोधनादिक हे पुत्र तुझ्या [१३]करीं असावेच, ।
अन्यरणीं प्राणांचा योग्य, परि न योग्य हा [१४]असा वेच[१५]. ॥ १४

---

१. प्रभुनें त्वां आणि—प्रभुनें शिवानें. २. शंकरानें हालाहल नामक उग्र विष प्राशन केलें—ही कथा सुप्रसिद्ध आहे. ३. विष. ४. हे धृतराष्ट्रा! ५. अर्जुनासह. ६. तूं (हे धृतराष्ट्रा!) साक्षात् गुरुहि (प्रत्यक्ष चुलता असा आहेस, धर्मास वंद्य असा आहेस.) तरिहि (तथापि देखील) पुत्रा अजातरिपुच्या महिम्या भी (पुत्रसम जो अजातरिपु—धर्मराज त्याच्या मोठेपणाला, माहात्म्याला भ्यावेंस अशी त्या धर्मराजाची योग्यता आहे). उत्तरार्ध—तूं (धृतराष्ट्र) [धर्माचा] साक्षात् (सांगीचा नव्हेस) गुरु (पिता—पितृव्य) [जरि आहेस] तरीही (तरी पण) पुत्रा अजातरिपुच्या (पुत्रासारखा जो धर्मराज त्याच्या) महिम्या भी. तो जरी तुझा मुलगा आहे व तूं त्याचा जवळचा गुरु आहेस तरी देखील त्याचा थोरपणा आणिक कांहीं आहे, तेव्हां त्याचा वचक बाळग व आपल्या मुलाला (दुर्योधनाला) शमीव=शांत कर. ७. महिम्या=महिम्याला. महिमन् शब्द 'महत्' विशेषणाला 'इमन्' पुल्लिंगी प्रत्यय लागून झाला आहे. हा प्रत्यय लागतांना शब्दाच्या स्वरूपांत फेर होतो, जसें:—मृदु—म्रदिमन्, काल—कालिमन्, गुरु—गरिमन्, बहु—भूमन्, दृढ—द्रढिमन्, लघु—लघिमन्, अणु—अणिमन्. ८. नमनें करूत—असा अन्वय. ९. त्या पांडवरूप सिंहांला. १०. हे सुयोधनादिक. ११. ते (पांडव) जरिहि ससेन (सैन्यासहित) [आहेत तरी ते] मत्करीं स्वप्राणासह मनें देतील (ते आपले प्राण आणि मनें हीं माझ्या स्वाधीन करतील.) १२. सेनेसहित. [स+सेन=सहित+सेना. सेना शब्द बहुव्रीहिसमासांत असून पुल्लिंगी विशेष्याचा अनुगामी आहे म्हणून 'सेन' असा अकारांत झाला आहे.] १३. तुझ्या आज्ञेंत राहणारे असले पाहिजेत. करीं असणें=हातीं असणें, अमलांत असणें, आज्ञेंत राहणें. १४. याप्रकारचा, आपसांत कलहाग्नि पेटवून त्यांत प्राणार्पण करणें या प्रकारचा. दुसऱ्या एखाद्या लढाईत प्राणांचा व्यय करणें उचित होईल, परंतु आपसांत (अकारण) कलह माजवून त्यांत प्राणांचा व्यय करणें योग्य होणार नाहीं. १५. खर्च.

वाढिव **धर्म** प्रेमें वाढवि मज जेंवि **नंद** [1]नवनीतें, ।
[2]सत्पुत्रांनीं भवनीं सुरतरुनीं न सुख **नं**दनवनीं तें. ॥ १५
त्यजिले [3]इष्टद **पां**डव कां [4]उन्मूलन करूनि सुरतरुसे? ।
बा! **उर्व**शीच, एकीं **पार्थी**, [5]न पवोनि एक सुरत, रुसे. ॥ १६
**पां**डव सहाय असतां, तुज होतिल सर्व लोक वश्य, पहा! ।

---

१. नवनीत=लोणी. ['नवनीतं नवोद्धृतम्' इत्यमरः। नवं च तन्नीतं च=नवनीतम्=ज्याला अग्निसंयोग झाला नाहीं असें नवीन काढलेलें लोणी.] या अर्धातील उपमा फार मनोहर आहे. तसेंच पुढच्या अर्धातील सुभाषित ही हृदयंगम आहे. पंतांचें उपमाचातुर्य आणि सुभाषितकौशल्य हीं खरोखर प्रशंसनीय आहेत; त्यांनीं मन तात्काल वेधून जातें. "**मोरोपंता**नें उपमारूपकउत्प्रेक्षादि अर्थालंकारांची योजना आपल्या काव्यांत विपुलपणें केल्यामुळें मनोरंजनादि अनेक प्रकारचे लाभ जे अनुभवास येतात, त्यांतील सुभाषितश्रवण हा एक होय. **पं**तांची कविता वाचित असतां अनेक प्रकारचीं सुभाषितें अवलोकनांत येतात. संस्कृतांत ज्याप्रमाणें अनेक अभियुक्त कवींच्या ग्रंथांतून निवडक कविता घेऊन सुभाषितरत्नाकरादि ग्रंथ बनविले आहेत; त्याप्रमाणेंच **मो**रोपंत, **वा**मनपंडित, **मु**क्तेश्वर, **तु**काराम, **रा**मदास इत्यादि महाराष्ट्र कवींच्या ग्रंथांतून सुभाषितें काढल्यास महाराष्ट्रसुभाषितरत्नाकर जरी बनला नाहीं, तथापि त्याची राजतरंगिणी तरी बनेल असें आम्हास वाटतें." (हंसकृत मोरोपंताच्या कवितेवरील निबंध–पृष्ठ १०५.) २. [जें सुख] सत्पुत्रांनीं (उत्तम मुलांच्या योगानें) भवनीं (घरांत) [होतें] तें सुख सुरतरुनीं (कल्पवृक्षांच्या योगानें) नंदनवनीं (इंद्राच्या उद्यानांत) न (होत नाहीं)–असा सान्वय अर्थ. येथें कल्पवृक्षापेक्षां सत्पुत्र श्रेष्ठ होत असें सांगून त्यांचें आधिक्य वर्णिलें आहे. व्यतिरेकालंकार. पुत्राविषयीं असाच भाव **पं**तांनीं अनेक स्थळीं वर्णिला आहे. सुपुत्र हा खरोखर नंदनवनांतील सुखापेक्षां ज्यास्त सुख देणारा होय. ['तों द्रोणही म्हणे कीं:–जें पुत्रीं सुख, न नंदनवनीं तें । सुत सर्वमत सुखींच्या एकचि पोषी न नंद नवनीतें. ॥' भीष्मपर्व–अ० १० गीति ५२. या गीतींतील यमकही **पं**तांचें आवडतें आहे. उत्तरार्धांत **व्यतिरेक** नामक अर्थालंकार असून 'नीं' या अक्षराची चारवार आवृत्ति झाल्यामुळें येथें '**वृत्त्यनुप्रास**'नामक शब्दालंकारही झाला आहे. ३. द्वितीय दलाचा उद्देश प्रथम दलांतील '**इष्टद**' या विशेषणाचा पूर्ण खुलासा करण्याचा आहे. पांडव हे इष्टद खरे पण सदिच्छा पूर्ण करणारे आहेत. दुरिच्छा पूर्ण करणारे नव्हत. याला उदाहरण एकीं पार्थीं एक सुरत उर्वशी न पवुनि रुसे. (काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–वनपर्व–अध्याय ३ गीति ६२-७३ पृ० ३५-३७ पहा). तेव्हां एवढा हा प्रसंग खेरीज करून बाकी प्रसंगीं पांडव इष्टद आहेत. तेव्हां कल्पवृक्षासारखे सदिच्छापूरक पांडव यांचा त्याग कां करतोस? ४. उत्पाटन. ५. न पावून.

[1]त्वद्भाग्योत्कर्षातें श्रवण करुनियां म्हणेल [2]कश्यप '[3]हा!' ॥ १७
म्हणतो युधिष्ठिर, 'नको [4]पायें लोटूं मला [5]अवनतातें.'।
[6]वचनकरापत्यांचें न करावें काय हो! [7]अवन तातें? ॥ १८
[8]क्रमिले तसेचि [9]कथिले होते त्वां त्यासि [10]अब्द तेरा जे,।
'धन्य' म्हणत होते जे [11]लावितिल तुलाचि शब्द ते राजे. ॥ १९
[12]सुखसंततिसुकृतर्द्धिप्रीतिश्रीपुण्यकीर्ति यां [13]लाभें।
[14]साम करीं साधूंसीं, नाहीं तरि [15]पावलेंचि [16]यांला [17]भें.' ॥ २०
बहुसत्य बहुप्रिय [18]बहुहित [19]बहुमत [20]बहुदुराप [21]बहुरुचिर।

१. तुझ्या दैवाच्या अभ्युदयातें. २. कश्यप=मरीचिमुनिपुत्र. याचे अदितीपासून झालेले जे पुत्र ते देव होत. त्यांस आदितेय किंवा अदितिनंदन असें म्हणतात. हे आदितेय मोठे पराक्रमी आणि ऐश्वर्यशाली, परंतु त्यांच्याहूनही पांडवांचा पराक्रम आणि विभव थोर असें जाणून कश्यपाला वाईट वाटेल—असा भाव. तुझ्या भाग्योदयानें कश्यपाच्या मुखांतून 'हा!' असा दुःखोद्गार निघेल. ३. हाय हाय. ४. पायें लोटणें=तिरस्कारपूर्वक फेंकणें, तुच्छ समजून टाकणें. पायें=पायानें. येथें 'एं' हा प्रत्यय लागून तृतीयेचें एकवचन झालें आहे. तृतीयेचें हें रूप कवितेंत फार आढळतें. 'काय त्यां **पामरें** बोलावीं उत्तरें, परि त्या **विश्वंभरें** बोलावीलें' [तुकाराम.] '**भूपें** हळूच धरिला कलहंस पायीं.' (रघुनाथपंडित.) 'बाण पहिला **पुष्कलें** सोडियेला' [राघव.] ५. अतिनम्रातें. ६. आज्ञाधारक मुलाचें, आज्ञांकित बालकाचें. अपत्य. मागें पृ० ३४ टीप १ पहा. ७. रक्षण. प्रश्नालंकार. ८. घालविले. ९. सांगितल्याप्रमाणें. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत—सभापर्व—अ० ६ गी० ९६-९७ पृ० ६१.] १०. वर्षें. अब्द=संवत्सर; मेघ. 'अब्दौ जीमूतवत्सरौ' इत्यमरः। 'अब्दः संवत्सरे मेघे गिरिभेदे च मुस्तके' इति विश्वः। अपो (उदकानि) ददाति (यच्छति) इति अब्दः।] ११. शब्द लावणें=दोष ठेवणें, ठपका ठेवणें, निंदणें, दूषणें. जे राजे आजपर्यंत तुला धन्य (भाग्यशाली, श्लाघ्यजीवित) असें म्हणत होते ते आतां तुझें अन्यायवर्तन पाहून तुलाच दोष देतील, तुझी निंदा करतील. प्रतिज्ञेप्रमाणें पांडवांनीं वनवास व अज्ञातवास केल्यावर तूं त्यांला त्यांचें राज्य देत नाहींस म्हणून तुझी निंदा करतील. १२. सुख+संतति+सुकृत+ऋद्धि+प्रीति+श्री+पुण्य+कीर्ति=सौख्य+पुत्रपौत्रादिसंतानवृद्धि+पुण्य+समृद्धि+प्रेम+लक्ष्मी+पवित्र, पूत+यश. १३. या लाभास्तव. १४. [सुखादिक लाभांसाठीं] साधूंसीं (सदाचारसंपन्न पांडवांशीं) साम (सख्य) करीं, न करशील तर सुखादिक लाभांस मुकशील. १५. या लाभांला भें (भय) पावलेंचि (आलें असेंच जाण.) या लाभाला मोठी भीति आहे असें समज. १६. सुखादिकांला. १७. भय. १८. पुष्कळ कल्याणप्रद. १९. अत्यंत मान्य. २०. अत्यंत दुष्प्राप. २१. फार सुंदर, अतिमनोहर. या पूर्वार्धांत 'बहु' याची सहावार आवृत्ति झाल्यामुळें 'छेकानुप्रास' समजावा.

शुचि[1] रम्य क्षीरधिजाननचंद्रचकोर[2] बोलिला सुचिर[3]. ॥ २१
त्या[4] बोधामृतपानें निवुनि म्हणति सभ्य, 'वर्ण[5] हे **व्यास**!' ।
सुरगुरुहि म्हणे, 'रसने! या सद्रिपुच्याहि[6] वर्ण हेव्यास.' ॥ २२
मग **भृगुराम** म्हणे, 'हे **दुर्योधन**! भूमिपाळ! सत्य जुनी ।
कथितों समयोचित हितहेतु[7] कथा, परिस[8], आळस त्यजुनी. ॥ २३
होता अत्युद्दाम[9] क्षितिपति[10] **दंभोद्भवाख्य**[11] पर्वतसा, ।

---

१. दोषरहित, पावन. [हें कृष्णाच्या भाषणाचें वर्णन आहे. गीति १-२०. कृष्णाचें भाषण ऐकून सर्व सभासद स्तब्ध झाले. त्यांतील एकही उत्तर देण्यास समर्थ नव्हता. तेव्हां जामदग्न्य परशुरामानें दंभोद्भव राजाची कथा सांगितली. अ० ९६ श्लो० ३.] २. क्षीरधि+जा+आनन+चंद्र+चकोर=क्षीरसागर+उत्पन्न झालेली–क्षीरसागरापासून उत्पन्न झालेल्या चौदा रत्नांपैकीं एक–लक्ष्मी+मुख+शशी+चकोर नामक पक्षी=लक्ष्मीच्या मुखचंद्राचा चकोर (कृष्ण). मुखाची तुलना इंदु (चंद्र), अब्ज (कमल) आणि दर्पण (आरसा) यांशीं करण्याचा कविजनांचा संप्रदाय आहे. 'मुखस्येंद्वब्जदर्पणाः' असें 'अलंकारशेखरां'त आहे. [अलंकारशेखर–मरीचि १३ श्लो० ५ पृ०४१.] तसेंच चकोर पक्षी चंद्रिकापानलोलुप होत अशीही कवि प्रसिद्धि आहे. 'जोत्स्ना पेया चकोरैः' इत्यादि **सा**हित्यदर्पणांतील श्लोक सुप्रसिद्ध आहेत. ३. फार वेळपर्यंत. ४. त्या बोधामृतपानें निवुनि (श्रीकृष्णाचें भाषण हेंच अमृत, त्याचें प्राशन केल्याचे योगानें तृप्त होऊन, शांतिरसातें सेवून, शांत होऊन) सभ्य म्हणति (त्या सभेंतील सभासद म्हणाले), हे व्यास! (हे व्यासा! पुराणेतिहासकारा!) वर्ण (वर्णन कर. हें श्रीकृष्णाचें भाषण, सभेंत त्यावेळीं नव्हते त्या लोकांस किंवा पुढें उत्पन्न होणाऱ्या लोकांस ऐकण्यास मिळावें यासाठीं वर्णन कर.) सद्रिपु (साधुद्वेष्टे) दुर्योधनादिक यांणीं पांडवांचा हेवा केला म्हणून हें भाषण ऐकण्यास सांपडलें. सुरगुरु(बृहस्पती)सारख्या वक्त्यांसही तें भाषण ऐकून आनंद झाला, म्हणून तो (सुरगुरुही) म्हणे, रसने! (हे जिव्हे!) या सद्रिपुच्याहि (पांडवद्वेष्ट्यांच्या) हेव्यास (दुष्टपणास) वर्ण (वर्णन कर). ५. वर्णन कर. ६. साधुद्वेष्ट्याच्या. ७. हिताला कारण अशी, कल्याणकारिणी. या कथेपासून प्राप्त होणारा हितबोध पुढें गीति ४४-४६ यांत सांगितला आहे, म्हणून या कथेला 'हितहेतु' हें सार्थ विशेषण लाविलें आहे. ८. ऐक. ९. फार माजलेला, फार गर्विष्ठ. पर्वतसा अत्युद्दाम. इंद्रानें पर्वतांचे पक्ष छेदिले त्यापूर्वीं पर्वत फार उपद्रव देणारे होते, कोणाला मोजीत नसत. त्या पर्वतांप्रमाणें उद्दाम. उत्तरार्ध–अतिशयोक्तिनामक अलंकार. १०. क्षिति+पति=पृथ्वी+पति=राजा, भूपाल. ११. दंभोद्भवनांवाचा. दंभोद्भव राजा फार गर्विष्ठ आणि अभिमानी होता. 'पृथ्वीवर मजपेक्षां बलवान् कोण आहे तें सांगा' असें हा आपल्या सभेंतील विप्रांस विचारी. त्यांनीं 'गंधमादनपर्वतावर नरनारायण मुनि आहेत, ते तुजहून बळानें श्रेष्ठ आहेत' असें

त्याच्या ह्रदयांत जसा नव्हता कोणाचियाहि गर्व तसा. ॥ २४
नित्य मुनींस पुसे कीं, 'मजसीं [1]संगर करी असा मान्य ।
कोण्ही असेल जरि तरि सांगा, लोकांत जो असामान्य.' ॥ २५
ते कंटाळुनि म्हणती, 'काय उणें? बहु समर्थ आहेत; ।
जा [2]गंधमादनीं [3]नरनारायण पुरवितील [4]हा हेत.' ॥ २६
[5]सेना घेउनि गेला दंभोद्भव [6]गंधमादनागातें, ।
[7]सिद्धाश्रमासि पावे, विश्व जया [8]सिद्धिसादना गातें. ॥ २७
जातांचि भेटले त्या [9]प्रभु बहुदुर्लभ तपोनि [10]धीरा जे ।
ज्यांला चिंतुनि तरले बहु [11]भरतादिकतपोनिधी राजे. ॥ २८
पाहुनि [12]भृश [13]कृश तो नृप हांसे, ह्रदयांत फार अवमानी, ।
[14]परमार्थ न कळतां कां हांसावें न [15]परमांसि [16]अवमानीं? ॥ २९

---

सांगितलें. तेव्हां तो त्यांजकडे गेला व युद्धभिक्षा मागूं लागला. 'आमच्यापाशीं क्रोध नाहीं तेव्हां युद्ध व्हावयाचें नाहीं' असें त्यांनीं सांगून त्याची समजूत केली, परंतु तो कांहीं केल्या ऐकेना. तेव्हां त्यांनीं एक मुष्टि दर्भ फेंकून त्याच्या सैन्याचा नाश केला. तेणेंकरून याचा अभिमान नष्ट झाला. नंतर त्याच्या अपराधाची क्षमा करून नरनारायणांनीं त्यास उपदेश केला. त्याप्रमाणें वागण्याचा निश्चय करून तो स्वनगरास परत आला—अशी याची कथा आहे. [उद्योगपर्व—अ० ९६.]

१. युद्ध. ['अथ प्रतिज्ञाजिसंविदापत्सु संगरः' इत्यमरः । 'संगरो युधि चापदि । क्रियाकारे विषे चांगीकारे क्लीबं शमीफले' इति मेदिनी.] २. गंधमादन. हें हिमालयाच्या उंच उंच शिखरांपैकीं एक आहे. याच्या उत्तरेस प्रख्यात मानससरोवर आहे. अनेक तीर्थें पाहत पाहत सानुज सदार धर्मराज येथें आला. अर्जुन येथें इंद्रलोकाहून परत येऊन त्यांना भेटला. येथें त्या सर्वांनीं चार वर्षें वास केला. ३. अ० ९६ श्लो० १४-१५ पहा. हे नरनारायण गंधमादनपर्वतावर घोर तप करीत होते. ४. हा युद्धाचा हेतु. ५. षडगिनी सेना घेऊन दंभोद्भव नरनारायणाकडे गेला. [षडगें= रथ, नाग, अश्व, पादाति, शकट, आणि उष्ट्र (उंट) हीं सेनेचीं सहा अंगें होत. अ० ९६ श्लो० १७ टीका.] ६. गंधमादन+अगातें=गंधमादन+पर्वतातें. [अग=पर्वत. 'शैलवृक्षौ नगावगौ' इत्यमरः । 'अगः स्यान्नगवत्तरौ । शैले सरीसृपे भानौ' इति हैमः.] ७. नरनारायणाश्रमातें. ८. सिद्धीच्या गृहास. ९. पुरुषोत्तम (नरनारायण). १०. जे (प्रभु) धीरा (धीर पुरुषालाहीं) तपोनि (तप करून सुद्धां) बहुदुर्लभ (प्राप्त होण्यास कठीण)=जे प्रभु तपश्चर्या करूनही धीर पुरुषाला प्राप्त होणें फार कठीण असे प्रभु दंभोद्भवाला जातांच भेटले. ११. भरत—दुष्यंतपुत्र. १२. अत्यंत. १३. क्षीण. [क्षुत्पिपासा आणि शीतवातातप यांनीं क्षीण झालेले दोघे तापस पाहून राजा हंसला.] १४. तत्त्वार्थ, सत्यार्थ. अवमानीं अवश्य ह्रांसावें, असें अपेक्षित उत्तर आहे. १५. उत्तमांसि. १६. नीचांनीं. उत्तरार्ध—प्रश्नालंकार.

पूजुनि नरनारायण म्हणाति, 'मनें इच्छिलें कळिव राजा ! ।
द्यावें सर्व [1]सुरनगें [2]समभिलषित काय जें [3]अलिवरा ज्या.' ॥ ३०
'ऐकुनि यश [4]समरार्थी मी आलों हे' असें म्हणे [5]मळधी, ।
खळ धीटपण प्रकटी, तें पाहुनि हांसले दयाजलधी. ॥ ३१
[6]स्मित करुनि प्रभु वदले, 'पशुहि न या आश्रमांत [7]उद्धत रे ! ।

---

१. ज्या अलिवरा (ज्या श्रेष्ठ भ्रमराला) जें काय समभिलषित (जें कांहीं इष्ट, प्रिय, आवडतें असेल) [तें] सर्व सुरनगें (कल्पवृक्षानें) द्यावें–कल्पवृक्षाजवळ भ्रमर येऊन जें कांहीं इष्ट मागेल तें त्यास प्राप्त होतें, तसें तुझें इष्ट वस्तु तुला येथें प्राप्त होईल–असा भावार्थ. २. इच्छित. ३. भृंगश्रेष्ठा. उत्तरार्ध–अर्थांतरन्यासालंकार. ४. युद्धाकांक्षीं, युद्धेच्छु. आलों आहें. ५. पापमति (दंभोद्भव). [अ० ९६ श्लो० २१.] ६. मंदहास्य. दांत न दिसतां व स्वर स्पष्ट न होतां गालांतल्या गालांत जें मधुर हंसणें तें. [स्मितलक्षण–'ईषद्विकसितैर्गंडैः कटाक्षैः सौष्ठवान्वितैः । अलक्षितं द्विजद्वारे सूत्तमानां स्मितं भवेत् ॥' इति नाट्यलोचनः, 'ईषत्प्रफुल्लितैर्गंडैः कटाक्षैः सौष्ठवान्वितैः । अदृष्टदंतकुसुमैरुत्तमानां स्मितं मतम् ॥' इति भरतः–मालतीमाधव–जगद्धरकृतटीकानुरोधतः पाठांतराणि–अंक १ ला–पृ० २२–निर्णयसागर छापखान्यांतील आवृत्ति.] स्मित हें एकप्रकारचें हास्य आहे. याजविषयीं पुढील विवरण वाचकांनीं अवश्य पहावें. त्यांत हास्याच्या अनेक भेदांचें स्पष्टीकरण केलें आहे. "हास्यरसाचे सहा भेद आहेत. त्यांचें वर्णन 'रसगंगाधरां'त केलें आहे तें असें:—'आत्मस्थः परसंस्थश्चेत्यस्य भेदद्वयं मतम् । आत्मस्थो द्रष्टुरुत्पन्नो विभावेक्षणमात्रतः ॥ १ ॥ हसन्तमपरं दृष्ट्वा विभावश्चोपजायते । योऽसौ हास्यरसस्तज्ज्ञैः परस्थः परिकीर्तितः ॥ २ ॥ उत्तमानां मध्यमानां नीचानामप्यसौ भवेत् । त्र्यवस्थः कथितस्तस्य षड्भेदाः सन्ति चापरे ॥ ३ ॥ स्मितं च हसितं प्रोक्तमुत्तमे पुरुषे बुधैः । भवेद्विहसितं चोपहसितं मध्यमे नरे ॥ ४ ॥ नीचेऽपहसितं चातिहसितं परिकीर्तितम् । ईषत्फुल्लकपोलाभ्यां कटाक्षैरप्यनुल्बणैः ॥ ५ ॥ अदृश्यदशनो हासो मधुरः **स्मित**मुच्यते । वक्त्रनेत्रकपोलैश्चेदुत्फुल्लैरुपलक्षितः ॥ ६ ॥ किंचिल्लक्षितदन्तश्च तदा **हसित**मिष्यते । सशब्दं मधुरं कायगतं वदनरागवत् ॥ ७ ॥ आकुञ्चिताक्षि मन्द्रं च विदुर्**विहसितं** बुधाः । निकुञ्चितांसशीर्षश्च जिह्मदृष्टिविलोकनः ॥ ८ ॥ उत्फुल्लनासिको हासो नाम्नो**पहसितं** मतम् । अस्थानजः साश्रुदृष्टिराकम्पस्कन्धमूर्धजः ॥९॥ **शार्ङ्ग**देवेन गदितो हासो**ऽपहसिता**ह्वयः । स्थूलकर्णकटुध्वानो बाष्पपूरप्लुतेक्षणः । करोपगूढपार्श्वश्च हासो**ऽतिहसितं** मतम् ॥१०॥' इति । [रसगंगाधर–काव्यमाला १२–पृष्ठे ४३-४४]. याचा भावार्थ:—हास्यरसाचें **आत्म**स्थ आणि **पर**संस्थ म्हणजे **स्व**निष्ठ आणि **पर**निष्ठ असे दोन भेद आहेत. विपरीत क्रिया इत्यादिक पाहण्याबरोबर पाहणाऱ्या मनुष्याला जें हसूं येतें त्याला विलक्षण वेष **आत्म**स्थ अथवा **स्व**निष्ठ असें म्हणतात. दुसऱ्या हंसत असलेल्या मनुष्यास पाहून जें हसूं येतें तें **पर**संस्थ अथवा **पर**निष्ठ होय. याप्रमाणें हास्याचे मुख्य दोन भेद झाले.

येथें [1]असंगशस्त्रें [2]केवि [3]षडरींतेंचि करुनि युद्ध तरे.' ॥ ३२
हांसति मुनि त्या मंदें समरचि वरितां पुन्हा, तपोराशी ।
म्हणति मनांत, 'न खेळों द्यावें या या उन्हांत पोराशीं.' ॥ ३३
[4]मूढात्याग्रह पाहुनि जो नरमुनि [5]साध्वसाधुभावज्ञ ।
धरि मुष्टिभरि [6]ईषीका सकरुण सस्मित सलील [7]सावज्ञ. ॥ ३४
दंभोद्भवाप्रति म्हणे [8]नारायणसख, 'बुधा! न [10]वरं समर, ।
दाटुनि मरसि, जरि [11]गरळरस गिळुनि, वमुनि [12]सुधानवरस, मर. ॥ ३५
हूं, ऊठ, तुझी युद्धश्रद्धा हरितों, [13]बहा [14]सहायांतें. ।
शस्त्र कशास? तुज बहुत मुष्टिइषीका, पहा, सहा यांतें.' ॥ ३६

---

मनुष्याच्या स्वभावावरून त्याचे उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ असे तीन भेद मानिले आहेत म्हणून हास्याचे एकंदर सहा भेद होतात, ते असेः—उत्तमाचे हसण्याला **स्मित** आणि **हसित**, मध्यमाच्या **विहसित** आणि **उपहसित** आणि कनिष्ठाच्या **अपहसित** आणि अतिहसित असें म्हणतात. या सहा भेदांचीं लक्षणें येणेंप्रमाणें:—**स्मित**—दांत न दिसतां व स्वर स्पष्ट न होतां गालांतल्या गालांत जें मधुर हसणें तें. **हसित**—ज्यांत मुख, नेत्र आणि गाल हे किंचित् विकसित होऊन दांतही कांहींसे दिसतात तें. **विहसित**—शब्द कांहींसा मधुर असून व डोळे आकुंचित होऊन जें बरेंचसें स्पष्ट मंदहास्य तें. **उपहसित**—नाक फुगणें, कुटिलदृष्टि, स्पष्ट शब्द व खांद्याचें आणि मानेचें हालणें यांनीं युक्त जें हंसणें तें. **अपहसित**—खांदे आणि केंस हालणें, डोळ्यांस अश्रु येणें, शब्द फारच स्पष्ट होणें या लक्षणांनीं युक्त जें हंसणें तें. **अतिहसित**—बाष्पांचा पूर सुटून डोळे भरून येणें, कर्णकटु असा मोठा ध्वनि होणें, आणि हातांनीं पोट कंवटाळणें या लक्षणांनीं युक्त जें हसणें तें. याप्रमाणें हास्याचे सहा भेद अलंकारशास्त्रज्ञांनीं सांगितले आहेत." ७. उद्दाम.

१. असंगरूप शस्त्रानें, विरक्तिरूप शस्त्रानें. २. पंडित, शाहणा पुरुष. ३. षट्+अरींतें=सहा (काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर)+शत्रूंतें. ४. मूढ अति—आग्रह. मूर्खाचा दुराग्रह, हट्ट, मूर्खांचा फार हेका. ५. साधु+असाधु+भाव+ज्ञ=चांगला+वाईट+धर्म, गुण, स्थिति+समजणारा=चांगला वाईट भाव जाणणारा. ६. तृणें. (अ० ९६ श्लो० ३२.) ७. अवज्ञायुक्त, धिक्कारपूर्वक. ८. नर म्हणे—'(हे दंभोद्भवा! तूं) गरळरस गिळुनि [व] सुधा नवरस वमुनि जर दाटुनि मरसि [तर] मर.'—जर तूं बुद्धिपुरःसर जाणून बुजून मुद्दाम विष प्राशन करून व अमृत नवरस ओकून मरणार असशील तर खुशाल मर. [येथें 'जर' असा शब्द असावा. 'जरि' हें संशयोत्पादि रूप आहे.] 'दाटुनि'—बुद्धिपुरःसर, मुद्दाम. या शब्दाचा प्रयोग दक्षिण कोंकणांत फार आहे. ९. नरमुनि. १०. स्वीकारूं नको. ११. विषरस. १२. अमृतनवरस. १३. बोलाव. १४. साहाय्य करणाऱ्यांतें.

भूप म्हणे, ‘उठलों, परि उचित [1]इषीकास्त्र [2]मज नव्हे राया ।
धर्मज्ञा! तूंहि नससि योग्य अशाला मला [3]अव्हेराया.’ ॥ ३७
शस्त्रास्त्रांचें दावी तो नृप बहुधा तया सकटक बळ, ।
[4]कांडाचाहि न [5]ज्याच्या तेजा बहु [6]धातयासकट [7]कवळ. ॥ ३८
नरमुनिवर सोडियला भूपें शस्त्रौघ जो [8]निशात रणीं, ।
त्यासि इषीकांनींच च्छेदी [9]रिपुवाहिनीनिशातरणी. ॥ ३९
करितां पुराणमुनिनें ऐषीकास्त्रप्रयोग, [10]नाकांत ।
सुख आणि इषीकाशत [11]कोंदे अरिच्या [12]सवेंचि नाकांत. ॥ ४०
एकाहि सैनिकाला [13]पात्यांनीं लोचना न झांकों दे, ।
तें ऐषीक न केवळ [14]खळबळनयनीं नभांतही कोंदे. ॥ ४१
नेत्रांत [15]घ्राणांत श्रवणांत मुखांत सर्व [16]कटकाच्या ।
बहु शिरकल्या इषीका, जेंवि जगीं शक्ति [17]विश्वघटकाच्या. ॥ ४२

---

१. इषीकेचें (गवताचें) केलेलें अस्त्र–ऐषिकास्त्र. इषिका नांवाचें एक तृण (काश) आहे. त्याची काडी अभिमंत्रित करून ती शत्रूंवर सोडणें म्हणजे इषीकास्त्राचा प्रयोग करणें होय. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–वनपर्व–पृ० १६७ टीप १४ पहा.] २. मज राया (ह्या दंभोद्भव नृपाला) उचित नव्हे. ३. टाकाया, त्याग कराया. माझ्याशीं त्वां शस्त्रानें युद्ध करूं नये–असा मी त्याज्य नाहीं. ४. ब्रह्मांडाचाहि. [क+अंडाचा=ब्रह्म+अंडाचा । ‘कः प्रजापतिरुद्दिष्टो को वायुरिति शब्दितः’ इत्येकाक्षरकोष (अभिधानसंग्रह–प्रथम खंड)] ५. ज्याच्या तेजा (ज्या नारायणसख नरमुनीच्या तेजाला, ज्या नरमुनीच्या तपःप्रतापाला) धातयासकट कांडाचा कवळ (ब्रह्मदेवासह सकल ब्रह्मांडाचा घांस करणें, ब्रह्मदेवासह सकल ब्रह्मांड (विश्व) गिळंकृत करणें) बहु न (फार कठीण आहे असें नाहीं, मोठें अवजड काम नाहीं, सहज करण्यासारखें आहे.) ज्या नराचें तेज विधात्यासह सकल ब्रह्मांडाचा नाश सहज करील. ६. ब्रह्मदेवासहित. ७. ग्रास. ८. तीक्ष्ण. ९. रिपु+वाहिनी+निशा+तरणी=शत्रु+सेना+रात्रि+सूर्य=शत्रुसेनारूप रात्रीच्या नाशास सूर्य असा (नरमुनि). रिपुसेनारूप रात्रीविषयीं (तरणी) सूर्य. १०. स्वर्गांत. ११. नाकांत (स्वर्गलोकांत) सुख कोंदे आणि इषीकाशत सवेंचि अरिच्या नाकांत (नासिकेंद्रियांत) कोंदे–असा अन्वय. येथें ‘कोंदे’ या क्रियापदाचा प्रयोग देहलीदीपन्यायानें करावा. दंभोद्भवाच्या सैन्याची खोड नरमुनीनें मोडली म्हणून स्वर्गांतील लोकांस सुख झालें. १२. तत्काल. १३. पातें=डोळ्यांची पापणी. समंत्रक दर्भमुष्टि सैन्यावर टाकिली तेव्हां त्या सैन्याचे नेत्र, कर्ण व नासिका हीं तुटून खालीं पडलीं. १४. दुष्ट सैन्याच्या डोळ्यांत. १५. नाकांत. १६. सैन्याच्या. १७. विश्वातें निर्माण करणाऱ्या ईश्वराच्या.

ऐसा मुनिवर्यासीं करुनि हठें विजयकामनाश[1] रण ।
तत्काल विमद[2] होउनी जाय, धरुनि कुशलकामना,[3] शरण. ॥ ४३
देउनि अभय, म्हणति **नरना**रायण, 'होतसे मद नरा ज्या ।
तो सर्व बुडे व्यसनीं, होय मलिन या मळें वदन, राजा! ॥ ४४
जा स्वपदीं स्वस्थ रहा, सुदृढ धरुनि कास[4] साधुपदवीची,[5] ।
वद वीची[6] प्राशावी द्युनदीची[7] कीं नृपा! कुनदवीची[8]?' ॥ ४५
रुचि लागली तशासहि[9] फार सदुपदिष्टसाधुरीतीची,[10] ।
दुर्योधना! त्यजुनि अभिमान, पहा तूंहि माधुरी[11] तीची. ॥ ४६
यापरि **न**र[12] प्रतापी, **ना**रायण [13]अधिक बहु **न**राहून, ।

---

१. जयेच्छेचा नाश ज्यांत आहे असा (रण). 'रण'शब्द अस्त्री आहे. २. गर्वरहित. ३. कल्याणाची इच्छा. (श्लो० ३३.) ४. कास धरणें=कासेस लागणें, स्वसंरक्षणार्थ मोठ्याचा आश्रय करणें, थोरांच्या आश्रयानें चालणें, आश्रय धरून असणें, अवलंब करणें. हा शब्दसमूह कोशकारांस उपयुक्त आहे. ५. सन्मार्गाची, सज्जनाच्या रस्त्यांची. ६. लहरी, लाट. ७. स्वर्गंगेची. ८. कु+नद+वीची=वाईट+नदी+लहरी=वाईट पाणी ज्यांत आहे अशा नदीची लहरी. हें प्रश्नालंकाराचें उदाहरण आहे. येथें द्युनदीची वीची प्राशावी—असें अपेक्षित उत्तर आहे. या प्रश्नालंकाराचीं अनेक उदाहरणें **पं**तांच्या काव्यांत आढळतात. जी गोष्ट अथवा जें मत सर्वांस मान्य आहे, ज्या संबधानें कोणीही वाद घेणार नाहीं, ज्याची सत्यता सर्वांस ग्राह्य आहे, अशा गोष्टीचा अथवा मताचा उल्लेख **पं**त वारंवार विधिरूपानें न करतां प्रश्नरूपानें करतात, आणि त्या प्रश्नाचें अपेक्षित उत्तर वाचकांस देण्यास लावतात. हा एक वर्णनशैलीचा खुबीदार मासला समजला पाहिजे. ९. त्या दुष्ट दंभोद्भवालाही. १०. साधूनें उपदेशिलेल्या. ११. मधुरता. १२. अर्जुन. १३. यांत '**अधिक**' नामक अलंकार आहे. जेथें एका पदार्थावर दुसऱ्या पदार्थाचें आधिक्य वर्णिलें असतें तेथें 'अधिक' अलंकार होतो. याचें लक्षण:–(१) आश्रयाश्रयिणोरानुरूप्यमधिकम्. [अलंकारसर्वस्व–पृ० १३४.], (२) महतोर्यन्महीयांसावाश्रिताश्रययोः क्रमात् । आश्रयाश्रयिणौ स्यातां तनुत्वेऽप्यधिकं तु तत्॥ १२८ ॥ [काव्यप्रकाश–पृ० ७८८.], (३) आधाराधेययोरन्यतरस्यातिविस्तृतत्वसिद्धिफलकमितरस्यातिन्यूनत्वकल्पनमधिकम्. [रसगंगाधर–पृ० ४५३.], (४) आधारादाधेयस्याधिक्येऽधिकम्. [काव्यानुशासनम्.], (५) अधिकं पृथुलाधारादाधेयाधिक्यवर्णनम्. [कुवलयानंद. ९४.], याचीं उदाहरणें:—(१) गाधिज रामाकरवीं मार्गीं गौतमसतीसि उद्धरवी, । मानी तत्पादास स्वकरसहस्रापरीस शुद्ध रवी. ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला–वनपर्व–अ० १० गी० ४९ पृ० १४४.], (२) लक्ष्मण निघे पदाधिक जाणुनि तत्पादसुपर माणूस। त्यजिल गुरुभजन कैसें हें आयकिल्याहि उपर माणूस?॥ [वनपर्व–अ०१० गी० ६७ पृ० १४६.], (३) जो पीडिला रडविला देउनि माथां स्वराज्यभर तातें । तदधिक कसा

तेचि [1]धनंजय माधव, न कळति साधूंत बहु न [2]राहून. ॥ ४७
[3]कण्वहि म्हणे, 'कुरुवरा! परिस तुला हाहि सांगतो कांहीं, ।
कीं [4]क्षाळावें भरिलें जें [5]पंकेंकरुनि आंग तो[6]कांहीं. ॥ ४८
प्रख्यात [7]शक्रसारथिवरमातलिदेहसंभवा नावें ।
[8]गुणकेशी, रूप जिचें अमृत, न [9]पररूप [10]अंभ वानावें. ॥ ४९
तीस वर देवमानुषलोकांत न आढळे म्हणुनि [11]साधी ।
मातलि नारदयत्नें [12]पाताळीं, जेंवि निधि खणुनि साधी. ॥ ५०
आला [13]मनास आर्यकनागाचा पौत्र सुमुख जामाता, ।
[14]गुणकेशीची व्हावी [15]हृष्टा अवलोकितांचि ज्या [16]माता. ॥ ५१

---

नव्हे प्रभु जो दे सुख हरुनि भार भरतातें?॥ [वनपर्व अ० १२ गी० १४५ पृ० १९०.], (४) न तसा स्वताताघातें, झालों मी तप्त जेंवि तव घातें; । शिशुसख्य आमुचें जें जाणे क्षितिवरिल लोक अवघा तें. ॥[गदापर्व-अ० १० गी० २८], (५) व्याघ्र व्याल क्रूर, क्रूरतर क्रोध, वोध रोधक हा । क्रोधवशासि विलोकुनि बहु म्हणति स्वहिततत्त्वशोधक हा.॥ [वनपर्व-अ० २ गी० ५५ पृ० २०.], (६) तरि कर्णाला आज्ञा द्या तो त्या पांडवांसि मारील । मारी लक्षहि न तदिषुहुनि अधिक प्राणिजात सारील ॥ [भीष्मपर्व-अ० १० गी० १६.], (७) म्हणतां तुम्हिच जपावें पार्थिववपुपरिस बहु यशोदेहा । सन्मतिस यशःसंग्रह सर्वस्वाधिक जसा यशोदे हा. ॥ [भीष्मपर्व-अ० ११ गी० ३३.] १४. नरापेक्षां.

१. धनंजय=अर्जुन, नर. माधव=कृष्ण, नारायण. येथें दंभोद्भवोपाख्यान संपलें. २. साधूंत बहु राहिल्यावांचून ते कळत नाहींत. ३. येथें मातलिवरान्वेषण नामक आख्यानास आरंभ होतो. ४. धुवावें. ५. चिखलानें. ६. मुलांनीं. ७. इंद्राचा सारथिश्रेष्ठ जो मातलि त्याच्या देहापासून (संभव) उत्पत्ति जीची अशी (गुणकेशी). ८. गुणकेशीचें रूप अमृत; पररूप (इतर स्त्रियांचें रूप) अंभ (उदक, पाणी) तें न वानावें. गुणकेशीच्या स्वरूपापुढें इतर स्त्रियांचें स्वरूप जसें अमृतापुढें पाणी तसें होतें, म्हणून त्या पाण्याची वाखाणणी करण्याच्या कोणी भरीस पडूं नये—असा कवीचा आशय. गुणकेशी अत्यंत रूपवती होती हा भावार्थ. ९.इतर स्त्रियांचें रूप.१०. उदक. ११. स+आधि=सहित+चिंता=सचिंत, दुःखित. १२. पाताळांत [वरातें] साधी (संपादी, मिळवी). 'पाताल' असें नांव पडण्याचें कारणः—'यस्मादलं समस्तास्ताः पतंति जलमूर्तयः । तस्मात्पातालमित्येव ख्यायते पुरमुत्तमम्. ॥' [अ० ९९ श्लो० ६. जलमूर्तयश्चंद्राद्याः पतंति चंद्रकांतवज्जलं स्रवंति अतोऽयं पतज्जल इति वक्तव्ये पाताल इत्यर्थः. टीका श्लो० ६ पहा.] १३. मनास येणें=पसंत पडणें. १४. ज्या (सुमुखाला) अवलोकितांचि गुणकेशीची माता हृष्टा (आनंदिता) व्हावी—असा अन्वय. १५. आनंदित. १६. गुणकेशीची माता सुधर्मा.

आर्यक म्हणे, 'सुरर्षे! कवणा न रुचेल हें असें नातें? ।
परि ज्या बळें करावें संतोषें मान्य म्यां असेना तें. ॥ ९२
भक्षुनि माझ्या पुत्रा चिकुरातें सर्पकाळ पक्षीन ।
वदला या मत्पौत्रा सुमुखातें कीं 'तुलाहि भक्षीन.' ॥ ९३
वदला तैसेंचि करिल, दुःसाध्या काय या प्रतिज्ञा त्या? ।
ऐसें असतां देशी गुणकेशी काय यांप्रति ज्ञात्या!' ॥ ९४
मातलि म्हणे, 'दिलीच स्वसुता म्यां, वचन काय फिरवावें? ।
जिरवावें दुःख तुम्हीं, या मुनिला पौत्ररत्न निरवावें. ॥ ९५
आम्हीं दोघे विनवूं सुरपतिला, तो समर्थ रक्षील, ।
पक्षी लक्ष्मीशप्रिय परि अरिभावें न यासि लक्षील.' ॥ ९६
नाग म्हणे, 'न्या, न पडों द्यावें शोकांत आर्यका! मातें, ।

१. आर्यक=हा एक सुप्रसिद्ध नाग. सुमुख हा आर्यकाचा पौत्र, आणि चिकुराचा पुत्र व वामन नामक नागाचा दौहित्र. [अ० १०३ श्लो० २३-२४] २. हे नारदा! ३. मातलीच्या कन्येशीं सुमुखाचा विवाह होऊन उत्पन्न होणारा संबंध. हा विवाहसंबंध सर्वांस आवडणारा आहे. ४. परि (परंतु) ज्या बळें (ज्या सामर्थ्याचे जोरावर, ज्या शक्तीचे भरवंशावर) [हें नातें] म्यां संतोषें मान्य करावें (ह्या विवाहसंबंधास आनंदानें संमति द्यावी) तें (बळ=तें सामर्थ्य, तें शक्तितेज) असेना (माझ्याकडे नाहीं, मी असमर्थ आहें). ५. पुत्र=आर्यकाचा पुत्र चिकुर. [आर्यकाचा पुत्र चिकुर याला गरुडानें थोड्या दिवसांपूर्वी भक्षण केल्याच्या योगानें आर्यक फार खिन्न होता. 'एक मासानंतर मी तुझ्या सुमुख नामक पौत्राचें भक्षण करीन' असें गरुडानें निक्षून सांगितलें होतें. यामुळें गुणकेशीसुमुखविवाह जरी इष्ट होता, तरी तो करण्यास आर्यकाचें मन घेईना. अध्याय १०४ श्लो० १४–१७.] ६. सर्पांचा काळ (गरुड). ७. गरुड. [पक्षी+इन=पक्षी+स्वामी.] ८. त्या गरुडाला. ९. या सुमुखाला. १०. या सुमुखाला मीं आपली कन्या दिली, माझी सुमुखावरील जामातबुद्धि आतां फिरावयाची नाहीं. [अ० १०४ श्लो० १८-२१.] ११. या प्रश्नार्थक चिमकुल्या काव्यांत पंतांनीं अर्थगौरव ठेवून जें सर्वसंमत उत्कृष्ट नीतितत्व सूचविलें आहे त्यास कोण नांव ठेवील? वचन पाळणें हें सदाचाराचें प्रधान अंग आहे व त्याचें फळ मोठें आहे. पंतांच्या काव्यसागरांत अशींच नीतितत्वरत्नें जागोजाग आढळतात. १२. नारदाला. १३. अत्यंत उत्तम पौत्र. रत्न=प्रत्येक जातींत जो उत्कृष्ट पदार्थ असतो त्याला रत्न म्हणतात. 'जातौ जातौ यदुत्कृष्टं तद्रत्नमभिधीयते' असें आधारवचन आहे. १४. स्वाधीन करावें. १५. इंद्राला. १६. लक्ष्मी+ईश+प्रिय=विष्णुप्रिय. १७. शत्रुत्वानें, शत्रु या नात्यानें. १८. सुमुखाला घेऊन जा.

न तसे स्वपितरहि जसे येती[१] लोकांत आर्य[२] कामातें[३].' ॥ ५७
[४]ज्याची महापुराणीं **व्यास** [५]भगवदुक्तिसीच [६]मात लिही, ।
तो[७] अभय **आ**र्यकाला दे, [८]सुरपतिसूतसचिव **मा**तलिही. ॥ ५८
**ना**रद **मा**तलि घेउनि आले [९]सुमुखाहिला [१०]सुरसभेला, ।
[११]सुरदृष्टिमक्षिकांचा मो[१२]हकें तो [१३]इक्षुचा सुरस भेलीं[१४]. ॥ ५९
प्रसवोनि परम धन्या झाली लोकत्रयांत [१५]ज्यां माता ।
तोही जेव्हां होता [१६]क्षीरधिचा सुरसभेंत [१७]जामाता. ॥ ६०
[१८]यद्यशबुजगवणें दे भक्तांसि शिवों न [१९]**का**लकागातें, ।
'सदय [२०]शरण्यवर' असें [२१]श्रुतिशत ज्या विश्वपालका [२२]गातें. ॥ ६१
[२३]पुरुषार्थांसि न गाउनि [२४]सत्सद [२५]ज्यांचे [२६]सुवृत्त भुज गातें, ।
त्या प्रभुच्या पायांवरि घाली [२७]मुनि कथुनि वृत्त [२८]भुजगातें. ॥ ६२
देवें[२९] म्हणे, 'हो! [३०]दादा! द्या [३१]अमृत, न द्यावया पळ उशिर [३२]हो, ।

---

१. उत्तरार्ध—व्यतिरेकातिशयोक्तिसंकर. लोकांत आर्य (श्रेष्ठ पुरुष) कामातें जसे येती (जसे उपयोगीं पडतात) तसे स्वपितरहि (त्याप्रमाणें आपले पितर देखील) न [कामातें येती]–असा अन्वय. येथें आर्यांचें आधिक्य वर्णून त्यांचा श्रेष्ठपणा पितरांपेक्षांही थोर आहे असें दर्शविलें आहे. यामुळें व्यतिरेक आणि अतिशयोक्ति यांचा यांत संकर झाला आहे. २. श्रेष्ठ. ३. कामातें येणें=उपयोगीं पडणें, उपयुक्त होणें, उपयोगास पडणें. ४. ज्या नारदाची. हें 'पर्यायोक्ता'चें उदाहरण आहे. ५. ईश्वरवचनासारखी. ६. कथा, गोष्ट. ७. नारद. ८. इंद्राचा सारथि व प्रधान. ९. सुमुख+अहिला=सुमुख+सापाला=सुमुख नामक सर्पाला. १०. देवसभेला. ११. देवांच्या दृष्टि ह्याच माश्या त्यांचा. १२. सोत्प्रेक्षारूपक. १३. उंसाचा. १४. मिसळ, गुळाचा रवा. १५. ज्या विष्णूला. हें सुंदर 'पर्यायोक्त' आहे. १६. क्षीरधीचा जामाता=श्रीविष्णु. [अ० १०४ श्लो० २३.] १७. जामात, जांवई. १८. ज्या विष्णूचें यश हेंच बुजगवणें. [बुजगवणें=बुजकणें, बुजगावणें, भुलोबा, बुजवणें, भयप्रदर्शक तोडगा, बागूलबावा, घोंगडबाऊ=Scare-crow.] १९. काळरूप कावळ्यातें. २०. आश्रयदात्यांत श्रेष्ठ. [शरण्य=शरणेषु साधुः शरण्यः. 'तत्र साधुः' १६५०;४।४।९८ या सूत्रानें अग्र्य, सामन्य, कर्मण्य हे शब्द सिद्ध होतात.] २१. शंभर श्रुतिवचनें (वेदवचनें). २२. स्तवितें. २३. धर्मार्थकाममोक्ष या चार पुरुषार्थांस (न स्तवून). २४. सत्+सद=साधु+सभा. [सदस्=सभा, असा सकारांत शब्द आहे.]=साधूसभा. २५. ज्या विष्णूचे. २६. सु+वृत्त=सुंदर, शोभन+आचरण, कृति=ज्यांचें आचरण चांगलें असे (भुज). ज्यांचा पराक्रम, वर्तनक्रम निर्दोष असे सदाचारसंपन्न (भुज). सुवृत्त=चांगले वाटोळे, उत्तम वर्तुलाकार. २७. नारद. २८. सुमुखातें. २९. विष्णु. ३०. दादा=वडील भाऊ. विष्णु हा

न[1] स्वशरणागताचें काळ बळें आपुलें पळवु शिर हो!' ॥ ६३
शक्र म्हणे, 'चक्रधरा[2]! तन्नखर[3] न साहवे नव क्रकच[4], ।
होइल त्या खगपतिचा[5] मद्वज्रें एकही न वक्र[6] कच[7].' ॥ ६४
जिष्णुसि[8] विष्णु सिकवि कीं 'आधीं तों अमृत आणवा, हूं, द्या, ।
त्याजवळि मज 'न[9] मत्कृत, सत्कृत हें' असिच आण वाहूं द्या. ॥ ६५
पात्रमुखीं[10] न पडे जरि, तरि अमृत वृथा कशास सांचविलें? ।
तें सत्य[11] वांचणें जें शरणागत सर्व सत्व वांचविलें.' ॥ ६६
साधुस्वीकृत[12][13] म्हणुनि प्रभुनें[14] अहिलाहि अमृत पाजविलें, ।

---

इंद्राचा धाकटा भाऊ होय. विष्णूला उपेंद्र, इंद्रावरज अशीं नांवें आहेत. ३१. या नागाला अमृत देऊन अमर करा असा इत्यर्थ. [अ० १०४ श्लो० २४.] ३२. होवो.

१. हो! (अहो! सुरपते!) बळें काळ आपुलें शिर पळवु (काळानें आपलें शिर कापून नेलें तरी चालेल) [परंतु] स्वशरणागताचें [शिर] न (पळवु)=परंतु आपल्यास जे शरण आले आहेत त्यांचें शिर काळास नेऊं देऊं नये—असें आपलें कर्तव्य आहे. २. हे सुदर्शनचक्रधारी विष्णो! ३. त्या गरुडाचीं नखें. ४. करवत. ५. गरुडाचा. ६. वांकडा. माझ्या वज्राच्यानें त्या गरुडाच्या एका केंसास सुद्धां इजा होणार नाहीं; इतकें माझें वज्र दुर्बल आहे. गरुडाचें केंसाइतकें सुद्धां वांकडें करण्याचें सामर्थ्य या माझ्या वज्राच्या ठायीं नाहीं—असा भाव. ७. केश. ८. इंद्राला. ९. 'न मत्कृत सत्कृत हें' असिच आण त्याजवळि मज वाहूं द्या—असा अन्वय. 'मीं केलें तें चांगलें केलें नाहीं' अथवा 'हें काम मीं केलें नाहीं, साधूनें केलें' अशी शपथ गरुडाजवळ मला वाहूं द्या, म्हणजे या नागाला तर अमृत पाजा, व गरुडाला राग येईल तर त्याजवळ काय बोलायाचें तें मी बोलेन—तें मजकडे सोंपवा. 'हें काम मी केलें खरें पण चांगलें झालें नाहीं' अथवा 'हें काम माझें नसून कोण्या साधूचें आहे, अशी समजूत त्याची मी पाडीन. याबद्दलची सर्व जबाबदारी मजवर आहे असा विष्णूचे बोलण्याचा आशय. १०. योग्य जनांच्या तोंडांत. ११. सत्य वांचणें=जीवितसाफल्य. वांचणें=जगणें, जीवंत राहणें. सत्व वांचविलें=सत्व रक्षण केलें. शरणागत सर्व सत्व वांचविलें=ज्या वांचण्यानें (जीवितानें) शरण आलेल्या जनांचें सकल सत्व संरक्षिलें तेंच खरोखर वांचणें होय, त्याच वांचण्यास (जीवितास) सत्य वांचणें म्हणणें यथार्थ आहे. इतर वांचणें हें मरणसमान समजावें. जें वांचणें शरणागताच्या सत्वाचें रक्षण करीत नाहीं तें वांचणें निष्फळ होय. १२. विष्णूच्या म्हणण्याला इंद्रानें 'साधु' 'स्वीकृतम्' असें म्हणून रुकार दिला. 'साधु'=ठीक, वरें आहे. 'स्वीकृतम्'=घेतलें, मानलें, कबूल, मंजूर. हा अर्थ प्रशस्त दिसतो. म्हणुनि=शब्दोच्चार करून. 'साधुस्वीकृत म्हणुनी' असाही पाठ धरून अर्थ करतां येतो—साधु म्हणजे नारद व मातलि त्यांनीं स्वीकृत=अंगीकृत; म्हणुनी=यास्तव; नारदानें व मातलीनें सुमुखास रक्षण्याचें कबूल केलें होतें यास्तव. (वर गीति ५६ पहा.) १३. साधु (नारदानें व मातलीनें) स्वीकृत (अंगीकारलेला). सुमुखाचा अंगीकार नारदानें व मातलीनें केला होता म्हणून. १४. विष्णूनें.

साजविलें कारुण्य, ब्रह्मांड भरूनि सुयश गाजविलें. ॥ ६७
स्वर्गावरि, गाजवुनि द्वेषिकरींचे महात पाख, वळे, ।
येउनि सभेंत इंद्रोपेंद्रावरि बहु महातपा खवळे. ॥ ६८
'वंद विष्णो! मजवांचुनि जरि मेळविलें असेल यश कांहीं?।
मद्बळ देवांनीं जरि हरिजेल, व्यजन कां न मशकांहीं?' ॥ ६९
देवं म्हणे, 'कवि म्हणती, 'मीपण अयशा, न बाहुला वाहें.'।
मज मीच वाहतों, तूं काय? बरें एक बाहुला वाहें.' ॥ ७०

१.अलंकृत करविलें, भूषित करविलें.२.शत्रुरूप हत्तीचे महात असे पंख गाजवुनि स्वर्गावर वळे. [तो गरुड] द्वेषिकरींचे (द्वेषि—शत्रु हेच करी—हत्ती) यांचे महात (माहूत, हस्तिपक). [हत्तीला स्वाधीन ठेवण्यास माहूत जसा समर्थ असतो त्याप्रमाणें शत्रूंला स्वाधीन ठेवण्यास समर्थ असे आपले] पांख (पंख, पक्ष; पक्षी आपल्या शत्रूला आपल्या पंखांनीं ताडतात हें विसरतां कामा नये.) गाजवुनि (पंखांचा ध्वनि करून) स्वर्गावरि वळे (इंद्रलोकावर मोठ्या वेगानें चाल करून आला). आपल्या द्वेषिजनांस ताडण करण्यासाठीं आपले पंख फडफडावून गरुड इंद्रलोकावर चाल करून आला. येथें द्वेषी हेच करी आणि महात हेच पाख असें रूपक समजावें. ३. महा तप ज्याचें असा गरुड. ४. सुमुखाला अमृत पाजून अमरत्व दिलें म्हणून गरुडास क्रोध आला. सुमुख हा गरुडाचा भक्ष्य असून त्याचा संहार एक महिन्यानें करण्याचा विचार होता. आपला भक्ष्य इंद्रानें व विष्णूनें नेला म्हणून गरुडाचें पित्त खवळलें. ५. हें क्षुब्ध झालेल्या क्रोधांध व विचारशून्य गरुडाचें वचन आहे. ६. माझें बळ (सामर्थ्य) जर देवांनीं हरण केलें, तर मशकांनीं व्यजन (पंखा) हरण कां करूं नये? [पंख्यानें मशकांचें निवारण करतात, पण सर्वच उलटा प्रकार झाला म्हणजे मशकच व्यजनाचें हरण करणार हें उघड आहे.] प्रश्न व निदर्शना यांचा संकर. ७. विष्णु म्हणाला. [अ०१०५ श्लो० १९-२१.] ८. विष्णु गरुडाला म्हणाला कीं, शहाणे लोकांचें असें म्हणणें आहे कीं—उपदेश आहे कीं 'मीपणरूप=अहंकाररूप पुष्कळशा अयशाला वाहूं नकोस,' बाहुला हें विशेषण आहे. याचपासून बाहुल्या असें भाववाचक नाम झालें आहे. 'बहुल' शब्दाचें भाववाचक नाम बाहुल. 'बाहुलं बहुलं बहु' इति रूपचिंतामणिः. 'वाहें' या यमकांतील उभय दलांतील शब्दाचा एकच अर्थ करावा लागतो ही गोष्ट चिंत्य आहे. दोन्ही ठिकाणीं 'वाहें' हें आज्ञार्थी द्वितीय पुरुषीं एकवचनी प्रयुक्त आहे. पंताच्या साधारण रहाटीस हें जुळत नाहीं. या गीतीचा अर्थ पुढें लिहिल्याप्रमाणें केला तरी चालेल:—देव म्हणे (विष्णु गरुडाला म्हणाला) [हे गरुडा!] 'कवि बाहुला म्हणतीः—(ज्ञाते पुरुष आपल्या भुजांला म्हणतात):—[हे भुज!] 'मीपण अयशा न वाहें' (अहंपणरूप जें अयश तें धरूं नका, वाळगूं नका; अयशाला कारण असें जें अहंपण त्याचा आदर करूं नका.) [हे गरुडा!] मज मीच वाहतों (माझा भार मीच वाहतों) तूं काय? (तूं माझा भार वाहण्यास कोठें समर्थ आहेस? माझा भार वाहण्याचें तुला कोठें सामर्थ्य आहे! बरें (बरें, जर तुला सामर्थ्य असेल तर) एक बाहुला

ऐसें वदोनि दे तो [१]स्कंधीं [२]बहुभव्यभुजभर, भरे हो ।
प्रभुचा प्रताप तो [३]तन्मदकक्षीं [४]हव्यभुज [५]भरभरे हो. ॥ ७१
हरि गरुडाचें मीपण [६]हरिबाहुभरप्रताप सारेंच, ।
[७]त्याचा गळतां [८]मळसा मद, उतरे सर्व तापसा [९]रेंच. ॥ ७२

---

वाहें' (माझ्या एक भुजाचा भार सहन कर पाहूं). वाहें (पूर्वार्ध) धर, बाळग; वाहें (उत्तरार्ध) सहन कर–असा अर्थ करावा.

१. खांद्यावर. २. अत्यंत पुष्ट भुजांचा भार, अत्यंत विशाल बाहूंचा भार. ३. गरुडाच्या गर्वरूप कक्षांत (तृणांत). हें 'रूपका'चें उदाहरण आहे. ४. अग्नि. ५. पेटे. ६. हरिबाहुभरप्रताप (विष्णूच्या भुजांच्या भाराचा प्रताप) गरुडाचें सारेंच मीपण हरि–असा अन्वय. [भगवंतांनीं आपला सव्य बाहु गरुडाच्या खांद्यावर ठेविला तेव्हां गरुड भारानें आर्त होऊन विव्हल आणि नष्टचेतन पृथ्वीवर पडला. व्यात्तास्य त्रस्तकाय आणि विचेतन अशा पक्षिराजाचे पंख गुरुभारानें गळून पडले. सपर्वत पृथ्वीच्या भाराइतका भार विष्णूच्या भुजांत आहे असें गरुडाला वाटलें. तेव्हां तो विनतातनय भगवंतास शरण गेला. [अ० १०५ श्लो० २२-३२.] ७. त्या गरुडाचा. ८. मळाप्रमाणें, विष्ठेप्रमाणें. ९. रेंच=गर्व, मीपणा अभिमान, अहंकार, रेंच उतरणें=रेंच मोडणें=खोड मोडणें, नाककाटणी करणें, कढ ऊब जिरवणें=To take the conceit out of. रेंच उतरिता=खोड मोडता, रेंच मोडणें, रेंच उतरणें=गर्व परिहार होई अशी खोड मोडणें. उत्तरार्ध–**अन्वय**—त्याचा मद मळसा गळतां, तापसा सर्व रेंच उतरे. **अर्थ**—गरुडाचा सर्व गर्व मळाप्रमाणें (विष्ठेप्रमाणें) गळून जातांक्षणीं जसा ताप उतरतो त्याप्रमाणें–तसा सर्व रेंच (ऊर्ध्वगत वायु)=उद्दामपणा उतरला. पोट दब्ब होऊन किंवा फुगून गेलें असतां वायु ऊर्ध्वगत होतो. मलशुद्धि झाली असतां पोट उतरतें, व वायूही अधोग होऊं लागतो. या गोष्टीकडे कवीचें लक्ष जाऊन प्रस्तुत आर्यार्ध रचला असावा. योगशास्त्रांत प्राणायाम साधण्यास पूरक, कुंभक व रेचक असे तीन प्रकारचे वायु लागतात. एका नाकपुडीनें वायु आंत घ्यावयाचा तो पूरक. आंत घेतलेला वायु कांहीं नियमित कालपर्यंत रोखून ठेवावयाचा तो कुंभक. नंतर दुसऱ्या नाकपुडीनें तो रोखलेला वायु नियमित गतीनें सोडून द्यावयाचा तो रेचक. या रेचक वायूला रेंच अशीही संज्ञा आहे. तेव्हां योगशास्त्रांतील रेचक शब्दाचा अर्थ थोडा व्यापक करून उर्ध्वग व कोंडलेला वायु असा अर्थ व्यवहारांत आला. आमच्या महाराष्ट्रांत रेंच उतरणें–काढणें याचा विशिष्टार्थ झाला आहे. एकाद्याला दृष्टिबाधा झाली असली, अन्नद्वेष झाला असला, तर त्याचे रेंच उतरतात किंवा काढतात. एका लहान तोंडाच्या भांड्यांत रसरसित निखारे घालायाचे, एका परातींत थंड पाणी एक दोन तांब्ये घालायाचें, एक केरसुणी (फडा, बाऱ्हा) व मीठ मोहऱ्या इतकें सामान जुळवायाचें म्हणजे रेंच काढण्याची तयारी झाली. ज्याची दृष्ट काढायाची असेल त्याला पूर्वाभिमुख बसवून

भुज मोही[1] त्यासि, जसा रेंव[2] शिशुदर्वीकरा[3] शिखंडीचा,[4] ।
तो भर दु:सह, रचिला वत्सावरि जेंवि राशि खंडीचा. ॥ ७३
गरुडाचा गुरुतरमद[5] उतरुनि[6] निजभुजहि उतरिला अजितें,[7] ।
अजि[8] तें[9] सदयत्व अतुल विधिहस्तें बिघडल्यासही सजितें. ॥ ७४

---

कांहीं प्राकृत मंत्र म्हणून त्याचेवरून मीठ मोहऱ्या तीन वेळ ओंवाळायाच्या व त्या निखाऱ्यांच्या भांड्यांत टाकायाच्या व मग तें निखाऱ्यांचें भांडें तीनवेळ ओवाळायाचें. तें भांडें तोंडासमोर आलें म्हणजे त्या दृष्ट झालेल्या मनुष्यानें आपल्या तोंडांतील वाफ त्या भांड्यांतील निखाऱ्यांवर सोडायाची. खरा रेंच तो हाच. पुढें तें भांडें पाण्याच्या परांतींत पालथें ठेवायाचें व त्या भांड्याला तीन वेळ दृष्ट झालेल्या मनुष्यानें सव्यपादानें (डाव्यापायानें) स्पर्श करायाचा वगैरे. या कृतीला रेंच उतरणें किंवा काढणें असें म्हणतात. प्रस्तुत गीत्यर्ध रचतेवेळीं ह्या कृतीवर पंतांचा कटाक्ष असावा असें दिसतें. या रेंच उतरण्यानें दृष्टिदोष दूर होतो, ताप (ज्वर) नाहींसा होतो, अन्नावर पूर्ववत् रुचि होते, वगैरे गुण येतात अशी समजूत आहे. तदनुरूपच 'उतरे तापसा रेंच' असा पंतांनीं प्रयोग केला आहे. 'रेंच उतरणें' हा शब्दप्रयोग पंतांनीं अन्य ठिकाणींही योजिला आहे. [अश्वमेध पर्व–अध्याय ५।१२; वनपर्व–अ० ११।३२]. अशीं स्थळें कोशकारांनीं टिपून ठेवण्यालायक आहेत.

१. विष्णुबाहु त्या गरुडाला भ्रांतचित्त करी, विष्णुभुज गरुडाला गर्भगळित करी, भुजाच्या भारानें गरुडाची पांचांवर धारण बसली, गरुड गडबडला, घाबरला. २. आवाज, शब्द. ३. शिशु+दर्वीकरास=बाल+सापाला–बालसर्पास. [दर्वीकर–साप. 'दर्वीकरो दीर्घपृष्ठो दंदशूको बिलेशयः' इत्यमरः । दर्व्याकारः फण एव करो यस्य प्रहारसाधनत्वात् दर्वीकरः । दर्वी फणं करोति इति वा दर्वीकरः. ४. मोराचा. मोर सर्पभक्षक होत, या समजुतीस अनुसरून ही उपमा योजिली आहे. (मयूर हे सापांचे वैरी होत या गोष्टीकडे येथें लक्ष्य आहे. मोर सापांना भक्षण करतात म्हणून त्यांस 'भुजंगभुक्' म्हणजे 'साप खाणारे' असें नांव अमरकोशांत आहे.) ५. फार मोठा. संस्कृत भाषेंत विशेषणास 'तर' आणि 'तम' अथवा 'ईयस्' आणि 'इष्ठ' असे प्रत्यय लागून 'अधिक' आणि 'अतिशयित' असे तारतम्यभावदर्शक यथानुक्रम अर्थ होतात, त्याप्रमाणें येथें 'तर' प्रत्यय लागून 'गुरुतर' म्हणजे 'अधिक मोठा' असा अर्थ झाला आहे. येथें शब्दश्लिष्टपूर्वक सहोक्ति अलंकार. ६. या अर्धांत 'उतरणें' ह्या धातूचा प्रयोग द्व्यर्थक केला आहे हें ध्यानांत असावें. ७. विष्णूनें. ८. हें दोन अर्धांस जोडणारें 'दामयमक' आहे. ९. तें (विष्णूचें सुप्रसिद्ध) सकृपत्व अतुल (अनुपम) [होय, कारणें तें सदयत्व] विधिहस्तें बिघडलेल्यासही (जें विधात्याच्या हातानें निर्माण करतेसमयीं नीट घडलेलें नाहीं त्याला सुद्धां) सजितें (भूषवितें, सुंदर करतें, साजरें करितें). येथें 'सजितें' हें क्रियापद सकर्मक समजावें. सजणें=सजविणें या धातूचा असा सकर्मक प्रयोग अन्यत्र ही आढळतोः–'असेल सजली यथारुचि तर्यीं स्वयोषा करें' [केकावलि ३६].

सावध होउनि गरुड प्रभुसि म्हणे वंदुनि 'क्षमस्व' असें, ।
'घे दास्य तसेंचि पुढें, जरिहि असा मंद अक्षम, 'स्व' असें. ॥ ७९
जो काय सुरसदूषक अघ परिहरिता तसा चिकुरवाळी ।

१. क्षमा कर. मोरोपंताच्या काव्यांत अशीं लहानलहान संस्कृत वाक्यें अनेक आढळतात. [निबंधमाला–अंक ६६ पृष्ठें ३०-३१ पहा.] २. प्रभुसि वंदुनि क्षमस्व (क्षमा करा) असें (अशा प्रकारें) म्हणे (म्हणाला). ३. [आजपर्यंत जसें दास्य (सेवा) घेतलें] तसेंचि पुढें (ह्यापुढेंही, (दास्य (माझी सेवा) घे, ग्रहण कर, मला तुझी सेवा घडों दे. जरिहि (यद्यपि) [मी गरुड] मंद (मंदमति) [व] अक्षम (बलहीन, असमर्थ) असा [आहें, तरी मीं] 'स्व' 'निज,' आपला, (तुमचा) असें, (मी जरी मूर्ख आणि दुर्बल आहें तरी मी आपलाच आहें यास्तव, हे देवा! यापुढेंही माझ्या हातून होणाऱ्या सेवेचें आपण ग्रहण करावें, मला तुमच्या सेवेंत राहणें श्रेयस्कर वाटतें–असा भाव.) येथें 'काव्यलिंग' नामक अलंकार झाला आहे. जेथें म्हणून किंवा कारण हा शब्द अध्याहृत असून शब्दामध्यें किंवा वाक्यामध्यें कार्यकारणभावाचें ग्रहण करावें लागतें तेथें काव्यलिंग अलंकार होतो. याचें लक्षण:—(१) काव्यलिङ्गं हेतोर्वाक्यपदार्थता [काव्यप्रकाश–११४.],(२)समर्थनीयस्यार्थस्य काव्यलिंगं समर्थनम् [कुवलयानंद.] याचीं उदाहरणें:—'रडत नसें पुत्रातें स्वर्गी गेला न सोडिली संधा;। कृष्णा रडतें मी या दीना हतबांधवा धवा अंधा.॥ [स्त्रीपर्व–अ० ४ गी० २१.] संशप्तकमथनीं करि पार्थ महारथ सहस्रसम कर्म; । धर्मप्रसाद माथां, आंगीं भगवत्प्रसाद दृढ वर्म.' ॥ [कर्णपर्व–अ० ११ गी० ९ अलंकारमीमांसा–पृ० ४३.] ४. 'स्व'=स्वजन आप्त असें (मी आप्त आहें, मी तुझा आप्त, दास आहें–गरुड म्हणतो. पंतांनीं गीति ४८-७६ यांत म्हणजे अवघ्या २८ आर्यांत मूळांतील नऊ अध्यायांचा (अध्याय९७-१०५) सारांश सुरसरीतीनें आणिला आहे आणि इतका संक्षेप करतांना मुख्य मुख्य मुद्यांच्या गोष्टींचाही संग्रह केला आहे. मुद्दा न सोडतां, सरस, सरळ आणि शुद्ध शब्दरचना योजून वाचकांचें मन तल्लीन करावें अशी कविता करण्याची पंतांची शक्ति अप्रतिम होय. या गुणांत त्यांची बरोबरी करणारा कोणीही महाराष्ट्र कवि नाहीं. ५. यमुनेचें सुजल त्याचा दूषक–कालिया. ६. अघासुर. या ७६ व्या गीतीच्या पूर्वार्धांत कांहीं अपपाठ असावा असें वाटतें. याचा पाठ कदाचित् असा असावा:—'जो काय सुरसदूषकफणिपरिहरिता तसा चिकुरवाळी' अथवा 'जो काय सुरसदूषकविषपरिहरिता तसा चिकुरवाळी'. हा सूचविलेला पाठ स्वीकृत केला तर याचा अर्थ असा:–[हें सर्व गरुडाचें वर्णन पूर्वार्धांत आहे] सुरसदूषक (उत्तम रसाला–दुग्धादि उत्तम पदार्थाला दूषविणारे, दूषित करणारे जे) फणी (साप) [त्यांचा] परिहरिता (नाश करणारा–दुग्धादि मधुर रसांला आपल्या विषानें दूषित करणारे जे साप त्यांचा नाश करणारा) [व] चिकुरवाळी (चिकुर नामक सर्पाचा नाश करणारा) [वाळणें=वेगळा करणें, फेंकून देणें, भात वाळणें=शिजविलेल्या भातांतून पेज काढून टाकणें. चिकुरवाळी=चिकुराला त्याच्या देहापासून वेगळा करणारा]

निर्गर्व करुनि चुकला बहु परि हरि तातसाचि कुरवाळी. ॥ ७६
तैसा तूंहि करिसि बहु गर्व, परि सुयोधना! न हें हित रे! ।
कर साम पांडवांसीं, सत्सख्यें संकटीं कुजनहि तरे. ॥ ७७
हा नारायण, पांडव धर्मादिसुरांश सबळ हे, राया! ।

---

[असा] जो काय (गरुड—या प्रकारचा जो समर्थ गरुड त्याला) हरि (विष्णु) निर्गर्व करुनि (गर्वहीन करून, गरुडाचा गर्व हरण करून) [जरी] बहु चुकला (गरुडानें जरी मोठा प्रमाद केला) परि (परंतु) तातसाचि (बापाप्रमाणें मोठ्या प्रेमानें) कुरवाळी (शरीरावर हात फिरवी; आईबापें मुलानें जरी मोठी चूक केली तरी त्याला प्रेमानें जशीं कुरवाळितात त्याप्रमाणें विष्णूनें गरुडाला प्रेमानें कुरवाळिलें). या गीतीचा अन्य रीतीनें अर्थ करितात, तो असाः—अन्वय—जो काय सुरदूषक अघपरिहरिता तसा चिकुरवाळी हरि (गरुडाला) निर्गर्व करुनि चुकला, परि तातसाचि बहु कुरवाळी. अर्थ—सुरस (बालक्रीडा) भंग करणाऱ्या अघासुराचा नाश करणारा अथवा यमुनेचें सुरस उदक दूषित करणारा कालिय त्याच्या पापाचा शास्ता, तसाच चिकुर सर्पाचा संरक्षणकर्ता असा जो काय हरि तो गरुडास गर्वहीन करून चुकला, परंतु नंतर पित्याप्रमाणें त्यास अनेक प्रकारें कुरवाळिता झाला. या गीतींत अघासुर व कालिय अशा दोन निरनिराळ्या व्यक्ति न घेतां दोहोंपैकीं एक हवी ती घ्यावी. चिकुरास गरुडानें भक्षिलें पण त्याचा पुत्र सुमुख यास इंद्राकडून अमृत पाजवून विष्णूनें—गरुडानें यास मारीन अशी प्रतिज्ञा केली असतांही—याचें संरक्षण केलें. येथें 'आत्मा वै पुत्रनामासि' या न्यायानें सुमुखाच्या जागीं चिकुर पद कवीनें योजिलें आहे, असें वाटतें. कवि म्हणतो—गरुडाला निर्गर्व केलें ही देवानें मोठी चूक केली, कारण परम भक्त गरुड याचा सर्व देवांसमक्ष इतका पाणउतारा करावयाचा नव्हता. पण न्यायानें ओघास आल्यामुळें तसें करून देव चुकला. परंतु ही चूक समजून नंतर परोपरीनें पित्यासारखाच त्याला कुरवाळिता झाला. येथें दिलेले दोन्ही अर्थ समाधानकारक नसल्यामुळें चिंतनीय आणि शोधार्ह आहेत. ७. हें बाराक्षरी अंत्य यमकाचें उदाहरण आहे. अशा लांबलांब अंत्य यमकांचीं कित्येक उदाहरणें प्रस्तुत चालू असलेल्या 'शालापत्रकां'त आढळतील. [शालापत्रक—पुस्तक ३ पृ० १२१-१२४.] जेव्हां द्वितीय पाद चतुर्थ पादीं आवृत्त होतो तेव्हां त्या यमकाला 'संदष्टक' असें म्हणतात. ['प्रत्येकं पश्चिमयोरावृत्त्या पादयोर्द्वितीयेन । यमके संजायेते गर्भः संदष्टकं चेति ॥' काव्यालंकार—अध्याय ३ श्लोक ७.]

१. त्या गरुडासारखा. २. साधु जनांशीं सख्य केल्यानें. येथें 'अर्थांतरन्यास' अलंकार झाला आहे. ३. श्रीकृष्ण. ४. सुरांच्या (देवांच्या—इंद्र वायु, अश्विनीकुमार इत्यादिकांच्या) अंशानें अवतीर्ण झालेले. [अ० १०५ श्लो० ३४-३५].

वचके **का**ळहि ज्यां, त्यां[1] शक्त तुम्हीं **का**ळकवळ[2] हेराया[3]?' ॥ ७८
त्यातें **सु**योधन म्हणे[4], 'तुमच्या होणार काय हाकांनीं? ।
ईश्वरसंकल्प[5] बळी, परिसोंचि नये प्रलाप[6] हा कानीं.' ॥ ७९
**ना**रद म्हणे, 'गुरुवचन न गणुनि घेतोसि करुनि किति हास[7]? ।
**दु**र्योधना! न आग्रह[8] हित, या विषयींच परिस इतिहास[9]. ॥ ८०
पूर्वीं साक्षात् **धर्म**[10] क्षुत्क्षाम[11] **व**सिष्ठरूप घेऊन, ।
सत्वपरीक्षार्थ[12] शिरे **वि**श्वामित्राश्रमांत[13] येऊन. ॥ ८१
**गा**धिज सादर सत्वर आंगें बहु पाककष्ट[14] साहोनी, ।
धांवुनि जाय तदर्थ[15] स्वशिरीं सिद्धान्नपात्र वाहोनी. ॥ ८२
**धर्म** म्हणे, 'राहेल क्षुधित[16] द्विजमंडळीं कसा चिर हा? ।
सेवीन हेंहि[17] पुनरपि येउनि, तोंवरि उभा असाचि[18] रहा.' ॥ ८३
ऐसें वदोनि जातां[19], **गा**धिज राहे उभाचि वर्षभर, ।

---

१. काळाला सुद्धां घाबरविणाऱ्या पांडवांस. २. काळाचे मुखांतील ग्रास. ३. पहाया. येथें कण्वभाषण समाप्त झालें. [गीति ४८-७८.] या अर्थात '**का**व्यार्थापत्ति' नामक अलंकार झाला आहे. ४. भगवंतास शरण जा, पांडवांशीं साम कर, विरोध करणें अहितास्पद होय—इत्यादि कण्वोपदेशाचा उपहास करून गजकराकार मांडी थोपटून सुयोधन म्हणतो. [अ० १०५ श्लो० ३८-४०.] ५. ईश्वराची इच्छा प्रबल आहे, ईश्वरेच्छा बलीयसी आहे, तिला आड येण्याचें सामर्थ्य कोणालाही नाहीं, तेव्हां तिलाच वश होऊन वागलें पाहिजे—असा भावार्थ. ६. बडबड, जल्पना. ७. हास्य, विडंबना. ८. आग्रह अनर्थकारक आहे, निर्बंध महादारुण आहे [१०६—श्लो० ६—७.] ९. गालवाचा इतिहास. गालव हा विश्वामित्राचा प्रिय शिष्य होता. याची कथा मूळभारतांत फार विस्तृत आहे. [अध्याय १०६-१२३.] १०. यम. ११. क्षुधेनें कृश. १२. विश्वामित्राच्या सत्वाची परीक्षा पहावी या हेतूनें. १३. विश्वामित्र=कौशिकमुनि. [विश्वामित्र='मित्रे चर्षौ' [१०४९।६-३-१३०] या सूत्रानें विश्व+मित्र यांचा संधि 'विश्वामित्र' असा होतो. जेव्हां कौशिक ऋषि असा अर्थ नसतो तेव्हां विश्वामित्र असाच संधि होतो. जसें—विश्वमित्र गोपाल. १४.अन्न शिजविण्याचे क्लेश. १५. त्या वसिष्ठासाठीं. १६. फार क्षुधित कसा राहील? अर्थात् भोजन करील—असा भावार्थ. [विश्वामित्र चारुपचन करण्यास लागला इतक्यांत यमधर्म अदृश्य झाला. अन्नसिद्धीपर्यंत वाट न पाहतां इतर मुनिजनांच्या घरीं त्यानें भोजन केलें. अ० १०६ श्लो० १०-११.] १७. हें त्वां आणलेलें अन्न. [अ० १०६ श्लो० १२.] १८. दोन हातांनीं मस्तकावर अन्न धारण करून उभा रहा. [श्लो० १३.] १९. गेला असतां, जात असतां.

पात्रभर न बहु, गालवपरिचरणें बहुत होय हर्षभर. ॥ ८४
भेटे वसिष्ठवेषें वर्षांतीं गाधिजास येऊन, ।
सेवून नवोष्णान्न प्रेमें उद्गार फार देऊन. ॥ ८५
तो, 'साधु ब्रह्मर्षे! साधु' असें वरद धर्म बोलोनी ।
तोलोनि वसिष्ठासीं जाय, भले डोलवूनि डोलोनी. ॥ ८६
गाधिज शिष्यासि म्हणे, 'वत्सा! झालासि धन्य, जा गेहा; ।
जैसा दासहितार्थ, स्वहितार्थ तसा सदा न जागे हां. ॥ ८७
रक्षी गुरुसेवा हे सच्छिष्यशिशूसि गालवा! जिवती, ।

---

१. अन्नपात्राचा भार विश्वामित्राला फार मोठा असा वाटला नाहीं, गालवानें त्याची सेवा (परिचरण) फार चांगली केली. २. गालवाच्या सेवेनें विश्वामित्राला अत्यंत आनंद झाला. ३. वसिष्ठाच्या रूपानें, वसिष्ठवेश धरून. [अ० १०६ श्लो० १५-१६.] ४. नूतन आणि उष्ण (ताजें) असें अन्न. [श्लो० १७.] ५. ढेंकर. ६. तो धर्म. ७. हे विप्रर्षे! [विश्वामित्र क्षत्रभावापासून नष्ट होऊन ब्राह्मणत्व पावला असें 'ब्रह्मर्षे' या संबोधनपदानें सूचविलें.] ८. सज्जन. ९. आपल्या शुश्रूषेनें आणि भक्तिभावानें तूं धन्य झालास. [श्लो० १९ टीका.] १०. हा (गाधिजमुनि) आपल्या सेवकाचें हित करण्यास जसा सदा उद्युक्त असतो तसा स्वहित साधण्यासही नसतो. व्यतिरेकालंकार. ११. उत्तम शिष्यरूप मुलास. १२. हे गालवा! सच्छिष्यशिशूस हे गुरुसेवा जिवती रक्षी. जे काय ईश्वरासि वंदुनि गाल वाजविती ते (त्याला) बहु प्रिय [असती] गुरुची सेवा हीच जिवती. सच्छिष्य हाच शिशू=बालक. जशी जिवती लहान मुलांचें रक्षण करते तशी गुरुसेवा सच्छिष्याचें करते. शंकराला जे कोणी वंदन करून त्याचे पुढें गाल वाजवितात (बोकडासारखा बु बु बु असा शब्द करतात) ते फार प्रिय होतात. प्रथमार्धांत रूपकालंकार. जिवती नांवाची देवी आहे. तिचें पूजन महाराष्ट्रांतील कांहीं भागांत (उ० नागपूर प्रांतांत) आषाढ वद्य अमावास्येस करतात. या पूजनानें ती संतुष्ट होऊन मुलांचें रक्षण करते अशी समजूत आहे. 'पुत्रपिंडपालन' नांवाचे व्रताचा उल्लेख कालिदासानें शाकुंतल—अंक २ यांत केला आहे. त्याच व्रताचें सांप्रत स्वरूप 'जिवती' असावें. या अमावास्येस नागपूरप्रांतीं 'जिवती'ची आंवस म्हणतात. दक्षिण महाराष्ट्रांत 'टवळी' आंवस म्हणतात. महाराष्ट्रांतील बऱ्याच भागांत या 'जिवती' देवीच्या प्रत्यक्ष पूजेचा लोप झाला आहे व तिच्या नांवानें मंत्रित ताईत किंवा दोरा यालाच 'जिवती' म्हणण्याचा प्रघात पडला आहे. प्रस्तुत स्थळीं दोन्ही अर्थ सुसंगत आहेत. तेव्हां हवा तो घ्यावा. द्वितीयार्धांत 'ईश्वर' शब्दानें शंकर, महादेव, शिव—असाच अर्थ घेतला पाहिजे; कारण वंदारूचें गाल वाजविणें इतर देवांना प्रिय असल्याचें कोठें प्रसिद्ध नाहीं. दक्षप्रजापतीचा शंकरानें शिरच्छेद केल्यावर इतरांच्या सांगण्यावरून एका बोकडाचें

प्रिय ईश्वरासि ते बहु, वंदुनि जे काय गाल वाजिवती.' ॥ ८८
गालव म्हणे, 'वहावी पायांवरि काय दक्षिणा सांगा?' ।
गाधिज म्हणे, 'दिली बहु, वत्सा! वदलासि तूं असें कां गा!' ॥ ८९
'कांहीं मागाचि' असें असकृत् फुगवुनि उगेंच गाल वदे, ।
अत्याग्रहें करूनि श्रीगुरुहृदयासि ताप गालव दे. ॥ ९०
गाधिज म्हणे, 'विधुधवल अष्टशत श्यामकर्ण दे वाजी.' ।
शिष्य 'अवश्य' म्हणे वरि, परि निजचित्तांत, 'हाय! देवाजी!'॥ ९१
झाला त्या चिंतेनें केवल कृश हरिणकाय गालव तो; ।
राजा! आधिहरिविणें भलत्या कविहरिण काय गा! लवतो? ॥ ९२

---

शिर दक्षाचें धडावर लाविलें. या बोकडाचे मुखानें दक्षानें महादेवाची स्तुति केली व ती स्तुति महादेवास फार आवडली. ही कथा सुप्रसिद्धच आहे. [भागवत–स्कंध ४ अध्याय ७ श्लोक ३ व श्लोक १३-१५.] दक्ष जसा शंकरास शरण जाऊन त्याचे पुढें बुबुबु शब्दद्वारा आपली लीनता व्यक्त करूं लागला व त्यावर शंकर प्रसन्न झाला, तद्वत् जो कोणी शंकरापुढें गाल वाजवून (म्हणजे बोकडाप्रमाणें शब्दोच्चार करून) आपली लीनता प्रकट करतो तो भक्त शंकरास फार आवडतो. तेव्हां लीनता हा प्रसन्नतासंपादक गुण आहे–हा भावार्थ. महादेवास नमस्कार करून, बोकडाच्या शब्दाचें अनुकरण करणारा ध्वनि गाल वाजवून करण्याचा संप्रदाय सुप्रसिद्ध आणि सर्वत्र प्रचलित आहे. १३. अलंकारविशेष. जो मुलांच्या गळ्यामध्यें बांधितात तो. या अलंकाराच्या योगें मुलांला भूतांखेतांची बाधा होत नाहीं असें समजतात. जिवती–ही एक देवता आहे, ही मुलांचें रक्षण करते म्हणून हिचें व्रत बायका करतात. सटवी मुलें मारते आणि जिवती मुलें राखते अशी समजूत आहे.

१. गुरुदक्षिणा. [गुरुदक्षिणा न दिली असतां, कोणतेंही कर्म सांग आणि सिद्ध होत नाहीं. सदक्षिण कर्म सिद्धीस पावतें, जो गुरुदक्षिणा देतो त्याला अपवर्ग (मोक्ष) मिळतो, 'हतो यज्ञस्त्वदक्षिणः' इति स्मृतिः–इत्यादि गोष्टींस अनुलक्षून गालवाचा प्रश्न आहे.] २. जी सेवा केली तींच बहु दक्षिणा झाली. ३. तूं दक्षिणा देण्याची गोष्ट काढूं नको–असें सूचविलें आहे. ४. पुनः पुनः. ५. विधु+धवल=चंद्र+शुभ्र=चंद्रासारिखे शुभ्र.·चंद्रवर्चस्क. ६. श्याम (हरित) आहेत कर्ण ज्यांचे ते श्यामकर्ण (घोडे). श्यामकर्ण अश्व अश्वमेधास उचित मानतात. ७. 'हाय! हाय! हे देवा!' असे दुःखोद्गार गालवानें मनांत काढिले. बाह्यतः चित्तस्वास्थ्य प्रकट केलें, तरी तो चिंतेनें मनांत घाबरला होता. ८. फिकट शरीराचा. हरिण+काय=पांडुर, शबल+देह. ९. मनोव्यथारूप सिंहाखेरीज. १०. कविरूप मृग. सुज्ञपुरुष हाच मृग. सुज्ञ पुरुषांला जर मनोव्यथेनें घेरलें असेल तरच ते लवतात. चितारूप सिंहाशिवाय भलत्यासलत्यास कविरूप हरिण कधींही लवणार नाहींत. या अर्थात 'काव्यार्थापत्ति' नामक अलंकार झाला आहे.

जेव्हां म्हणे बहु मनोरुगजगरग्रस्तकाय गालव 'हा !' ।
गरुड म्हणे, 'उडविन नग, मग मित्रा ! आधि काय ? गा ! लव हा ?' ॥
आहे पृष्ठीं, पाहे, बहु यत्न करुनि तदाधि वाराया, ।
परि गालवासि न पुरे धीर, परमविकळ होय गा! राया ! ॥ ९४
गरुड नव्हे मूर्तिमती ब्रह्मण्या विष्णुची दया ती, तें ।

१. मनस्+रुज्+अजगर+ग्रस्त+काय=चित्त+रोग+मोठा साप+पीडित+शरीर=मनोव्यथारूप अजगरानें ग्रासिलें शरीर ज्यांचें असा. २. हाय हाय. चंद्रशुभ्र आठशें श्यामकर्ण अश्व मिळण्याची अशा नव्हती म्हणून गालवाला मोठी चिंता पडली. तो चिंताशोकपरायण होत्साता दुःखानें विलपूं लागला [अ० १०७ श्लो० १-१५], व समुद्राच्या परतीरीं जाऊन देहविसर्जन करण्याचा निश्चय करून बसला. ३. विनतात्मज गरुड हा गालवाच्या विष्णुदासत्वानें सखा होय. गालवानें त्याजवर पूर्वीं उपकार केला होता म्हणून सखा असें नव्हे. 'विष्णूच्या आज्ञेनें मी तुझें साहाय्य करण्यास आलों आहें' असें गरुडानें गालवाला सांगितलें. [अ० १०७ श्लो० १७-१८.] ४. पर्वत. ५. कण. ६. गालवाला गरुड आपल्या पाठीवर घेऊन गेला. पूर्व पश्चिम दक्षिण आणि उत्तर या दिशांस घेऊन जाण्याची आपली सिद्धता आहे असेंही गरुडानें सांगितलें. (अध्याय १०८-१११) पण अखेरीस ते दोघे ययाति नामक राजाकडे आले. (अ० ११४ श्लो० ६-८.) ७. तत्+आधि+त्याची+चिंता=त्या गालवाची चिंता. ८. हें 'अपन्हुति' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. उपमेयावर उपमानाचा आरोप करण्यासाठीं उपमेयाच्या स्वरूपाचा (गुणाचा) अपलाप (अपन्हव) केला असतां तेथें अपन्हुति अलंकार होतो; उपमेयाच्या खऱ्या स्वरूपाचा अपन्हव करून त्याजवर उपमानाचा (नव्या गुणाचा) आरोप करणें, म्हणजे उपमेय असत्य आणि उपमान सत्य असें स्थापणें यास अपन्हुति म्हणतात. याचीं उदाहरणें:—(१) हा चंद्रमा नव्हे, तर आकाशगंगेंतील कमळच आहे. (२) ही शब्दवृष्टि नव्हे, तर अमृतवृष्टिच होत आहे. (३) हें मुख नव्हे, तर चंद्रच आहे. (४) ही स्त्री नव्हे, प्रतिष्ठा तुमची, जरि ईस सोडिता पाणी । धर्में चार्थे च असें वदलां कां प्रथम जोडितां पाणी ? ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत—विराटपर्व—पृ० २४-२५ अध्याय १ गीति १०३.] (५) खड्गें पट कापविला न तिचा अर्धा गळाचि तो कलिनें, । न मळावेंचि कधीं तें प्रेम कसें मळविलें खळें मलिनें ?॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला—वनपर्व—पृ० ११ अध्याय ४ गी० ११६.] (६) सखि हस्तीं हस्त न वृष, पांडवहृदयांत सायका मारी । क्रोधातें भीम गिळी, गरलातें जेंवि काय कामारी.॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत—सभापर्व—अ० ४ गी० ८१ पृ० ३४.] (७) सेतु न तो, यत्पतिनें स्वसुता नेली, जशी वृकें एणी, । त्या लंकेची श्रीभूदेवीनें ओढिली असे वेणी. ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला—वनपर्व—अध्याय १२ गी० ११ पृ० १७०.] (८) ते सत्य सर्प, न विशिख कर्णहि न, तदीय सदन वारुळ तो; । कीं माणिक्यसर जयश्रीवरणीं शर

तें बहु कारुण्य असो, भेटवि वित्तार्थ[1] मग ययातीतें. ॥ ९९
तेणें नाहीं तादृग्धनसंग्रह[2] म्हणुनि माधवी[3] दुहिता[4] ।

गळां नवा रुळतो. ॥ [द्रोणपर्व–अ० १२ गी० ८२] (९) कृतवर्मा शल्यातें स्वरथीं वाहोनि शीघ्रतर पळवी । होय स्वयेंचि सावध, भीम न तो मोह तद्यशा मळवी. ॥ [द्रोणपर्व–अध्याय १ गी० ९३.] या अलंकाराचें लक्षण असें:—(१) प्रकृतं यन्निषिध्यान्यत्साध्यते सा त्वपन्हुतिः [काव्यप्रदीप–पृ० ३९०] (२) विषयस्यापन्हवेऽपन्हुतिः [अलंकारसर्वस्व–पृ० ५०] (३) नैतदेतदिदं ह्येतदित्यपन्हवपूर्वकम् । उच्यते यत्र सादृश्यादपन्हुतिरियं यथा ॥ [वाग्भटालंकार–चतुर्थ परिच्छेद. ८६] (४) प्रकृतस्य सदृशानामपलापोऽपन्हुतिः । [काव्यानुशासन–अध्याय ३ पृ०३९] (५) अपन्हुतिरपन्हुत्य किंचिदन्यार्थदर्शनम् । न पंचेषु स्मरस्तस्य सहस्रं पत्रिणामिति ॥ [काव्यादर्श–२-३०४ पृ० २७२] (६) प्रकृतं प्रतिषिध्यान्यत्स्थापनं स्यापदन्हुतिः [साहित्यदर्पण–१० ६८३। पृ० २८७.] किंचिदपन्हुत्य यदन्यार्थप्रदर्शनं सापन्हुतिः ॥ [अलंकारशेखर–त्रयोदश मरीचि–काव्यमाला पृ० ३४]. ९. ब्राह्मणाविषयीं दयालु. या गीतीचा सान्वय अर्थः–[तो गरुड नव्हे (तो गरुड नव्हता) [तर] ती ब्रह्मण्या विष्णूची (ब्राह्मणाविषयीं दयालु अशा विष्णूची) मूर्तिमती (प्रत्यक्ष देहधारिणी गरुडरूपिणी) दया (कृपा) [होती.] तें तें (या प्रसंगीं गरुडानें प्रकट केलेलें) कारुण्य (दयाशील वर्तन) बहु असो (पुष्कळ असो, गरुडाचें आचरण अत्यंत सदय असो, तें मी विस्तारानें सांगत नाहीं, भगवद्दयारूप जो गरुड त्याच्या ठिकाणीं तें कारुण्य फार असावयाचेंच) मग (नंतर) वित्तार्थ (धनासाठीं, द्रव्य संपादण्याच्या उद्देशानें, शामकर्ण घेण्यासाठीं द्रव्य मिळविण्याच्या हेतूनें) ययातीतें (ययाति राजाला) भेटवि. (त्या गरुडरूपधारिणी दयेनें द्रव्यप्राप्तीसाठीं गालवाची ययाति राजाशीं भेट करून दिली.) या आर्येचा अन्य रीतीनेंही अन्वय लावितां येतोः—गरुड नव्हे [ती] मूर्तिमती ब्रह्मण्या विष्णूची दया [होय] तें बहु कारुण्य तीतें[च] असो, मग [ती] वित्तार्थ ययातीतें भेटवी–असा अन्वय करावा. या अन्वयांत पूर्वार्धात 'तीतें' असें पद घेतलें आहे. याचा अर्थः–त्या गालवास साहाय्यकर्ता गरुड भेटला नाहीं; तर ब्राह्मणांविषयीं दयाळू अशी मूर्तिमती श्रीविष्णूची दयाच भेटली. या दयेलाच हा कृपाळुपणा असो (योग्य आहे), नंतर त्या गरुडानें (दयेनें) त्या गालवास वित्तार्थ ययातिराजाला भेटविलें.

१. आठशें अश्व विकत घेण्यासाठीं लागणाऱ्या पैशाकरितां. २. गालवानें मागितला तसला धनाचा संचय. ३. ययातीच्या मुलीचें नांव माधवी [ही कन्या गालवानें कोणा राजाला देऊन त्याजपासून आठशें श्यामकर्ण घेऊन कृतकृत्य व्हावें व काम झाल्यावर पुनः गालवानें येऊन भेटावें अशा करारानें ययातीनें दिली. अ० ११५ श्लो० ८-१६.] ४. दुहिता=कन्या. दुहिता='कन्यावाचक संस्कृत 'दुहितृ' शब्द, झेंड् 'दुग्धर', ग्रीक 'डुगटर', गाथिक 'डाटर' वगैरे एकच असून मूळ धातु 'दुह् दोहने' हा दिसतो. अर्थात् त्या वेळीं गाई, म्हशी वगैरेंचें दूध काढण्याचें काम मुलीचें असल्यामुळें तिला 'दुहिता' म्हणतात. [ग्रामसंस्था–पृष्ठ ५ टीप ३].

दिधली [1]कीर्त्युपदेशें भावि नृपांच्या करावया सुहिता. ॥ ९६
विकिली [2]हर्यश्वदिवोदासोशीनरनृपांसि ती कन्या ।
[3]तद्दत्तषट्शतहयांसह मग [4]गुरुलाहि अर्पिली धन्या. ॥ ९७
पुत्र प्रथम वसुमनानामा संप्राप्त होय हर्यश्वा; ।
गमला ज्या नरसिंहापुढें रणीं [5]शत्रुभूपवर्य [6]श्वा. ॥ ९८
[7]मानी प्रतर्दनाख्यें पुत्रें, बहु आत्मतप, दिवोदास; ।
[8]ज्या उपजतांचि धांवुनि गुण देती, जेंवि सपदि 'वो' दास. ॥ ९९
शिबिनामक पुत्रातें पावे हो! [9]वरुनियां उशीनर ती, ।
[10]यद्गुणजित निजपतिची पाहे स्थिर कोरडी उशी न रती. ॥ १००

---

१. कीर्ति व उपदेश यांच्या द्वारा राजांचें भावी कल्याण करण्यासाठीं दिली. २. हर्यश्व, दिवोदास आणि उशीनर या तीन राजांला. [हर्यश्व=हा अयोध्येचा राजा, याला गालवानें ती कन्या दिली. तिच्याठायीं त्याला वसुमना नामक पुत्र झाला. तेव्हां ती कन्या राजानें गालवास दोनशें श्यामकर्णासह परत दिली. (अ० ११६.) दिवोदास=हा काशीचा राजा. याला हिच्याठायीं प्रतर्दन नामक पुत्र झाला. नंतर दिवोदासानें दोनशें श्यामकर्णासह तिला परत दिलें. (अ० ११७.) उशीनर=हा भोजनगराचा राजा. याला या माधवीच्या ठायीं शिबि नामक पुत्र झाला. नंतर राजानें दोनशें चंद्रशुभ्र श्यामकर्णासह तिला गालवास परत दिले. (अ० ११८) या प्रमाणें गालवाला सहाशें श्यामकर्ण प्राप्त झाले. नंतर दोनशें अश्व कमी होते ते मिळविण्याचा त्यानें उद्योग केला. पण तो सफळ होण्याची आशा नव्हती. तेव्हां त्या अश्वांसह माधवी कन्येला विश्वामित्राच्या स्वाधीन केलें.] ३. तत्+दत्त+षष्+शत+हयांसह=त्या तीन राजांनीं+दिलेल्या+सहा+शंभर+घोड्यांसह=त्या तीन राजांनीं दिलेल्या सहाशें श्यामकर्ण अश्वांसह. ४. विश्वामित्राला. ५. शत्रूंतील श्रेष्ठ राजा. ६. कुत्रा. ७. दिवोदास प्रतर्दन नामक पुत्र झाल्यामुळें आत्मतप बहु (मोठें, श्रेष्ठ) मानी (समजे). ८. जेंवि दास सपदि वो देती (ज्याप्रमाणें सेवकजन धन्यानें हाक मारली असतां तात्काल वो देतात—जवळ येतात, प्राप्त होतात) [तेंवि] ज्या (ज्या दिवोदासपुत्रास—प्रतर्दनास) उपजतांचि (त्याचा जन्म होतांच—बाळपणांतच) गुण (उत्तमगुण) धांवुनि (वेगानें येऊन) वो देती (प्राप्त होतात, हजर होतात—प्रतर्दन लहानपणींच गुणसंपन्न असा होता. वो देणें—'ओ' असें म्हणणें, जवळ येऊन जबाव देणें. सपदि=तत्काल.) ९. त्या माधवीशीं विवाह करून, त्या माधवीचा स्वीकार करून. १०. यद्गुणजित (ज्या शिबिनामक उशीनरपुत्राच्या गुणांनीं जिंकिलेल्या) निजपतिची (मदनाची) उशी (निजण्याचे ठिकाणीं बिछान्यावर डोकीखालीं घेतात ती—उपधान) स्थिर आणि कोरडी अशा स्थितींत रती (मदनस्त्री) न पाहे—चिंतेनें मदनास स्वस्थ झोंप आली नाहीं आणि त्याचे डोळ्याचे

विश्वामित्रा चढवी सुयशाच्या पुत्र अष्टक विमानीं, ।
साक्षात् गरुडचि त्यातें सर्वाधिव्यालदष्ट कवि मानी. ॥ १०१
गाधिज म्हणे, 'अहा! रे! गालव! बा! लवहि तूज न विचार, ।
देतासि माधवी मज होते ऐसेचि पुत्र कवि चार'. ॥ १०२
ऐसा हरिभक्तहि मुनि गुर्वर्थहि करुनि आग्रह श्रमला, ।
गमला तत्सख गरुडहि दुर्बळ, कीं तोहि त्यासह भ्रमला. ॥ १०३
यास्तव दुराग्रह नव्हे हितें, सदुदित वाक्य कर उगा, राया! ।

---

अश्रु खळले नाहींत–असें तात्पर्य. शिबीच्या गुणांनीं जिंकलेला जो आपला पति मदन त्याची उशी रतीनें कोरडी व स्थिर पाहिली नाहीं. (ती नेत्राश्रूंनीं भिजलेली व मदनाच्या अस्वस्थपणानें हाललेली असे–असें तात्पर्य.)

१. गालवानें सहाशें अश्व व माधवी कन्या यांस घेऊन गरुडासह विश्वामित्राकडे जाऊन त्याची गुरुदक्षिणा घेण्याविषयीं प्रार्थना केली. मुनीनें त्या दक्षिणेचा अंगीकार केला. कांहीं दिवसांनीं माधवीच्या ठायीं विश्वामित्राला अष्टक नामक पुत्र झाला. तेव्हां त्यानें माधवीस गालवाच्या स्वाधीन केलें आणि सहाशें अश्व दान केले. गालवानें माधवीला प्रथमतःच आपल्याला दिलें नाहीं म्हणून मुनीला वाईट वाटलें. [अ० ११९ श्लो० १४-२०.] २. सकल मनोव्यथारूप सर्पानें दंशिलेला, सर्व चिंतारूप सर्पांनीं चावलेला. ३. तिलभरही. ४. गालव. ५. गुरूकरितां देखील. ६. त्या गालवासह. येथें गालवाचा इतिहास पुरा झाला. (गीति ८१-१०३.) मूळांतील १७ अध्यायांचा संक्षेप पंतांनीं अवघ्या २२ गीतींत केला आहे, यावरून पंतांची संक्षिप्त वृत्तांत सांगण्याची हातोटी अनुपम समजली पाहिजे. एकंदर **महाभारत** 'स्वल्पांत आणण्याचा' त्यांचा पूर्व संकल्पच होता असें त्यांच्याच लेखावरून दिसतें. पंतांच्या भारतांत एकंदर १७१२९ गीति आहेत, यावरून त्याचें स्वल्पत्व व्यक्त होतें. 'व्यासकृत महाभारत लक्ष ग्रंथ प्रसिद्ध हा भारी । आर्यावृत्तें रचितों; **स्वल्पांतचि आणितों कथा सारी** ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–आदिपर्व–अ० १ गी० ९ पृ० २.] "मुक्तेश्वरादि कांहीं कवींनीं हरएक विषय विस्तारपूर्वक वर्णन केला आहे. परंतु **मोरोपंताचें** तसें नाहीं. त्याजला कोणत्याही वर्णनांत विस्तार आवडत नव्हता. एखादी गोष्ट विस्तारानें करण्याजोगी मनोरंजक, कवितेला अनुकूल, पुण्यश्लोकचरित्ररूप असली, तरी तिचा अगदीं विस्तार करावयाचा नाहीं; हा जसा त्याचा बाणाच. जेथें जेथें विस्तार असावा असें त्याचें मनच त्याजला सांगूं लागलें त्या त्या ठिकाणींही त्यानें निमित्तविशेषाची योजना करून कथेचा विस्तार करित नाहीं म्हणून लिहून ठेविलें आहे." [कै० हंसकृत मोरोपंतावरील निबंध–पृ० १०१.] ७. कल्याणप्रद. ८. सत्+उदित=साधु+कथित=साधूंनीं बोलिलेलें, साधूक्त.

[1]सन्मतधर्मपरावरि काळहि न शकेल कर [2]उगाराया. ॥ १०४
[3]मानें तोहि ययाति स्वर्गापासूनि पावला [4]पतन, ।
'[5]दौहित्र साधु [6]साधुनि देती त्याचें तयासि तें [7]वतन.' ॥ १०५

---

## अध्याय नववा.

धृतराष्ट्र [8]म्हणे, 'कृष्णा! मज हा [9]दुर्वृत्त आकळेना गा! ।
होतो मदांध जो, त्या स्वहित अहित काय गा! कळे [10]नांगा? ॥ १
तूं प्रभु [11]परमाप्त म्हणुनि, करुनि कृपा, या सुयोधना वळिव, ।
'[12]बळि वळविला तुवां, [13]हा किति? याला [14]स्वहित बा! पुन्हा कळिव. ॥ २
ज्याच्या वचनीं ब्रह्मप्रमुख [15]कवींचा [16]उदंड विश्वास, ।

---

१. साधूंला मान्य अशा धर्माच्या ठिकाणीं तत्पर असणाऱ्या जनांवर. २. कर उगारणें—हात उगारणें, (मारण्यासाठीं) हात उचलणें. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ३. अभिमानानें. ४. काव्यसंग्रहग्रंथमाला—मुक्तेश्वरकृत आदिपर्व—पृष्ठें १५६-१६७ अध्याय १९ वा यांत ययातिपतनाची कथा आहे. ५. दुहितेचे पुत्र, वसुमना इत्यादि. ययातिराजाची कन्या माधवी म्हणून होती तिला अष्टक, प्रतर्दन, वसुमना आणि शिबि असे चार पुत्र होते. हे अरण्यांत जेथें तप करीत होते तेथेंच ययाति आत्मश्लाघादोषानें स्वर्गातून पतन पावला. यांनीं आपलें पुण्य देऊन मातामह ययातीला परत स्वर्गीं पाठविलें. ६. संपादून, मिळवून. ७. तें वतन=स्वर्ग. [उद्योगपर्व—अ० १२०-१२३ यांत माधवीपुत्रांचें सविस्तर वर्णन आहे.] 'वतन' हा आरबी शब्द पंतांनीं आपल्या काव्यांत अनेक स्थळीं योजिला आहे. [स्वर्गारोहणपर्व—अ० १।८; महाप्रस्थानकपर्व—अ० २।१४; शांतिपर्व—अ० ५।७४; कर्णपर्व—अ० ४२।१२, अ० २८।१, अ० २०।२९; ब्रह्मोत्तरखंड—अ० २०।३६; सभापर्व—अ० १।६०, अ०७।४७.] ८. अ० १२४ श्लोक २-५ पहा. ९. दुराचारसंपन्न, दुर्विनीत, दुःशील. १०. हत्तीस. (दृष्टांतपक्षीं—उन्मत्त झालेल्या दुर्योधनाला.) ११. अत्यंतहितकर्ता. १२. बळि नामक दैत्यश्रेष्ठ याला त्वां वश केलें. [बळि—विष्णूनें वामनावतारीं त्रिपादभूमि बळीपाशीं मागून, बळीनें देतों असें म्हटल्यावर, विश्वरूप दाखवून, दोन पावलांत भूलोक व स्वर्गलोक व्यापून, तिसरें पाऊल ठेवावयास जागा नव्हती म्हणून त्याच्या मस्तकावर पाय देऊन त्यास पाताळीं घातलें. याप्रमाणें कृष्णानें आपल्या पराक्रमानें बलिदैत्याला पादाक्रांत करून वठणीस आणिलें, असें वर्णन आहे. बळीचा छळ केल्यामुळें जें पातक घडलें त्याच्या निरसनार्थ विष्णु बळीच्या द्वारीं लोखंडाचें मुसळ हातांत घेऊन द्वारपाळाचें काम करूं लागला—असें पुराणांत वर्णन आहे.] १३. हा दुर्योधन सहज वळण्यासारखा आहे, या दुर्योधनाचा पाड काय? १४. स्वतःचें कल्याण. १५. कवि=पंडित, विद्वान्, ज्ञाता. १६. पुष्कळ.

निश्वास[1] वेद ज्याचे, पाळी जो परम आप्त[2] विश्वास[3]. ॥ ३
तो प्रभु करी परोपरि, परिहाराया अनर्थ[4], उपदेश[5], ।
जेणें केला केवळ बाळ ध्रुव[6] साधुमान्य[7] सुपदेश[8]. ॥ ४

---

१. ज्याचे निश्वास (सुस्कारे–श्वासोच्छ्वास) वेद होत. वेद हा ईश्वराचा निश्वास असें वर्णन प्राचीन ग्रंथांत आढळतें. पुढील श्लोक पहा:–'यस्य निश्वसितं वेदा वेदेभ्यो योऽखिलं जगत्। निर्ममे तमहं वन्दे विद्यातीर्थं महेश्वरम् ॥.' पंतांनींही असेंच वर्णन अन्यत्र केलें आहे:–'निश्वास वेद ज्याचे [रामरीति–गी० ३]; 'ज्याचे निश्वास सर्वही वेद [द्वितीय शिवरामायण–गी० ५१, काव्यसंग्रहग्रंथमाला–रामायणें–भाग २ पृ० ९५.]; ज्याचे संपूर्ण वेद निश्वास [कृष्णविजय–उत्तरार्ध–अध्याय ८३ गीति २५ पृ० २५१.] २. आप्त–स्नेही, हितैषी, ज्याचा विश्वास पटला तो, विश्वासाधार. ['आप्तः प्रत्ययितः' इत्यमरः.] ३. जगत्त्रयास. ४. कुरुवंशक्षयरूप अनर्थ टाळण्यासाठीं. [येथें उपदेशकाची योग्यता सांगितली आहे त्यावरून इष्टकार्य सफल होण्याचा संभव फार आहे असें सूचित केलें आहे. सर्वधर्मार्थतत्त्ववेत्ता कृष्णासारखा उपदेशक असल्यावर त्याच्या बोधापासून श्रोत्याच्या मनावर सुपरिणाम व्हावयाचा हें साहजिक आहे.] ५. (दुर्योधनाला) उपदेश करी–असा अन्वय. (हा उपदेश–अध्याय १२४ श्लो० ८-६२ यांत आहे, तो जरूर तर पहावा.) ६. ध्रुव–उत्तानपाद राजास त्याच्या सुनीति नामक भार्येपासून झालेला पुत्र. या राजास सुनीति व सुरुचि अशा दोन भार्या होत्या, त्यांत सुनीति ही नावडती होती, त्यामुळें तिचा पुत्र ध्रुव हाही नावडता होता. एकदां याचा सावत्र भाऊ राजाच्या मांडीवर बसला असतां हाही बसण्यास गेला, पण हें सुरुचीला आवडलें नाहीं, व तिनें त्याचा धिक्कार केला. तेव्हां हा रडत रडत आपल्या मातेकडे (सुनीतीकडे) गेला व झालेली गोष्ट तिला सांगितली, तेव्हां तिलाही फार वाईट वाटून ती म्हणाली, 'परमेश्वराची आराधना केल्याशिवाय हें ऐश्वर्य कोठून प्राप्त होणार?' तेव्हां ह्याला पश्चात्ताप होऊन लागलाच अरण्यांत जाऊं लागला. इतक्यांत मार्गामध्यें ध्रुवाला नारद भेटले. त्यांनीं 'तूं लहान आहेस, परत जा' असें सांगितलें, पण ह्यानें ऐकिलें नाहीं. नारदमुनींस याची दया येऊन त्यांनीं यास एक मंत्र व भगवद्ध्यान यांचा उपदेश केला. अल्पकाळांत यास भगवंतांनीं भेट दिली म्हणून याच्या मनांत स्तुति करावी असें वाटलें, पण सामर्थ्य नसल्यामुळें हस्त जोडून उभा राहिला. तेव्हां हें जाणून परमेश्वरानें त्यास सामर्थ्य दिलें, व यानें स्तुति केली. तीवरून परमेश्वर संतुष्ट होऊन 'तूं छत्तीस सहस्र वर्षें पित्याच्या मागें राज्य कर व या स्थानीं परत ये' असा वर दिला. हें सर्व वर्तमान उत्तानपाद राजास कळलें, व तो समारंभपूर्वक सामोरा येऊन ध्रुवास परत नगरास घेऊन गेला, व त्याला राज्याभिषेक करवून आपण अरण्यगमन केलें–अशी कथा आहे. (भागवत–स्कंध ४ अ० ८-९.) ७. सज्जनांनीं मान देण्यास योग्य असा. ८. उत्तम पदाचा धनी. गीति ३-४ यांचें युग्म आहे.

परि तो न घेचि लेशहि आंत जसा कलश पालथा नीचं, ।
अहितकरत्व स्वमतें कल्पी अल्पायु बाल थानींच. ॥ ५
जैसा निर्भाग्यांनीं सर्वार्थद दत्त अतिथि वारावा, ।
खळकर्ण अनादरिती त्यापरि त्या दुर्लभाहि आरावा. ॥ ६
'दुर्योधना! शिरावें न व्यसनशतावहीं दुरभिमानीं, ।
भीष्मद्रोणविदुरकृपधृतराष्ट्रगुरूक्तिला सुरभि मानीं. ॥ ७
भ्रमवी श्रमवी मळवी पळवी सत्कीर्तिला दुराग्रह, रे! ।

---

१. परि (परंतु) तो नीच (दुर्योधन) पालथा कलश (तोंड खालीं करून ठेविलेला तांब्या—गडवा) जसा आंत (आपल्या अंतर्भागांत) लेशहि (अल्प उदक देखील) घेत नाहीं तसा न घेचि (उपदेशलवसुद्धां घेता झाला नाहीं, कृष्णोपदेशाचा दुर्योधनानें अल्प देखील स्वीकार केला नाहीं). २. उलटा, उपडा, अधोमुख. 'पालथ्या घागरीवर पाणी' ही मराठी म्हण प्रस्तुत गीति लिहितांना पंतांच्या मनांत पुढें असावी असें 'कलश पालथा' या पदांवरून दिसतें. ३. दुष्ट, क्षुद्र. ४. अनिष्ट करण्याचा धर्म. ५. अल्प (थोडें) आयु (जीवित) ज्याचें तो (बाल—लहान मुलगा). येथें 'अल्पायु बाल' या पदांनीं 'मूर्ख दुर्योधन' असें सुचविलें आहे. ६. मातृस्तनीं. [स्तन—थान, स्थाली—थाली, स्तर—थर, स्थान—थारा, स्थूल—थोर, याप्रमाणें शब्दांच्या मूलरूपांत बदल होतो.] हें गीत्यर्ध सुभाषितरूप आहे. ७. निर्भाग्य=दैवहीन, हतभाग्य, फुटक्या नशीबाचा मनुष्य, मंदभाग्य. ८. सर्व+अर्थ+द=सकल+काम+दाता=सर्व अर्थ देणारा. चारी पुरुषार्थ देणारा. हें विशेषण येथें सहेतुक आहे म्हणून 'परिकरालंकार' होय. याचें लक्षणः—'परीकरः परिकरः साभिप्राये विशेषणे' (मंदारमरंदचंपू—व्यंग्यबिंदु १०; काव्यमाला—पृ० १३०.) ९. दत्तात्रेय. दत्तात्रेय अवधूत हा भगवान् दत्त अत्रि+अनसूया यांचा पुत्र. ब्रह्म विष्णु शिव या त्रयीचा अवतार असून हा मोठा यात्रेकरू आहे. हा प्रत्यहीं प्रातःकाळीं काशींत स्नान करतो, दोनप्रहरीं मातापुरास (माहूरास) स्नान करतो, नंतर भिक्षार्जनासाठीं कोल्हापुरास जातो आणि रात्रौ विश्रांतीसाठीं सह्याद्रिपर्वतावर जाऊन निजतो—अशी याची प्रसिद्धि आहे. याच्या आदिनान्त दिग्भ्रमणावरून जो कोणी मनुष्य सदां अनियमितपणें भटकत असतो त्याला 'दत्तात्रेयाची फेरी' अथवा 'दत्तात्रेयाची स्वारी' असें म्हणतात. हा आपल्या भक्ताचे इष्ट मनोरथ पुरवितो अशी याची प्रसिद्धि आहे. या थोर मुनीचें वर्णन 'गुरुचरित्र' नामक ग्रंथांत सविस्तर आहे. १०. दुर्जनाचे कान. ११. बोधरूप शब्दास. १२ व्यसन+शत+आवहीं=संकट+शंभर+बाळगणाऱ्यांत, शतशः संकटें धारण करणाऱ्या अशा दुरभिमानांत (दुष्ट अभिमानांत). १३. कामधेनु. १४. हें 'कारकदीपक' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. यांत दुराग्रह हा एकच कर्ता असून तो 'भ्रमवी' इत्यादि चार क्रियांशीं अन्वित झाला आहे, म्हणून हा 'कारकदीपक' अलंकार होय. १५. यांत वृत्त्यनुप्रासही आहे. १६. उत्तम कीर्तीला. १७. दुष्ट आग्रह, वाईट गोष्टीविषयीं हेका, दुष्परिणामकारक गोष्टीचा हव्यास.

सेव्य[१] सदुपदेश सुधाग्रह[२]; असदुपदेश[३] हा सुराग्रह[४], रे! ॥ ८
पांथांचा[५] ताप नृपा! तिळ तरि पावोनि सर[६] अपय[७] शमला? ।
शम[८], लाभ यांत आहे, आइक, देऊं नको अपयश[९] मला. ॥ ९
सेवूत सुरर्षिमुखें[१०] स्वर्गी सादर यशःकथा पितर, ।

---

१. सेवन करण्यास योग्य. २. सुधेचा (अमृताचा) ग्रह (स्वीकार). ३. असत्+उपदेश=दुष्ट+बोध=वाईट उपदेश. या गीतींत पंतांनीं दुराग्रहाचें जें वर्णन केलें आहे तें किती मार्मिक आणि सरळ आहे! त्यांतील प्रत्येक शब्द तोलून जेथच्या तेथें असा खुबीनें योजिला आहे कीं तो जर जरासा हालविला अथवा बदलला तर या गीतींतील चेटक निघून जाऊन ती नीरस होण्याची भीति आहे. दुराग्रहानें ज्यांस पकडलें आहे त्यांची स्थिति या गीतींतील चार क्रियापदांनीं जशी दर्शविली आहे तशीच सदा होत असते हें कोण कबूल करणार नाहीं? या चार क्रियापदांत इतका अर्थ भरून दिला आहे कीं त्यांच्या स्थानीं वीस शब्द योजिले तरी तितका सरस अर्थ आणणें महाकठिण आहे. पाल्हाळ न करतां आणि मुद्दा न सोडतां सरस वर्णन करण्याची पंतांची हातोटी अनुपम आहे. "अर्थदृष्ट्याही प्रस्तुत कवीचें काव्य प्रौढ व रसभरित आढळतें. सर्व महाकवींच्या ग्रंथांतून जशी सुंदर व प्रौढ अर्थाची सुंदर व प्रौढ भाषेंत रचना केलेली आढळते त्याप्रमाणेंच मोरोपंताच्या कवितेंतही सहृदय वाचकांस केवळ तल्लीन करून टाकणारीं व हजारों वेळां वाचलीं तरी पुरेशीं न होणारीं अशीं सहस्रावधि स्थलें सांपडतात. त्या त्या पात्रास व समयास उचित व विवक्षित रसानें पूर्ण भरलेलीं अशीं भाषणें व वर्णनें त्याच्या ग्रंथांत जागोजाग आहेत. आतां हें खरें आहे कीं वरील सरसता जेथें तेथें आढळते असें नाहीं; पण हा प्रकार साऱ्याच कवींच्या व ग्रंथकारांच्या ठायीं आढळणारा आहे. येथून तेथून सारें सारखेंच उज्वल असें काव्य किंवा असा ग्रंथ प्रायः थोडाच सांपडेल. त्यांतून ग्रंथाचा जेवढा विस्तार अधिक तेवढा वरील सार्वत्रिक सरसत्वाचा संभव कमी. जान्सन्नें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, हिरा म्हटला म्हणजे अर्थातच कोंदण त्याच्याहून कमी योग्यतेचें असलें पाहिजे. तर याच न्यायावरून पाहतां कोणत्याही ग्रंथाचे सरस भाग म्हटले म्हणजे त्यांहून इतर भाग अर्थातच नीरस असले पाहिजेत." [निबंधमाला—६३ पृ० ८.] ४. सुरा+ग्रह=मद्य+स्वीकार=मद्याचें ग्रहण. ५. पथिकांचा. ६. सरोवर. ७. अ+पय=अभाव+उदक=उदकरहित, शुष्क. ['अ' हा आगम (१) सादृश्य, (२) अभाव, (३) भेद, (४) अल्पता, (५) अप्राशस्त्य आणि (६) विरोध इतक्या सहा अर्थांचा बोधक आहे म्हणून सांगितलें आहे. ह्या अर्थांचीं उदाहरणें:—(१) अब्राह्मण, अभिक्षु; (२) अज्ञान, अक्रोध, अनंग; (३) अपट; (४) अनुदरा (कृशोदरी, तनुमध्यमा); (५) अकाल, अकार्य; (६) अनीति, असित, असुर. या सर्व अर्थांचा समावेश पुढील पद्यांत आहे:—'तदसादृश्यमभावश्च तदन्यत्वं तदल्पता । अप्राशस्त्यं विरोधश्च नञर्थाः षट् प्रकीर्तिताः ॥.'] ८. शांत हो. ९. अपेश. १०. नारदमुखें.

[1]मद्रचितसामपोतें [2]दुस्तरविपदब्धि जरि तथापि तर. ॥ १०
[3]काय तुम्हीं [4]भंगाल स्वगदाघातेंकरूनि **भीम** [5]नगा? ।
[6]त्रिपुरारिसख्याचेंही पाहुनि [7]निजयक्षकदन भी मन, गा! ॥ ११
[8]सुत [9]बंधु [10]जनक [11]जननी [12]गुरु [13]मित्रं [14]कलत्र यांसि [15]पाव कसा? ।
तुझिया [16]बळांसि केवळ [17]दुःसह **अर्जुन**, तृणासि [18]पावकसा. ॥ १२
वदला [19]**ईश्वर**, '**पा**र्वति! [20]**अर्जुन** मजसीं भला झगडला, गे!' ।
[21]किति त्यापुढें बळ तुझें? खचवीसा **मे**[22]रुला दगड लागे? ॥ १३

---

१. म्यां रचिलेल्या सामरूप नौकेनें. [पोत=नौका. 'यानपात्रे शिशौ पोतः' इत्यमरः । 'पोतः शिशौ वहित्रे च गृहस्थाने च वाससि' इति मेदिनी.] २. दुस्तर+विपत्+अब्धि=तरण्यास कठिण+विपत्ति+सागर=तरून जाण्यास कठिण असा दुःखसागर. ३. तुमची काय मातबरी आहे? कोणत्या झाडाचा पाला तुम्ही? तुमची कोण पर्वा करतो. ४. चुरून टाकाल. ५. पर्वता. ६. त्रिपुरारि+सख्याचें=शंकर+मित्राचें, कुबेराचें. ७. आपल्या यक्षांचा नाश. [सौगंधिकवनपुष्करिणीरक्षक यक्षांचा भीमानें नाश केला या कथेचा येथें उल्लेख **पं**तांनीं केला आहे. काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–वनपर्व–अध्याय ५ गीति ७३-८९ पृ० ८४-८६ यांत ही कथा आहे.] ८. लक्ष्मण. ९. दुःशासनादिक बंधु. १०. धृतराष्ट्र. ११. गांधारी. १२. द्रोण, कृप, भीष्म. १३. कर्णसौबलादिक मित्र. १४. भानुमती. १५. पाव कसा=पावच, खचित पाव. 'कसा' या अव्ययावरून निश्चितार्थ, निःसंदेहार्थ ध्वनित होतो. जसें–'तूं जा कसा' म्हणजे तूं जाच, खचित जा. १६. सैन्यास. १७. अधृष्य. १८. अग्निसारिखा. १९. शंकर. २०. अर्जुनानें किरातरूपधारी महादेवाशीं महायुद्ध करून त्याला जर्जर केलें व स्वबाहुबलानें संतोषित करून पाशुपतास्त्र मिळविलें या कथेचा येथें उल्लेख **पं**तांनीं केला आहे. याच कथानकावर शके ५५६ पूर्वी झालेल्या भारवि नामक महाकवीनें 'किरातार्जुनीय' नामक एक महाकाव्य संस्कृतांत रचिलें आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–वनपर्व–अध्याय ३ गीति २-३३; अमरचंद्रसूरिविरचित बालभारत–वनपर्व–सर्ग १ श्लो० २६-४२ यांत ही कथा आहे.] २१. त्यापुढें (शंकराशीं भलें युद्ध करणाऱ्या अर्जुनापुढें तुझें (दुर्योधनाचें) बळ (सैन्य–सामर्थ्य) किती (कितीसें टिकणारें आहे? कितीसें कामास येणार आहे? अर्थात् फार तुच्छ होय.) मेरुला (अत्यंत कठिण अशा मेरुपर्वताला) खचवीसा (खचविण्यास समर्थ असा, जो लागल्यानें मेरुपर्वत खचून बसेल असा) दगड लागे [काय?] (दगड मेरुपर्वताला लागेल काय? मेरुपर्वत खचावा असा हेतु धरून तुझ्यासारख्या शाहण्या पुरुषानें त्या पर्वतावर खूब जोरानें दगड फेंकला तर तो दगड लागून त्यामुळें मेरुपर्वत खचेल काय? मेरुपर्वत खचेल असा दगडांचा मार लागेल काय? अर्थात् असा दगड मेरुपर्वताला लागणार नाहीं हें अपेक्षित उत्तर आहे. हें प्रश्नालंकाराचें उदाहरण समजावें. दगड लागून मेरुपर्वत जसा कधींही खचावयाचा नाहीं तसाच अर्जुनापुढें तुझ्या बळाचा प्रभाव चालावयाचा नाहीं–असें तात्पर्य. २२. मेरु=

दि[1]नमणिपुढें पळांत प्राप्ता गति होय अं[2]धकारा, ती ।
तुज त्या रा[3]जर्षिपुढें, कीं तो प्र[4]भु जेंवि अं[5]धकाराती. ॥ १४
सेना व्यसनीं तुजला ता[6]रिल? कोपेल जरि अ[7]जातारि, ।
ह[8]रि खवळतां भयांत स्वपतिप्रति काय गा! अ[9]जा तारी? ॥ १५
त्यां[10]चा प्रसाद हो बहु, कु[11]रुदारांच्या न कोप तिलकीं हो, ।

---

पर्वतविशेष. 'शुशुभे दिव्यो राजवत्समधिष्ठितः । आदित्यतरुणाभासो विधूम इव पावकः ॥ मेरुस्तु योजनानां सहस्राणि चतुरशीतिरुच्छ्रितः । प्रविष्टः षोडशाधस्तादष्टाविंशतिः विंशतिः ॥ विस्तत्तरात्रिगुणस्तस्य परिणाहः समंततः ॥' इत्यादि मेरुपर्वताचें वर्णन मत्स्यपुराणांत आहे. हा पर्वत ग्रीक लोकांच्या ऑलिम्पस् पर्वतासारखा होय.

१. सूर्यापुढें. २. सूर्यापुढें अंधकाराचा नाश होतो ही गोष्ट सर्वविदित आहे. ३. त्या राजर्षिपुढें (त्या धर्मराजापुढें) ती (नाशगति पलायनगति) तुज (तुला–दुर्योधनाला प्राप्त होईल.) ४. तो प्रभु (तो धर्मराज) शंकरासारखा होय. ५. अंधक दैत्याचा अराति (शत्रु) शंकर–महादेव. अंधकासुर–मागें पृष्ठ ४ टीप १४ पहा. ६. तारिल (काय?) तारण्यास समर्थ होणार नाहीं–असें तात्पर्य. ७. धर्मराज. ८. हरि (सिंह) खवळतां (क्षुब्ध झाला असतां, चवताळला असतां) भयांत (संकटांत) अजा (शेळी) स्वपतिप्रति (आपल्या नायकाला) तारी काय (संरक्षण करते काय?) अर्थात् संरक्षण करूं शकत नाहीं–असें तात्पर्य. हें गीत्यर्थ सुभाषितरूप आहे. ९. बकरी. १०. त्याचा (त्या धर्मराजाचा) कुरुदारांच्या (कौरवांच्या स्त्रियांच्या) तिलकीं (मस्तकावरील सौभाग्यसूचक कुंकुमतिलकावर) प्रसाद (प्रसन्नपणा) बहु (पुष्कळ) हो (होवो) [आणि] कोप (क्रोध) न हो (होऊं नये.) [धर्मराजाच्या प्रसादानें कुरुस्त्रियांचे मस्तकभाग कुंकुमतिलकमंडित असोत, त्याच्या रागानें कुरुकुलक्षय होऊन कुरुभार्यांचीं मस्तकें तिलकरहित न होवोत–असें तात्पर्य. धर्मराजाच्या प्रसादानें कुरुकुलाचा क्षय न व्हावा व कुरुस्त्रियांचें सौभाग्य कायम राहावें–असें पर्यायानें म्हटलें आहे म्हणून हा **'पर्यायोक्त'** नामक अलंकार होय. ११. दार–स्त्री. ['दार' हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी आणि अनेकवचनी आहे. **पं**तांनीं हा 'दार'शब्द केवळ संस्कृताच्या शुद्ध पद्धतीस अनुसरून योजिला आहे असें दृष्टीस पडतें. 'कृप भोज द्रौणि तिघे पाहुनि राजासि दीन आरडले । ते राज**दार** जैसे तैसे तेही म्हणोनि 'हा!' रडले ॥' [स्त्रीपर्व–१।१२] असे प्रयोग **पं**तांच्या काव्यांत अनेक आढळतात. अशा प्रयोगांच्या संबंधानें **'नि**बंधमाला'कार लिहितातः–["अशा प्रकारच्या] सर्व प्रयोगांवरून मोरोपंतांचा एकंदर रोंख तेव्हांच दृष्टीस पडतो. तो अर्थात् हाच कीं, मराठी भाषेस जितकी व्याकरणशुद्धता आणतां येईल तितकी आणायाची. पण इतकेंच नव्हे; वरील उदाहरणावरून हेंही सहज लक्षांत येईल कीं, संस्कृतांतील व्याकरणप्रयोगही मराठी कवितेंत आणण्याचा त्यानें यत्न केला आहे. हें [पंतांच्या] पूर्वींच्या एकाही मराठी कवीनें मुळींच केलेलें नाहीं. या शेवटल्या कवीचा यांत मोठा

नकुळ सहदेव केवळ [1]अनलानिलसेचि कोपतिल कीं हो ! ॥ १६
ते पांच त्यांत सावा [2]हा, यावा कोप या न [3]साव्याही, ।
[4]अभिमत तसे न माझ्या [5]जामात्यांसकट मानसा व्याही. ॥ १७
सत्यचि दुःसह आम्हीं [6]कृष्ण [7]त्रिदशेश्वरासही, [8]राजा ! ।
[9]त्या काय [10]टंक [11]भंगिल घनही भंगूं शके न [12]हीरा ज्या ? ॥ १८

---

धीटपणा उघड दिसतो. पण हेंचसें काय; प्रस्तुत मालेच्या (निबंधमालेच्या) चवथ्या अंकांत (पृष्ठ २० यांत) सांगितल्याप्रमाणें आमचे बाकीचे महाराष्ट्र कवि बहुतेक सारे व्याकरणापासून केवळ अलिप्त होते असें म्हणण्यासही कांहीं हरकत नाहीं. त्यांत अगोदर त्यांत विद्वान् म्हणण्यासारखे तीन चारच निघतील; आणि व्याकरणास बुद्धिपुरःसर अनुसरलेला आम्हांस एक मोरोपंतच दिसतो. बाकीच्या कोणाचीही व्याकरणाकडे तशी करडी नजर दिसत नाहीं.' (निबंधमाला–अक १० पृ० १६-१७.)

१. अनल+अनिल+से=अग्नि+वायु+सादृश्यदर्शक प्रत्ययः–अग्नि आणि वायु यांसारखे. २. हा मी कृष्ण. ३. या सहाव्या कृष्णामुळें तुम्हाला राग येऊं नये. ४. मान्य, वंदनीय. [ते पांच पांडव] माझ्या मानसा (या कृष्णाच्या चित्ताला) [जसे] अभिमत (मान्य) आहेत] तसे (त्याप्रमाणें) जामात्यांसकट (जामात्यांसहित) व्याही (मुलीचे सासरे देखील) [अभिमत नाहींत]. या अर्थांत **'व्यतिरेक'** अलंकार आहे. जेथें उपमान आणि उपमेय यांमध्यें साधर्म्य दाखवून त्यामध्यें एकाचें दुसऱ्याहून आधिक्य किंवा न्यूनत्व दाखविलेलें असतें तेथें **व्यतिरेक** नामक अलंकार होतो. येथें व्याह्यांपेक्षां पांडव आपणांस अधिक प्रिय आहेत असें सुचवून त्यांचें आधिक्य वर्णिलें आहे. ५. जामाता–जांवई, जामात. ['जामाता दुहितुः पतिः' इत्यमरः । जायां मिमीते मिनोति वा जामाता.] ६. कृष्णार्जुन. कृष्ण–(१) अर्जुन, (२) 'केशव. ['कृष्णः सत्यवतीपुत्रे वायसे केशवेऽर्जुने' इति हैमः.] ७. त्रिदश+ईश्वर=देव+स्वामी=इंद्रासही. ८. हे दुर्योधना ! ९. ज्या हीरा (हिऱ्याला) घनही (मुद्गर देखील, लोखंडी (मुद्गरसुद्धां) भंगूं न शके (भग्न करण्यास समर्थ नाहीं) त्या (हिऱ्याला) टंक (टांकी) भंगिल काय ? (भग्न करूं शकेल काय ? टंक हिऱ्याचा भंग करण्यास असमर्थ आहे हें काय सांगावें ?) ['घनं सांद्रं घनं वाद्यं घनो मुस्तो घनोंऽबुदः । घनः काठिन्यसंघातो विस्तारो लोहमुद्गरौ ॥' इति धरणिः.] १०. दगड फोडण्याचें हत्यार, टांकी, सुतळी इत्यादि. ११. या अर्थांत **'काव्यार्थापत्ति'** नामक अलंकार झाला आहे. जेथें कैमुतिकन्यायानें अर्थसिद्धी होते तेथें **काव्यार्थापत्ति** नामक अलंकार होतो. किमुत (किम्+उत) याचा भाव तो, कैमुतिक याचा अर्थ–काय कथा, कशाला सांगावें, काय नवल असा होतो. याचीं उदाहरणें:—(१) मोठे मोठे राजे जेथें नम्र होतात तेथें सामान्य जनाची गोष्ट कशाला ? (२) तीर वाघाला मारतो मग बिचाऱ्या चिमण्यांची काय कथा ? (३) हे स्त्रिये ! तुझ्या मुखानें चंद्र जिंकिला मग कमळाची काय कथा ? (४) या हत्यारानें कठीण लांकूड तुटतें मग कोंवळ्या गवताची गोष्ट काय सांगावी ? हीं

हो सावध [1]सत्सख्यें [2]सुरसत्तमसा सुखें कर विलास, ।
तूं लोभें भ्रांत शकुनिदुःशासन[3]वृषमुखें [4]करविलास.' ॥ १९
[5]भीष्महि म्हणे, 'कुरुवरा! दे यश [6]यदुनायकासि बा! [7]शम, रे! ।
कोण्हीहि [8]सदुपदेशामृतलवहि [9]प्राशितां कधीं न [10]मरे.' ॥ २०
[11]द्रोणें म्हणे, 'कृष्णाचें भीष्माचें वचन [12]आयकावेंच, ।
[13]सद्वाक्चिंतारत्नें वि[14]खेरिसि कां? भरतनायका! वेंचें[15].' ॥ २१
विदुर [16]म्हणे, 'शम पावें प्रेमें, शोकें करूनियां न रडें, ।
पितरांचें न पिळावें [17]सुतशोकवृकें धरूनियां [18]नरडें.' ॥ २२

---

सारीं उदाहरणें याच अलंकाराचीं आहेत. पंतांच्या काव्यांत या अलंकारांचीं उदाहरणें पुष्कळ सांपडतात. त्यांतून थोडीं पुढें देतोंः—(१) तव सेवक मर्यादाविलंघनीं मात्र हो न हे सकती । प्लवग, तवांघ्रिप्लवगत, तरले भवसिंधु, हा समुद्र किती? ॥ [मंत्ररामायण–युद्धकांड–गीति २० पृष्ठ ८९], (२) जसि जसि समृद्धि अहितीं तसि तसि चिंतारुजा मनीं वाढे । अमृतरसहि न शके मग तच्छमनीं काय बापुडे काढे? ॥ [मोरोपंत–भारत], (३) या दृढ मदभिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला । मर्त्यांची काय कथा प्राकृतसा काय कर्ण हा गमला? ॥ [कर्णपर्व], (४) भरवी मृगार्भकां, मग तो भरवी कां न नातवा घास? [आदिपर्व–अ० १२ गी० ५५], (५) दे बालाज विमानातें, मग दे तो भीम कां न नौकेतें? [आदिपर्व अ०२८ गी०७३], (६) बापाशि बाप न म्हणे ऐशाला काय होय आजोबा? [वनपर्व–अ० १ गी० ६५], (७) नाम न रुचेल, मम सुत मानेल कसा? मनांत विटलीला [अ० ४ गी० २१९], (८) त्यातें पाहुनि पावे काळहि भय, मग न भीम हा काय? [अ० ५ गी० ६४]. या अलंकाराचें लक्षण व उदाहरण कुवलयानंदांत सांगितलें आहे. 'कैमुत्ये नार्थसंसिद्धिः 'काव्यार्थापत्ति'रिष्यते । स जितस्त्वन्मुखेनेंदुः का वार्ता सरसीरुहाम् ॥.'

१२. हिन्याला.

१. साधूंच्या सख्यानें. २. देवश्रेष्ठ जो इंद्र त्यासारखा. ३. कर्ण. ४. मागें पृ० १३ टी० २ पहा. ५. अध्याय १२५ यांत (श्लो० २-८) ही भीष्मोक्ति आहे. ६. यदुवंशीयांचा नायक जो श्रीकृष्ण त्याला (केशवाला). कृष्णाचें वचन मान्य कर–असा भावार्थ. ७. संधि कर, पांडवांसीं समर करण्याचें सोडून साम कर. ८. सद्+उपदेश+अमृत+लव=साधु+बोध+सुधा+अल्पभाग, अल्पांश=अल्प सुबोधपीयूष. ९. पितां. १०. नाश पावत नाहीं. हें अर्ध उत्तम सुभाषित आहे. ११. अध्याय १२५ श्लोक ९-१७ यांत द्रोणोक्ति आहे. १२. आइकलें पाहिजे, कृष्णभीष्मांचा उपदेश शिरसावंद्य मानलाच पाहिजे. १३. सत्वाक्यरूप चिंतामणि. १४. पसरून टाकतोस. १५. हे भरतसत्तमा दुर्योधना! सद्वाणीचिंतारत्नें गोळा कर, टिपून घे, टाकूं नको. १६. अध्याय १२५ श्लोक १९-२७ पहा. १७. पुत्रशोकरूप वृकें (लांडग्यानें). १८. वृक

धृतराष्ट्र म्हणे, 'पुत्रा! निर्भय अंतःपुरीं सुखें रम, रे! ।
शम रे! गमो युधिष्ठिर इंद्र, जगीं तूं उपेंद्रसा गम, रे! ॥ २३
व्हावा वळला अहितहि; मग देव म्हणेल कां 'नका' व्याही? ।
रक्षील तेज, यापरि नीति न गुरुला कळे, न काव्याही.' ॥ २४

---

मनुष्याचें नरडें पिळतो तसें सुतशोकानें पितरांचें (धृतराष्ट्रादिकाचें) नरडें न पिळावें—असा भावार्थ.

१. अध्याय १२६ पहा. २. अंतःपुर=राजादिकांच्या भोग्यस्त्रियांचें राहण्याचें स्थान, राजस्त्रीमंदिर. येथें 'अंतःपुर' हा शब्द लक्षणेनें योजिला आहे. असे शब्द योजण्याची रूढि सर्व भाषांत प्रचलित आहे. अंतःपुर म्हणजे अंतःपुरांत राहणारा स्त्रीजन. ३. विलास कर, विषयोपभोग घे. ४. उपेंद्र=विष्णु. ['उपेंद्र इंद्रावरजश्चक्रपाणिश्चतुर्भुजः' इत्यमरः । इंद्रमुपगतोऽनुजत्वात् उपेंद्रः । उपेंद्र हा इंद्राचा धाकटा बंधु होय. युधिष्ठिर हा मोठ्या भावाप्रमाणें आणि दुर्योधन हा धाकट्या भावाप्रमाणें होय असें इंद्रोपेंद्रांचा दाखला देऊन सूचविलें आहे. पांडवांचें आणि दुर्योधनादि शतभावांचें सख्य झालें असतां धर्मसुयोधन हे या जगतीतलावर इंद्रोपेंद्रासारखे विराजमान होतील.] ५. अहितहि (शत्रू देखील) वळला (वळला असतां, आपल्या वचनास मान्य झाला असतां, आपल्या बोधास वश होऊन वागला तर व्हावा (पाहिजे आहे, प्रिय आहे). [शत्रु असून तो जर आपण म्हणतों तसें वागण्यास सिद्ध असेल तर तोही हवा आहे, त्याचाही संग्रह सुज्ञ पुरुष आपल्या पक्षांत खुषीनें करतात. असें जर आहे तर] मग व्याही (दुर्योधन) नका (नको असें, न व्हावा असें) देव (भगवान् श्रीकृष्ण) कां म्हणेल? (व्याही दुर्योधन आपल्या पक्षांत नको असें कृष्ण कां बरें म्हणेल? अर्थात् कधींही म्हणणार नाहीं). [हें अर्ध काव्यार्थापत्ति नामक अलंकाराचें उदाहरण समजावें. हे दुर्योधना! तूं कृष्णाच्या उपदेशास वळल्यास आणि धर्माशीं सख्य केलेंस तर, देव तुझें] तेज रक्षील (तुला तेजोहीन होऊं देणार नाहीं. तुझा यथायोग्य मान ठेवील, तुझा तेजोभंग आणि कीर्तिनाश होऊं देणार नाहीं) यापरि (या कृष्णदेवाप्रमाणें, या कृष्णाला जितकी कळते तितकी) नीति (राजनीति) गुरुला न कळे (बृहस्पतीला कळत नाहीं [आणि] न काव्याही [कळे]=शुक्राचार्यासही कळत नाहीं. हे दुर्योधना! तूं पांडवपक्षास वळलास तर तुझा तेजोभंग होण्याची भीति वाळगण्याचें कारण नाहीं, कारण राजनीतींत कृष्ण महानिपुण आहे, तो तुझें उणें पडूं देणार नाहीं—असें तात्पर्य. ६. गुरु=बृहस्पति. ['बृहस्पतिः सुराचार्यो गीर्पतिर्धिषणो गुरुः' इत्यमरः । 'गुरुर्महत्यांगिरसे पित्रादौ धर्मदेशके । अलंघ्यौ दुर्जरे चापि' इति हैमः । गृणाति उपदिशतीति गुरुः.] ७. काव्य=शुक्र. ['शुक्रो दैत्यगुरुः काव्य उशना भार्गवः कविः' इत्यमरः । कोतुमवश्यमाख्यातुमर्हत्वात् काव्यः । 'काव्यं ग्रंथे पुमान् शक्रे काव्या स्यात्पूतनाधियोः.'] सुराचार्य आणि दैत्याचार्य या दोघांच्या पेक्षांही कृष्णाचें राजनीतिनैपुण्य श्रेष्ठ आहे असें सुचवून दुर्योधनाचें मन वळविण्याचा धृतराष्ट्रानें यत्न केला आहे.

भीष्म द्रोण विदुर हे [1]कथिति पुन्हाही [2]असें खळास हित, ।
'न शिरें [3]हटें [4]वृकोदरकाळमुखीं [5]बंधुनृपबळासहित. ॥ २५
कृष्णकरें भेट नृपा! [6]स्वांकीं श्रीधर्मराज तुज वाहो, ।
त्याचा तूं [7]राज्यभरप्रोद्वहनसमर्थ [8]बाहु उजवा, हो.' ॥ २६
तो दुष्ट [9]म्हणे, 'कृष्णा! सर्व [10]तुम्हीं [11]दूषितां मज [12]चखोटा ।
पांडुसुतांला म्हणतां 'फार भले' [13]सानुजा मजच 'खोटा.' ॥ २७
ठावा नसे मज, तुम्हीं सांगा अपराध कोण तो [14]यांचा? ।
बहु [15]जनवाद, [16]अनावरवेग निरोधील [17]कोण [18]तोयांचा? ॥ २८
केलें स्वयें सुखार्थ द्यूत, निपुणता नसोनि, धर्मानें, ।
हारविलें धन [19]कांहीं, पडला व्यसनांत तो स्वकर्मानें. ॥ २९

---

१. अध्याय १२६ पहा. (श्लोक २-१८.) २. उत्तरार्धांत व गीति २६ यांत सांगितल्याप्रमाणें. ३. दुराग्रहानें. ४. वृकोदर+काळ+मुखीं=भीम+यम+तोंडांत=भीमरूप यमाच्या तोंडांत, मृत्युमुखांत. ५. बंधु (दुःशासनादिक) नृप (साहाय्य करणारे शकुनिप्रभृति राजे) बळ (सैन्य) यांसहित. [जोंपर्यंत भीमसेन हातांत गदा घेऊन सैन्याचा संहार करीत करीत मार्ग आक्रमण करून हिकडे आला नाहीं तोंपर्यंत आणि जोंपर्यंत वीरघातिनी गदा धरून वनस्पतींच्या फळांप्रमाणें गजयोधी वीरांचीं मस्तकें रणांगणांत चरचरां कापून टाकलीं नाहींत तोंपर्यंत पांडवांशीं सख्य कर–असें मूळांत वर्णन आहे. अ० १२६ श्लो० ४-५.] ६. स्व+अंकीं=निज+उत्संगीं=आपल्या मांडीवर, आपल्या समीप. ७. राज्य+भर+प्रोद्वहन+समर्थ=राज्य+भार+वाहणें+क्षम=राज्यभार उचलावयास समर्थ. ८. उजवा बाहु=दक्षिण भुज=उजवा हात. उजव्या बाहूप्रमाणें हरएक प्रसंगीं साहाय्य करून उपयोगीं पडणारा असा. ९. अध्याय १२७ पहा. (श्लोक २-२५.) १०. भीष्मद्रोणविदुरप्रभृति कवि. ११. मी जो चखोट (चांगला, सदाचारसंपन्न) त्या माझी निंदा करतां. १२. चांगल्यास. १३. धाकट्या भावांसहित. [दुर्योधनाच्या भावांचीं नांवें मुक्तेश्वरकृत आदिपर्वांत दिलीं आहेत तीं पहावीं. काव्यसंग्रहग्रंथमाला–मुक्तेश्वर–आदिपर्व–अध्याय २६ ओंव्या १०३-११६ पृ० २३१-२३२.] १४. या दुर्योधनाचा. १५. लोकापवाद, लोकांमध्यें माझ्याविषयीं पुष्कळ निंदा चालते, पण माझा अपराध काय हें मात्र मला कोणी सांगत नाहीं. १६. अनावर (आवरण्यास कठिण) असा जो वेग (गतिजव) तो. १७. तोयाचा अनावर वेग रोधण्यास कोणीही समर्थ नाहीं, त्याप्रमाणेंच बहुजनवाद बंद करण्यास कोणीही समर्थ नाहीं. 'तोयाचा अनावर वेग कोण निरोधील?' ही कल्पना सृष्टिशास्त्रांतील असून कवीच्या सूक्ष्मसृष्टपदार्थावलोकनाची साक्ष पटवीत आहे. १८. उदकाचा. १९. किंचित् धन, थोडेंसें द्रव्य. (अ० १२७ श्लो० ७-८ पहा.)

तेथें दोष शकुनिला लावितसां कां मलाहि [१]अनघाला? ।
[२]जाणोनि पक्षपाती कां घालितसां? नयांत मन [३]घाला? ॥ ३०
तेंहि धन फिरोन दिलें, तरि लावितसां बळेंचि [४]अघ, [५]लावा, ।
[६]साधुसमाधिस्थगळां जेंवि खळव्याळ आळ न [७]घालावा. ॥ ३१

घडला वनवास, बरें, केला होता [८]तिहीं तसाच [९]पण ।
अज्ञातवाससमयीं परि त्यांहीं रक्षिलें न [१०]सांचपण. ॥ ३२
अपराध काय? [११]म्हणतां कां सर्व 'युधिष्ठिरा करीं नमनें?' ।
मी, [१२]क्षत्रियमानातें सोडुनि, हें मान्य कां करीन [१३]मनें? ॥ ३३
सांगा करीन शतदा या सर्वद्विजजनासि मीं नमन, ।
न विटे ब्राह्मणनमना [१४]क्षत्रमन जसें, [१५]वनासि [१६]मीनमन. ॥ ३४
पांडव काय? [१७]पविधरहि येइल कापावयासि जरि मान, ।

---

१. निरपराध्यास. २. समजून उमजून, बुद्धिपुरःसर. ३. हें अर्ध सर्वमान्य नीतिबोधानें भरलेलें आहे तेव्हां त्याची गणना 'नीतिवचनां'त अवश्य केली पाहिजे. ४. पाप. ५. तुम्ही बळानेंच जर अघ लावितां आहां तर खुशाल लावा. ६. साधुसमाधिस्थगळां (उत्तम रीतीनें जो समाधीच्याठायीं आहे त्याच्या गळ्यांत) जेंवि खलव्याळ (ज्याप्रमाणें दुष्ट साप) [न घालावा, तेंवि हा] आळ (खोटा दोषारोष, पांडवांस मीं संकटांत पाडिलें असा हा खोटा आरोप) माझ्या गळ्यांत न घालावा (विनाकारण हा आरोप मजवर घालूं नका, मला अकारण दोष लावूं नका.) ७. घालावा. ८. त्या पांडवांनीं. ९. प्रतिज्ञा. १०. सत्य, खरेपण. [मोरोपंत–विराटपर्व–अध्याय ३ गीति ८८-८९, व अध्याय ४ गीति ५८-६८ पहा.] ११. युधिष्ठिरा (धर्मराजाला) नमनें करीं (नमस्कार घाला) [असें तुम्ही] सर्व (अवघेजण) कां म्हणतां (कशासाठीं म्हणतां?). १२. क्षत्रियांच्या मानाला. रणांत धारातीर्थीं मरावें–हा क्षत्रियांचा मान आहे. दुर्योधन म्हणतो—'सुक्षत्रियांसि जी गति बहुमान्या तीच हे मला घडली। तनु मनुपूत घृताहुनि मखशिखिकुंडीं तशी रणीं पडली॥' [गदापर्व–अ० १० गी० १६.] तो बहु निंद्य क्षत्रिय देउनि जो पाठ जडतम रणातें। पावे सदा गदार्दित होउनि रडवीत रडत मरणातें। ॥ २३ ॥ समर करूनि मरावें जावें स्वर्गासि हेंचि परम हित। आम्ही सुरांत होऊं, मागें होउत नरांत पर महित. ॥ ५८ ॥ [शल्यपर्व–अ० १]. 'भाग्यें घडेल जरि तरि मज परम श्लाघ्य संगरीं पतन। जतन क्षत्रिय न करिति जोडिति नाकीं तनुव्ययें वतन ॥ [गदापर्व–अ० २ गी० १८]. या गीतींवरून क्षत्रियांचा मान म्हणजे काय याचा बोध चांगला होण्यासारखा आहे. १३. युधिष्ठिराला शरण जाणें ही गोष्ट मला मनापासून कशी रुचेल? १४. क्षत्रियाचें मन. हें अर्ध सुभाषितरूप समजावें. १५. उदकास. १६. मत्स्याचें मन. १७. वज्रधरहि. (इंद्र.)

तरि [1]मानवेंद्र मी न नमीन [2]उपेक्षुनि [3]निमेषभरि [4]मान. ॥ ३५
न मज समजलें तेव्हां जेव्हां दिधला [5]विभाग मत्तातें, ।
[6]जो धन धूर्त हरितसे काय कळे तत्प्रयोग मत्तातें? ॥ ३६
जितुकें काय [7]सुतीक्ष्णें [8]सूच्यग्रें भेद भूमितळ पावे, ।
तितुकेंहि [9]अदेय; [10]तयां कीं मज खायासि गृध्र तळपावे. ॥ ३७
आम्हीं त्यांहींहि **म**हादेवापरि या [11]धराधवा गावें; ।
[12]मागावें दास्य सदा वचनीं, [13]विमदापराध वागावें. ॥ ३८
[14]**कुरुगुरु भीष्म द्रोण** द्वेषि[15]तमोराशिचे [16]रवि [17]धुरीण, ।
कैसें न फेडितील [18]प्रभु हे [19]श्रितचित्तकुमुदविधु [20]रीण? ॥ ३९

---

१. मनुजाधीश. २. दुर्लक्ष करून. ३. क्षणभर. ४. राज्यांश. (अ० १२७ श्लो० २२.) ५. माझ्या पित्यानें. ६. जो धूर्त (लबाड मनुष्य) धन हरितसे (धन हरण करतो) तत्प्रयोग (त्यांचा कारभार, त्याचा धनहरणाचा उद्योग) मत्तातें (असावध मनुष्याला) काय कळे? (कळतो काय? अर्थात् कळत नाहीं; मी असावध व अज्ञान असतां धर्मानें धनापहरण केलें तें अर्थात् मला विदित नाहीं.) ७. अ० १२७ श्लो० २५ पहा. ८. सुईच्या अग्रानें. ९. देण्यास अयोग्य. १०. दुर्योधन म्हणतो—तयां (त्या पांडवांला) कीं (किंवा) मज (मला दुर्योधनाला) खायासि (खाण्यासाठीं–भक्षण करण्यासाठीं) गृध्र (गिधाड, गीध, घार) तळपावे (त्यांच्या किंवा माझ्या भोंवतीं घिरट्या घालाव्या). [तळपणें–(१) चमकणें, चकाकणें. जसें–'मकरकुंडलें तळपति श्रवणीं.' (२) घिरट्या घालणें भोंवडणें.] पांडवांला किंवा आम्हांला खाऊन फस्त करण्यासाठीं रणांगणावर त्यांच्या किंवा माझ्या सभोंवतीं गिधाडांनीं रुधिरमांसाच्या लोभानें घिरट्या घालाव्या असेंच मी इच्छितों. युद्ध व्हावें आणि त्यांत समरभूमीवर जो पतन पावेल त्याचा संहार गिधाडांनीं करावा हें चांगलें, साम होणें चांगलें नाहीं–असें म्हणण्याचें तात्पर्य. गृध्रांची भक्षणलोलुपता आणि भक्ष्य पदार्थांभोवतीं घिरट्या घालून चोंचीनें घाव मारून क्षतांकित करण्याची वृत्ति सुप्रसिद्ध आहे. ११. श्रीकृष्णाला. (धरा+धव=पृथ्वी+पति.) १२. या कृष्णाचें दास्य सदा प्रार्थावें, आपण श्रीकृष्णदास आहोंत अशी स्थिति सदा इच्छावी. १३. गर्व आणि अपराध यांनीं रहित; गर्व व अपराध सोडून. १४. कुरुवंशीयांचे गुरु. (भीष्म वंशसंबंधानें गुरु आणि द्रोण आचार्यसंबंधानें गुरु.) १५. शत्रुरूप अंधकारराशीचे. शत्रुरूप अंधकाराच्या राशीचे. १६. सूर्य. सूर्य जसा अंधकारराशीचा नाश करतो तसें द्वेषिजनांचे (शत्रुजनांचे) नाश करणारे. हें रूपकाचें उदाहरण होय. १७. कार्यभार वाहणारा, प्रवीण, अग्रगण्य. १८. समर्थ 'प्रभु' या पदानें पांडवांचा पराभव करण्यास ते (भीष्मद्रोण) समर्थ आहेत असें सुचविलें. या गीतींत 'द्वेषितमोराशिचे रवि' 'धुरीण,' 'प्रभु' आणि 'श्रितचित्तकुमुदविधु' हीं चारीही पदें साभिप्राय आहेत म्हणून हा '**परिकररूपकसं**-

मरणभयें अरिसि कसा मानाधिक गणुनि काय[1] हा[2] लवतो ? ।
अचळ[3] अशनिनें[4] होइल चूर्णशिखर[5], म्हणुनि काय हालवतो[6] ? ॥ ४०
मजपासुनि पावेल न शक्रहि, मग कोण बळिनर[7] विभागा[8] ? ।
भा[9] गातां ज्याची[10] तो विधु, कवि हो ! होय मलिन; रविभा गा.' ॥ ४१
केशव कोपोनि म्हणे[11], 'काय वदसि कविसभेंत अन्याया ? ।
दुर्योधना ! बहुमता[12] तुजलाचि तुझ्या, न उक्ति अन्या या. ॥ ४२
अपराध नसे केला ? स्मरण नसे काय ? मन न आठव दे ? ।
तरि परिस, मींच वदतों, समयीं[13] कोण न असोनि पाठ वदे ? ॥ ४३
अपराध तुझे विश्वश्रुत[14], त्यांचा लोपला नसे लवही; ।
कुशलाहि चित्रगुप्ता[15] लिहितां गुरुहि[16] पुरली नसेल वही. ॥ ४४

---

कर' होय. १९. आश्रितांच्या चित्तरूप कमळाचे चंद्र. आश्रितांच्या मनाला कमलचंद्रन्यायानें सौख्य देणारे. २०. रीण=ऋण, कर्ज. भीष्मद्रोण हे आपल्या आश्रयदात्यांचें आणि अन्नदात्यांचें रीण फेडण्यासाठीं पांडवांशीं युद्ध करून त्यांचा नाश करतील—असें म्हणण्याचें तात्पर्य.

१. शरीर. २. हा (दुर्योधन) अरिसि (शत्रूला) काय (देह) मानाधिक (मानापेक्षां अधिक) गणुनि (मानून) मरणभयें (मरणाच्या भीतीनें) कसा लवतो ? (कसा नम्र होईल, पांडवांला नमस्कार घालून कसा शरण जाईल ?) मी शरीराची पर्वा करीत नाहीं, मी अपमान कधींही सोसणार नाहीं, मी मरणास भीत नाहीं, असें जर आहे तर शत्रूला कां शरण जाईन—असें म्हणण्याचें तात्पर्य. लवणें—मान खालीं करणें, नमस्कार घालणें. ३. पर्वत. ४. वज्रानें. ५. चूर्ण (भग्न) झालें शिखर (शिरोभाग) ज्याचें तो. (अचल=पर्वत.) ६. पर्वत कधींही हालवायाचा नाहीं म्हणून हा असंभवपूर्वक प्रश्नालंकार आहे. ७. बलवान् पुरुष. ८. (राज्यविभागांला) मजपासुनि पावेल ?—असा अन्वय. ९. कांति, तेज. १०. ज्याची भा (तेजस्विता) गातां (स्तवितां) तो विधु (चंद्र) मलिन (हीनतेज, गतप्रभ) होय [यास्तव, म्हणून] कवि हो ! (अहो ! पंडित हो !) रविभा (सूर्यप्रभा) [आतां] गा (स्तवा, स्तवन करा.) येथें विधु आणि रवि या शब्दांनीं धर्म आणि सुयोधन उद्दिष्ट आहेत. येथें 'म्हणून' हा शब्द अध्याहृत असून दोन वाक्यांत (ज्याची भा गातां तो विधु मलिन होय+कवि हो रविभा गा) कार्यकारणभाव आहे म्हणून हा **काव्यलिंग** अलंकार झाला, असें समजावें. ११. अध्याय १२८ पहा. यांत श्रीकृष्णाचें भाषण आहे. १२. बहुत मान्य. १३. पाठ असोनि (कोणतीही गोष्ट माहीत असून) समयीं (उचित प्रसंगीं) कोण न वदे ? (कोण बोलणार नाहीं ?). १४. विश्वांत प्रसिद्ध. १५. यमलोकांतील एक पुरुष. हा लोकांचे गुणावगुण व पापपुण्यें एका वहींत लिहून ठेवितो व प्राणी यमलोकास गेला म्हणजे ती उघडून यमाला

घूकासि[1] जेसा[2] दिनकर[3] तुज सुजनोत्कर्ष पळ पहावेना, ।
तन्नाम तुला, अहिला गरुडाचें नांमसें[4], सहावेना. ॥ ४५
कितवाकरवीं[5] कपटद्यूतीं त्वां पांडुपुत्र नागविले ।
वागविले जे भीष्में स्वकरतळस्फोटसे[6] न भागविले[7]. ॥ ४६
ज्या साध्वीनें[8] केली न सतींच्या तिलहि हानि रीतीची, ।
सोडित होता स्वकरें दुःशासन[9] दुष्ट हा निरी तिची. ॥ ४७
माराया[10] भीम, तुझा धरि संकोचासि न भुज, गरदानीं[11] ।
या त्वद्गुणापुढें[12] बहु मिरवावें तेज न भुजगरदानीं[13]. ॥ ४८
त्वां वारणावतीं[14] जतुसदनीं[15] कोंडूनि जाळिले होते, ।

---

दाखवितो व प्रत्येकाला त्याच्या पापपुण्याचरणाप्रमाणें शासन अथवा बक्षिस मिळतें. चित्रगुप्त मनुष्याचीं पापपुण्यें एका वहींत लिहून ठेवतो–असा उल्लेख पंताच्या व इतरांच्या काव्यांत अनेक स्थळीं आढळतो. [संशयरत्नमाला–१४; मुक्तेश्वर–आदिपर्व–अ० १६ गी० १३९ पृ० १३०.] १६. मोठीही वही पुरलीं नसेल इतके तुझे अमित अपराध होत.

१. घुबडास. २. हा उपमालंकार होय. ३. सूर्य. ४. हा उपमालंकार जाणावा. ५. कपटी शकुनीकरवीं. (अ० १२८ श्लो० ४.) ६. आपले करतळावरील फोडाप्रमाणें. ७. श्रमविले. ज्या पांडवांला भीष्मानें यत्किंचित्‌ही दुःख, क्लेश अथवा त्रास दिला नाहीं. तळहातावरचे फोडास मनुष्य फार जपतो, त्या फोडाकडे सतत दृष्टी देऊन बसतो त्याप्रमाणें भीष्मानें पांडवांस वाढविलें पण कधींही श्रमविलें नाहीं. ८. साध्वी='पतिं या नाभिचरति मनोवाग्देहसंयता । सा भर्तृलोकानाप्नोति सद्भिः **साध्वी**ति चोच्यते ॥' [मनुस्मृति–अध्याय ९ श्लोक २९]. याचा भावार्थः—जी (स्त्री) मनानें, वाणीनें व देहानें पतीच्या मर्जीविरुद्ध कांहीं कृत्य करीत नाहीं ती मरणोत्तर भर्तृलोकास जाते व तिला इहलोकीं शिष्ट लोक '**साध्वी**' असें म्हणतात. ९. अध्याय १२८ श्लोक ९-१० पहा. १०. तुझा (दुर्योधनाचा) भुज (बाहु) गरदानीं (विषान्न चारून, विष देऊन) भीम (भीमसेनाला) माराया संकोचासि न धरि–असा अन्वय. [अ० १२७ श्लो० १५.] ११. विषदानद्वारा. १२. तुझ्या (दुष्ट) गुणांपुढें. [येथें जे गुण म्हणून वर्णिले आहेत ते सर्व दुर्गुण होत म्हणून येथें 'गुण' हा शब्द व्याजोक्तिपूर्वक योजिला आहे असें स्पष्ट दिसतें.] १३. भुजग+रदांनीं=साप+दातांनीं=सर्पाच्या दंतांनीं. १४. इंद्रप्रस्थीं. [मोरोपंत–आदिपर्व–अध्याय २८ गीति ८-१८ पहा. यांत पांडवांना वारणावतास पाठवून तेथें त्यांचा लाक्षागृहांत नाश करावा अशा अर्थाचें दुर्योधनाचें भाषण आहे. पृ० १४४, तसेंच गीति ५२-७४ पहा. पृ० १४७-१४९.] १५. लाक्षागृहांत.

परि वांचले तशाहि व्यसनीं दैवेंचि पाळिले हो! ते. ॥ ४९
ऐसे अपराध तुझे मेरुसम, न यांसमान वेनाचे, ।
बहुमत्त आपणाला न गणुनि धिक्कार, मानवे, नाचे. ॥ ५०
यां साधूंचा बहुमत बोध सदा सुरसभाजनां, आमा ।
बाळाचा, हा धरवे न तुज, जसा सुरस भाजना आमा. ॥ ५१
देतोसि, पाजितां हितबोधामृत, जरि बळेंचि ओकारे, ।
'ओ' कारेसि यमाच्या देसिल, शोकाग्नि याहि ओकां रे! ॥ ५२

---

१. विदुराच्या युक्तीनें पांडवांचें संरक्षण झालें, असें वर्णन आदिपर्वात आहे. २. तुझ्या या अपराधांसारखे. ३. वेनराजाचे. ४. बहुमत्त (फार उन्मत्त झालेला पुरुष) धिक्कार न गणुनि (लोकांनीं त्याचा केलेला जो धिक्कार त्याची पर्वा न करतां) आपणाला मानवे (आपणच आपणास 'बरा, भला' असें म्हणतो) [आणि] नाचे (नाचतो, यथेच्छ वर्तन करतो. या बहुमत्त मनुष्याप्रमाणें दुर्योधनाचें वर्तन आहे असें दर्शविलें आहे. ५. सज्जन भीष्मद्रोणादिकांचा. ६. अत्यंत मान्य. ७. देवसभेंतील लोकांस. ८. स्तन. ९. हा साधुबोध. १०. उत्तम रस. ११. पात्रा. १२. अपक्का, कच्या (भाजना). १३. बंदिशाळेस. १४. यमाच्या कारेसि ओ देसिल; यमाच्या बंदिशाळेंत पडशील. [ओ देणें—जबाब देणें, उत्तर देणें, येतों असें म्हणणें.] १५. 'देशिल' हें क्रियापद येथें देहलीदीपन्यायानें योजावयाचें आहे. १६. गृहास. येथें कृष्णाचें भाषण संपतें. हें मूळांत बरेंच मोठें आहे व त्याचें सरस सार पंतांनीं आपल्या कल्पनेच्या बळावर मराठींत आणिलें आहे. अशा स्वतंत्र व संक्षिप्त वर्णनशैलीविषयीं **कालिदास** आणि **पंत** यांची तुलना **हंस** यांनीं फार मार्मिकपणें केली आहे, ती येथें शोधक व रसज्ञ वाचकांच्या सोईसाठीं देतों:—"कालिदासादि कविजनांनीं रघुवंशादि काव्यें इतिहासपुराणांच्या आधारानें लिहिलीं त्याप्रमाणेंच मोरोपंतानेंही आपले सर्व ग्रंथ इतिहासपुराणांच्याच आधारानें लिहिले आहेत. कालिदासादिकांनीं आपल्या ग्रंथाचे सर्गरूप विभाग पाडिले आहेत व मोरोपंतानें ते अध्यायरूप केले आहेत. वनवर्णनें व ऋतुवर्णनें, स्वयंवरें, विरहवर्णनें, लोकस्थिति, ह्यासंबंधीं सुंदर व विपुल कविता कालिदासादि कवींच्या काव्यांत आहे. व प्रत्येक वर्णन त्यांनीं विस्तारपूर्वक केलें आहे, तसा प्रकार मोरोपंताच्या वर्णनांत दिसत नाहीं. म्हणजे हरएक वर्णनप्रसंगीं त्यानें संक्षेपावरच नजर दिली आहे. तरी हीं वर्णनें त्याच्या काव्यांत नाहींत असें नाहीं. दंडीनें जें महाकाव्याचें लक्षण सांगितलें आहे तें मोरोपंताच्या काव्यासही चांगलें लागतें. यास्तव त्याच्या काव्याची महाकाव्यांत गणना करण्यास कांहीं हरकत नाहीं असें आम्हांस वाटतें. आतां कालिदासादिकांच्या काव्यास महाभारतादि इतिहासांतील सामान्य गोष्टींचा मात्र आधार घेतला आहे. वस्तुतः काव्यांत संपूर्ण वर्णन स्वतंत्र कल्पनेचें व रसिक जनांनीं यथेच्छ रसतरंगिणींत क्रीडा करण्याजोगें हेतुपूर्वक रसाळ आणि विस्तृत केलें आहे. शृंगारवीरादि रसविशेष उत्कर्षानें दाखवि-

तों दुःशासन बोले, 'राया! व्यसनांत वांच, धर्म करीं. ।
साम न करितां, कौरव तुज बांधुनि ओपितील धर्मकरीं. ॥ ६३
भीष्म द्रोण विदुर हे तुज मज कर्णासि बद्ध करितात, ।
हरितात प्राणातें, झाला पर, परमहितहि जरि तात.' ॥ ६४
ऐसें म्हणतांचि, उठे, क्षिप्र निघे दुष्ट मंडळीसहित; ।

ण्याचा प्रसंग आला कीं, त्या ठिकाणीं साहित्यशास्त्रकथित लक्षणाप्रमाणें तो तो रस मूर्तिमंत उभा करून देण्याचा कवीनें अंतःकरणपूर्वक उद्योग केलेला दृष्टीस पडतो. यामुळें रघुवंशादि काव्यांत नानाप्रसंगीं अनेक वर्णनें मोठ्या कारागिरीनें केलेलीं व ओतप्रोत रसानें भरलेलीं दिसतात. तसा प्रकार मोरोपंताच्या काव्यांत झाला नाहीं. एकंदर भारत, भागवत, रामायण या संस्कृत ग्रंथांत कोणाविषयीं काय काय इतिहास लिहिला आहे तो संक्षेपानें प्राकृत भाषेंत कवितारूपानें मात्र मोरोपंतानें उतरला आहे, तथापि प्रसंगविशेषीं व स्थळविशेषीं मूळ ग्रंथाहून अगदीं निराळ्या प्रकारची काव्यसृष्टि त्यानें निर्माण केली नाहीं असें नाहीं; तरी त्यानें सर्वत्र अतिसंक्षेपरूप दिल्यामुळें त्याच्या भारतरामायणासंबंधीं कवितांतील आनंद केवळ फलरूपानें मात्र प्रत्ययास येतो. कालिदासादिकांच्या काव्यांत पक्क फलभारानें लवलेल्या वृक्षांच्या मोठमोठाल्या राई दृष्टीस पडतात; तशीं झाडें उभीं केलेलीं पंताच्या कवितेंत सांपडणार नाहींत. काव्यसृष्टींतील नानारसयुक्त फलांनीं ओथंबलेल्या वृक्षांचीं व वेलींचीं हिरवीं गार मैदानें पाहून रसिकांस जसा आनंद होतो; तसाच फळांफुलांनीं गजबजलेल्या बाजारास पाहूनही होतोच. पण बागाचा देखावा बाजारास येणार नाहीं असें म्हणणारे रसिकांची संख्या अधिक निघेल असें वाटतें. यामुळें कालिदासादिकांच्या काव्याची बरोबरी पंताचें काव्य करणार नाहीं. तरी जी त्यानें रचना केली आहे, तींत त्याच्या स्वतंत्र कल्पनांचा व कारागिरीचा त्यानें पुष्कळ सरस उपयोग केला असून, ग्रंथसंख्या एकंदरींत फार मोठी आहे; यास्तव त्याच्या ग्रंथास महाकाव्य म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं." [हंसकृत मोरोपंतावरील निबंध—पृ० १०१-१०४.]
१९. गृहास.

१. अध्याय १२८ श्लो० २३-२४ पहा. २. हे सुयोधन राजन्. ३. धर्माला अनुसरून आचरण कर; नीतिमार्ग, शास्त्राचार सोडूं नको. ४. युधिष्ठिराच्या हातीं. ५. कुंतीपुत्राच्या स्वाधीन करून गतप्राण करतात. ६. शत्रु. ७. धृतराष्ट्र. मूळांत 'झाला पर, परमहितहि जरि तात' या चतुर्थ पादास आधार नाहीं. हा पंतांनीं आपल्या उज्वल कल्पनाचातुर्यानें येथें योजिला आहे. अशींच स्थळें पंतांच्या काव्याचें अपूर्वत्व आणि सरसत्व स्थापित करतात. ८. याप्रमाणें दुःशासनानें म्हटलें तेव्हां. ९. धार्तराष्ट्र सुयोधन त्वेषानें फणाणून सभेंतून उठला. १०. धाकटे भाऊ व सामात्य जमलेले राजे यांसहित.

सत्सत्पतिपासुनिहि प्राप्त नव्हे दुष्टमंडळीस हित. ॥ ९५
चित्तीं भीष्म म्हणे, 'रे! गंतासि हरिं विलंघ्य करिप! क?' ।
देवासि म्हणे, 'प्रभुजी! न वळति ते, ज्यांसि काल करि पक्व.' ॥ ९६
भीष्मद्रोणप्रमुखां वृद्धांसि प्रभु म्हणे, 'अहो! परिसा. ।
चुकतां न्यायासि कसें? बांधावा दुष्ट हा तुम्हीं अरिसा. ॥ ९७
म्यां दुष्ट कंस वधिला, वधितांहि नसेचि पाप मत्तातें; ।
अनुभविला सर्वेही वंशें, केवळ न ताप मत्तातें. ॥ ९८
देवासुरांत पूर्वी ऐसाचि विरोध होय बहुधा त्यां ।
लोकलया चुकवाया लागे हृदयांत आधि बहु धात्या. ॥ ९९
मग धर्माला सांगुनि बांधुनि दैतेय निरविले वरुणा, ।

१. सत्+सत्+पतिपासुनिहि=साधुजन+उत्तम+नायकापासून देखील=सज्जनांच्या उत्तम नायकापासून सुद्धां. या अर्धांत सामान्य सिद्धांताचें समर्थन केलें आहे म्हणून येथें 'अर्थांतरन्यास' नामक अलंकार झाला आहे. २. दुष्टांच्या टोळीस. ३. हे करिप! हरिं विलंघ्य क गंतासि?=हे गजपते! सिंहाला उल्लंघून कोठें जाशील? [गजपति जरी असला तरी त्याच्या हातून जसें सिंहाचें उल्लंघन कधींही व्हावयाचें नाहीं, तसेंच बलाढ्य दुर्योधनाच्या हातून पांडवांचें मर्दन व्हावयाचें नाहीं—असा सांगण्याचा उद्देश.] ४. अशीं लहान लहान संस्कृत वाक्यें पंतांच्या काव्यांत पुष्कळ ठिकाणीं आढळतात. यांतील कित्येकांचा संग्रह निबंधमाला—अंक ६६ (पृष्ठें ३०-३१) यांत केलेला आहे तो पहावा. पंतांची कविता 'प्राकृतसंस्कृतमिश्रित' आहे असें खुद्द पंतांनीं प्राकृत 'मंत्ररामायणा'च्या उपक्रमांत वर्णिलें आहे (गीति १८). ५. श्रीकृष्णाला. ६. ज्यांस (ज्या मनुष्यांस) काल (यम) पक्व (मरणास योग्य असे) करि (करतो ते (मनुष्य) [बोधाला] वळति न (वळत नाहींत). [हे जनार्दना! हे सर्व क्षत्रिय कालपक्व झाले आहेत असें मला वाटतें, आणि म्हणूनच सामान्य सर्व पार्थिव मोहानें दुर्योधनाला अनुसरतात—असें मूळांत आहे. श्लो० ३२ पहा.] ७. न्याय करावयास. ८. शत्रूसारखा. ९. उन्मत्तातें. येथें दुसऱ्या पादांत सर्वसामान्य सिद्धांताचें समर्थन केलें आहे म्हणून हा 'अर्थांतरन्यास' नामक अलंकार झाला. १०. माझ्या बापानें (वसुदेवानें). ११. त्यास (विरोधास). १२. लोकनाशाला. १३.चिंता १४. ब्रह्मदेवाला. [अ० १२८ श्लो० ४१-४७.] [देव आणि असुर यांचें युद्ध सुरू होऊन लोकांचा नाश होऊं लागला, तेव्हां ब्रह्मदेवाला चिंता पडली. त्यानें यमधर्माला सांगितलें कीं, 'या असुरांला वरुणाच्या स्वाधीन करा.' त्याप्रमाणें केल्यावर वरुणानें त्या दानवांला धर्मपाशांनीं आणि स्वपाशांनीं बांधून सागरांत ठेवून दिलें आणि स्वतः त्यांचें रक्षण करीत पाताललोकीं बसला—अशी कथा आहे.] १५. यमाला. १६. दैत्य. १७. स्वाधीन केले.

ऐसी केली विधिनें [1]लोकांवरि त्या खळांवरिहिं करुणा. ॥ ६०
दुर्योधन दुःशासन कर्ण शकुनि खळ तसेचि [2]करकरुनी ।
बांधुनि धर्मकरीं द्या, लोक बुडवितील हे नि[3]कर करुनी. ॥ ६१
[4]पुरुष कुळार्थ, ग्रामाकरितां कुळ, तोहि [5]जनपदाकरितां, ।
आत्मार्थ [6]भू त्यजावी, असि नीति कळोनि कां असें करितां ? ॥ ६२

---

१. लोक युद्धजन्य संहारापासून मुक्त झाले व खळ असुर हे देवांच्या तडाक्यांतून पार पडले, यामुळें, ही दोघांवरही करुणाच झाली. २. तंग ओढून, ताणून, गच्च कसून. 'करकरुनी' हा गच्च बांधण्याच्या क्रियेचा सूचक शब्द आहे. असे अनुकरणवाचक शब्द पंतांनीं आपल्या काव्यांत अनेक स्थळीं योजिले आहेत. या शब्दांच्या योगानें वर्णन चित्तवेधक झालें आहे. [फरफरां–सभापर्व–अ० ५ गी० ७, खदखद–सभापर्व–अ० ३ गी० ३५, करकरां–कर्णपर्व–अ० १७ गी० २५, घटघटां–अ० ४६ गी० ५८, चरचरां–कर्णपर्व–अ० ४५ गी० १४.] ३. कहर. ४.'त्यजेदेकं कुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् । ग्रामं जनपदस्यार्थे आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् ॥' [अ०१२८ श्लो० ४९.] ५. 'राया! कुलार्थ पुरुष, ग्रामार्थ कुळहि समस्त सोडावें, । ग्रामहि देशार्थ मही आत्मार्थ, बुधें भलेंचि जोडावें. ॥२०॥ याविषयीं वचनाधारः–'त्यजेत्कुलार्थे पुरुषं ग्रामस्यार्थे कुलं त्यजेत् । ग्रामं जनपदस्यार्थे आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् ॥' (सभापर्व–अध्याय ६२ श्लो० ११). याचा अर्थः–एका पुरुषाच्या संग्रहेंकरून जर कुळाचा नाश होत आहे तर त्याचा त्याग करून कुळाचें रक्षण करावें. एका कुळाच्या योगेंकरून जर ग्राम नाश पावतो तर तें कुळ ग्रामांतून काढून लावावें, आणि ग्राम रक्षावा. एका ग्रामामुळें जर देश उच्छिन्न होतो तर तो ग्राम मोडून टाकावा. जर आत्मा नाश पावतो आहे तर पृथ्वीचा त्याग करून आत्मरक्षण करावें. जंभासुराच्या त्यागाकरितां शुक्राचार्यांनें जी नीति सर्व असुरांस सांगितली तींतील हें वचन आहे. ६. पृथ्वी. ही गीति 'सार' नामक अलंकाराचें उदाहरण होय. जेथें उत्तरोत्तर उत्कर्षाचें वर्णन केलेलें असतें तेथें सार नामक, अलंकार होतोः—जसें मधाहून सुधा गोड, सुधेहून काव्य गोड, इ०. एखाद्या पदार्थाचे गुण उत्तरोत्तर पायरी पायरीनें वर चढून शेवटीं अगदीं अखेरच्या गुणांचें वर्णन झालें म्हणजे 'सार' अलंकार होतो. एका गुणापेक्षां दुसरा गुण पायरीनें अधिक, दुसऱ्यापेक्षां तिसरा गुण पायरीनें अधिक, असें वर्णन असून सर्व गुणांचें सार शेवटीं सांगितलें असतें म्हणून या अलंकाराला 'सार' असें म्हणतात. जसेंः–(१) संसारामध्यें मनुष्यपण सार आहे, मनुष्यपणांत कुलीनत्व सार आहे, कुलीनत्वांत धर्मित्व, आणि धर्मित्वांत सदयत्व. (२) मधाहून सुधा गोड आहे, सुधेहून कविवाणी गोड आहे. (३) पर्वत मोठा आहे, त्याहून सागर, त्याहून आकाश, त्याहून ब्रह्म, आणि ब्रह्माहून आशा मोठी आहे. (४) राज्यांत सार पृथ्वी, पृथ्वीमध्यें सार स्वनगर, स्वनगरांत स्वमंदिर, आणि स्वमंदिरांत स्वपर्यंक आणि स्वपर्यंकीं स्वकलत्र सार आहे. (५) पटुत्व सकलेंद्रियीं, मनुजता, सुवंशीं जनीं

अजि धृतराष्ट्र! अजि महाराज! न हा[१] साधु, बांधवा यास, ।
न करावा व्यर्थ तुम्हीं हित[२]सूचक साधुबांधवायास[३].' ॥ ६३
धृतराष्ट्र म्हणे[४], 'विदुरा! जा, वाढुनि[५] आण एथ गांधारी[६], ।
सोडी[७] कर कांतारीं[८] करुण[९] कवि[१०] नव्हे निजानुगांधारी[११].' ॥ ६४
'जी! जी!' म्हणोनि जाउनि घेउनि आला सभेंत भावजये[१२], ।
[१३]पतिजवळिं कलत्र[१४] नये कां हो? सिद्धाश्रमांत सावज[१५] ये. ॥ ६५
स्त्रीस म्हणे तो नृप, 'सति! तूं तरि दुर्योधनासि बोध करीं, ।

---

द्विजत्वहि दिलें भलें, बहु अलभ्य जें कीं जनीं। यशःश्रवणकीर्तनीं रुचि दिली तरी हा वरा म्हणे अधिक याच कीं अखिल याचकीं हावरा. ॥१२॥ (केकावली) (६) ऐसें असतां भ्राता, तोही स्वज्येष्ठ, त्यांतही राजा, । तत्रापि धर्मकोविद, बहु मानी आणि शांतनव आजा ॥ २६ ॥ पांडुसमातें त्यातें धर्मज्ञा! मारितोसि पामरसा; । रोदन करील येणें विसरविला आठवूनि राम रसा. ॥ २७ ॥ (कर्णपर्व–अ० ४१ ) या अलंकाराला इंग्रजी साहित्यशास्त्रांत Climax असें म्हणतात.

१. हा दुर्योधन. २. हित सूचविणारा. हिताची सूचना ज्यांत आहे असा (साधुबांधवाचा–विदुराचा) आयास (उपदेशरूप श्रम) तुम्हीं व्यर्थ न करावा. हित सूचविणारा असा जो साधु बांधव (सुशील बांधव–विदुर) यानें केलेला आयास तुम्ही व्यर्थ न करावा. ३. साधु+बांधव+आयास=साधु व बांधव यांचा आयास. ४. कृष्णाचें वचन ऐकून धृतराष्ट्र म्हणाला. (अ० १२९.) ५. रथांत घालून आण. ६. गांधारी ही दीर्घदर्शिनी आणि महाप्राज्ञा होती असें वर्णिलें आहे. [अ० १२९ श्लो० २.] ७. [जो कोणी आपल्या आश्रयानें येणाऱ्या आंधळ्याचा] कर (हात) कांतारीं (अरण्यांत) सोडी (सोडितो–रानांत सोडून देतो) [तो] करुण कवि नव्हे (दयाशील ज्ञाता (सुज्ञ नर) नव्हे) [तर तो] निज–अनुग–अंध–अरी (आपल्या आश्रयानें येणाऱ्या अंधाचा शत्रु होय.) धृतराष्ट्र म्हणतो त्याचें तात्पर्य असें:–हे विदुरा! तूं कवि आहेस, तूं करुण (दयालु आहेस), मी तुझ्या आश्रयानें चालणारा अंध आहें आणि या प्रसंगीं संकटांत आहें. अशा प्रसंगीं त्वां माझा हात सोडून जाऊं नये. ८. रानांत. ९. उत्तरार्धांत 'क' व्यंजनाची पुनः पुनः आवृत्ति झाल्यामुळें 'वृत्त्युनुप्रास' अलंकार झाला आहे. १०. या अर्धांत 'करुण कवि' कोणाला म्हणावें याची सुरेख व्याख्या पंतांनीं निषेधरूपानें केली आहे. ११. आपल्या आश्रयानें येणाऱ्या अंधाचा शत्रु. १२. भावजय–भ्रातृजाया. १३. गांधारी सभेंत आली ही गोष्ट लोकाचारास चमत्कारिक दिसते या शंकेचें निरसन कवि करतो:– हो! (अहो!) पतिजवळिं कलत्र (स्त्री) कां नये? (नवरा असेल तेथें बायको निःशंकपणें कां येणार नाहीं?) [अर्थात् येईल. यास दृष्टांत.] सावज (वनपशु मृग इत्यादिक) सिद्धाश्रमांत (मुनिजनांच्या पवित्र आश्रमांत) ये (निःशंकपणें संचार करतात, भय न बाळगतां विश्वस्तपणें पुण्याश्रमपदांत विहार करतात). १४. स्त्री. १५. श्वापद.

देणार [1]अंतकाच्या [2]स्वासुसह सकळ सहाय योध [3]करीं.' ॥ ६६
[4]देवी म्हणे, 'शिकवितां [5]देवर्षि [6]महायशाहि [7]उपरमला; ।
[8]उपरमला **भीष्म विदुर कृ**ष्णहि, कथिता [9]अशाहि उपर मला! ॥ ६७
[10]ऐकेलं काय गुरुवच सुत? आपण ऐकिलें कितिकसें जी? ।
पावेल सुयश सुसुख प्रसवुनि सुतशतहि हे **दि**ति कसें जी? ॥ ६८
सांगेन यथामति, परि कोठें तो?' नृप म्हणे, '[11]बहा [12]भ्रात्या.' ।
आणी सभेंत वळवुनि **वि**दुर पुन्हा वातसा [13]महाभ्रा त्या. ॥ ६९
**गां**धारी त्यासि म्हणे, 'वत्सा! बहु कष्टतो दुरभिमानी, ।
कां त्यजिसि गुरूक्ति? [14]इला आत्माधिक बहुगुणें [15]सुरभि मानी. ॥ ७०

---

१. यमाच्या. २. स्व–असु–सह=आपल्या प्राणांसहित. ३. हातांत. ४. 'देवी कृताभिषेकायां तेजनीस्पृक्कयोरपि' इति मेदिनी. ५. नारद. ६. महत् आहे यश ज्याचें तो महायशा. ७. थकला. ८. हें दोन अर्थ जोडणाऱ्या 'दामयमका'चें उदाहरण आहे. ९. [भीष्म विदुर आणि कृष्ण बोध करितां थकले] अशाही उपर (हें कळल्यानंतर देखील, भीष्म द्रोण विदुर कृष्ण यांच्या उपदेशाचा कांहीं उपयोग झाला नाहीं असा अनुभव आल्यावरही) [त्या दुर्योधनास बोध करण्याविषयीं] मला कथिता (मला सांगता–हें मोठें आश्चर्य आहे.) १०. जी! (अहो धृतराष्ट्र!) सुत (दुर्योधन) गुरुवचन (वडिलांचें अथवा श्रेष्ठांचें वचन) ऐकेल काय? (मानील काय? अर्थात् मानणार नाहीं–असा भावार्थ.) [कारण] आपण (वडिलांनीं) कितिकसें ऐकिलें? [आपण जर ऐकिलें नाहीं तर आपला पुत्र गुरुवचन कां बरें ऐकेल?] हे (ही मी गांधारी) जी दिति (जी दैत्यमातेप्रमाणें दुष्टपुत्रप्रसविनी) सुतशतहि प्रसवुनि (शंभर दुराचारी पुत्र प्रसवली त्या योगानें) सुयश [आणि] सुसुख कसें पावेल? [अर्थात पावणार नाहीं.] या ६८ व्या गीतींत गांधारी धृतराष्ट्राला उपालंभपूर्वक बोलत आहे हें मार्मिक वाचकांच्या ध्यानांत येऊन चुकलें असेलच. दुर्योधनास राज्यपदाधिरूढ करण्याच्या समयीं धृतराष्ट्राला जो भीष्म-द्रोण-विदुरांनीं बोध केला त्याचा धृतराष्ट्रानें धिक्कार केला आणि अविचारानें व सुतलोभानें अंध होऊन मूढ, बालिश, दुराचारी, कामी आणि अविचारी दुर्योधनाला राष्ट्रप्रदान केलें या सर्व अविचाराचें फळ हितोपदेशक गुरुजनाचें वचन न ऐकिल्यामुळें भोगावें लागत आहे असें गांधारी दर्शवित आहे. [अ० १२९ श्लो० ११-१५.] ११. बोलाव. १२. बंधु विदुरा. १३. वात जसा मोठ्या अभ्राला (मेघाला) आणतो तसा. १४. या गुरूक्तीला सुरभि (कामधेनु) बहुगुणें (अनेक प्रकारांनीं) आत्माधिक (आपल्याहून थोर अशी) मानी (समजते). येथें गुरूक्तीचें सुरभिहून आधिक्य वर्णिलें आहे म्हणून हा अधिकालंकार होय. १५. कामधेनु.

[1]अन्यायकृष्णवर्त्मा न स्पर्शो [2]कीर्तिकापुरा, [3]तनया! ।
ज्या लोभा भजसी तूं, भजले नाहींत वा! [4]पुरातन या. ॥ ७१
[5]कामें कोपें लोभें नागविले अमित, यांस जे भुलले, ।
यांच्या कुदृष्टिपातें तेजस्वी [6]पुरुषहीरही [7]उलले. ॥ ७२
न उगाचि [8]मूकसा तूं चित्तांत धरूनि [9]दंभ दर्प रहा, ।
बा! दुरभिमान न बरा, देइल [10]धनपतिकरींहि [11]खर्पर हा. ॥ ७३
अहित कथील तरि कसा गुरु? बाप कसा? तसीच आइ कसी? ।
नाइकसी गुरुवचन, [12]क्षुद्रवचन बहु जपोन आइकसी! ॥ ७४
[13]सत्यप्रेमें [14]स्वामी [15]न म्हणविती हे [16]दयाभ्र [17]मामाजी ।

---

१. अन्याय+कृष्णवर्त्मा=अन्यायरूप अग्नि. [कृष्णवर्त्मन्=अग्नि, कृष्ण (काळा) आहे वर्त्मा (मार्ग) ज्याचा तो कृष्णवर्त्मा. जेथून अग्नि जातो तेथें सर्व भस्म होऊन जमीन काळी होती म्हणून हें नांव अग्नीला पडलें. कृष्णो धूमो वर्त्मास्य । 'बर्हिः शुष्मा कृष्णवर्त्मा शोचिष्केश उषर्बुधः' इत्यमरः.] २. कीर्तिरूप कापुराला. [या अर्थात रूपकालंकार झाला आहे. कृष्णवर्त्मा (अग्नि) कापुराला लागला असतां जें घडतें तेंच अन्यायाचा स्पर्श कीर्तीला घडतां होणार आहे असें सूचविलें आहे. यशोहास्ययोः शौक्ल्यस्य । अयशःपापयोः कार्ष्ण्यस्य ॥ या [काव्यानुशासन—अध्याय १ पृ० ९] वचनावरून यशाचा (कीर्तीचा) रंग शुक्ल होय. कापुराचा रंग शुभ्र असतो [द्रोणपर्व—अ० २ गी० ८७] म्हणून येथें 'कीर्तिकापुर' असें रूपक योजिलें आहे.] ३. हे दुर्योधना! ४. पूर्वज. ५. काम कोप आणि लोभ यांच्यापायीं शेंकडों लोकांचा नाश झाला आहे या साध्या गोष्टीचें पंतांनीं फार सुरस वर्णन केलें आहे. येथें 'भुलले' 'नागविले' या दोन शब्दांत कवीनें सर्वचित्ताकर्षकत्व भरून ठेविलें आहे. ६. पुरुषरूप हिरेही. ७. फुटून गेले, विदीर्ण झाले. हिरा हा अत्यंत कठिण असल्यामुळें कधींही फुटावयाचा नाहीं पण तोही कुदृष्टिपातानें फुटतो. ८. मुक्यासारिखा. ९. अध्याय १२९ श्लोक ३३ पहा. १०. कुबेराच्या हातींही. कुबेरालाही भीकेस लावणारा दुरभिमान आहे, हा दुरभिमान कुबेराच्या अमित संपत्तीची खाक करून त्याच्या हातांत भिक्षा मागण्यासाठीं खापर देईल असा दुष्परिणामकारक आहे. ११. खापर. १२. हलकट पुरुषांचें भाषण. १३. सत्यावर आहे प्रेम म्हणून. १४. धनी. १५. हे दयाभ्र (दया+अभ्र=करुणा+घन=दयाघन, अत्यंत कृपाळु) मामाजी (भीष्माचार्य) सत्यप्रेमें (सत्याचें आहे प्रेम म्हणून, सत्याची प्रीति—आवड वाळगतात म्हणून) स्वामी (राजा, धनी, राज्याचा प्रभु—असें आपणास) न म्हणविती (म्हणवीत नाहींत). [भीष्माचा स्वतःस राजा म्हणविण्याचा हक्क आहे व तो राज्यशकटवहनसमर्थ आहे, तथापि आपलें पूर्ववचन पाळण्यासाठीं आपणास धनी असें तो म्हणवीत नाहीं. भीष्मानें सत्यवतीला दाशपतीजवळ मागून घेऊन आपल्या पित्याला (शंतनूला) दिली. तेव्हां 'तिच्या पुत्रास राज्यावर बसवीन (आपण न बसतां) आणि आजन्म ब्रह्म-

'मीं राजा' ऐसें जें काय म्हणसि खेद या भ्रमामाजी. ॥ ७५
राज्यार्ध पांडवां दे, तूं घे राज्यार्ध, बहु तुला[1] वा! हें, ।
साम करीं, यश[2] रुसलें मुरडुनि तुज पाहतें, मुला! बाहें[3]. ॥ ७६
निष्कंटक[4] राज्य करिसि, हा महिमा सत्य पांडवाचा रे! ।
सत्सख्य[5] करूनि यशें धवल[6] करा सत्यपांड[7], वांचा रे! ॥ ७७
भीष्मद्रोणाद्यार्य[8] प्राणातें सोडितील, न तयांतें[9]; ।
सामर्थ्य असोनि अधिक, बहु ते आहेत साधु नत यांतें. ॥ ७८

---

चर्यव्रत पाळीन' असें सत्यवतीच्या बापाजवळ कबूल केलें, या समयीं शंतनूनें प्रसन्न होऊन स्वेच्छामरण वर भीष्मास दिला–अशी कथा आहे. मोरोपंत–आदिपर्व–अध्याय १३ गीति ८५-९८ पृ० ८८-८९ पहा. मुक्तेश्वर–आदिपर्व–अध्याय २३ ओव्या ४३-७३ पहा. या प्रसंगाचें वर्णन **श्रीमदमरचंद्रसूरि**विरचित **बालभारतांत** आहे तें असें:—'अथोचे दाशभूपस्तं ददे तुभ्यमिमां ततः। यदि स्यान्नृप जातोऽस्यां तनयस्तव राज्यभाक् ॥ राजापि राज्यधौरेयं ध्यात्वा देवव्रतं सुतम् । तस्य वाक्यमनादृत्य व्यावृत्य स्वपुरं ययौ ॥ नृपः सदर्पकंदर्पशरैर्विधुरितस्ततः । स्मरन्सत्यवतीं स्वांते न निद्रामपि भेजिवान् ॥ ततो मंत्रिगिरा मत्वा तद्वृत्तं तटिनीजनिः । जनकाय ययाचे तां कन्यां धन्याशयः स्वयम् ॥ अथैनं यमुनाकूलवासी दाशेश्वरोऽवदत् । कथं स्यान्मम दौहित्रो राजा राज्यधरे त्वयि ॥ सेवे नृपश्रियं नैव सत्योऽयं समयो मम । इति सत्यव्रतेनोक्ते पुनर्दाशपतिर्जगौ ॥ कथंचित्पितृभक्त्या त्वं भविता न प्रियः श्रियः । क्रुद्धास्तु केन रुध्यंते गजा इव तवांगजाः ॥ ततः शांतनवः स्माह साहसी दाशवासवम् । आजन्मापि समाचर्यं ब्रह्मचर्यं मया व्रतम् ॥ [बालभारत–श्लोक ७१-७८ पृ० ३४-३५.] मी (दुर्योधन) राजा (या राज्याचा धनी) ऐसें जें काय म्हणसि (असें जें कांहीं तूं म्हणतोस, मनांत समजतोस) [हा तुझा भ्रम आहे] या भ्रमामाजी खेद (त्या भ्रमामध्यें राहून खेद मात्र होणार आहे, या भ्रमानें खेदाची प्राप्ति होणार आहे.) १६. दयेचे मेघ. १७. भीष्म.

१. राज्यार्ध तुला पुष्कळ आहे. २. [हे दुर्योधना!] यश [तुजवर] रुसलें [आहे], तुज (तुजला) मुरडुनि पाहतें (तुजकडे तें वांकडा डोळा करून पाहत आहे) [तर, हे] मुला! बाहें (त्या यशाला बोलाव). ३. बोलाव. ४. शत्रुरहित. ५. साधुसख्य. ६. यशाचा रंग पांढरा म्हणून 'धवल करा' असें पद योजिलें आहे. ७. सत्यप+अंड=सत्यलोकपाल प्रजापति+अंड=ब्रह्मांड. ८. भीष्म+द्रोण+आदि+आर्य=भीष्म+द्रोण+प्रभृति+सभ्य, कुलीन=भीष्मद्रोणादिक थोर थोर पुरुष. [आर्य=सभ्य, साधु. आर्य हें पूर्वी लोकविशेषाचें नांव होतें. राष्ट्रकथामाला–आशीरिया–पृ० ३३० आर्यलोक–पहा.] ९. पांडवांतें.

क्षुद्र शकुनिदु:शासनकर्ण, यश क्षुद्रसंगरहितास, ।
कोणा होइल केला भूतबळें रुद्रसंगर हितास? ॥ ७९
सर्वसुहृत्तम कृष्ण प्रभु, यांची कास धरुनि सर्व तरे, ।
तूं किति? तरले याच्या नामें बहु सागरांत पर्वत रे! ॥ ८०
तुज पांडवजय दुर्घट, नारळ हरिजेल काय खर्वतरें? ।
कृष्णोक्तें सख्य करीं, याचि उपायें अनिष्ट सर्व तरें.' ॥ ८१
ऐसें मातृवचनही लंघुनि गेला उठोनि पुनरपि तो, ।
जो भव्य पावणारा सद्गुरुसद्वाक्सुधेसि सुनर पितो. ॥ ८२
जाउनि सुयोधन म्हणे दु:शासन कर्ण शकुनि यांपाशीं, ।
'आम्हीं हितशत्रूंच्या कळत पडावें न ठकुनियां पाशीं. ॥ ८३
जोंवरि आहों आम्हीं स्वाधीन न बद्ध जाहलों चववे, ।
कृष्णासचि बद्ध करूं, म्हणजे मेलेचि शत्रु ते अवघे.' ॥ ८४

---

१. शकुनि दु:शासन [आणि] कर्ण [हे] क्षुद्र (नीच, तुच्छ, पांडवांशीं तुलना पावण्यास अयोग्य) [आहेत]. [आणि] क्षुद्रसंगरहितास यश [सदा मिळतें] (ज्यानें नीचाचा समागम केला नाहीं, म्हणजे ज्यानें मोठ्यांचा संग केला आहे त्यालाच यशोलाभ होतो) भूतबळें (मसणांतील पिशाचें मिळवून त्यांच्या बळावर) रुद्रसंगर केला (रुद्राबरोबर संग्राम केला) [तर] [तो] कोणा हितास होईल? [तर तो हितकारक असा कोणाला होईल काय?—अर्थात् कोणासच हितप्रद होणार नाहीं.] संगर=संग्राम, युद्ध, लढाई. संगर हा शब्द पुल्लिंगी आहे. 'अथ प्रतिज्ञाजिसंविदापत्सुसंगरः' इत्यमरः. 'संगरो युधि चापदि । क्रियाकारे विषे चांगीकारे क्लीवं शमीफले' इति मेदिनी. रुद्र हा भूतांचा राजा होय म्हणून रुद्राला (शंकराला) 'भूतेश, भूतपति' असें नांव आहे. २. सर्वांचा उत्तम मित्र. ३. 'कास धरणें' ही 'लोकोक्ति' होय. जेथें लोकप्रवादाचें अनुकरण होतें तेथें 'लोकोक्ति' नामक अलंकार होतो. याचें लक्षण—'लोकप्रवादानुकृतिर्लोकोक्तिरिति भण्यते' [कुवलयानंद—१५५.] 'हे सखि! डोळे मिटून कांहीं महिने सहन कर' या वाक्यांत 'डोळे मिटून' हें प्रसिद्ध लोकवादाचें अनुकरण आहे म्हणून थांत 'लोकोक्ति' अलंकार आहे. ४. संसारसागर तरतो. ५. दुर्योधना! तूं काय क्षुद्र आहेस. मोठमोठे पर्वत याच्या नामस्मरणानें तरून गेले. ६. पांडव आणि कृष्ण अजेय होत, असें मूळांत आहे. [अ० १२९ श्लो० ३७.] ७. अति ठेंगण्यानें. नारळाचें झाड उंच वाढतें व नारळाला मोठ्या उंच मनुष्याचा सुद्धां हात पोंचत नाहीं ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. ८. कल्याण, सुख. ९. उत्तम गुरूच्या उत्तम वाणीरूप अमृताला. १०. उत्तम पुरुष. हें अर्ध उत्तम सुभाषित आहे. ११. अध्याय १३० श्लोक ४-९ पहा.

कर्णादि म्हणति, 'बांधूं यदुपा[1], सदुपाय हा बरा सुचला, ।
शीघ्र उठा, लीलेनें पांडुसुतांतें करूं पैरासु[2], चला.' ॥ ८५
ते[3] इंगितज्ञ[4] सात्यकि कृतवर्म्याला हळूच जाणवुनी, ।
प्रथम कुरुसभाद्वारीं सिद्ध करवुनि स्वसैन्य आणवुनी ॥ ८६
जाउनि सभेंत आधीं श्रीकृष्णाला कुमंत्र ऐकवी, ।
राजासि म्हणे मग भगवदनुमतें[6] सर्वसाधुराय[7] कवी, ॥ ८७
'अजि धृतराष्ट्र! प्रभुजी! मी सात्यकि! किमपि विनवितों, परिसा, ।
तुमच्या सुतें करावा बद्ध श्रीवासुदेव हा अरिसा? ॥ ८८
हा सांपडतो एका प्रेमा सुखकीर्तिच्या[8] घटकबंधा, ।
प्रेमरहिता सुदुर्जय[9] भगवंत, जसा महाभट[10] कबंधा[11]. ॥ ८९
हें काय? हो विदुरजी! परमप्रेमास्पदांगजातातें[12] ।
द्यावें अनुमोदन निजपरगृहदाहास जाणत्या[13] तातें[14]!' ॥ ९०
विदुर म्हणे, 'अद्यापि स्वस्थचि तूं, काय हें? अहा! तात! ।

---

१. कृष्णास. यांतील वर्णरचना अपूर्व होय. २. गतप्राण. ३. गीति ८६-८७ यांचें युग्मक आहे. जेव्हां दोन पद्यें अर्थासाठीं एकदम घेणें जरूर असते तेव्हां त्यांस 'युग्म' अथवा 'युग्मक' असें म्हणतात. ४. अभिप्राय जाणणारा. मूळांतही 'इंगितज्ञ' असेंच विशेषण योजिलें आहे. [अ० १३० श्लो० १०.] ५. हें पंतांचें आवडतें ठरींव यमक आहे. ६. श्रीकृष्णाच्या अनुमतानें. ७. हा समास चिंतनीय आहे. 'साधुराय' असा शब्द पंतांच्या काव्यांत अनेक स्थळीं दृष्टीस पडतो. ८. सुख आणि कीर्ति यांतें देणाऱ्या बंधनाला (प्रेमाला). ९. जिंकून घेण्यास अत्यंत अशक्य. १०. महा+भट=मोठा+योद्धा=महावीर. ११. मस्तकहीन शरीरा–धडा. १२. परम प्रेमाचें आस्पद (स्थान) जो अंगजात (पुत्र) त्यातें=परमप्रेमास्पद पुत्रातें. पित्याच्या अंगापासून झालेला जो तो अंगजात=पुत्र. या संबंधानें 'अंगादंगात्संभवसि हृदयादधिजायसे । आत्मा वै पुत्रनामासि स जीव शरदां शतम् ॥' असें वेदवचन आहे. हें जातकर्मसंस्कारसमयीं ब्राह्मण म्हणतात. पिता पुत्राला संबोधून म्हणतो, 'हे पुत्रा! माझ्या प्रत्येक अंगापासून तुझा संभव आहे, तूं हृदयापासून झालास, तूं माझें प्रतिबिंब आहेस, यास्तव शंभर वर्षें वांच'–असा या वचनाचा भावार्थ. १३. जाणत्या=हा शब्द येथें योजून पंतांनीं आपलें लोकव्यवहारनैपुण्य आणि मार्मिकत्व प्रकट केलें. एखादा भ्रांतचित्त पिता आपल्या मुलास पाहिजे तें अनुचित कार्य करण्याची परवानगी देईल व देतोही असें व्यवहारांत आढळतें, पण जाणत्या (दूरदर्शी, कार्याकार्यज्ञ) तातानें असें कसें करावें? १४. सुज्ञ धृतराष्ट्रानें.

राया! या **यदु**सिंहा त्वत्पुत्र धरावया पहातात. ॥ ९१
हा **याद**वसिंह प्रभु, धरितिल तव मत्तसुत[1] मतंगज[2] याँ,[3] ।
बा! दावपावकासीं[4] समर करुनि पावतिल पतंग[5] जया?' ॥ ९२
देव म्हणे, 'देवा![6] द्या आज्ञेसि, धरूत वीर हे मातें, ।
कीं मी धरीन यांतें, शोधिति दहनतां धीर हेमातें.[7] ॥ ९३
आतांचि धरुनि बांधुनि **पां**डवहस्तांत यांसि ओपीन; ।
जरि धर्मकृत्य[8] न घडे, भुज केले व्यर्थ काय हो! पीन[9]? ॥ ९४
हें साधुधर्मकृत्यहि राहो न तुम्हांपुढें, उचित मातें ।
जें प्रागल्भ्यप्रकटन वृद्धांत, नव्हे भलें शुचितमा[10] तें. ॥ ९५
निंदित कर्म कसें हो! करिन? कुलजवत्स[11] मीं, परा[12] ज्या जी ।
उचित प्रतिक्रिया, मग दावीन, भवत्समीप राजाजी! ॥ ९६
अन्याय मीं करीना, कर्तव्य करो सुखें **सु**योधन हो! ।

---

१. उन्मत्त पुत्र. २. हस्ती. [मतंगज=मतंग मुनीपासून जन्म पावलेला–असा या शब्दाचा विग्रह आढळतो.] ३. या [यादवसिंहाला] तव मत्त सुत मतंगज धरितील (काय?)=अर्थात् गज हे सिंहाचा पराभव करतील–अशी उलट गोष्ट कधींही व्हावयाची नाहीं, यावरून दुर्योधनादिकांला यादवश्रेष्ठ कृष्ण बद्ध करील असें सुचविलें. ४. दावानळाशीं. ५. शलभ. [द्रोणपर्व–अ० ३ गी० २४-१०६ आदिपर्व–अ० १९ गी० १२, गीता–अ० ११ श्लो० २९.] हे दावानलांत होरपळून भस्म होतील. [पतंग=सूर्य; (द्रोणपर्व–अ० २ गी० ६१) शलभ, टोळ.] ६. धृतराष्ट्रा! ७. धीर (सुज्ञ पुरुष) दहनांत (अग्नींत) हेमातें (सुवर्णातें) शोधिति (शुद्ध करतात, अस्सल सोनें अथवा हिणकस सोनें आहे याची परीक्षा सोनें आगींत घालून करतात. येथें शौर्यरूप सुवर्णाची परीक्षा दहनरूप समरांत होईलच–असें तात्पर्य.) सोन्याची परीक्षा अग्नींत घालून करतात ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. अग्निदाहानें उत्तमजातीय सुवर्णाची उज्वलतावृद्धि होते आणि अधमजातीय सुवर्णाची विवर्णतावृद्धि होते. 'हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा' [रघुवंश–स० १ श्लो० १०] असें **का**लिदासानें म्हटलें आहे. **पं**तांनींही असेंच वर्णन अन्यत्र केलें आहेः–'हीरातें जेंवि घनीं परीक्षितां अग्निमाजि हेमातें.' [स्वर्गारोहणपर्व–अ० १ गी० ५२.] ८. धर्माचें कृत्य, शास्त्रधर्मानुरूप आचार. येथें 'धर्म'शब्द कदाचित् श्लिष्ट असावा असा भास होण्याचा संभव आहे, परंतु तो श्लिष्ट नाहीं असें समजावें. ९. पुष्ट. १०. अत्यंत पवित्र अशा पुरुषाला. ११. मी सत्कुलोत्पन्नांचा मुलगा आहें. १२. ज्या परा (ज्या शत्रूला) जी प्रतिक्रिया (जो निवारणोपाय) उचित [आहे, ती] [हे धृतराष्ट्र] राजाजी! भवत्समीप (आपल्याजवळ) दावीन (दाखवीन).

व्यसु[1] हो, परंतु खोटा सभ्यजनाच्या मुखें, सुयोध[2] न हो.' ॥ ९७
धृतराष्ट्र म्हणे[3], 'विदुरा! मजपाशीं आण जाच पुनरपि त्या[4] ।
काय करूं? शूलाधिक दुःसहतर दुःखहेतु[5] कुनर पित्या[6].' ॥ ९८
ज्यासि[7] न साधु सहावे जेंवि पहावे[8] तुरंग न हल्याला[9], ।
त्यासि कवि पुन्हा आणी जो आग्रह मित्रबंधुसह त्याला. ॥ ९९

---

## अध्याय दहावा.

धृतराष्ट्र सुतासि म्हणे[10], 'रे कुरुकुलकीर्तिनाशका! कुष्ठा[11]! ।
इच्छिसि कृष्णप्रभुला बद्ध करायासि काय रे! दुष्टा!? ॥ १

---

१. वि+असु=विगत+प्राण=गतप्राण. २. सुयोध व्यसु हो (उत्तम वीर गतप्राण होवो, शूर वीराचा प्राण गेला तरी हरकत नाहीं.) परंतु सभ्यजनाच्या मुखें खोटा न हो (परंतु त्या सुयोधाला चांगल्या लोकांनीं 'खोटा' दुराचारसंपन्न, असें दूषण लावूं नये, परंतु सुयोधानें सभ्यजनांकडून 'खोटा' असें निंदाव्यंजक पद लावून घेऊं नये, दोषी होऊं नये.) ३. अध्याय १३० श्लोक ३० पहा. ४. त्या राज्यलुब्ध पापभूयिष्ठ व नृशंस अशा सुयोधनाला. [श्लो० ३३-३४.] ५. दुःखाला कारण. ६. बापाला. यांत कुनर आणि शूल यांची तुलना करून कुनराचें आधिक्य वर्णिलें आहे म्हणून हा 'अधिक' नामक अलंकार होय. येथें कुनरापासून (कुपुत्रापासून) होणाऱ्या दुःखाचें वर्णन पंतांनीं धृतराष्ट्रमुखें सुरेख केलें आहे. ७. ज्यासि (ज्या दुर्योधनाला) साधु (सज्जन) न सहावे (सहन होत नसत, ज्याला सज्जन पाहतांच कोपावेश चढे) जेंवि (ज्याप्रमाणें) हल्याला (रेड्याला) तुरंग न पहावे (घोडा पाहवत नाहीं) [रेडा घोड्याला पाहून बुजतो, गुरें बुजकट असतात, रेडा घोड्याला पाहून संताप पावतो, रानरेडे व घोडे यांचें वैर आहे, ह्या गोष्टी प्रसिद्ध आहेत.] जो (दुर्योधन) बंधुमित्रसह (दुःशासनादिक बंधु आणि कर्णादिक मित्र यांसह) आग्रह (दुराग्रह, हट्ट) त्याला (सेविता झाला) त्यासि (त्या दुर्योधनाला) कवि (विदुर) पुनः आणी. ८. 'पाह' धातूचा शक्यभेदीं प्रयोग 'पाहवे' असा करतात. पंतांनीं 'पहावे' 'सहावे' असे प्रयोग केले आहेत. ९. हल्या=हेला, रेडा, टोणगा. [हल्या=हल=नांगर, हली, हल्या=नांगर ओढणारा. टोणग्यास हल्या म्हणतात यावरून प्राचीनकाळीं शेतकी सुरू होण्याचे वेळेस टोणग्यास नांगरास लावीत असत असें दिसतें. नांगरास बैल लावण्याची चाल मागून पडली असावी. (व्युत्पत्तिप्रदीप–पृष्ठ ६७.)] १०. अध्याय १३० श्लोक ३६ पहा. ११. कुष्टरोगा! [येथें दुर्योधनाला 'कुष्ट' असें संबोधिलें आहे. कुष्टरोगानें शरीरकांतीची कशी दुर्दशा होते हें सुप्रसिद्धच आहे. त्याप्रमाणें दुर्योधन हा कुरुवंशाच्या कीर्तिकांतीची हानि करणारा कुष्टरोग होय.]

प्रेमाचि एक यातें बांधुनि बहु कीर्ति दे [1]यशोदेतें, ।
[2]अभिमत साधुनि देतें [3]सुकृत [4]कुकृत कीं अरे! [5]पशो! देतें? ॥ २
केवळ बाळचि इच्छी [6]विधुसि धरायासि? कां [7]बँरा इच्छी? ।
म्हणते [8]सभा तुज जसी [9]पिकरिपुकाकासि [10]आंबराइ 'छी.' ॥ ३
वाहसि शिरीं तयातें देतो जो [11]गर्वभार ताप सदा, ।
सुखकर [12]गुरुवरकरभर दुर्धर तुज [13]सर्वभारतापसदा!' ॥ ४
विदुर म्हणे, '[14]द्विविद कपिहि [15]नरकहि [16]ज्यांसि न धरावया शकला, ।
त्यासि कसा धरिसिल? जें [17]सकला [18]जड, तें घडे कसें [19]शकला? ॥ ५

---

१. कृष्णाची माता यशोदा हिनें कृष्णाला दांव्यानें उखळाशीं बांधून कीर्ति मिळविली, परंतु हें कृष्णाचें उखलबंधन प्रेममूलक होतें, दुर्योधनाचें कृष्णाला बांधणें हें द्वेषमूलक. २. इष्ट, वांच्छित. ३. पुण्य. ४. पाप, दुष्ट कृत्य. हें प्रश्नालंकाराचें उदाहरण असून यांत प्रश्नद्वारा 'सुकृत अभिमत साधुनि देतें' या उन्नत नीतीचें कथन केलें आहे. ५. 'पशो!' या संबोधनानें सुयोधनाच्या कोडगेपणाची आणि खलत्वाची परमावधि सूचविली आहे. सुयोधन हा उपदेशातीत आणि तिरस्कारार्ह होय, असें धृतराष्ट्राच्या म्हणण्याचें तात्पर्य. ६. चंद्रास. ७. शहाणा. ८. येथें 'आंबराइ' हें उपमान, 'सभा' हें उपमेय, 'जसी' हा उपमावाचक शब्द, 'छी म्हणते' हा साधारण धर्म अशा चाऱ्ही गोष्टी उपस्थित असल्यामुळें 'पूर्णोपमा' अलंकार झाला. ९. पिकाचा (कोकिलाचा) जो रिपु (शत्रु) काक (कावळा) त्याला. १०. आम्रराजी=आमराई. येथें सभा ही आमराई, दुर्योधन हा पिकरिपुकाक आणि पांडव हे पिक असें समजावें. ११. गर्वातिशय. १२. गुरूचा वर हाच कर (हस्त). १३. सर्व+भारत+अपसद=भरतकुलांतील सकल पुरुषांमध्यें नीचा! १४. द्विविद. (अ० १३० श्लो० ४१-४२.) हा सुषेणवानराचा कनिष्ठ पुत्र, मैंदवानराचा कनिष्ठ भ्राता, सुग्रीवाचा सचिव आणि अंगदाचा मातुल. हाच नरकासुराचा मित्र होय. नरकासुरास कृष्णानें मारिलें म्हणून हा दाशरथी रामभक्त असतांही कृष्णाचा आणि बलरामाचा द्वेषी झाला. आपल्या जिवलग मित्राचा वध करणाऱ्याचा सूड उगवावा म्हणून द्विविदानें रामकृष्णांशीं वैरभाव केला. बलराम रैवतकपर्वतीं स्त्रियांसहित स्वैर कंदर्पक्रीडा करीत असतां यानें त्यास पुष्कळ उपद्रव दिला. तेव्हां दोघांचें युद्ध होऊन त्यांत द्विविद मरण पावला. मोरोपंतकृत बृहद्दशमाच्या सप्तषष्टीतम अध्यायांत द्विविदवधाख्यान आहे. १५. नरक. (अ० १३० श्लो० ४३-४४.) १६. ज्या कृष्णाला. १७. पूर्णास. १८. करण्यास, साधण्यास अशक्य, कठिण. हा चवथा चरण सुभाषितरूप आहे. १९. तुकड्याला. जें (कृत्य) सकला (संपूर्ण भागाला) जड (अवघड, अशक्य) तें शकला (तुकड्याला, अंशाला, अपूर्ण भागाला) कसें घडे? (कसें घडणार? जें कृष्णबंधनरूप कृत्य आम्हां सकल कौरवांस अशक्य आहे तें एकट्या सुयोधनाच्या हातून कसें घडणार?)

या धरिति न षष्टिमितें[1] निर्मोचनवासि[2] दानवेयशतें[3], ।
मीं काय एकमुख[4]? दशशतवदनासहि[5] न वानवे यश[6] तें. ॥ ६
पाठविले यन्नामें[7] अरिहि करुनि मुक्त पूत[8] नाकाला[9], ।
बद्ध कसें करिसिल या खलकेश्यघकंसपूतनाकाला[10]? ॥ ७
बांधावया पहासी जरि या मधुकैठभांतकालाही[11], ।
तरि बांधावा भेकें[12] चक्षुर्हण[13] जागरूक[14] कालाही[15].' ॥ ८
देव म्हणे[16], 'रे! मंदा[17]! एकाकी[18] वासुदेव हा काय? ।

---

१. षष्टिमितें दानवेयशतें=साठ शंभर=सहा हजार महासुर. २. निर्मोचनसंज्ञक क्षेत्रीं रहाणारीं. (अ० १३० श्लो० ४५ टीका.) ३. दानवेय+शतें=दानव+शंभर=दैत्यशतें. निर्मोचन नामक नगरांत सहा हजार असुर हातांत पाश घेऊन कृष्णास बांधण्यास आले होते, परंतु त्या कामीं त्यांस यश आलें नाहीं, ते त्यास बांधण्यास असमर्थ झाले. ४. मी (विदुर) एकमुख [तें यश] काय [वानूं?]=मजसारख्या एकमुख्यानें कृष्णाच्या यशाचें स्तवन कसें होणार? तें करण्यास मीं सर्वथैव असमर्थ आहें. ५. दशशत (हजार) वदनें (मुखें) आहेत ज्यास त्या शेषासही. ६. तें यश=तें कृष्णाचें सर्वत्र सुप्रख्यात यश. ७. ज्याच्या नांवानें, ज्याच्या नामस्मरणानें. [जे दुष्ट भगवन्नामस्मरण करतात त्यांस मुक्ति मिळते अशी समजूत आहे तिला अनुसरून हें वर्णन आहे. पंतांच्या **'नामसुधाचषक'** (मोरोपंतकृत स्फुटकाव्यें–पृ० ३११-३२४) नामक काव्यांत नाममहिमा सुरस वर्णिला आहे. **पंडितांनींही** स्वप्रणीत **'नामसुधा'** नामक काव्यांत भगवन्नामगौरव वर्णिलें आहे. **वाम**-नकृत कवितासंग्रह–भाग पहिला–नामसुधा–पृ० १८८-२४५ पहा.] ८. पवित्र. ९. स्वर्गाला. १०. खल+केशि+अघ+कंस+पूतना+काला=दुष्ट+केशिदैत्य+अघासुर+कंसासुर+बकी+यमाला=दुष्ट जे केशि इत्यादि दैत्य त्यांचा काल जो श्रीकृष्ण त्याला. ११. मधु व कैटभ या दैत्यांचा अंतक (नाशक) जो श्रीकृष्ण त्याला. १२. भेक=बेडुक. १३. दृष्टीनें मारणारा. (ज्याच्या नेत्रांत विष असल्यामुळें जो विषाच्या दर्पानें घात करणारा अशा सापाला.) १४. जागा, सदा सावधान असा. १५. काल+अहि=कृष्णसर्प, कालसर्प. मधुकैटभान्तक कृष्णाला दुर्योधनानें बांधूं पाहणें हें कृत्य भेकानें कालसर्पाला (आपल्या शत्रूला, भेकभक्षक सापाला) बांधूं पाहण्यासारखें असंभाव्य होय–असें सांगण्याचें तात्पर्य. कृष्णाला बांधणें म्हणजे बचकेंत पाणी धरणें, अथवा धोंड्याचा दोर काढणें होय. सर्प हे भेकभक्षक होत ही गोष्ट येथें विसरतां कामा नये. या मंडुकाशनवृत्तीवरून सापाला 'भेकभुज्' म्हणजे 'बेडुक खाणारा' अशी संज्ञा आहे. येथें 'चक्षुर्हण' आणि 'जागरूक' हीं विशेषणें योजून कालसर्पाचें उग्रत्व आणि दक्षत्व व्यक्त करून त्याच्या योगानें कालसर्पबंधन अत्यंत अशक्य असें सूचविलें आहे. १६. अध्याय १३१ श्लोक २-३ पहा. १७. मूर्खा! दुर्यो-

इच्छिसि बद्ध कराया, तरि आधीं नीट तूं पहा [1]काय.' ॥ ९
ऐसें वदोनि उघडुनि दावी, [2]निजविश्वरूपता पावे, ।
कीं पाहोनि निवावे साधु [3]सकल दुष्ट भूप तापावे. ॥ १०
तेजोमय प्रकटले प्रभुच्या [4]ब्रह्मांडकोटिगेहांत ।
[5]ब्रह्मादिदेव यादव पांडव [6]अंगुष्ठमात्र देहांत. ॥ ११
दे [7]हर्ष [8]विश्वरूपप्रभुभास्कर [9]सुजननयननलिनांतें, ।
बहु ताप दे स्वतेजें [10]खलघूकांतें [11]स्वभावमलिनांतें. ॥ १२
भीष्म द्रोण विदुर कवि संजय निर्मल तपःपर महर्षी ।
हे [12]दिव्यदृष्टि देउनि केले [13]करुणाकरें परम हर्षी. ॥ १३
देवांनीं वाजविलीं वाद्यें तेव्हां सुखें [14]अवधिरहितें, ।
होय मुहूर्तभरि भुवन बधिरचि [15]सत्कविमुखें [16]अवधिरहि तें. ॥ १४
बहु पुष्पवृष्टि होय, ब्रह्मांडींही न [17]माय [18]परिमळ तो, ।

---

धना! १८. एकटा, असहाय. ['एकाकी त्वेक एककः' इत्यमरः । 'एकादाकिनिच्चासहाये' १९९८;५।३।५२ या सूत्रानें एकाकी हा शब्द झाला आहे.]

१. देह. २. आपलें विश्वस्वरूपपण. [गीता–अध्याय १२ पहा. यांत भगवंतांनीं अर्जुनाला आपलें विश्वरूप (विराटस्वरूप) दाखविलें आहे.] ३. येथें 'सकल' हा शब्द देहलीदीपन्यायानें 'साधु' आणि 'दुष्ट' यांजकडे सारखाच लावतां येतो. अशी विशेषणाची योजना जेथें असतें तेथें 'विशेषणदीपक' अलंकार होतो असें म्हटलें असतां चालण्यासारखें आहे. 'सकल' या विशेषणाचा अन्वय उभय शब्दांशीं समान आहे. पंतांनीं विशेषणांची योजना अशा प्रकारानें अन्यत्रही केली आहे. 'सकल साधु निवावे' आणि 'सकल दुष्ट तापावे' असा अन्वय इष्ट आहे. ४. अनंत कोटि ब्रह्मांडांचें गृह त्यांत (देहांत). ५. ब्रह्मदेव, आदित्य, वसु, रुद्र, मरुद्गण, विश्वेदेव इत्यादि. ६. आंगठ्याएवढें. ७. हें रूपकालंकाराचें सुरेख उदाहरण आहे. ८. विश्वरूपी ईश्वर हाच कोणी भास्कर (सूर्य). ९. सज्जनाचीं नेत्रें हींच कमळें त्यांतें. सूर्य कमळांला हर्षवितो, सूर्यकिरणांच्या योगें कमळें विकसित होतात. मुख विकसित होणें हें आनंदाभिव्यंजक आहे त्याचप्रमाणें कमल विकसित होणेंही आहे. हे संकेत ध्यानांत असले म्हणजे या गीतीचा अर्थ सहज कळणारा आहे. १०. दुष्टशत्रुरूप घुबडांतें. ११. स्वभावेंकरून पातकी. १२. दिव्यचक्षु. (अ० १३१ श्लो० १५.) १३. करुणा+आकरें=दया+खनिनें=दयेची खाण जो कृष्ण त्यानें. [ज्यांला दिव्यदृष्टि मिळाली नाहीं ते नेत्र मिटून स्तब्ध बसले होते.] १४. बहुत, असंख्य. १५. सत्कवींच्या मुखानें. १६. बधिर नसणारेंही (भुवन). १७. मावे. १८. सुवास (पुष्पवर्षाचा). ही अतिशयोक्ति आहे.

या[1] प्रभुयशें नुरावा तिळहि खळांचा, उरेचि परि, मळ तो. ॥ १५
धृ[2]तराष्ट्र म्हणे, 'प्रभुजी! संसारीं हा कृ[3]तार्थ हो, पाहो[4], ।
या जात्यंधासि[5] तुम्हीं डोळसपण पळभरीच ओपा[6] हो! ॥ १६
त्या वृद्धा जात्यंधा राजाला विश्वरूप दावाया ।
अ[7]द्भुतचातुर्याच्या निधिला विधिलाहि लाज लावाया[8], ॥ १७
य[9]त्प्राप्त्यर्थ श्रीमद्द[10]स्रशिरहि गुरुपदीं सदा लवतें, ।
रविचेंहि दृ[11]गघभंजन अंजन कं[12]जनयनें दिलें लव[13] तें. ॥ १८

---

१. या प्रभुयशें (कृष्णानें विश्वस्वरूप प्रकट केलें यामुळें झालेल्या यशानें—या श्रेष्ठ अशा यशाच्या योगानें) खळांचा तिळहि मळ नुरावा (दुर्योधनादिकांची मलबुद्धि (पापमति, पापवासना) किंचित्‌ही राहूं नये, पापबुद्धि हीच मळरूप होय.) परि तो (मळ) उरेचि (परंतु तो पापवासनारूप दोष नष्ट झाला नाहीं. विश्वस्वरूपदर्शनानें दुर्योधनादिकांच्या मनावर कांहीं चांगला परिणाम घडला नाहीं. शुभ्र यशानें दुर्गतिरूप (काळा) मळ नष्ट झाला पाहिजे, पण तसें झालें नाहीं. येथें 'अतद्गुण' नामक अलंकार झाला आहे. दोन पदार्थांचा संबंध घडला असतांही एकाचा गुण दुसऱ्यास लागत नाहीं तेथें 'अतद्गुण' अलंकार होतो. आपणाशीं संयुक्त अशा वस्तूचा गुण जेव्हां एखादा पदार्थ घेत नाहीं तेव्हां अतद्गुण हा अलंकार होतो. ज्याचा संबंध झाला त्याचा गुणाचा स्वीकार झाला नाहीं म्हणजे हा अलंकार झाला असें जाणावें. 'हे प्रिया! माझ्या प्रेमयुक्त चित्तांत तुला पुष्कळ वेळ ठेविलें परंतु तूं प्रेमपूर्ण झालास नाहींस' यांत प्रेमाचा स्वीकार झाला नाहीं म्हणून अतद्गुण. प्रभुयशाचा संबंध जडला असतांही त्याच्या गुणाचा स्वीकार दुष्टांच्या मलानें केला नाहीं म्हणून अतद्गुण. याचें अन्य उदाहरणः—'पंकांत पद्म न मळे; काकांच्या दुर्गुणा शिके न पिक; । चंदन परगंध न घे; होय तृणामाजि तृणचि काय पिक? ॥' [कर्णपर्व—अ० २९ गी० ४८.] जेथें संबंध पुष्कळ जडला असून एकाचा गुण दुसऱ्यानें घेतला असें वर्णन असतें तेथें 'तद्गुण' अलंकार होतो.) २. धृतराष्ट्र. ३. कृतकृत्य, सफलमनोरथ. ४. तुमचें विश्वस्वरूप अवलोको. ५. जन्मांधाला. धृतराष्ट्र हा जन्मतःच अंध होता. ['मान्य करूनि मुनि गेला; अंधचि सुत अंबिकेसि मग झाला । धृतराष्ट्र असें भीष्में संस्कारुनि नाम ठेविलें त्याला. ॥' मोरोपंत—आदिपर्व—अ० १५ गी० ४४ पृ० ९४.] विश्वरूपदिदृक्षेनें धृतराष्ट्रानें कृष्णापाशीं दिव्यचक्षु मागून घेतले. ६. अर्पण करा. ७. अद्भुत चातुर्याचा निधि जो प्रजापति त्याला. ८. या अर्धांत 'ल' या व्यंजनाची पुनः पुनः आवृत्ति झाल्यामुळें 'वृत्त्यनुप्रास' अलंकार. गीति १७-१८ या 'युग्मा'चें उदाहरण आहे. ९. ज्या अंजनाच्या प्राप्तीकरितां. १०. अश्विनीकुमारांचें शिर. ११. दृश्‌+अघ+भंजन=दृष्टि+पाप+नाशक=दृग्दोषनिवारक. १२. कमलनेत्र कृष्णानें. १३. लेशमात्र.

[1]अंधत्व अंधकूपचि, त्यांतुनि होऊनि दिव्यचक्षु निघे, ।
[2]प्रज्ञाचक्षु क्षणभरि बहु सुख तें विश्वरूप लक्षुनि घे. ॥ १९
'[3]वृद्धा! [4]अगस्त्य हो, हा [5]मन्महिमामृतसमुद्र आटो, पी;' ।
ऐसें मनीं म्हणोनि प्रभुवर तें विश्वरूप आटोपी. ॥ २०
न [6]वळे [7]गतायुजन, तें उत्तमचि जसें सुवैद्य [8]मानुनि घे, ।
सात्यकिकर धरुनि तसें तेथुनि [9]यदुवंशपद्मभानु निघे. ॥ २१
[10]ज्ञानेंचि जना हो, न प्राप्त वयें केवळ, [11]स्थविरता हो, ।

---

१. अंधत्व (आंधळेपणा) [हा] अंधकूपचि (अंधकारानें व्यापिलेला कूप–खळगा अंधकारयुक्त म्हणजे तोंड बंद केलेली विहीर होय. अंधत्व आणि अंधकूप यांत अभेद कल्पिला आहे म्हणून हा रूपकालंकार होय.) त्यांतुनि (त्या अंधकूपांतून धृतराष्ट्र) दिव्यचक्षु होऊनि निघे (ईश्वराचें विश्वरूप पाहण्यास समर्थ अशा दृष्टीनें युक्त होत्साता बाहेर पडला.) २. प्रज्ञा (बुद्धि) हीच चक्षु (नेत्र) ज्यास तो धृतराष्ट्र. ३. हे वृद्धा! (धृतराष्ट्रा!) तूं अगस्त्य हो. ४. [हे] वृद्धा! (हे धृतराष्ट्रा!) अगस्त्य हो (अगस्त्यमुनीप्रमाणें आचरण कर. अगस्त्यानें जसें सागराचें पान करून त्यास आटविलें तसें तूं कर). हा मन्महिमामृत समुद्र (माझा महिमा हाच अमृतसागर, माझा विराटस्वरूपप्रकाशनरूप अमृतसागर) आटो (शुष्क होवो, सुकून जावो) पी (या सागराचें तूं अशेष प्राशन कर). ५. माझा महिमा हाच अमृतसागर. ६. गतायुजन न वळे–तें जसें सुवैद्य उत्तमचि मानुनि घे, तसें [मानून घेऊन] तेथुनि सात्यकिकर धरुनि यदुवंशपद्मभानु निघे–असा अन्वय. ज्याचें आयुष्य संपलें आहे असा मनुष्य औषध घेण्यास जर न वळला तर चांगलेंच झालें असें सुवैद्य मानून घेतो (समजतो), कारण अशा मनुष्याला औषध देण्यापासून यश यावयाचें नसतें. असा मनुष्य औषध न घेईल तर वैद्याला आनंदच वाटतो. त्याप्रमाणें आसन्नमरण दुर्योधन आपलें उपदेशरूप औषध घेण्यास वळला नाहीं हें चांगलेंच झालें असें मानून श्रीकृष्ण सात्यकीचा हात धरून कुरुसभेंतून निघून आला. [अध्याय १३१ श्लो० २४.] या समयीं सधूम पावकाप्रमाणें श्रीकृष्ण चालता झाला असें वर्णन मूळांत आहे. ७. मरणोन्मुख. ८. मानुनि घे=मानितो. ९. यदुकुलरूप कमळाला सूर्य. १०. जना स्थविरता ज्ञानेंचि प्राप्त हो, केवळ वयें [स्थविरता प्राप्त] न हो=मनुष्याला वृद्धत्व जें प्राप्त होतें तें ज्ञानानेंच होतें, केवळ वयानें वृद्धत्व प्राप्त होतें असें नाहीं. अहो! जरि बुद्धिवृद्ध असता [तरि] जैसा जळस्थ भेंडा [विरतो तसा] विरता–अहो श्रोते हो! धृतराष्ट्र जर बुद्धिवृद्ध असता तर मातीचा गोळा पाण्यांत टाकिला असतां जसा विरघळून जातो तसा कृष्णोपदेशानें विरघळून गेला असता. 'तो ढेंकुळासारखा विरघळला; हें भाषण ऐकून तो गृहस्थ पाण्यांत मातीचें ढेंकूळ विरून जावें त्याप्रमाणें विरघळून गेला'–असा बोलण्याचा संप्रदाय आहे हें येथें लक्षांत वागविलें पाहिजे. वृद्धांत प्रकार तीन–तपोवृद्ध, वयोवृद्ध आणि ज्ञानवृद्ध. पंतांनीं आणखी एक प्रकार कल्पिला आहे तो बुद्धिवृद्ध. जो बुद्धिवृद्ध असेल तो

जरि बुद्धिवृद्ध असता, जैसा भेंडा जळस्थ विरता हो! ॥ २२
जाऊनि सभाद्वारापावेतों प्रभुवरासि पावाया, ।
अंध म्हणे[2], 'प्रभुजी! हा[3] स्पष्ट अनीश्वर म्हणोनि पावा[4] या. ॥ २३
दुर्मति दुराग्रही सुत आटोपायासि अंध अक्षम[5] हा, ।
जो जो यत्न करावा तो केला म्यां तुम्हांसमक्ष महा.' ॥ २४
प्रभु मुरडोनि म्हणे, 'हो! जन हो! जो परमअहितकर[6] अरिसा ।
त्या सुतशिक्षेविषयीं[7] म्हणती, आपण अनीश[8], हें परिसा. ॥ २५
अजि बाह्लिक[9]! अजि भीष्म! द्रोण! विदुर! हें तुम्हांसि कळलें कीं? ।
हे धृतराष्ट्र अनीश्वर, यांचें चाले न लेश बळ लेंकीं. ॥ २६
आलां बहु दूर, रहा, येतों धृतराष्ट्रजी! पुरे, परता, ।
कथितों धर्मासि असें कीं,–यश दिधलें तुम्हीं भलें भरता[10].'–॥ २७
बोलेल कृपणवचन[11] स्वमुखें कां? काय देव[12] कीनाश[13]? ।
कीं भक्तकीर्तिनाश न साहे, साहेल देवकीनाश[14]. ॥ २८

---

कालक्रमेंकरून ज्ञानवृद्ध होईलच, पण ज्यास बुद्धिच नाहीं त्यास ज्ञान प्राप्त होण्याची आशा नाहीं, हें उघड आहे. बुद्धिवृद्ध म्हणजे ज्ञानवृद्ध असेंही समजलें तरी चालेल. ११. वृद्धत्व.

१. अध्याय १३१ श्लो० ३१-३५ पहा. २. मी. ३. असमर्थ. ४. प्रसन्न व्हा. ५. असमर्थ. ६. अकल्याण करणारा. ७. त्या सुतशिक्षेविषयीं=त्या सुताच्या (पुत्राच्या, दुर्योधनाच्या) शिक्षेविषयीं (शासनाविषयीं, पारिपत्याविषयीं, शिकवणुकीविषयीं). येथें 'सुतशिक्षा' हें समस्त पद योजिलें आहे, परंतु तें अग्राह्य समजलें पाहिजे. 'त्या सुताच्या शिक्षेविषयीं' असें असमस्त आणि विभक्तियुक्त 'सुत' हें पद पाहिजे होतें. येथें 'त्या' हें पद 'सुता'चें विशेषण आहे, 'शिक्षे'चें नाहीं. ८. असमर्थ. (मूळांतही 'अनीश' शब्दच योजिला आहे. श्लो० ३८.) ९. भीष्माचा चुलता. १०. संततीनें सदाचारास आणि नीतीस धरून वर्तन करणें म्हणजे पूर्वजांस यश देणें होय. एखाद्या कुळांत अनीतिवर्ती पुरुष उत्पन्न झाले तर त्यांच्या पापाचरणाचें अपेश त्यांच्या पूर्वजांच्या माथीं येतें. कृष्ण व्याजोक्तिपूर्वक म्हणतोः–[हे धृतराष्ट्रजी!] तुम्ही भरता भलें यश दिलें=वडिलांचा लौकिक चांगला केलात, ज्या पूर्वजांच्या नांवावरून तुम्हाला 'भारत' असें म्हणतात त्या भरताच्या नांवाचा चांगला बोज ठेविलात–अर्थात् त्याच्या धवल आणि उज्ज्वल कीर्तीस काळिमा लाविला–असें म्हणण्याचें तात्पर्य. ११. दुर्बळासारखें वचन, क्षुद्रजनासारखें भाषण. १२. हें पंताचें आवडतें ठरींव यमक आहे. [द्रोणपर्व–अ० ९ गी० ३४.] १३. यम. १४. देवकीचा नाश.

स्वरथीं चढोनि भगवान् मग जाय पुसावयासि आतेला, ।
तेंचि वदूं, कोण रसिक गोघृत सोडुनि करील आ तेला? ॥ २९
सांगे सुयोधनाचें मत संक्षेपें यदूद्वह सतीतें, ।

---

१. श्रीकृष्ण. २. पुसणें—प्रयाणसमयीं निरोप घेणें. ३. कुंतीला. आत—पित्याची स्वसा. (अ० १३१ श्लो० ४१.) ४. गाईचें तूप. ५. आ करणें—आ पसरणें, [पान करण्यासाठीं] तोंड उघडणें. ६. 'आ' हा शब्द आणि त्याच्या पाठोपाठ लगेच येणारा तेलातुपाचा दृष्टांत हें पंतांचें आवडतें युग्म दिसतें. त्याचा उपयोग पंतांनीं अनेक स्थळीं केला आहे:—(१) आम्हांहुनि तूंचि अधिक घृत सोडुनि कोण करिल आ तेला? । [उद्योगपर्व—अ० ६ गी० ३५], (२) त्यजुनि हित, अहित घे तो, खल करितो वमुनि आज्य आ तेला [द्रोणपर्व—अ० १ गी० ३९]. या पद्यांतील तेलातुपाचा दाखला हा प्रसंगास अगदीं अप्रयोजक होय, असा 'निबंधमाला'कारांचा आक्षेप आहे. निबंधमालाकार लिहितात:—'काव्याचा उद्देश मनोरंजन असल्यामुळें व जे विषय नेहमींच्या व्यवहारांतले व अत्यंत परिचित त्यांच्यापासून वरील उद्देश साध्य होत नसल्यामुळें, त्यांचे वाचक शब्द व त्यांचे दृष्टांत हे मनास आल्हाद देत नाहींत, उलटें असें सुद्धां होतें कीं एखादें पद्य सुंदर साधलें असून त्यांत मोठा प्रौढ अर्थ संग्रहीत केलेला असतो, पण वरच्या प्रकारच्या एका शब्दानें किंवा दाखल्यानें दुधांत मिठाचा खडा टाकल्याप्रमाणें होऊन जातें.' (निबंधमाला—अंक ६३ पृष्ठ १४.) असा या पद्यावर आक्षेप आहे व त्याचें निरसन वे० शा० सं० गणेश शास्त्री लेले, त्र्यंबककर, यांनीं येणेंप्रमाणें केलें आहे:—'मोरोपंताच्या कवितेवर मुख्यत्वें ग्राम्यत्वाचा दोष दिला. परंतु ग्राम्य म्हणजे नांगरहांके वगैरे हलके लोक यांच्याच मात्र भाषणांत येणारे जे शब्द, त्यांचा प्रयोग केला असतां हा दोष होतो. पण तसें मोरोपंताच्या कवितेंत आढळत नाहीं. त्या कवितेंत ज्या शब्दांचा प्रयोग केला आहे ते शब्द सभ्यांच्याहीं भाषणांत येणारे असे आढळतात, म्हणून तो ग्राम्यत्वरूप दोष आहे असें म्हणतां येत नाहीं. तसेंच सभ्य लोकांच्या व्यवहारांत येणाऱ्या गोष्टी दृष्टांतत्वेंकरून सांगितल्या असतां तोही ग्राम्यत्वरूप दोष नव्हे. तर उलटा अर्थसौलभ्यरूपानें गुणच होय असें म्हणण्यास बाध दिसत नाहीं. तुम्हीं (निबंधमालाकारांनीं) ग्राम्यत्व दोषाच्या उदाहरणार्थ सात आर्या लिहिल्या त्यांतील पहिलीच 'तूं जेंवि देवकीला' [उद्योगपर्व—अ० ६ गी० ३५] इत्यादि आर्या आहे. या आर्येंत आतेला या तीन अक्षरांचें यमक साधलें आहे. येथील आ हा शब्द आणि तेलातुपाचा दृष्टांत हे दोन्ही ग्राम्यजनैकव्यवहार्य (हलक्या लोकांच्या मात्र व्यवहारांत येणारे) नसल्यामुळें यांस ग्राम्य असें म्हणवत नाहीं. (निबंधमाला—अंक ७० पृष्ठें २५-२६.) ६. हें असंभवपूर्वक प्रश्नालंकाराचें उदाहरण आहे. तसेंच हें सुभाषितरूप आहे. ७. अध्याय १३२ श्लो० २-४ पहा. ८. यदु+उद्वह=यदुकुल+पुत्र=श्रीकृष्ण.

धर्मासि निरोप पुसे सुतमार्दव आठवूनि हँसतीतें. ॥ ३०
कुंती म्हणे, 'वद असें त्या मत्तनयासि कमलनयना! कीं ।
परिसोत पूर्वज तुझा प्रेमें सुरगीत अमल नय नाकीं. ॥ ३१
वाटे सुभटें पुत्रें मेळविला विप्रसेवनीं नव टं, ।

---

१. धर्मराजाला काय निरोप सांगावयाचा आहे तो बोल असें कुंतीला पुसे. २. पुत्राचें कोमलत्व. ३. यांत 'स्मरणालंकार' झाला आहे. स्मारक पदार्थ पाहून पूर्वानुभूत पदार्थांची स्मृति झाली म्हणजे **'स्मरणालंकार'** समजावा. यांत 'स्मरणें' धातूचा किंवा तदर्थक धातूचा प्रयोग अवश्य असतो. याचीं उदाहरणें:—(१) अलिपुंज देखतां मज सीतेचे केश लक्ष्मणा! **स्मरती**; । तत्कबरीसम हे शिखि पिच्छकलाप स्वमानसीं भरती. ॥ (मंत्ररामायण–किष्किंधाकांड–गीति ४), (२) बहु रक्त दिसे, खेळुनि होय जसा काय वा! गुलालातें; । पळतां कर्ण **स्मरलें** भिडनि पळे पोर बागुलाला तें. ॥ [द्रोणपर्व–अध्याय १२ गीति ८३), (३) अरिहरिपासुनि सुटतां करि करि भूपति पलायन त्वरित, । **स्मरलें** सुरांसि तेव्हां कालयवनभीत शौरिचें चरित. ॥ (कर्णपर्व–अध्याय ३१ गी० ४३), (४) पार्थाचा धैर्य न दे रिपुदमनीं त्या तदा शर थिराया; । तेव्हां मज **आठवला** वालिवधख्यात दाशरथिराया. ॥ (कर्णपर्व–अध्याय ३६ गीति ४५), (५) मातें कमल म्हणालें विलोकितां **स्मरति** युवतिच्या सुभुजा । प्रणयक्रोधें मजला बद्ध करायासि सर्वथा विभु जा. ॥ [मंत्ररामायण–किष्किंधाकांड–गीति ३.] (६) धांवति अन्योन्यावरि ते दोघे **आठवूनि** अपकार । जाणों ते मदमत्त क्रोधोद्धत दंपतींच अपकार. ॥ [कर्णपर्व–अ० ४५ गी० २], (७) दिव्यमणिकनकखचित द्युमणिप्रभ तें किरीट रागानें । भस्म क्षणांत केलें **आठवुनी** पूर्व वैर नागानें. ॥ [कर्णपर्व–अध्याय ४७ गीति ४८.] ४. हसणारी जी कुंती तिला. ही वाक्यरचना शुद्ध संस्कृतपद्धतीस अनुसरून केलेली आहे. अशीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत अनेक आढळतात. [निबंधमाला–अंक १० पृष्ठें १५-१६.] ५. अध्याय १३२ श्लोक ५-३४ व अध्याय १३३-१३७ पहा. ६. माझ्या पुत्रास, धर्मराजाला. ७. हे राजीवलोचना श्रीकृष्णा! ८. सुरांनीं (देवांनीं) गीत (स्तुत)=देवांनीं स्तविलेला असा, तुझा अमल (निर्मल, निष्कलंक) नय (न्यायाचार, सदाचार) नाकीं (स्वर्गीं) प्रेमें पूर्वज (वाडवडील) परिसोत (ऐकोत). या गीत्यर्थावरून कुंतीला धर्मराजाची शांति आणि क्षमापरता पसंत वाटत नव्हती असें होतें. युधिष्ठिरानें पृथ्वीपालनरूप धर्माचा त्याग करूं नये, ब्रह्मदेवानें क्षत्रियांस जो धर्म सांगितला आहे त्याचा अवलंब करावा. दंडनीतिद्वारा प्रजांचें पालन करावें, कालास कारण राजा आहे असें समजून बाहुवीर्यानें उपजीविका करावी, पितृपैतामहोचित जे राजधर्म आहेत त्यांचें रक्षण करावें, धर्माचें आचरण क्षत्रियधर्मसंमत नाहीं–इत्यादि प्रकार कुंतीनें सूचविला आहे. ९. वाटे (मला–कुंतीला असें वाटतें कीं) सुभटें पुत्रें (वीरपुरुष जो युधिष्ठिर त्यानें, उत्तम भट योद्धा जो पुत्र त्यानें) विप्रसेवनीं (अरण्यांत ब्राह्मणसेवा करून त्याच्या योगानें) नव (नूतन, पूर्वजांनीं

वर्षोष्णसह[1] जटिल वर, तरि काय बहुत तसे वनीं न वट[2]? ॥ ३२
वर्णिति[3] रिपूंत समरीं दाखवितां बाहुबळ जनां भाट, ।
ब्रह्मा[4] नामीं दुसरा[5] योग्य क्षत्रा न जलजनाभा[6]! ट. ॥ ३३
जें सिंधुराजविजितस्वसुतातें[7] बोलिली सती विदुला[8], ।

संपादन केलेला नव्हे असा) ट (ट हें अक्षर) मेळविला (संपादित केला), प्रथम जो सुभट होता, तो आतां सुभट्ट बनला. धर्मराज जो सुभट (शूर क्षत्रिय) होता तो आतां सुभट्ट (उत्तम विप्र, ब्राह्मण) झाला. धर्मराजानें क्षत्रियगुण सोडून देऊन विप्राचे क्षमा तितिक्षा इत्यादि गुण आदरले. कौरवांनीं दिलेला त्रास, प्रतीकार न करतां, निमुटपणानें सोसणें हें साधुपण समजावयाचें नाहीं अशा उद्देशानें कुंती आणखी म्हणते:—(उत्तरार्ध)–[जर] वर्षोष्णसह जटिल वर [समजावयाचा] तरि तसे वनीं बहुत वट न काय?–असा अन्वय. पर्जन्य आणि उष्ण सहन करणाऱ्या जटाधारी (जनाला) जर वर (श्रेष्ठ) असें समजणें योग्य होईल तर (पर्जन्य आणि उष्ण सहन करणारे व जटाधारी असे वटवृक्ष अरण्यांत पुष्कळ नाहींत काय? त्या वृक्षांसही साधु अथवा (तपस्विश्रेष्ठ) म्हणणें उचित होणार नाहीं काय? १०. सुभट होता तो सुभट्ट झाला काय?=क्षत्रिय होता तो विप्र झाला काय? सुभट=उत्तम वीर; सुभट्ट=उत्तम विप्र.

१. पर्जन्य उष्ण सहन करणारे तापसश्रेष्ठ. २. वडाचे वृक्ष. ३. समरीं रिपूंत बाहुबळ दाखवितां जना (शूर वीरांला) भाट (स्तुतिपाठक) वर्णिति. [हे] जलजनाभा! (कृष्णा!) दुसरा ट (भट्ट या शब्दांतील दुसरा ट, ज्याच्या योगें भट शब्द भट्ट झाला तो ट) ब्रह्मा नामीं योग्य (ब्राह्मणाला नांवांत चांगला शोभतो), क्षत्रा योग्य न (क्षत्रियांस शोभत नाहीं). कुंती म्हणते:—माझ्या उत्तम भट (शूर) पुत्रानें ब्राह्मणसेवा करून नूतन ट मिळविला आहे असें वाटतें, म्हणजे तो सुभट होता तो आतां सुभट्ट झाला असें वाटतें. पाऊस आणि ऊन सहन करणारे जटाधारी असले म्हणजे तेवढ्यासाठींच जर त्यांस श्रेष्ठ म्हणावयाचें तर वर्षोष्ण सहन करणारे व जटाधारी असंख्यात वड काय अरण्यांत थोडे आहेत? पण ते श्रेष्ठ नव्हेत, कारण पुण्यतपस्याच पाहिजे तर श्रेष्ठत्व मिळतें, अन्यथा तें अप्राप्य आहे. तसें ब्राह्मणसेवा केली म्हणजे झालें असें नाहीं. श्रेष्ठत्व पाहिजे असेल तर क्षत्रियानें युद्धांत भुजपराक्रम दाखविला पाहिजे आणि तसें केलें म्हणजे कवि त्याची स्तुति गातात. दुसरा ट विप्राला योग्य आहे, क्षत्रियाला नाहीं, तेव्हां माझ्या पुत्रानें विद्वत्ता क्षमा इत्यादि विप्रोचित गुणांनीं आपल्यास धन्य न मानितां समरीं बाहुबळ दाखविलें पाहिजे. ही **भट्ट** शब्दावरील कोटि **पंतां**चीच होय. अशीच 'भट' या शब्दावर कोटि **पंतां**नीं केली आहे. [गदापर्व–अ० ३ गीति १८; अनुशासनपर्व–अध्याय ६ गीति ३२.] ४. ब्राह्मणांस. ५. भट्ट हें नाम ब्राह्मणाला योग्य आहे. ६. हे कमलनाभा कृष्णा! ७. सिंधुराजानें जिंकिलेल्या आपल्या संजय नामक पुत्रातें. ८. विदुला ही सौवीर देशाच्या राजाची स्त्री. हिचा पति मरण पावल्यामुळें

तें परिस सांगत्यें तुज[१] यदुकुलकमलाकराचिया विधुला.[२] ॥ ३४
विदुला म्हणे, 'अहा! रे! क्लीबा![३] मंदा! कसा पळालास? ।
कां वांचलासि? अयशस्कर ऐसा तूं न कां गळालास? ॥ ३५
अरि हरिल राज्य, मग तूं वरिशिल वृत्त्यर्थ[४] काय[५] माधुकरी[६]? ।
सुखकर सुकर्म टाकुनि, असुखकर[७] कुकर्म कोण साधु करी? ॥ ३६
मद्यौवन[८] संजय! हें निजनामहि[९] बुडविलें तुवां दगडें! ।
झगडें यशोर्थ, अरिरथचक्रांहीं स्पष्ट लोष्टसा[१०] रगडें. ॥ ३७
जेणें लज्जित व्हावें स्वर्गी सहपूर्वजें तुझ्या तातें, ।
परमानुचित पलायन कैसें केलें तुवां कुजाता![११] तें? ॥ ३८
मरण विहित,[१२] न पलायन, भीती धर्मज्ञराजकन्या[१३] यी[१४] ।

---

व पुत्र संजय अल्पवयस्क असल्यामुळें सिंधुदेशाच्या राजानें याचा पराभव करून याचें राज्य घेतलें; पुढें हा मोठा झाल्यावर हिनें यास क्षात्रधर्माचा उपदेश केला. त्या योगानें संजयाला वीरश्रीचें स्फुरण चढलें व त्यानें सिंधुराजापासून आपलें बळकावून घेतलेलें राज्य परत घेतलें. (उद्योगपर्व–अ० १३३-१३६.) असा या विदुलेच्या शौर्योत्तेजक बोधाचा सुपरिणाम झाला.

१. श्रीकृष्णाला. (अ० १३३.) यदुकुल+कमल+आकराचिया=यादववंश+उत्पल+खाणीच्या=यदुवंशरूप समूहाच्या (विधुला=चंद्राला). चंद्रकिरणांनीं कमलें विकसित होतात ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. २. चंद्राला. ३. हे नपुंसका! ४. उपजीविकेकरितां. ५. अध्याय १३३ श्लो० २५ यांत कापाली वृत्ति (भिक्षाचर्या) तुला योग्य नाहीं असें वर्णन आहे. ६. सिद्धान्नभिक्षा. 'माधुकरी' शब्दाची व्युत्पत्ति मोठी चमत्कारिक दिसते. याचा मूळचा अर्थ 'मधुकर' ह्मणजे 'भ्रमर' तत्संबंधिनी असा होय. तेव्हां अर्थातच हें विशेषण आहे. यास्तव प्रथमतः 'माधुकरी वृत्ति' (भ्रमरांच्या सारखा जीवनप्रकार) असे मूळचे शब्द असावे; आणि पुढें विशेष्य टाकून देऊन 'माधुकरी' येवढें विशेषणच नामासारखें योजण्याची रीत पडली असावी. जसें 'द्वितीया,' 'तृतीया,' 'एकादशी' हीं मूळचीं 'तिथि' या स्त्रीलिंग नामाचीं विशेषणें असून, पुढें नामेंच बनलीं. तेव्हां प्रस्तुत शब्दाची व्युत्पत्ति ही कीं, जसे भ्रमर या फुलावरून त्या फुलावर उडून जातात त्याप्रमाणें घरोघर अन्नाकरतां फिरण्याची जी वृत्ति ती 'माधुकरी' (वृत्ति). पुढें हा शब्द त्या लोकांस ही लागला.' (निबंधमाला–अंक ६ पृ० २९.) ७. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ८. माझें तारुण्य. ९. आपला लौकिक. १०. ढेंकूळसा. ११. कुत्सितजनना! १२. उचित. १३. क्षत्रियधर्मवेत्त्या राजकन्या. १४. धर्मज्ञराजकन्या या अन्याया (या पलायनरूप अनीतीला भीती (भितात; क्षत्रियकन्यांला क्षात्रधर्मोल्लंघनाचें भय वाटतें) अन्या (धर्मज्ञराजकन्यांहून इतर कन्या, अक्षत्रियकन्या) याहुनि अधिका (पलायनापेक्षां

अन्या याहुनि अधिका घडल्याही न गणतीच अन्याया. ॥ ३९
साधूंसि बाहुजाचा[1] मत[2] विजय जसा तसाचि वध मत, रे! ।
निजधर्माश्रित[3] न बुडे, निजधर्मच्युत[4] कधीं न अधम तरे[5]. ॥ ४०
अधमा! तुवां मरावें, क्षणहि न, बुडवूनि मान[6], वांचावें. ।
काळा[7]! यासम[8] अन्यहि जे असतिल, त्यांहि मानवां चावें.' ॥ ४१
तो संजय तीस म्हणे, 'पुत्राच्या इच्छितीस कां मरणा? ।
वांछिति[9] शमा अकाम प्राज्ञ, इतर इच्छिती सकाम रणा. ॥ ४२
रडसील संस्नुषा[10] कीं मज जरि देइल परासुता[11] समर, ।

---

अधिक अशाही) [अन्याया] घडल्याही (घडला असतांही) न गणतीच (पर्वा करीत नाहींत.) ज्या क्षत्रियकन्या आहेत त्यांलाच क्षत्रधर्मानुरूप पलायनासारख्या कर्माचें वाईट वाटतें, पण इतर कन्यांला ह्याहीपेक्षां कांहीं ज्यास्त असें घडून आलें तर त्याचें फारसें वाईट वाटत नाहीं.

१. क्षत्रियाचा. [बाहूपासून झाला तो बाहुज=क्षत्रिय.] ['मूर्धाभिषिक्तो राजन्यो बाहुजः क्षत्रियो विराट्' इत्यमरः । बाहुभ्यां जातः बाहुजः, बाहोर्जातो वा । 'बाहुजः क्षत्रिये कीरे स्वयंजाततिलेऽपि च' इति विश्वमेदिन्यौ । 'बाहू राजन्यः कृतः'=प्रजापति ब्रह्मदेवानें आपल्या बाहूंपासून क्षत्रिय उत्पादित केले. (पुरुषसूक्तम्-१२.) असेंच वर्णन मनुस्मृतींत आहे:-'लोकानां तु विवृद्ध्यर्थं मुखबाहूरुपादतः । ब्राह्मणं क्षत्रियं वैश्यं शूद्रं च निरवर्तयत्. ॥' [मनुस्मृति-अ० १ श्लो० ३१] याचा भावार्थः—प्रजोत्पत्ति होण्यासाठीं ब्रह्मदेवानें आपलें तोंड, बाहु, मांड्या आणि पाय यांपासून अनुक्रमानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र अशा चार वर्णांची उत्पत्ति केली.] २. मान्य. ३. आपल्या धर्मानें चालणारा. ४ स्वधर्मभ्रष्ट. ५. तरून जात नाहीं, बुडतो. ही पंक्ति उत्तम सुभाषितरूप आहे. हींत स्वधर्मत्यागाचा परिणाम आणि स्वधर्मसेवनाचें फल यांचें वर्णन केलें आहे. ६. अभिमान. ७. हे काळा! हे मृत्यो! ['कालं मृत्यौ महाकाले समये यमकृष्णयोः' इति कोषः.] ८. या संजयासारखे भीरु, कापुरुष. ९. अकाम (निष्कामबुद्धीचे, निरिच्छ असे) प्राज्ञ (ज्ञाते पुरुष) शमा वांछिति (शांतीचि इच्छा करतात, कलह करूं इच्छित नाहींत, शांतिप्रिय असतात) [आणि] इतर (याहून अन्य, ज्ञाते नव्हत असे) सकाम (कामनेनें व्यापिले होत्साते) रणा [वांछिति]. [या उत्तरार्धांत विदुला ही सकाम होत्साती रणाची इच्छा करते असें दृष्टांतानें सुचविलें आहे. यांत संजयानें आपल्या मातेचा निषेध करून आपण निरिच्छ बुधाप्रमाणें शांति इच्छितो असें दर्शविलें आहे. हें उत्तरार्ध उत्तम सुभाषित असून यांत पंतांनीं आपल्या मार्मिक लोकव्यवहारज्ञानाची साक्ष पटविली आहे.] १०. सुनेसहित. ११. मरण. [परासुता=परागता असवा यस्मात् स परासुः तस्य भावः=परासुता.]

न म्हणेल स्वप्नींही शतपुत्राही परा सुतास 'मर.' ॥ ४३
'जी व्यर्थ उभयलोकानुपयुक्त अपत्य वाढवी, ती तें ।
स्पष्ट करी वात्सल्य, ज्ञाते जन म्हणति 'गाढवी' तीतें. ॥ ४४
निजलासि काय? उठ रे! जय पावतसे सदा समरशील, ।
उत्साह टाकितां तूं दैन्यें सांगन सदास मरशील.' ॥ ४५
संजय म्हणे, 'नमस्ते जननि! जन निशाकरें जसा निवतो, ।
बोधें तसा निवालों, न हितंकर गुरूपदेशसा शिवं तो.' ॥ ४६
विदुलोक्त करी संजय जिंकुनि समरांत सिंधुराजाला; ।
सिंहीला तोचि उचित सुत जो मारूनि सिंधुरा जाला. ॥ ४७
सांग स्वसख्यासि असें झाली त्वत्सूतकीं गगनवाणी ।

१. जिला शंभर पुत्र तीही. २. परकीय मुलाला सुद्धां 'मर' असें म्हणणार नाहीं, मग जिला एकच मुलगा आहे अशी जननी आपल्या एकुलत्या एक पुत्रास 'मर' असें कसें म्हणेल? अर्थात् म्हणणार नाहीं. ३. हें विदुलेचें प्रत्युत्तर आहे. ४. दोन लोकीं नाहीं उपयोग ज्याचा. इहपरलोकीं उपयोगीं न पडणारें. ५. दया. ६. येथें कोणत्या मातेला 'गाढवी' हें निंदाव्यंजक नांव लावावें याचा खुलासा पंतांनीं केला आहे. मुलांचे फाजील लाड करणाऱ्या आईबापांनीं विदुलेच्या या उक्तीपासून पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. एकंदरींत हें विदुलोपाख्यान विचारार्ह आणि चिंतनीय आहे. ७. युद्ध करणें हा ज्याचा स्वभाव तो. ८. स+अंगना=सह+स्त्री=स्त्रीसह, अंगनेसह. ९. दासासहित. १०. तुला नमस्कार असो. ११.चंद्रानें.१२.कल्याणकर.१३.गुरुबोधासारखा, गुरूचें माहात्म्य फार श्रेष्ठ आहे.'विदलयति कुबोधं बोधयत्यागमार्थं सुगतिकुगतिमार्गौ पुण्यपापे व्यनक्ति । अवगमयति कृत्याकृत्यभेदं गुरुर्यो भवजलनिधिपोतस्तं विना नास्ति कश्चित् ॥.' [सूक्तिमुक्तावली–पद्य २४, काव्यमाला–सप्तमो गुच्छकः–पृष्ठ ३७.] १४.शिव (शंकर सुद्धां) गुरुबोधाप्रमाणें कल्याणकर नाहीं. यांत गुरूपदेशाचें आधिक्य वर्णिलें आहे. हा व्यतिरेकालंकार होय. १५. विदुलेचें वचन. येथें 'विदुलापुत्रानुशासन' उपाख्यान समाप्त झालें. [अ०१३६.]१६.हें अर्ध सुभाषित आहे. १७. गजाला. १८. झाला. १९. आपल्या मित्राला (अर्जुनाला), तुझा सखा अर्जुन त्याला. २०. तुझ्या जन्मकाळीं. 'मागें सांगितल्याप्रमाणें शब्द पहिल्यानें चांगल्या अर्थाचा वाचक असून मागून त्याचा वाईट अर्थ झाल्याचें सुतक हा शब्द उदाहरण आहे. जनन व मरण या दोन्ही काळीं बांधवांस अशुचित्व सांगितलें आहे. त्यावरून प्रथमतः जननाशौचास सुतक असें नांव पडलें. शास्त्रांत जाताशौच व मृताशौच अशीं दोन नांवें आहेत. कालांतरानें जाताशौचास मराठींत सोहेर असें नांव पडून मृताशौचास सुतक असें नांव पडलें. दोन्ही प्रकारच्या अशौचांत कर्मानधिकार सारखाच आहे; तथापि जनन हें आनंदकारक असल्यामुळें जाताशौच मंगलप्रद आहे याकरतां त्यांत स्पर्शदोष नाहीं. मृताशौच दुःखकारक असल्यामुळें तें अमंगळ मानिलें आहे. बिचारा सुतक शब्द मंगलप्रद

कीं, '¹कुंति! हा अरि वधुनि ²पद साधिल, तुज सुखा ³मग न वाणी.॥
होतिल सकळखळवधीं ⁴हरिहरमुख या ⁵बुधा सुर सहाय, ।
चित्तीं म्हणेल याच्या कीर्तिरसें जितसुधासुरस 'हाय!' ॥ ४९
तें ⁷सत्य असो, तेंही जें युद्ध ⁸पुरांतका महेशासीं, ।
⁹मद्वीरसूत्वहि, श्रीस्त्रीकीर्त्यपहारकाम हे ¹⁰शासीं.' ॥ ५०

---

अशुचिलाचा वाचक असून त्यास अज्ञान लोकांनीं अमंगळ जें मृताशौच तद्वाचक केलें. अमक्यास सुतक आलें आहे म्हणजे मृताशौच आलें आहे असें समजतात. नशीब विचाऱ्या शब्दाचें.' [व्युत्पत्तिप्रदीप–पृ० ६५.] २१. आकाशवाणी. 'इंद्रापासून अर्जुन होतां, सद्गुण मनोरम नभोगी । वर्णी, तच्छ्रवणें सुख बहु कुंतीपांडुसाधुमन भोगी. ॥ ८० ॥ 'हा रंजवील गुरुजनचित्तातें; श्रुतिरहस्य कवळील; । दुग्धाब्धिफेनधवलें स्वयशें कुरुच्या कुळासि धवळील; ॥ ८१ ॥ लीलेनें सुरदुष्कर कर्म करिल; संगरीं न आटेल; । फाटेल भयें याच्या द्विषदुर; हा मूर्त काळ वाटेल; ॥ ८२ ॥ हा तोषवील युद्धीं त्यासहि, जो काळकंपद पिनाकी. । पावेल पाशुपतही, ज्या पात्र न, जरि कृती तदपि, नाकी. ॥ ८३ ॥ किंबहुना विष्णु जसा सुखद अदितिला, तसाचि हा तुजला. । धन्यासि कुंति! पांडो! लक्षेत्रीं कल्पवृक्ष हा रुजला. ॥ ८४ ॥' या प्रमाणें पंतांनीं अर्जुनजन्मवृत्त आदिपर्व–अ० १८ यांत वर्णिलें आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–आदिपर्व–पृ० ११०.] या वर्णनावरून अर्जुनाच्या अतुल पराक्रमाची कल्पना वाचकांस चांगली होईल. [अ० १३७ श्लो० २-६.]

१. अर्जुन. २. राज्यांशपद. ३. कमीपणा. ४. विष्णुशंकरप्रमुख. ५. ज्ञात्या अर्जुनाला. ६. ज्या अर्जुनाच्या कीर्तिरूप रसानें जिंकलेला जो सुधारूप सुरस तो 'हाय' म्हणेल (दुःखोद्गार काढील). ७. कुंतीचा हा अर्जुनाला निरोप आहे. याप्रमाणेंच इतर पुत्रांस त्याच्या अनुरूप असे संदेश आहेत. गीति ५१-५६ पहा. ८. त्रिपुरनाशक शंकराशीं. (महेश=शंकर.) याचा अर्थः–तें (गगनवाणीचें सांगणें) सत्य असो (खरें ठरो), पुरांतका महेशासीं जें युद्ध झालें (त्रिपुरासुराचा नाश करणारा जो महेश–शंकर त्याशीं अर्जुनानें युद्ध केलें) तेंही सत्य असो (ती गोष्ट असत्य असें लोकांस न वाटो), मद्वीरसूत्वही सत्य असो (मी वीर पराक्रमी पुत्रांस प्रसवलें ही गोष्ट सत्य होवो), [या तिन्ही गोष्टी शत्रूंचा उच्छेद केल्यानें खऱ्या ठरणार आहेत यास्तव हे अर्जुना!] (राज्यश्री, राज्यलक्ष्मी) स्त्री (द्रौपदी) कीर्ति (विमल यश) यांचा अपहारकाम (हरण करण्याची इच्छा) ज्यास आहे असे (श्रीस्त्रीकीर्त्यपहारकाम) हे (कौरव) शासीं (शासन कर, पारिपत्य करा, शिक्षा कर.) हे अर्जुना! संपत्ति, स्त्री आणि कीर्ति यांचा अपहार करण्याची बुद्धि धरणाऱ्या कौरवांचें पारिपत्य कर म्हणजे तुझ्या जन्मकालीं झालेली नभोवाणी, तुझें शंकराशीं झालेलें प्रचंड युद्ध आणि माझें वीरसूत्व हीं खरीं ठरतील– असें तात्पर्य. 'जयी नयी बली बालो रिपुजंबालभास्करः । भविष्यत्ययमित्यासीत्तदा गगनभारती ॥' असें श्रीमदमरचंद्रसूरिविरचित 'बालभारतां'त वर्णन आहे. [आदिपर्व–सर्ग ४ श्लो० १८९ पृ० ४३.] ९. माझें वीरपुत्राचें प्रसवणें. १०. शासन कर.

भीमासि म्हणे, 'द्यूतीं नेलें जिंकूनि वित्त[1] भीमा! जें ।
तें न स्मरें, न तुमच्या वनवासालाहि चित्त भी माझें[2]. ॥ ९१
सलतें मनांत दुष्टें ओढुन नेली सभेंत कृष्णा[3] तें, ।
स्मरली[4], त्यांहि उपेक्षा करितां, हरितां[5] निरीस, कृष्णातें. ॥ ९२
त्या स्मरणें मन पडलें तापीं बहु, जेंवि तळमळत डागें, ।
हृदयें[6] मोह उघडिला जैसा ग्रीष्मांत तळमळ[7] तडागें[8].' ॥ ९३
'दावावें, यश जोडुनि, कुळजानें[9] सुप्रसन्न वदन कुळा;' ।
प्रथम पुसोनि[10] कुशल मग जगदीशा! तूं असेंचि वद नकुळा. ॥ ९४
'अयशस्कर तोकें[11] पळहि मळवाया धाम[12] वा! न रांगावें, ।
जरि न गमेचि[13], तरि सुखें चित्ररचितरामवानरां गावें.' ॥ ९५
हें[14] क्षत्रियासि[15] समुचित ऐसाचि निरोप सांग सहदेवा, ।

---

१. द्रव्य. जिंकून घेतलेल्या धनाचें वर्णन सभापर्वांत आहे. [मोरोपंत—सभापर्व—अ० ४ गी० ४७-१०० पृ० ३०-३६]. २. माझें. (अ० १३७ श्लो० ११.) ३. द्रौपदी. ४. कृष्णा (द्रौपदी) कृष्णातें (वासुदेवातें) स्मरली. या प्रसंगाच्या सभापर्वांतील गीति अत्यंत मोहक आणि कारुण्यमय आहेत [काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत—सभापर्व—अ० ५ गीति ६९-७९ पृ० ४४-४५]. ५. दुःशासनें निरीस हरितां—असा अन्वय. ६. हृदयें मोह उघडिला [हृदयानें मोह व्यक्त केला, शांति, आनंद, सुख इत्यादि जे हृदयाचे धर्म ते त्यानें निखालस टाकिले आणि तें मोहयुक्त (मूढ—भ्रांत) झालें, द्रौपदीनिरीकर्षणानें माझें हृदय भ्रांत झालें. मला त्या प्रसंगाच्या स्मरणानें मला पराकाष्ठेचा मोह उत्पन्न झाला, माझ्या हृदयांतील मोह. (ममता, प्रेमा, भ्रम) व्यक्त झाला. ७. तळाचा मळ, चिखल. ८. तलावानें. ९. सत्कुलोत्पन्नानें. १०. क्षेमसमाचार घेऊन. ११. अपत्य, बाल. १२. गृह. १३. जर करमत नसेल तर, सुखानें वेळ जात नसेल तर. [गमणें=करमणें. मला येथें गमत नाहीं=मला येथें करमत नाहीं, सुखास येत नाहीं. गमणें याचे तीन अर्थ आहेत, एक सुखानें मजेनें वेळ जाणें, दुसरा दिसणें, वाटणें, आणि तिसरा आळसानें रमत रमत फिरणें.] तरि सुखें (आनंदानें) चित्ररचित (चित्रार्पित, चित्रांत काढलेल्या) रामवानरां (रामाला आणि त्याच्या वानरांला) गावें (वर्णावें, स्तवावें) [रामनाम स्तवन करून आनंद व पुण्य हीं दोन्हीं संपादावीं; परंतु अयशस्कर तोक हे सुखकर मानूं नये. घरांत मूल नसल्यामुळें गमलें नाहीं तर पतकरलें, पण अयशस्कर मूल घरांत नसावें; मुलाच्या अभावीं भिंतीवरील चित्रपटांतल्या रामवानरांचें स्मरण करून जिवाला करमणूक करून घेऊन सुखानें पुण्य जोडून असावें हें उत्तम. मुलाच्या रांगण्यानें मिळणारें सुख पुण्यमार्गानें मिळवावें.] १४. यश जोडून तोंड दाखविणें, यशस्कर होणें. १५. क्षत्रकुलोत्पन्नाला. [क्षत्रिय='ब्राह्मणानां क्षतत्राणात् ततः क्षत्रिय उच्यते'—शांतिपर्व. असेंच वर्णन मनुस्मृतींत आहे. अ० ७ श्लो० २ पहा. क्षत्रे राष्ट्रे साधु तस्यापत्यं जातौ वा.]

जो पांचांत यशस्कर तो माझा पुत्र मूर्तमह[१] देवा ! ॥ ९६
कृष्णेसि सांग कृष्णा ! तिळभरिहि तुजें उणें नसो शील[२], ।
त्वां साहिलें असें पळमात्रहि सर्वसहा[३] न सोशील[४]. ॥ ९७
सति[५]! तव सभाप्रवेशीं रामेंहि[६] विलोकिलें परश्वश्रू[७], ।

---

१. मूर्तिमंत उत्सव. २. सुस्वभाव. 'जगतः शीलं परं भूषणम्' असें भर्तृहरीनें म्हटलें आहे त्यावरून शीलाचें श्रेष्ठत्व दिसून येतें. शीलाची महती अशी वर्णिली आहे:–'शीलं सर्वत्र वै धनम्', 'न शीलाद्विभ्रंशो भवतु कुलजस्य श्रुतवतः', 'हरति कुलकलंकं लुम्पते पापपंकं सुकृतमुपचिनोति श्लाघ्यतामातनोति । नमयति सुरवर्गं हन्ति दुर्गोपसर्गं रचयति शुचि शीलं स्वर्गमोक्षौ सलीलम् ॥' 'तोयत्यग्निरपि स्रजत्यहिरपि व्याघ्रोऽपि सारङ्गति व्यालोऽप्यश्वति पर्वतोऽप्युपलति क्ष्वेडोऽपि पीयूषति । विघ्नोऽप्युत्सवति प्रियत्यरिरपि क्रीडातडागत्यपांनाथोऽपि स्वगृहत्यटव्यपि नृणां शीलप्रभावाद्ध्रुवम् ॥,' [**सोमप्रभाचार्य**विरचित–**सूक्ति**-मुक्तावलि–काव्यमाला–सप्तमो गुच्छकः–पृ० ४१-४२] ३. सर्व सहन करणारी पृथ्वी. 'सर्वसहा' हा शब्द साभिप्राय आहे. **पं**तांचें शब्दयोजनाचातुर्य अशाच स्थळीं दिसून येतें. हा शब्द **पं**तांच्या मार्मिकतेची साक्ष देत आहे. येथें 'सर्वसंहा' हें विशेष्यनाम साभिप्राय आहे म्हणून हा **परिकरांकुर** नामक अलंकार झाला. 'साभिप्राये विशेष्ये तु भवेत् परिकरांकुरः' असें याचें लक्षण 'कुवलयानंदां'त आहे. चतुर्भुज देव मला चार पुरुषार्थ देवो–या वाक्यांत 'चतुर्भुज' हें विशेष्य साभिप्राय आहे, कारण चार पुरुषार्थ देण्याचें सामर्थ्य चतुर्भुज देवाचें आहे असा अभिप्राय गर्भित आहे. याचीं अन्य उदाहरणें:–(१) **जि**ष्णुपुढें असुरजनीं कोणी वैराटिके सरी करिता. [विराटपर्व–अध्याय ३ गी० ९] (२) थोरपण **अनंता**चें अनंत, वर्णील काय कविहीर ? । [उद्योगपर्व–अ० ७ गी० ६३] जेथें विशेषण साभिप्राय असतें तेथें **परिकर** नामक अलंकार आणि जेथें विशेष्य साभिप्राय असतें तेथें '**परिकरांकुर**' अलंकार होतो–असा या दोहोंत भेद आहे. ४. हीं अतिशयोक्ति होय. ५. [हे] सति! (हे पतिव्रते! द्रौपदि! तव सभाप्रवेशीं (कौरवसभेंत दुःशासनानें तुला ओढून फरफरां नेली त्या प्रसंगीं) रामें (परशुरामानें, ज्यानें निःक्षत्रिय पृथ्वी केल्यावर शस्त्रग्रहण करावयाचें नाहीं अशी घोर प्रतिज्ञा करून शस्त्रन्यास केला होता व जो कठोर मनस्क असल्यामुळें कधींही दयार्द्र होऊन अश्रुमोचन करावयाचा नाहीं, ज्या उग्रवीर्य जामदग्न्याच्या डोळ्यांतून अश्रुपात होण्याचा संभवही नाहीं–त्यानें परशु (आपलें परशु नामक आयुध) [आणि] अश्रु (नेत्रांचे ठिकाणीं आंसवें) विलोकिलें (अवलोकन केलें–परशुरामासही शस्त्र हातीं घ्यावें असें वाटलें आणि त्याचे डोळ्यांतून पाणी आलें, कारण त्याला द्रौपदीधर्षण नितराम् दुःसह झालें. अशी जर जामदग्न्याची अवस्था झाली तर इतरांची काय कथा? ६. राम हा शब्द तिघांस लावतात:–दाशरथि राम, जामदग्न्य राम आणि वसुदेवसुत राम. येथें परशुराम असा अर्थ समजावा. ७. परशु आणि अश्रू.

निर्लज्जा [1]कठिना मी, मरतीच तदा भली पर [2]श्वश्रू. ॥ ५८
त्वां रक्षिलें, न झाले [3]क्षम रक्षायासि [4]मत्तनय, नातें, ।
असते क्षम [5]चरणनखा स्पर्शों देते न [6]मत्तनयनातें. ॥ ५९
जरि बुँडविलीस माझ्या पुत्रांहीं [8]व्यसनगर्तलीनाहीं, ।
तरि न [9]विटलीस, यापरि [10]सत्वें कोणीहि वर्तली नाहीं. ॥ ६०
[11]किंबहुना? सांग तयां [12]समयीं जें काय चांगलें कांहीं, ।
कृष्णा! [13]मन्मत हें कीं '[14]यशें रक्षावें न आंग लेंकांहीं.' ॥ ६१
वा! गा! [15]म्हण बाहूंतें पुरवाया [16]स्वजनकाम हा 'भागा.' ।
मागायाचें तुज हें, नाहीं म्हणसील कां [17]महाभागा? ॥ ६२

---

१. निर्दय. २. सासू. परशुरामाला सुद्धां द्रव आला, पण मी पहा कशी निर्लज्ज आणि निर्दय आहें ती! दुसरी भली सासू असती तर स्नुषेची ही अवस्था पाहून मरण पावती, मी भली नव्हे म्हणून जगत्यें. ३. समर्थ, शक्तिमान्. ४. माझे तनय (पुत्र पांडव). ५. तुझ्या पायांच्या नखाला. ६. मत्त+नयनातें=उन्मत्त+नेत्रांतें=उन्मत्त कौरवांच्या नेत्रांला. ७. हें द्वितीय पुरुषीं कर्मणिप्रयोगाचें उदाहरण आहे. अशीं उदाहरणें क्वचित् आढळतात. ८. व्यसनरूप खळग्यांत पडलेल्यांनीं. ९. कंटाळलीस. १०. शीलौनत्यानें. ११. फार काय सांगूं. १२. या वाक्यांत सर्व कांहीं आलें, सर्व जबाबदारी कृष्णाकडे आली. हें कुंतीचें भाषण 'धन्यास्ते ये न पश्यंति देशभंगं कुलक्षयम् । परहस्तगतां भार्यां मित्रं च विषमस्थितम् ॥.' या श्लोकांतील मुख्यतत्वास अनुसरून आहे. १३. ही कुंतीची अल्प उक्ति अर्थभारवती नाहीं असें कोण म्हणेल? यांत क्षत्रिय धर्माचें सर्वस्व भरून ठेविलें आहे. यांत जें सांगितलें आहे तें केलें म्हणजे क्षत्रियाचें जन्मसाफल्य झालें असें समजलें पाहिजे. १४. माझा अभिप्राय. १५. वा! अगा! [कृष्णा!] [आपल्या] बाहूंतें (भुजांतें) म्हण (सांग कीं) [हे भुज हो!] हा स्वजनकाम पुरवाया भागा. (हा कुंतीनें सांगितलेला आपल्या भक्तांचा मनोरथ सफल करण्यासाठीं श्रम घ्या, मेहनत करा. आपल्या लोकांची कामना पुरविण्यासाठीं आपल्या दंडास थका–श्रमाची पराकाष्ठा करा असें म्हण. ६१ व्या गीतीच्या चतुर्थ पादांत कुंतीनें आपलें इष्टार्थसर्वस्व निवेदन केलें आहे–तें परिपूर्ण करण्यासाठीं करवेल तेवढी मेहनत करा.) १६. स्वजन+काम=स्वभक्त, आप्तजन+मनोरथ, इष्टार्थ. १७. 'महाभागा' हें संबोधन येथें साभिप्राय समजावें. जो कोणी महाभाग (भाग्यशाली, मोठ्या दैवाचा) आहे तो याचकास विमुख दवडणार नाहीं हें उघड आहे. 'महाभाग' शब्द योजण्याचा हाच मतलब कीं दैवशाली मनुष्य कधींही याचकाला नकार लावून परत पाठवावयाचा नाहीं. माझी प्रार्थना सफल होईल असें कुंती सूचवीत आहे.

पाहों नको मजकडे बा! निज[1]बिरुदावलीकडेचि पहा, ।
काय [2]स्तनार्थिशिशुच्या शब्द उचित सांत्वनीं पडे 'चिं[3]प' हा?' ॥ ६३
[4]नमुनि निघे कि[5]मपि प्रभु न वदे, त्यावरुनियां असें वाटे, ।
कीं, 'कृत्वा दर्शयते प्राज्ञ[6]' असा भाव कीं [7]गळा दाटे. ॥ ६४
वृद्धांसि पुसे, स्वरथीं कर्णाला सबहुमान [8]बाहुनि घे, ।
[9]शक्रप्रमुखमहाभुजभुजगाधिपपूज्यमानबाहु निघे. ॥ ६५
प्रभुवर तेथुनि [10]जातां, धरुनि मनीं फार कोप, दे[11]शाला; ।
**भीष्म द्रोण** पुन्हाही करिति खळा [12]तारकोपदेशाला. ॥ ६६
दुर्योधनासि न रुचे सांगति जें [13]सदुपदेशपटु ते तें, ।
[14]मधुररसीं उपदेशीं ज्वर खळ आणिति बळेंचि [15]कटुतेतें. ॥ ६७

१. आपल्या यशाच्या पंक्तीकडे. [मोरोपंत–सभापर्व–अ० ५ गी० ७२ पृ० ४५ पहा.] २. स्तन पिणाऱ्या लहान बालकाच्या. ३. चिप=उगा रहा हा शब्द. हें प्रश्नालंकाराचें उदाहरण आहे. ४. कुंतीला नमस्कार करून. [अ० १३७ श्लो० २५-३२.] ५. कांहींही. ६. ज्ञानी करून दाखवितो. ७. किंवा कंठ दाटून आला. कृष्ण प्रत्युत्तरादाखल कांहीं बोलला नाहीं, याचें कारण जें कार्य करावयाचें तें बोलून न दाखवितां क्रियापूर्वक करून दाखवावें अथवा कृष्णाच्यानें वियोगदुःखानें गळा भरून आल्यामुळें बोलवलें नाहीं–असा भाव. ८. बोलावून. ९. इंद्र आदीकरून वीरश्रेष्ठ व शेष यांनीं पूजित आहेत बाहू ज्याचे असा कृष्ण. (येथें त्रिलोकांहीं पूज्य असा भाव आहे.) हें लांब लांब संस्कृत समासाचें उदाहरण आहे व अशीं उदाहरणें पाहिजे तितकीं पंतांच्या काव्यांत दाखवितां येतील. [निबंधमाला–अंक ६६ पृ० २८-२९.] १०. सात्यकि व कर्ण यांसह स्वदेशाला जातां. [अ० १३७ श्लो० २६.] ११. उपप्लव्य नगराला. [श्लो० ३२.] १२. तारक अशा उपदेशाला. [अ० १३८ श्लो० २-२७.] प्रशम कर असा ह्या उपदेशाचा मुख्यार्थ आहे. १३. सत्+उपदेश+पटु=सदुपदेश करण्याविषयीं कुशळ. १४. येथें '**यथासंख्य**' आणि '**अर्थांतरन्यास**' यांचा संकर आहे. ज्याला ज्वर आला आहे त्याला कोणताही मधुर पदार्थ कडू लागतो ही गोष्ट सुप्रसिद्ध आहे. ज्वर मधुररसीं व खळ उपदेशीं बळेंचि कटुतेतें आणिति–असा येथें अनुक्रमानें अन्वय आहे, म्हणून हा '**यथासंख्य**' अलंकार होय. जेव्हां पदार्थांचें वर्णन ज्या क्रमानें पहिल्यानें झालेलें असतें त्याच क्रमानें त्याचा संबंध (अन्वय) पुनः दुसऱ्या पदार्थांशीं लागत असला म्हणजे '**यथासंख्य**' अलंकार होतो. शत्रूंस, मित्रांस आणि विपत्तीला जिंक, राख आणि पिटाळ' या वाक्यांत शत्रु, मित्र, आणि विपत्ति या शब्दांचा ज्या क्रमानें उल्लेख झाला आहे त्याच क्रमानें जिंक, राख, आणि पिटाळ, या शब्दांशीं त्यांचा संबंध लागला आहे म्हणून हा '**यथासंख्य**' अलंकार झाला. याचीं अन्य उदाहरणें:—(१) जयभीमवधाविषयीं कर्णसुयोधन करोत बकबक रे। कैसे करितील तिमिग्रास दहनमेष भंग बक बकरे ॥ [द्रोणपर्व–अ०

वाली, होउनि तिर्यग्दृक्[1] नतमुख[2], भोंवयांसि[3] तो गांठी; ।
केवळ हितोक्ति कृत्या[4], भासे त्या काळदृष्टि[5] ज्या गांठी[6]. ॥ ६८
भीष्म म्हणे, 'जो बहुमत ईश्वरसा सत्यलोकपाळाला[7] ।
त्या वत्सासीं[8] विग्रह[9]? हा! आलें काय हो! कपाळाला?' ॥ ६९
द्रोण म्हणे, 'पुत्रांधिक[10] कीं पोषी नित्य शिष्टता पार्थ ।
त्या वत्सासीं विग्रह? हा! झालों काय शिष्ट[11] तापार्थ?' ॥ ७०
जो वळला[12] पळ लाजुनि न श्रीदेवर्षिला[13] न पितरांला[14] ।
वळला न ईश्वरासहि[15], तो दुष्ट वळेल काय इतरांला[16]? ॥ ७१
मंत्र करुनि कर्णातें देऊनि निरोप जाय अरिपाणी[17], ।

---

१२ गीति ९१], (२) कीचकरहित विराट स्पष्ट जसा सर्प नीरदन दीन, । अल्प अनल्प वळें तो तूं संप्रति, जेंवि नीरद नदीन.॥ [विराटपर्व–अध्याय २ गीति ३१ पृष्ठ ४९],(३) कर्णखचरार्जुनां कां म्हणति न खद्योतरात्रिकरसविते [वनपर्व–अ० ७ गी० ९५], (४) मानीं मनोजशर हार तुरे फुलांचे, कंदर्पकोपवचनें ध्वनि कोकिलांचे । राकाशशी मदनदर्पण भाविलाहे, नेघेंचि तो न परिसें न तयासि पाहे ॥ [रघुनाथपंडित–नलदमयंतीस्वयंवराख्यान]. (५) प्रथमचि तुम्ही तुळा, शतजन्मेंहि सुदुर्लभा परा सुकृतें । संप्रति तव कर्मे परकर्मे जीवत्कृतें परासुकृतें ॥[वनपर्व–अध्याय ६ गीति ४२ पृ० ९८.] १५. कद्रूपणातें.

१. वक्रदृष्टी. [अ० १३९ श्लो० १.] २. अधोवदन. ३. भोंवयांस गांठी घालणें =भंवया चढविणें, भंवयांस अडी घालणें=To knit the eye-brow. ही क्रिया तिरस्कार, गैरमर्जी, असंतोष, तिट्कारा, नापसंती यांची दर्शक आहे. ४. राक्षसी, आसुरी उग्र देवता, आज्ञाकरी देवता=कृत्या. (नीलकंठ टीकाकार–वनपर्व–अ० २५१) हें अर्ध सुभाषितरूप आहे. ५. मृत्युदृष्टि. ६. गांठले. ७. ब्रह्मयाला. ८. अर्जुनाशीं. (अ० १३९ श्लो० २.) ९. कलह. १०. अश्वत्थाम्याहून अधिक. ११. मला पार्थानें शिष्टता दिली, तेव्हां मी शिष्ट आणि पार्थ माझा शिष्य असें आम्हां उभयतांमध्यें नातें उत्पन्न झालें. तापार्थ (पार्थाला ताप देण्यासाठींच) काय मी शिष्ट झालों? पार्थाला ताप देण्यास मीं प्रवृत्त व्हावें हाच काय माझा शिष्टपणा? १२. कोणी दुष्ट लज्जेनें वळतो, श्रेष्ठांच्या किंवा वडिलांच्या सांगण्यास वळतो असा कांहीं प्रकार असतो, पण दुष्ट दुर्योधन कोणत्याही प्रकारें वळला नाहीं असें या आर्येंत सांगितलें आहे. १३. नारदास. [मोरोपंत–उद्योगपर्व–अ० ८ गीति ८०-८३ पृ० १३९.] १४. भीष्म, विदुर, धृतराष्ट्र, गांधारी यांला. १५. श्रीकृष्णाला देखील. १६. अर्थात् वळणार नाहीं असें अपेक्षित उत्तर समजावें. हें असंभवसूचक प्रश्नालंकाराचें उदाहरण होय. १७. चक्रपाणी.

[१]ज्याचे पिती [२]घटघट घटघट घडिघडि घरींहि अरि पाणी. ॥ ७२
अंध [३]म्हणे, 'रे संजय! जो या [४]दुर्बुद्धिवायसां गमला ।
[५]प्रभुहंस [६]अहित, तेणें केला तो [७]मंत्र काय सांग मला.' ॥ ७३
श्रीकृष्ण म्हणे, 'कर्णा! तूं कुंतीचा कुमार [८]कानीन, ।
[९]त्वद्वदनोत्थ न पडला [१०]अर्थिजनाच्या कधींहि कानीं [११]नं. ॥ ७४

१. ज्याचे (ज्या अरिपाणीचे–कृष्णाचे) अरि (शत्रु) घरींही (आपल्या घरांत असतां, समोर कृष्ण नसून त्याची फक्त आठवण होतांच) घडि घडि (प्रत्येक क्षणीं–वारंवार) घटघट (घागरींच्या घागरी–विपुल) पाणी (उदक) घटघट (घटाघट–पानक्रियेचा अनुकरणवाचक शब्द) पिती (पितात–असा कृष्णाच्या दराऱ्यानें त्याच्या शत्रूंचा कंठ शुष्क होत असतो). २. प्राशनक्रियेचा अनुकरणबोधक शब्द. **पं**तांच्या काव्यांत अशा अनुकरणवाचक शब्दांचा प्रयोग अनेक स्थलीं केला आहे. (१) चरचर–वनपर्व–अ० १३ गी० २४, (२) फरफरां–सभापर्व–अ० ५ गी० ७, (३) खदखद–सभापर्व–अ० ३ गी० ३५, (४) कचाकच व खळखळां–द्रोणपर्व–अ० १२ गी० ६३, (५) परपर–द्रोणपर्व–अ० ११ गी० ११०, (६) झटझट–सभापर्व–अ० ५ गी० ८९, (७) डरडरां–सभापर्व–अ० २ गी० २४, (८) खळखळ–सभापर्व–अ० ६ गी० ११, (९) खळखळां–सभापर्व–अ० ६ गी० ८८, (१०) करकरुनी–सभापर्व–अ० ५ गी० ४३. "या अशा अनुकरणरूप शब्दांचा या महाराष्ट्र भाषेंत जितका भरणा असेल तितका, मला वाटतें, आणखी कोणत्याही भाषेंत नसेल, आणि तो या भाषेचा केवळ असाधारण जिव्हाळा होऊन राहिला आहे; गति, वेग, मांजुल्य, कार्कश्य, सौंदर्य; परिमिति इत्यादि क्रियेचे शतावधि प्रकार दाखवायाचे असतां, त्या त्या अनुकरणरूप शब्दांचा प्रयोग होतो. जसें:—**झटझट** चालतो; **चमचम** लवत्ये; **टकमक** पाहत्ये: **झणझण** वाजतें; **बद्‌बद्** पडतें; **टपटप** झरतें; **भडभड** ओकतो; **तडतड** बोलतो; 'छडी वाजे **छमछम,** विद्या येई **घमघम.**" (दादोक्त व्याकरण.) **पं**तांनीं असे अनुकरणवाचक शब्द योजून कोठें कोठें मोठी बहार करून दिली आहे. अशा स्थलीं अर्थ आणि ध्वनि हे परस्परांस इतके अनुरूप आणि अनुगुण आहेत कीं त्यांवरून **पं**तांचें समर्पक शब्दरचनाचातुर्य आणि भाषापतित्व हे गुण सुव्यक्त होतात. ३. अध्याय १४० श्लो० १-३ पहा. ४. या दुर्मति कौरवरूप कावळ्यांला. ५. श्रीकृष्ण हाच हंस. ६. शत्रु. ७. मसलत (कर्णाला कृष्णानें काय उपदेश केला?) ८. कन्यापुत्र. (कुमारीदशेंत झालेला पुत्र) कन्याया अनूढाया अपत्यं कानीनः (कन्यायाः कनीन च. ४।१।११६)=कन्यकाजात सुत. । 'कानीनः कन्यकासुते कर्णे व्यासे' इति हेमचंद्रः । 'पितृवेश्मनि कन्या तुभ्यं पुत्रं जनयेद्रहः । तं कानीनं वदेन्नाम्ना वोढुः कन्यासमुद्भवम्. ॥' अर्थः—पित्याचे घरीं कन्या अविवाहित असतां ती एकांतीं [सवर्णापासून] जो पुत्र उत्पन्न करील तो पुत्र त्या कन्येशीं विवाह करणाराचा **कानीन** पुत्र म्हणावा. [मनुस्मृति–अ० ९ श्लो० १७२.] ९. त्वत्+वदन+उत्थ=तुझ्या मुखांतून निघालेला. १०. याचकजनांच्या. [अर्थी=याचक. इन् प्रत्यय लागून नामदर्शित गुण वाळ-

ऐसा [1]वदान्य विद्वान् [2]विश्रुत तूं शुद्धविप्रजनदास ।
चाल, भजोत [3]भ्राते तुज, [4]चातक भजति जेंवि [5]वनदास. ॥ ७५
देईल [6]अजातारी मद्वचनें आजि राज्य [7]अभ्रात्या; ।
भ्रात्या न [8]वळेल कसा? वळवीलचि [9]धर्मवायु अभ्रा त्या. ॥ ७६
[10]सांनुजसुत धर्म तुला नमिल, [11]सयादव करीन मी नमन, ।
[12]सच्चित्त [13]गुर्वनादर [14]तोयानादर [15]करी न [16]मीनमन. ॥ ७७
राज्याभिषेक करितिल तुज मजसह विप्र [17]भूमिप [18]दरानें; ।
[19]किंबहुना? [20]घेईल तव तांबूल क्षिप्र भूमि पदरानें. ॥ ७८

गणारा अशा अर्थांचीं विशेषणें होतात. जसें:–धन, धनिन् (धन बाळगणारा), हल–हलिन् (हल=(नांगर) धरणारा), परंतु अर्थी शब्दाचा अर्थ–ज्याच्यापाशीं अर्थ आहे तो अर्थी–असा होत नाहीं.] ११. नकार (नाहीं).

१. दाता. २. प्रख्यात. ३. धर्मादिक पांडव. ४. ही 'उपमा' आहे. 'उपमा कालिदासस्य' असें जें सुभाषित आहे त्यांत 'उपमा रामपुत्रस्य' अथवा 'उपमा श्रीमयूरस्य' असा फेरफार केला तर तो **पं**तांस यथार्थत्वानें लागू पडणार नाहीं असें कोण म्हणेल? **पं**तांच्या उपमा फारच बहारीच्या असतात. त्यांत समर्पकता, चातुर्य, आणि नीटनेटकेपण यांची कमाल करून सोडिली असते. चातकांची मेघोदकासक्ति संस्कृत सुभाषितग्रंथांतून फार वर्णिली आहे. [वल्लभदेवसंगृहीता 'सुभाषितावलि'–मयूराश्चातकाश्च–पृ० १०६-१०८ पहा.] ५. मेघास. [वन+दास=उदक+देणाऱ्याला.] ६. धर्मराज. ७. बंधूवांचून दुसऱ्याला. ८. हें **'काव्यार्थापत्ति'** नामक अलंकाराचें उदाहरण होय. बंधु नव्हे अशालाही राज्य देणारा धर्मराज जर आहे तर तो भावाला प्रसन्न होऊन राज्य देण्यास कसा वळणार नाहीं? अर्थात् तो राज्य देण्यास सिद्ध होईल. या गीतीच्या चतुर्थ पादांत धर्म आणि वायु अभिन्न मानून व बंधु आणि अभ्र हेही अभिन्न समजून वळविणें ही एक क्रिया मानिली आहे. ९. स्वधर्मरूप वायु. १०. धाकटे बंधु व पुत्र यांसहवर्तमान. ११. यादवसहित. १२. साधूंचें चित्त. १३. गुरूचा अनादर. १४. उदकाचा अनादर. १५. मत्स्याचें मन. १६. यांत अर्थांतरन्यास आणि निदर्शना हे अलंकार आहेत. १७. राजे भूमिपालक. १८. भयानें. १९. फार काय वर्णूं? २०. भूमि पदरानें तव तांबूल क्षिप्र घेइल–असा अन्वय. [एखाद्याचा शब्द दुसऱ्यानें मान्य केला म्हणजे पहिल्याची थुंकी दुसऱ्यानें झेलली–खालीं पडूं दिली नाहीं–असें म्हणण्याचा भाषणसंप्रदाय आहे, मग तो शब्द योग्य असो अथवा नसो, यांत बोलणारा सेव्य आणि शब्द झेलणारा सेवक असा संबंध असतो. असाच भाव मनांत धरून कृष्ण कर्णाला म्हणतो.] तव तांबूल (हे कर्णा! तुझ्या मुखांतून खालीं पडणारें रसहीन तांबूल) भूमि (पृथ्वी, लक्षणेनें सर्व जन) पदरानें (आपल्या आंगवस्त्रानें आदरपूर्वक) क्षिप्र घेइल (तात्काल ग्रहण करील). [तव तांबूल–या शब्दानें मुखांतून निघणारा कोणताही बरा वाईट शब्द असें

चाल कसा, हो राजा, [1]मातेच्या मानसासि दे सुख, गा! ।
[2]यांचा तुज काकांचा सहवास [3]जैसा [4]सितच्छदा [5]सुखगा.' ॥ ७९

सुचविलें. भूमि–या शब्दानें पृथ्वीवरील सर्व जनांत तुझा शब्द अमान्य करणारा कोणी नाहीं असा भाव दर्शविला. पदरानें–कांहीं मोठी वस्तु, थोरांचा प्रसाद पदरांत अथवा पदरानें घेण्याचा शिष्टसंप्रदाय आहे त्यास अनुलक्षून पदरानें या शब्दानें प्रसादस्वीकारवत् पूज्यबुद्धि, आदरबुद्धि दाखविली आहे. क्षिप्र–या शब्दानें ग्रहणक्रियेच्या उत्सुकतेचा बोध केला आहे. या गीतींत शब्द अगदीं साधे असून अर्थगौरव फार आहे. ही गीति नारिकेलपाकाचें उत्तम उदाहरण समजण्यास कांहीं हरकत नाहीं आणि अशीं उदाहरणें **पं**तांच्या काव्यांत पुष्कळ आहेत. 'कालिदासाची कविता प्रसन्न समजतात व **भा**रवीची कविता भारदस्त म्हणतात. प्रसन्न कवितेचा रस द्राक्षांच्या रसासारखा असून, भारदस्त कवितेचा रस नारळाच्या रसासारखा असतो. जो पाक **का**लिदासांत आहे, तो **भा**रवींत नाहीं; जो पाक **भा**रवींत आहे, तो **का**लिदासांत नाहीं. पण **पं**तांच्या काव्यांचा हे दोन्ही पाक खमंगपणा वाढवीत आहेत. **मो**रोपंती **म**हाभारतांतील कांहीं आख्यानें नीट समजलीं म्हणजे सगळा **का**लिदास व सगळा **भा**रवि वाचण्याचें श्रेय मिळून आणखीही अधिक लाभ होतो. तो लाभ भक्तिरसाचा व देवाविषयीं आस्तिक्यबुद्धीचा होय. भक्तिरसाचा लाभ **का**लिदासाच्या काव्यांत फारसा होण्याचा संभव नाहीं. **भा**रवीनें आपल्या काव्यांत भक्तिरसाचा छाटा निःसंशय उडविलेला आहे. पण कोठें **मो**रोपंती भक्तिसागराचा अलोट पूर व कोठें **भा**रवीची भक्तिरसानें मंद मंद वहात जाणारी छोटी सरस्वती!!! पदलालित्य **दं**डीचें लोकोत्तर समजलें जातें व उपमालंकार **का**लिदासाचा सुरेख समजतात. **पं**तांच्या काव्यांतील पदलालित्य **दं**डीसारखेंच लोकोत्तर असून, **पं**तांनीं स्थळोस्थळीं बांधलेले उपमालंकार अतिसुरेख आहेत. सारांश **का**लिदासाची, **भा**रवीची व **दं**डीची–मिळून त्रिवेणी एकट्या **मो**रोपंतामध्यें एकत्र संगम झालेली उघड आढळते.' [**प्रो० रा० रा०** भागवत–**इं**दुप्रकाश–ता० १९।९।९२.]

१. कुंतीच्या. [अ० १४० श्लो० २८.] २. सितच्छदां सुखगा (श्वेतपक्ष हंसाला) जसा काकांचा (कावळ्यांचा) सहवास (समागम, सोबत) तसा तुज (कर्णाला) यांचा (या दुष्ट कौरवांचा) [सहवास अहितप्रद, यास्तव यांची सोबत टाक–असा अभिप्राय.] या प्रसंगाचें **अमरचंद्रसूरिकृत 'बालभारता'**त वर्णन असें केलें आहे. 'कर्ण मा स्वमपवर्णय वृत्तं बंधुवर्गमधुनापि भज स्वम् । राज्यभाजमिह धर्मजमुख्यास्त्वां नमंतु तव कोऽपि न मंतुः ॥ अग्रजं विभुमवाप्य भवंतं दुर्जयेषु खलु तेषु विपक्षैः । वीर जीवदखिलात्मतनूजा प्रीतिमेतु जननी तव कुंती ॥ परस्परोन्मूलनमूलसंधा बंधान्निवर्ते त्वयि फाल्गुने च । अविग्रहं वीर सहस्रदृष्टेः सहस्रभासा सह मैत्र्यमस्तु ॥' [**बालभारत**–उद्योगपर्व–स०२ श्लो०७८-८०.] ३. हा उपमालंकार आहे. **पं**तांचा हा अलंकार फार आवडता असून काकहंसांची भेदरूपानें तुलना ही फार प्रिय आहे. संस्कृतांत काकहंसपर अन्योक्तींचा भरणा फार मोठा आहे. ४. श्वेतपक्ष अशा. ५. उत्तम पक्षिहंसास.

कर्ण म्हणे[1], 'बा! देवा! वदसि स्नेहेंचि बा! दयाळो! हें; ।
भटकरगें[2] जोडावी स्पर्शमणीची[3] कसी दैया[4] लोहें[5]? ॥ ८०
मातृत्यक्ता मैंजला[6] राधाहस्तीं[7] दिलें अधिरथानें, ।
मज[8] पाजाया प्रेमें पय पळ धरिती तिचीं न धिर थानें. ॥ ८१
निष्फळ कसें करूं गा! बा! परिहृतसर्वनतनराधे[9]! तें? ।
मेल्यांवांचुन[10] द्यावें जोडुनि सुतशोकवतन[11] राधेतें? ॥ ८२
दुर्योधन[12] नांवाचा राजा मी, सर्व राज्यभोग मला, ।
मूर्त नरक नरकविच्या[13] हृदयाला, जो कृतघ्न, तो गमला. ॥ ८३
संस्कार विवाहावधि[14] केले माझे यथोक्त[15] सूतानें, ।

---

१. अध्याय १४१ श्लोक १-५७ पहा. २. भट (वीर) कर (हात) ग (गेलेलें)=वीराच्या हातांत असलेल्या (लोहें=शस्त्रें). ३. परिसाची. ४. दया जोडणें संभवनीय नाहीं—असा भाव. ५. शस्त्रानें. येथें 'लोह' म्हणजे लोहाचें केलेलें शस्त्र (तरवार) असा अर्थ उपलक्षणेनें (Synechdoche) घेतला आहे. ६. मोरोपंत—आदिपर्व—अ० १६ गी० १६-१८ पहा. ७. राधा=अधिरथाची बायको. ८. [मूल जन्मलें कीं त्यास आंगावरील दूध पाजावें असें प्रत्येक आईस वात्सल्यभरानें वाटतें, हें लक्षण ज्या स्त्रीमध्यें नाहीं ती खरोखर जन्मदात्री असली तरी आई नव्हे, आणि हें लक्षण जींत आहे ती जननी नसली तरी ती आईच समजली पाहिजे असें प्रतिपादन करीत कर्ण म्हणतो.] पय प्रेमें मज पाजाया तिचीं (त्या राधेचीं) थानें (स्तन) पळ (पळभरही अल्पकाळ देखील) धिर न धरिती (अवकाश लावीत नाहींत, उतावीळ झालीं—प्रेमानें फुटलेला पान्हा मला पाजण्यास राधा फार आतुर झाली म्हणून तीच माझी खरी आई होय—असा अभिप्राय.) ९. परिहृत+सर्व+नत+नर+आधि=दूर केला+सकल+शरणागत+मानसिक चिंता=सकल शरणागत जनाची काळजी ज्यानें दूर केली अशा हे कृष्णा! १०. जीवंत असतांच मी राधेला पुत्रशोकाचें दुःख कसें देऊं? माझी आई राधा आहे ती तशीच राहणार, माझी आई कुंती होणें अशक्य आहे. मी जीवंत असून दुसरी आई केली, असें समजून राधेनें पुत्रशोक करावा हें उचित आहे काय? ११. हा समास चिंतनीय होय. १२. दुर्योधन नांवाचा राजा, (खरा राजा) मी (आहें)—असा भाव. १३. जो (मनुष्य) कृतघ्न [आहे] तो नरकविच्या (नरपंडिताच्या) हृदयाला (मनाला) मूर्त (मूर्तिमान्, प्रत्यक्ष देहधारी) नरक गमला (वाटला)—असा अन्वय. मी कृतघ्न झालों तर पंडितजन मला प्रत्यक्ष नरक गणतील—असा भाव. जो कृतघ्न आहे तो सर्वस्वी नरकासारखा त्याज्य आणि गर्हणीय होय असें सांगण्याचें तात्पर्य. १४. विवाह+अवधि=लग्न+मर्यादा=विवाहपर्यंतचे संस्कार (जातकर्मनामकरणादि संस्कार—अ० १४१ श्लो० ९-११). १५. यथाविधि, यथाशास्त्र.

[1]निर्मळपणें [2]निघावें [3]रक्तपटांतूनि केंवि [4]सूतानें? ॥ ८४
[5]समरमखचि होऊं द्या, [6]क्षत्रिय सेवूत [7]तल्प न [8]गदानीं, ।
[9]पुण्यरणमरणदानीं वीरां जें, तें न कल्पनगदानीं. ॥ ८५
[10]पतितासि सांवरी मृदु [11]शुचि हा उपदेश केशवा ! [12]तूळ, ।

---

१. शुभ्रपणानें. २. तांबड्या वस्त्रांतून. रंगवलेल्या वस्त्राचें सूत वेगळें केलें तरी तें रंगीत असणारच. सूताचा रंग मूळचा शुभ्र असला तरी रंगीत वस्त्रांतून शुभ्रवर्ण सूत मिळावयाचें नाहीं. तसेंच मूळचा जन्म जरी श्रेष्ठ वर्णातला असला तरी अधमवर्णांत जातकर्मादिक संस्कार होऊन इतके दिवस गेल्यामुळें आतां श्रेष्ठ वर्णाचा म्हणविणें हें अनुचित, निंद्य आणि अतएव अकार्य होय असें जाणविलें आहे. ३. रक्तपटांतून सूत कधींही शुभ्रवर्ण निघावयाचें नाहीं–असा भावार्थ. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ४. पांढऱ्या सूतानें. ५. युद्धयज्ञ. ६. गदांनीं (रोग प्राप्त झाल्यामुळें) क्षत्रियांनीं तल्प (शय्या) सेवूं नये. रोगग्रस्त होऊन बिछान्यावर खितपत पडून राहणें हें क्षत्रियाला अनुचित आहे. पंतांनीं एका ठिकाणीं रणमरणाविषयीं असेंच लिहिलें आहे.:–'शुचिमति यति अतियत्नें जें जोडिति सहज वीर युद्धीं तें। रणमखजशुद्धि लाजवि यज्ञव्रततीर्थदानशुद्धीतें. ॥६४॥ पावे भव्य रणमखीं जो शत्रुजना न पाठि दे वांचे, । वीर मरे जो त्यासहि सत्कारिति सर्व नाथ देवाचे. ॥६५॥ अघहर शुभकर तीर्थ श्रुति आम्हां क्षत्रियांसि युद्ध वदे. ।' [कर्णपर्व–अ० ४६.] ७. शय्या. ८. रोगांनीं. ९. [दान घेण्यांत पुण्य नाहीं पण दान देण्यांत पुण्य आहे अशी गोष्ट आहे खरी, तथापि क्षत्रिय वीरांची गोष्ट निराळी आहे.] वीरां (वीर क्षत्रियांला) जें पुण्य रणमरणदानीं [आहे] तें [पुण्य] कल्पनगदानीं [नाहीं]–असा अन्वय. वीरांला रणांत मरणदान मिळाल्यानें जें पुण्य (प्राप्त होणार आहे) तें पुण्य कल्पवृक्षदान केल्यानें प्राप्त व्हावयाचें नाहीं. 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गम्' म्हणजे 'जर युद्धांत मृत झालास तर स्वर्गास जाशील' असें गीतेंत आहे. [गीता–अ० २ श्लो० ३७.] रणमरणदान घेण्यांत जें पुण्य क्षत्रियांला आहे तें कल्पवृक्षदान देण्यांत नाहीं. १०. [हे कृष्णा! केशवा!] हा उपदेश मृदु [आणि] शुचि तूळ (कापूस) [जसा] पतितासि (पातक्यास, पक्षीं पडलेल्या जनाला) सांवरी (रक्षितो)= मृदु (कोमल–मऊ) [आणि] शुचि शुभ्र, (केरकचरा नाहीं असा) तूल (कापूस) जसा पतिताला (पडलेल्या मनुष्यास) सांवरी (सांवरतो, बचाव करतो, रक्षण करतो) तसा हा तुझा मृदु (अकठोर, मार्दवमय, स्नेहयुक्त) आणि शुचि (निर्दोष, पवित्र) उपदेश (बोध) पतितासि (भ्रष्टाला) सांवरी (सांवरणारा आहे) [असा तुझा उपदेश योग्य आहे, परंतु त्याचा मला उपयोग नाहीं. कारण, हे केशवा!] अंबार्पित (अंबा+अर्पित=आईनें+दिलेला, असला तथापि) वातूळ (वावडा, वातकारक) पदार्थलेश अतिरुग्णासि जैसा [तैसा हा तुझा उपदेश मला आहे]. आईनें ममतापूर्वक दिलेला अल्प वातूळ पदार्थ रोग्याला जसा अपायकारक होतो, तसा तुझा उपदेश मातृसदृश वात्सल्यानें जरी केलेला आहे तरी तो माझ्या उपयोगाचा नाहीं. 'अंबार्पित,' 'आईनें दिलेला' या पदानें देणाराचें प्रेम, वात्सल्य, शुद्ध हेतु इत्यादि गुण गृहीत केले

जैसा अंबार्पित अतिरुग्णासि पदार्थलेश वातूळ. ॥ ८६

श्रीकृष्णजी! करावा कैसा विश्वासघात अवसानीं?। 

युद्ध कसें न करावें आम्हां हा युद्धलाभ नवसांनीं? ॥ ८७

तरि मग उरलें काय? प्रभुजी! त्यजिल्या जरि प्रतिज्ञा त्या?। 

नेंच सोडवेल देउनि धीर भरंवसा अरिप्रति, ज्ञात्या! ॥ ८८

राज्य न करील देइल धर्म मला उमजतांचि हें नातें, । 

देईन सुयोधना मी तेव्हां होइल तुम्हांसि हें ना तें. ॥ ८९

---

आहेत म्हणून हें साभिप्राय विशेषण आहे. ज्याविषयीं शंका येईल अशा मनुष्यानें दिलेला नव्हे; तर अत्यंत काळजीच्या आणि जिव्हाळ्याच्या मनुष्यानें दिलेला. ११. या अर्थात पतित, मृदु आणि शुचि हीं पदें श्लिष्ट आहेत. जेथें अनेकार्थक शब्दांची योजना जाणूनबुजून बुद्धिपुरःसर केलेली असते आणि ते अनेक अर्थ विवक्षित असतात तेथें 'श्लेष' नामक अलंकार होतो. याचें लक्षणः–(१) नानार्थसंश्रयैः शब्दैः साधर्म्यप्रतिपादनम् । वर्ण्यावर्ण्योभयेषां चेच्छ्लेषालंकृतिरिष्यते. ॥ [मंदारमरंदचंपू १०–व्यंग्यबिंदु], (२) पदैस्तैरेव भिन्नैर्वा वाक्यं वक्त्येकमेव हि । अनेकमर्थं यत्रासौ श्लेष इत्युच्यते यथा ॥ [वाग्भटालंकार–परिच्छेद ४ श्लोक १२८ पृ० ५६.] जेथें एकच वाक्य त्या त्या पदांनीं अथवा भिन्न पदांनीं अनेकार्थ दाखवितें तेथें श्लेषालंकार होतो. याचीं उदाहरणें:–(१) तूं मलिन कुटिल नीरस जडहि पुनर्भवपणेंहि कचसाच। धरिला शिरींहि न स्वप्रकृतिगुण त्यजसि नाम कच साच. ॥ [मोरोपंत–आदिपर्व–अ० ९ गी० ६३ पृ० ५८.], (२) जरि शुचिमूर्ति सुवृत्ता मान्या श्रवणोचितें गुणें मुक्ता। विद्धा जडाहि ते हे अगुणाही तीस करि उणें मुक्ता ॥[सन्मणिमाला–४ पृ० १.] पंतांच्या काव्यांत भरपूर श्लेष आहेत असा जो लोकांचा समज आज इतकीं वर्षें झालेला आहे तो केवळ निराधार आहे. श्लेषप्रयोगांचीं उदाहरणें कोठें कोठें आढळतात हें खरें आहे, तथापि जेथें श्लेष योजिला आहे अशीं पदें सुप्रसिद्ध सुबोध आणि परिचित असून त्यांत खटाटोप केल्याचा भास सुद्धां होत नाहीं. अमृत, भुजग, द्विजराज, अंबर, मार्गण अशासारख्या सुप्रसिद्ध शब्दांवर एखाद्या पद्यांत श्लेष आहे. [निबंधमाला–अंक ५८.] १२. कापूस.

१. रोग्याला. २. अंतीं, शेवटीं. ३. त्या सुप्रसिद्ध सर्वश्रुत अशा प्रतिज्ञा. तें सत्र पूर्ण होतां, कर्ण म्हणे, 'पांडवायु हरिशील,। ऐसाचि कुरुपते! तूं विश्वस्तुत राजसूय करिशील. ॥ जोंवरि न अर्जुनातें मारीन रणांगणांत मी स्वशरें, । तोंवरि न पादधावन करवीन करीन आपुल्याचि करें. ॥ सेवीन न मांसातें, जैसा मोक्षेच्छु सुजन न सुरेतें, । न तदुक्त मृषा ज्याचें सुक्षेत्रामाजि सुजनन सुरेतें.' ॥ [वनपर्व–अ० ७ गी० ११७–११९ पृ० १२०.] ४. [हे ज्ञात्या! कृष्णा!] धीर आणि भरंवसा देऊन शत्रूलाही सोडणें उचित नाहीं, मग मित्राला कसें सोडतां येईल? ५. राज्य देईन–असा अन्वय. ६. हें नाहीं आणि

आटोपिला न पहिला, तो आटोपेल काय गा! ऊत[1]? ।
जोडा यश; कवि, होउनि रोमांचव्याप्तकाय[3], गाऊत. ॥ ९०
धारातीर्थींच[4] मिळे सद्गति[5] सत्कीर्ति शुद्धि अधमातें, ।
राज्यपदभोग न लगे, द्यावा देवा! रणांत वध मातें. ॥ ९१
मज समजलें[6] प्रभो! हें त्वद्दृष्टिपुढें उरेल न क्षत्र[7]; ।
रवि कालरुद्रदृष्टिसि[8] न पुरे, तेथें पुरेल नक्षत्र[9]? ॥ ९२
तूं स्वाश्रितप्रतिज्ञा[10] करिसिल, न धरूनि शस्त्र, सत्या गा! ।
उरतिल कैसे करिते झाले जे, हरुनि वस्त्र, सत्यागा[11]? ॥ ९३

---

तें नाहीं असें तुम्हाला होईल. राज्यप्राप्ति नाहीं आणि लढाईच्या मार्गानें जयप्राप्ति नाहीं असे तुम्ही दोन्ही बाजूंनीं फसाल. कर्णप्राप्ति नाहीं आणि राज्यप्राप्ति नाहीं असें होईल. यास्तव मी पांडवांचा बंधु आहें हें मनांत न आणतां युद्ध करा हेंच उत्तम. मी वडील बंधु आहें असें नातें (संबंध) धर्मास कळलें म्हणजे तो आपण राज्य करणार नाहीं, तो ज्येष्ठत्वाचा अधिकार मनांत आणून तें राज्य मला देईल. मी तें राज्य मित्रलोभानें अर्थात् दुर्योधनाला देईन. मग तुम्हांला 'हें ना तें' असें होईल. तेल नाहीं तूप नाहीं धुपाटणें हातीं येईल अशी तुमची दुरवस्था होईल, बंधुपरी बंधु नाहीं, राज्यापरी राज्य नाहीं, अशी तुमची दीन अनुकंपार्ह स्थिति होईल.

१. पहिला ऊत आटोपिला न=दुर्योधनप्रेमरूप दुधास आलेला पहिला कढ आरंभींच आटपण्याचा यत्न केला नाहीं, तर (त्या प्रेमरूप दुग्धाला आलेला) तो (ऊत) [आतां] आटोपेल काय? [आटपण्याची वेळ निघून गेल्यावर दुधाच्या ऊताला आटपण्याचा यत्न करणें व्यर्थ आहे.] [आतां युद्धच करून] यश जोडा (जयश्री मिळवा); रोमांचव्याप्तकाय (पुलकितदेह, रोमांचितगात्र) होउनि कवि [यश] गाऊत (यश गाओत. तुमच्या जयश्रीचें वर्णन करोत. तुमचें यश कवींनीं सहर्ष गावें–स्तवावें.) मला ज्यावेळेस तुम्ही आपल्या पक्षांत आणावयाचें होतें. त्यावेळेस आणिलें नाहीं, माझें पोषणलालन बालपणींच तुमच्या घरीं कुंतीनें केलें पाहिजे होतें, पण तसें कांहीं त्यावेळीं झालें नाहीं, तर आतां माझें मन दुर्योधनाकडे प्रेमपाशानें बद्ध झालें असतां, मला राज्याचा लोभ (आमिष) दाखवून वश करूं पाहणें व्यर्थ होय–असा भाव. २. दुर्योधनाविषयीं माझ्या (कर्णाच्या) मनाचा प्रेमौघ. ३. रोमांचांनीं प्रफुल्लित देह ज्यांचे. ४. शस्त्रधारारूप तीर्थामध्यें. ५. उत्तम गति, मुक्ति. ६. अ० १४१ श्लो० ५३ पहा. ७. क्षत्रिय. ८. काल (प्रलयकर्ता) जो रुद्र (शंकर) त्याच्या दृष्टीला. ९. नक्षत्र पुरणार नाहीं–असा भाव. येथें प्रश्नपूर्वक **काव्यार्थापत्ति** अलंकार झाला आहे. १०. आपल्या धर्म भीम अर्जुन इत्यादि आश्रितांच्या (भक्तांच्या) प्रतिज्ञा. [सभापर्व–अ० ७ गी० १६-२७ पृ० ६४-६५ यांत पांडवांच्या प्रतिज्ञांचा उल्लेख आहे. हें कर्णाचें भाषण उपरोधिक नसून खऱ्या समजुतीचें आहे.] ११. सतीच्या आगा=अपराधा. द्रौपदीच्या अपराधा.

देव म्हणे, '[1]राज्य नको? [2]उपदेश अयोग्य काय हे महिम्या? ।
क्लीबाला कन्यासी तुज कां द्यावी [3]बळेंचि, हे [4]महि, म्यां? ॥ ९४
[5]जेथें **भीम धनंजय** बहुदुःसह [6]वासवा [7]रणाजिर तें ।
[8]हरिलंघन असतांही [9]बलिगजसहवास वारणा जिरतें? ॥ ९५
[10]धनदानें [11]अधनाचा तुमचा तैसाचि काम [12]रणदानें ।

---

१. [हे कर्णा!] तुला राज्य नको काय? २. हे (मीं केलेला) उपदेश [तुमच्या] महिम्या (मोठेपणास) अयोग्य आहे काय? मीं (कृष्णानें) केलेला (तूं राज्य करावें असा) उपदेश तुमची कीर्ति आणि महत्त्व वाढविण्यास अयोग्य आहे काय? ३. आग्रहानें. ४. पृथ्वी. [हे कर्णा! तुला जर राज्य नको आहे तर,] हे महि (ही पृथ्वी) म्यां (कृष्णानें) तुज (कर्णाला, राज्यलाभाविषयीं निरिच्छ अशा तुला) बळें (मुद्दाम) होऊन, जबरीनें) [जशी] क्लीबाला (नपुंसकाला) कन्यासी (कन्या तशी) कां द्यावी? अर्थात् देऊं नये. हाच उचित पक्ष होय. या उत्तरार्धांत **उपमा** अलंकार आहे. ५. ज्या रणाजिरांत (रणांगणांत) भीम [आणि] धनंजय (अर्जुन) [आहेत] तें रणाजिर वासवा (इंद्रालासुद्धां) बहुदुःसह [आहे]. ६. इंद्राला. ७. रणांगण. ८. सिंहलंघन. ९. बलिगजसहवास (बलशाली हत्तींचा समागम) असतांही असला तथापि) [मदत करण्यास मोठे मोठे बलवान् असे गज असले तथापि] वारणा (हत्तीला) हरिलंघन (सिंहाचा अतिक्रम, सिंहाची अमर्यादा करणें) जिरतें? (पचतें काय?) पुष्कळ हत्ती मिळाले तरी त्यांचें सिंहापुढें कांहीं चालावयाचें नाहीं–असा भाव. हें अर्ध सुभाषितरूप असून प्रश्नालंकाराचें उदाहरण आहे. [वारण=हत्ती. 'मतंगजो गजो नागः कुंजरो वारणः करी' इत्यमरः । वारयति शत्रुबलमिति वारणः । 'वारणं प्रतिषेधे स्याद्वारणस्तु मतंगजे' इति विश्वः.] १०. कुबेरानें. ११. दरिद्राचा, धनहीनाचा. कुबेरानें धनहीनाचा काम (मनोरथ) जसा पुरवावा तसा म्यां रणदानें (ह्या रण देणाऱ्या कृष्णानें) तुमचा (कौरवांचा) मनोरथ पुरविला पाहिजे. मूळांत 'अनघाचा' असा पाठ आहे तरी 'अधनाचा' हाच पाठ युक्त व शुद्ध दिसतो. सान्वयार्थ–[जैसा] धनदानें (कुबेरानें किंवा दात्यानें) अधनाचा [काम धनदानें (पैसे देण्यानें) पुरविजे] तैसाचि म्यां (कृष्णानें) रणदानें (लढाईच्या दानानें किंवा देणगीनें तुमचा (कर्णादि कौरवांचा) काम पुरविजेल. स्वरगें (स्वः+अगें=कल्पवृक्षानें) इतरें [दानें] द्यावीं [मग] मरणदानें कां न [द्यावीं]? जर कल्पवृक्ष सर्व प्रकारच्या कामना पूर्ण करितो तर त्यानें याचकांची मरणाची कामना कां पूर्ण करूं नये? अवश्य करावी–हा भाव. कौरवांना मरणाव्यतिरिक्त जर दुसरी गोष्ट नकोच आहे तर तें देणें मला अवश्य आहे व तें मी देणार असा कृष्णोक्तीचा आशय. कल्पवृक्ष जशीं इतर दानें देतों तसें मरणदान ही त्यानें याचकानें मागितलें असतां अवश्य दिलें पाहिजे. मी कल्पवृक्ष तुम्हास राज्य देतों म्हणतों, तुम्ही तें न घेतां मरणदान मागतां, तर ठीक आहे, मी तें तुम्हांस तुमच्या इच्छेप्रमाणें देईन. सपाद पूर्वार्ध–उपमालंकार. चरमचरण–सप्रश्नार्थांतरन्यासालंकार. १२. रण+द=युद्ध+दाता मी त्यानें.

म्यां पुरविजेल द्यावीं [1]स्वरगें इतरें न का मरणदानें? ॥ ९६
जा, सर्व सिद्ध व्हा; जरि आहे उद्युक्त [2]मानस मराया, ।
[3]सम रायास तुम्हांसहि **भीमार्जुन** वरद, शीघ्र समरा या. ॥ ९७
देईल **कुरुक्षेत्रीं धर्म** प्रभुवर [4]तुम्हां [5]निधनदानें ।
[6]धनदानें जसिं येणें न दिलीं उदकें [7]तथाविध [8]नदानें.' ॥ ९८
**कर्ण** [9]म्हणे, 'बा! [10]वचना मान्य न झालों म्हणों नको, पावें, ।

---

१. स्वर्+अगें=स्वर्ग+वृक्षें=कल्पवृक्षानें. २. इच्छा. मरण्याची इच्छा धरून प्रवृत्त झालां असाल तर युद्ध करण्याची तयारी करा. ३. भीमार्जुन रायास [आणि] तुम्हासही सम वरद [आहेत, यास्तव] समरा शीघ्र या–असा अन्वय. भीम आणि अर्जुन हे राजा आणि इतर जन यांचा भेद न मानितां सर्वांचा सारखा खरपूस समाचार घेण्यास समर्थ आहेत असें सांगण्याच्या हेतूनें कृष्ण म्हणतो. रायास (दुर्योधनाला) [आणि] तुम्हासही (कर्णादिक मित्रांला देखील) सम वरद (सारखेच मनोरथ पुरविणारे आहेत.) [यास्तव शंका न धरितां] समरा (युद्धाला) शीघ्र (त्वरित) या (चला, युद्ध करण्यास त्वरित उभे रहा). तुम्ही मरण मागत आहां, तर तुम्हाला आणि तुमच्या राजाला मरण देण्यास समर्थ असे भीमार्जुन आहेत. तुम्हा कौरवांला तुमचा इष्ट वर देण्यास भीमार्जुन सिद्ध आहेत, रणभूमीवर चला म्हणजे इष्टार्थप्राप्ति होईल. येथें 'रायास' म्हणजे धर्माला असाही अर्थ संभवनीय आहे. भीमार्जुन तुम्हांस [व] रायास सम वरद [आहेत]. धर्मराजा राज्य मागतो म्हणून त्यास भीमार्जुन राज्य देणार आणि तुम्ही मरण मागतां म्हणून ते तुम्हास मरण देणार आहेत. ४. कौरवांला, कौरवपक्षीय जनांला. ५. निधन+दानें=मरण+देणग्या=मरणरूप दानें. धर्मराजा मोठा दाता आहे, तो तुम्हाला तुमचें इष्ट मनोगत (मरण) देईल. ६. धर्म हा मोठा उदार दाता आहे असा अर्थ प्रतिपादित होतसाता कृष्ण म्हणतोः– जसि (ज्याप्रमाणें विपुल) येणें (धर्मानें) (धनदानें, द्रव्यदानें, पैशाच्या देणग्या) दिलीं तथाविध (त्या प्रकारचीं–तशीं, तथा+विध=तशीं+प्रकार) नदानें (एखाद्या उदकपरिपूर्ण नदीनें) उदकें (जलें) न दिलीं. धर्मराजानें जितकें धन दिलें तितकें नदानें उदकही दिलें नसेल. ७. तशी. ८. नदीनें. ९. अध्याय १४३ श्लो० २-४५ पहा. १०. कर्ण म्हणेः– बा! (कृष्णा!) पावें. (कृपा कर, प्रसन्न हो) [तुझ्या] वचना मान्य न झालों [असें] म्हणों नको (मीं तुझें बोलणें ऐकिलें नाहीं असें म्हणूं नको, मीं तुझी अवज्ञा केली असें समजून रोष धरूं नको), वध्यें (ज्याचा वध उचित आहे त्यानें, देहांत प्रायश्चित्त ज्यास योग्य आहे त्यानें) 'वधाचि' म्हणतां (वधच करा असा आग्रह धरिला असतां, माझा वध केलाच पाहिजे असें निकरानें म्हटलें असतां,) आग्रह म्हणोन (त्याचा हा आग्रह आहे यास्तव, त्यानें हा आग्रह धरिला या कारणास्तव) प्रभुनें कोपावें काय? (प्रभुनें कोप करावा हें उचित आहे काय? अर्थात् तो कोपास पात्र नसून दयेसच पात्र आहे, त्याजवर प्रभूनें कोप न करितां दयाच करावी–असा भावार्थ.

वध्यें 'वधाचि' म्हणतां, प्रभुनें आग्रह म्हणोन कोपावें? ॥ ९९
सत्य उपदेश आम्हीं[1] वरिचेवरि भव्यहेतु[2] झेलावे[3], ।
जाणोनि[4] सर्व देवा! लाविसि कां बोल? हे तुझे लावे[5]. ॥ १००
स्वप्नांत[6] पाहिले नृप[7] शांतनव[8] द्रोण हाहि दाता[9] हे, ।
घेऊनि उंष्ट्रयानीं[10] बैसुनि दक्षिणदिशेसि[11] जाताहे. ॥ १०१
रक्तोष्णीषधर[12] सकल सुश्वेतोष्णीषधर[13] तिघे मात्र, ।
कृप कृतवर्मा अश्वत्थामा मलयजरजोधवलगात्र[14]. ॥ १०२
शुभ्रसहस्रस्तंभ[15] प्रासादीं धरुनि शुभ्र माल्याला[16] ।
चढला धर्म श्वेतोष्णीषा दत्तोडुपभ्रमा[17] त्याला[18]. ॥ १०३

---

१. आम्हीं कौरवांनीं व तत्पक्षीय जनांनीं. २. हितहेतु. ३. उपदेश झेलणें=उपदेश शिरसावंद्य मानणें. लहान मनुष्य थोराचा शब्द झेलतो म्हणजे त्याचा शब्द शिरसावंद्य समजतो, त्याच्या शब्दाप्रमाणें करतो, त्याच्या शब्दाला खालीं पडूं देत नाहीं. उपदेशाप्रमाणें वागतो. ४. 'जाणोनि' या शब्दानें पुढें घडून येणारें घनघोर महायुद्ध व तज्जन्य महानर्थ, कुरुकुलसंहार, भूभारहरण इत्यादि भावी गोष्टी कृष्णाला माहीत असून कृष्ण उगाच आग्रह करतो, याजवर त्याला आपण काय उत्तर द्यावें, जो सर्व समजून उमजून विचारतो त्याला काय उत्तर द्यावें हें आपणास कळत नाहीं—असें कर्ण दर्शवीत आहे. [अ० १४३ श्लो० २-७.] पृथ्वीचा विनाशकाल उपस्थित झाला असून त्याला शकुनि, मी, दुःशासन आणि दुर्योधन निमित्त होत हें सर्वांतर्यामी सर्वज्ञ कृष्णाला माहीत असून तो मला पांडवांचा पक्ष स्वीकारण्यास गळ घालतो आणि आम्हाला शब्द लावितो हें सर्व आश्चर्यच होय असें कर्णोक्तीचें तात्पर्य. ५. खेळ. [लावा=अर्थवाद, अर्थशून्य शब्दालंकार, वाग्गारुड. लावालावी करणें, तिखटमीठ लावून सांगणें.] ६. अध्याय १४३ श्लो० ६-२५ पहा. ७. धृतराष्ट्र. ८. भीष्म. [अ० १४३ श्लो० ४३.] ९. हा दानशील कर्ण. १०. उंट. ११. 'अगस्त्यशास्ता दिशेला' असें मूळांत आहे. [अ० १४३ श्लो० ४४.] दक्षिणदिशा ही यमाची दिशा होय. १२. आरक्त पागोटीं धारण करणारे. [अ० १४३ श्लो० ४१-४२.] १३. कृप, कृतवर्मा आणि गुरुसुत हे मात्र या घोर भारत संग्रामांत मरावयाचे नव्हते म्हणून यांस श्वेतोष्णीषधर असें विशेषण लावलें आहे. मोरोपंतकृत शल्यपर्व—अ० १ गीति ३ पहा. १४. चंदनरजाप्रमाणें शुभ्र देह ज्यांचा असे. मलयज=चंदन. 'मलयागिरावेव चंदनोत्पत्तिः' इति काव्यानुशासने. १५. शुभ्र सहस्र आहेत खांब ज्या गृहाला. १६. पुष्पाला. १७. चंद्रभ्रांति देणाऱ्या. १८. चंद्राच्या शुभ्र कांतीचा भ्रम उत्पन्न करणारें असें श्वेत उष्णीष धर्माच्या मस्तकावर होतें—असें तात्पर्य. कर्णानें स्वप्नांत जें कांहीं पाहिलें त्याचें हें वर्णन आहे.

सहदेव नकुळ सात्यकि भीमार्जुन धर्म तूंहि बापा! हे ।
सत तुम्हीं श्वेतगजीं ऐसें स्वप्नांत कर्ण हा पाहे.' ॥ १०४

---

१. हे ताता कृष्णा! २. सात. ३. शुभ्रगजारूढ. ४. कर्णानें जीं अनेक घोर स्वप्नें आणि अशुभसूचक चिन्हें पाहिलीं त्यांचें वर्णन मूळांत बरेंच विस्तृत आहे. शनीनें रोहिणीशकटभेद केला, मंगळ ज्येष्ठानक्षत्रीं होता, महापाताख्य ग्रह चित्रेला पीडा करी. चंद्र आणि सूर्य यांच्या स्थितीवरून सोमवंशीय आणि सूर्यवंशीय राजांचा क्षयकाल समीप ठेपला असें दिसलें. पशूंचें भक्षण अल्प आणि पुरीषादि उत्सर्ग विपुल इत्यादि अनेक दुश्चिन्हें कर्णानें पाहिलीं. ह्यावरून पांडवांचा जय आणि कौरवांचा पराजय होणार ही गोष्ट कर्णाच्या मनांत पक्की बिंबली होती. या प्रसंगाचें वर्णन **गोपाल**कवीनें केलें आहे तें असें:—"**कर्ण** म्हणे, 'कमलपाणी! । सर्व जाणता तूं ज्ञानी । तरी मातें आग्रह करूनी । मोह किमर्थ घालिसी? ॥ १ ॥ **शकुनी** मी **दुः**शासन । चौथा नृपति **दुर्योधन** । आमुच्या निमित्तें निधन । पातलें अच्युत! वीरासीं. ॥ २ ॥ भारातीत करावया धरा । आपणें धरिलें अवतारा । संपादुनी त्या चरित्रा । दुष्ट थारा मोडावा. ॥ ३ ॥ **कुरुपां**डवांच्या संग्रामीं । रक्तकर्दमपूर्ण भूमी । राजे राजपुत्र **का**लधामीं । प्रविष्ट होतील असंख्य. ॥ ४ ॥ स्वप्नीं चिन्हें उत्पात दारुण । होती, नाशाचें कारण । **गां**धारीचे शत नंदन । निमतील मत्संगें. ॥ ५ ॥ ग्रह थोर आवरी **रो**हिणीतें । प्राणेश्वर पीडिती प्रजांतें । **भौम** झांकुनी दुष्टांतें । अनुराधातें दर्पितू. ॥ ६ ॥ कीलक्षणीं कमलिनीकांत । राहू सूर्यासमीप येत । दिवसा उल्कांचे निर्घात । धरा कांपे क्षणक्षणां ॥ ७ ॥ गज श्वासोच्छ्वास सोडिती । शालेमाजी वाजी रुदती । तृणोदकां न स्फुंदती । मळ बहू स्वल्पाशनें. ॥ ८ ॥ जयचिन्हें मृग पांडवां । सांगती, पराभव कौरवां; । नभोदेवता **वा**सुदेवा! । अनर्थ नेमी भूतांतें. ॥ ९ ॥ शिखी हंस सारस चातक । करिती सूचना क्षयकारक । मक्षिकादेशाचें कटक । चतुष्पदांसी रुपताती. ॥ १० ॥ भेरीवाद्यांचे जाहले घोष । मलिन झालेंसे आकाश । रत्नस्थानें धर्मपुरुष । वरील भूमी भामिनी ॥ ११ ॥ पांडवसैन्यीं न ताडितां । भूमी कंपे भेरी गर्जतां । पावन गो मुखें नर्दतां । वृषभमाज ज्यापरी. ॥ १२ ॥ नाश अजगर **कौ**रवांतें । ग्राशील तेंवीच शोषनीतें । मेघ वर्षे सूर्याभोंवते । दुश्चिन्ह दुर्ग, दिसताती. ॥ १३ ॥ गंड कबंध परिघ शैल । नभीं दिसताती विशाल । उदय अस्तमान वेळ । भयंकर समस्तांतें ॥ १४ ॥ कृष्णग्रीवा लंबायमान । शकुनी भ्रमती विलक्षण । येणें नष्टात्मा **दु**र्योधन । मृत्यु पावेल मित्रेंसी. ॥ १५ ॥ पूर्वदिशा लोहितवर्ण । कृष्णरंगें दिसे लक्षण । ममपुत्रासमान न कृष्ण । अस्त कुंकुमीचें पाहें पां. ॥ १६ ॥ उत्तर प्रदीप्त तेज वरी । या दुश्चिन्हें माझ्या अंतरीं । वाटे **कौ**रवकुळसागरीं । **काळ** अगस्ती क्षोभला. ॥ १७ ॥ स्वप्नीं देखिला **यु**धिष्ठर । सहस्र स्तंभांचें गोपुर । माजीं बैसला सहोदर । सन्मानुनी आपुले. ॥ १८ ॥ शुक्लांबरें शुक्लवसनें । आंगीं धरिलीं दिव्यभूषणें । अंत्रमाला रुधिर जाणे । तळीं चर्चित वसुंधरा ॥ १९ ॥ अस्थींचा गिरी नभचुंबित । त्यावरी धर्म सर्वज्ञनाथ । बैसला, सुवर्णपात्रीं घृत । पायसांसी भक्षीतसे.

श्रीकृष्ण म्हणे, 'बहुधा मरणारचि हे[1] समस्त सुपदेश[2], ।
कीं[3] तव हृदयें माझा हि[4]तहि स्वीकारिला न उपदेश.' ॥ १०५
कर्ण म्हणे, 'भेटि असो परलोकीं मात्र बा! दयालो! कीं ।
कलहीं स्नेह न राहे, हे दुर्लभ म्हणुनि पाद[5] या लोकीं.' ॥ १०६
ऐसें म्हणोनि कर्ण प्रभुला क[6]डकडुनि भेटला सु[7]चिर, ।
मु[8]ग्धासहि जडित कनकम[9]रकत न[10]ग न ग[11]मला तसा [12]रुचिर. ॥ १०७

---

॥ २० ॥ धार पर्वतीं भीमनामा । गदा टेंकणें लावी व्योमा । देखिला केवळ काळप्रतिमा । क्रोधें निरीक्षीत भूमीतें. ॥ २१ ॥ सात्यकी सहदेव नकुळ । कीं युद्धीं गदे जैसा अनळ । मालांबरेंसीं सोज्वळ । नरवाहनीं वैसले. ॥ २२ ॥ मजसहित भीष्मद्रोण । सेविले विलक्षमाण । अगस्ती देशाचिया वदन । गमनोद्योग वांच्छिला. ॥ २३ ॥ रूपें मलिन दिगंबरें । तैल चर्चिलें शरीरें । पृष्टीं विपरीत वादे थोरे । त्रासदायक गर्जती ॥ २४ ॥ शीघ्र काळें पार्थाच्या बाणीं । आम्हीं प्रवेशूं काळवदनीं । पांडवाविरहित धरणीं । क्षत्रिय कोणी न राहती. ॥ २५ ॥" [उद्योगपर्व—अध्याय १६ ओंव्या ६८-९२.]

१. राजे. २. सु+पद+ईश. ३. कारण कीं. ४. मूळांतही असेंच वर्णन आहे. [अ० १४३ श्लो० ४६.] ५. येथें कृष्णाच्या नामाचा उच्चार न करतां नुसता 'पाद' हा साधा शब्द योजून कर्ण भगवंताचा अत्यंत गौरव करीत आहे असें पंतांनीं सुचविलें आहे. 'हे दुर्लभ म्हणुनि पाद या लोकीं' या चरणांवरून कर्णाच्या थोर आणि उदात्त मनाचें प्रतिबिंब चांगलें दिसून येतें. ६. कडकडुनि भेटणें=कडकडां भेटणें, कंवटाळून धरणें, दृढ आलिंगन देणें. ७. पुष्कळ वेळ. ८. अज्ञान्यास. ९. पाच. १०. अलंकार. ११. कर्णानें प्रेमानें कृष्णाला दृढ आलिंगन दिलें इतक्या वर्णनानें वाचकांना कर्णाच्या भक्तीविषयीं चांगलीशी कल्पना होणार नाहीं असें समजून या उत्तरार्धांत कर्णाला कृष्ण किती प्रिय गोड आणि सुंदर वाटत होता हें वाचकांच्या मनावर चांगलें ठसण्यासाठीं पंत उपमालंकाराचा आश्रय धरून वर्णन करीत आहेत. संजय धृतराष्ट्राला म्हणतो:—जडित (जडावाचा) कनकमरकतनग (सोन्याचा, पाचेचा दागिना) तसा रुचिर (तितका सुंदर, तितका प्रिय आवडता) मुग्धासही (मुग्ध पुरुषाला देखील) गमला न (वाटला नाहीं) [इतका कृष्ण कर्णास रुचिर गमला.] मुग्धजनाला अलंकार फार प्रिय असतात अशा समजुतीस अनुसरून पंतांनीं 'मुग्ध'शब्दाची योजना केलेली दिसते. 'मन्मति विनयादि गुणां वाहो, प्रेमें नगां जसी मुग्धा' [मोरोपंत—स्फुटकाव्यें—भाग १ सन्मनोरथराजि—गीति ३८ पृ० ३०७] असें पंतांनीं वर्णन केलें आहे. मुग्ध=(१) बालिश, मूर्ख (२) भोळा, भावार्थी—असे या शब्दाचे अर्थ आहेत, त्यांतील पहिला अर्थ येथें ग्रहण केला असतां चालेल, पण त्यांत फारसें सरसल राहत नाहीं. १२. सुंदर.

झाला [1]मंत्र असा, मग आला नगरांत कर्ण [2]परतोन, ।
[3]पर तो न प्रभु, कोपे वरि पुरता पूर्ण, आंत पर तो न. ॥ १०८

## अध्याय अकरावा.

[4]विदुर म्हणे, 'बाइ! पृथे! [5]यांसम विश्वांत हे [6]महाखळ गे! ।

१. एकांत विचार. २. अ० १४३ श्लो० ५०-५१ पहा. ३. तो प्रभु (कृष्ण) पर (शत्रु) न=तो भगवान् कृष्ण कर्णाला परका—भिन्न—असा नव्हता, कर्णाच्या ठिकाणीं कृष्णाला परकीपणा नव्हता. परमात्मा कृष्ण आणि जीवात्मा कर्ण हे एकच होत. [तो प्रभु] वरि (वरच्या) पुरता पूर्ण कोपे (तो कृष्ण बाहेरच्या पुरता परिपूर्ण क्रुद्ध झाला होता. कृष्णाला बाहेरून परिपूर्ण कोप आला होता). पर (परंतु) आंत न [कोपे] (परंतु अंतर्यामीं कोप आला नव्हता). कृष्ण प्रभु हा कर्णाचा बाहेरून पक्का शत्रु होता, पण अंतर्यामीं तसा नव्हता. [या १४३ व्या अध्यायाला मूळांत 'कृष्णकर्णसंवाद' असें नांव आहे. कर्ण निघून गेल्यावर सात्यकिसह कृष्ण रथांत बसून परत पांडवांकडे आला. कर्णाला कौरवांच्या कटांतून फितुर करून फोडून काढण्याचा बेत सिद्धीस गेला नाहीं.] ४. कृष्ण कौरवांकडे गेला होता, तो कार्य सफळ न झाल्यामुळें पांडवांकडे परत आल्यावर विदुर कुंतीजवळ जाऊन म्हणाला. [अ० १४४ श्लो० २-९.] ५. या कौरवांसारखे. ६. मोठे दुष्ट. येथें कौरव हे कौरवांसारखे खळ असें वर्णन केलें, म्हणून हें **'अनन्वय'** नामक अलंकाराचें उदाहरण आहे. जेथें ज्याची त्यालाच उपमा दिली असते म्हणजे जेथें उपमानत्व आणि उपमेयत्व हीं दोन्हीं एकाच वस्तूवर असतात, तेथें हा अलंकार होतो. जसें:—गगन हें गगनासारखें आहे, रामरावण हे रामरावणोपम होत. याचें लक्षण व उदाहरण—'उपमानोपमेयत्वं यदेकस्यैव वस्तुनः । इंदुरिंदुरिव श्रीमानित्यादौ तदनन्वयः ॥ गगनं गगनाकारं सागरः सागरोपमः । रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरिव ॥.' आणखी प्राकृत उदाहरणें:—(१) झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु, परंतु यासम हा; । यास महादेवा! दे जय, पाहिन कधिं धनंजयास महा ॥ [मोरोपंत—विराटपर्व—अध्याय ४ गीति ७५; काव्यसंग्रह—पृष्ठ ९६], (२) शक्र म्हणे, 'वा! तुजसम तूंचि भला विश्वमहिततरशील, । व्यसनातें बंधूंसह निर्दाळुनि सर्व अहित तरशील. ॥ [मोरोपंत—वनपर्व—अध्याय २ गीति ११४; काव्यसंग्रह—पृष्ठ २७], (३) श्रीरामरावणसमर होय श्रीरामरावणसमरसा । ते वृष्टि जसे न करिति तासि शुचि सशकार रावण समरसा. ॥ [वनपर्व—अध्याय १२ गीति ६६; काव्यसंग्रह—पृष्ठ १७९], (४) होय रामराज्य रामराज्यसेंचि तोखद, व्याधि जो भवाख्य उग्र हें तयासि ओखद । कीं करी प्रकाशुनि स्वसन्महा निरंजन, श्रीश बुद्धिचें हरूनि जन्म हानि रंजन ॥ [मोरोपंत—पंचचामर रामायण—श्लोक ८१; सर्वसंग्रह—पृष्ठ ४०५], (५) यासम हाचि धनुर्धर म्हणतां उपमन्युसुरतरु रुसेना । रण विसरतिल रिपुचमू जेंवि हरिसमक्ष

[1]गुरु अंध अंधरूपचि, [2]याचे दुर्योधनादि सुत खळगे. ॥ १
वरकड उगेचि, सर्वानर्थांचा एक अंध हा निकर[3], ।
[4]कीं [5]राधासुत,–दोघे हे [6]कुरुकुलकुशलकीर्तिहानिकर–.' ॥ २
कुंती त्यासि म्हणे, 'हो! भावोजी! [7]शिशुपणीं असें घडलें, ।
मत्पुत्ररत्न [8]पदरीं [9]राधेच्या [10]मदुरीहितें पडलें. ॥ ३
जाऊं दिलें [11]परकरीं [12]निजशस्त्र तसें [13]अपत्य हा! हा! तें, ।
बा! निजघात [14]अधैर्यें म्यां [15]केला आपुल्याचि हा! हातें. ॥ ४

---

सुरत रुरुसेना. ॥ [मोरोपंत–कर्णपर्व–अध्याय ४० गीति ५९; सर्वसंग्रह–पृष्ठ १६५], (६) जनिभृति वारुनि गति दे शबरीतें पूजितांचि ते बरवी । यासम हाचि दयाकर पाहे आणिक जगीं असा न रवी ॥ ५८ ॥ [रामायणें भाग २–शिवरामायण दुसरें–पृ० ९७], (७) बहु असति परंतु म्हणति वाल्मीकिप्रमुख विप्र 'यासम हा । प्रभुच्या प्रेमें पावे मारुति होऊनि विप्रयास महा' ॥ २४ ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला–रामायणें भाग २–परंतुरामायण–पृ० १८०], (८) धर्मराज म्हणे, 'देवऋषी! । ज्ञान विज्ञान तपोराशी । तुळितां तुझिया सामर्थ्यासी । तुजसारिखा तूं एक ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला–मुक्तेश्वर–सभापर्व–अ० ५ ओं० १], (९) घडे दैवें किंचित् कलुष, परि संतापति मनीं । अशांतें ताराया असति बहु तीर्थें त्रिभुवनीं; । जयां प्रायश्चित्तें नसति, कुनरां दे गति अशी । समर्था! या लोकीं तुजसम अये! तूंचि अससी ॥ [वामनपंडित–गंगालहरी १७.]

१. गुरु (बाप) अंध (आंधळा धृतराष्ट्र) [हा] अंधरूपचि (केवळ अंधकार होय, निवळ अंधकारानें भरलेला होय). २. याचे (या धृतराष्ट्राचे) दुर्योधनादि सुत (दुर्योधनप्रमुख शंभर पुत्र हे) खळगे (खाडे होत). काळोख आणि खाडे यांचा संयोग प्रवासेच्छु जनांस घातुक होत असतो, तसा धृतराष्ट्र आणि दुर्योधनादिक शत पुत्र यांचा संयोग सहवासेच्छु जनांस अपायकारक होय–असें सांगण्याचें तात्पर्य. ३. समूह. ४. किंवा. ५. कर्ण. ६. कुरुवंशाच्या कुशलाची (कल्याणाची) व कीर्तीची हानि करणारे. या चरणांतील 'क' वर्णाची आवृत्ति स्मरणीय आहे. ७. माझ्या बालपणांत. ८. पदरीं पडणें=प्राप्त होणें, मिळणें, लाभणें. ९. मोरोपंत–आदिपर्व–अध्याय १६ गीति १६-१८ पहा. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–आदिपर्व–पृ० ९९-१००.] १०. मत्+दुर्+ईहितें=माझ्या+दुष्ट+कृत्यानें=माझ्या दुष्ट चेष्टितानें. ११. शत्रूच्या हातीं. १२. आपलें शस्त्र. [आपलें शस्त्र शत्रूच्या हातीं गेलें असतां दुहेरी नुकसान होतें, एक आपला पक्ष कमजोर होतो आणि दुसरें शत्रुपक्ष बळावतो.] १३. मूल. [कर्ण कौरवपक्षीय झाल्यानें पांडवांचें मोठें नुकसान झालें असें मनांत येतांच कुंतीला कृतकर्माचा पश्चात्ताप झाला, आणि फार हळहळ वाटली हें स्वभावानुरूप आहे.] १४. कर्ण हा माझा कानीन गर्भ आहे असें जनांस सांगण्याचें धैर्य नसल्यामुळें, स्त्रीभावानें आणि बालभावानें जनापवाद सोस-

येइल मनासि तुमच्या, तरि हें [1]नातें तयासि कळवीन, ।
पळवीन [2]भ्रम, चित्त [3]स्नेहगुणें [4]आकळुनि वळवीन.' ॥ ५
[5]विदुरानुमतें कुंती [6]गंगातीरीं सुताकडे गेली, ।
न कळत [7]तदुत्तरीयच्छायेंत उगीच ती सती [8]ठेली. ॥ ६
कर्णाचा नियम असा ब्रह्मजप करीत निश्चळ रहावें, ।
[9]तापेल [10]पृष्ठ तोंवरि रविचें मंडळ निरंतर पहावें. ॥ ७
[11]नियमांतीं कुंतीतें पाहूनि म्हणे धरूनि राग मनीं, ।
'राधेय [12]आधिरथि मी तुज [13]नमितों, काय कार्य आगमनीं?' ॥ ८
कुंती कर्णासि म्हणे, 'वत्सा! कौंतेय तूं, न [14]राधेय; ।
'राधे!' यथेष्ट म्हण, परि कर्णा! [15]कर्णासि फार बाधे 'य.' ॥ ९

---

ण्याचें धैर्य नसल्यामुळें. [अ० १४४ श्लो० २२-२३.] १५. म्यां आपुल्याचि हातें निजघात केला—या भाषणांत कुंती आपला उपालंभ करीत आहे. या उपालंभवाणांची प्रखरता आणि मर्मभेदकता कळण्यास बरीच सहृदयता पाहिजे.

१. कानीन पुत्रसंबंध. २. पांडवांचा व आपला कांहीं संबंध नाहीं हा कर्णाचा भ्रम. ३. स्नेहरूप गुणानें (दोरीनें) [त्या कर्णाचें] चित्त आकळून (बांधून घेऊन) कौरवपक्षाकडून निवृत्त करून स्वपक्षाकडे आणीन. ४. आकळणें=बांधणें, बांधून ठेवणें, बांधून घेणें. ५. विदुराच्या विचारानें. ६. अ० १४४ श्लो० २६ पहा. ७. कर्णाच्या उत्तरीय वस्त्राच्या छायेंत. ८. उभी राहिली. [कर्णाच्या जपावसानाची वाट पाहत कुंती उभी होती.] या प्रसंगाचें वर्णन **बालभारतां**त असें केलें आहेः—'आपृष्ठतापादुदयंतमर्कं राधेयमाराधयितुं प्रवृत्तम् । प्रतीक्षमाणा सुतवत्सलासौ तापातिताम्यत्तनुरत्र तस्थौ ॥' [बालभारत—उद्योगपर्व— सर्ग ५ श्लोक ५ पृ० २८२]. ९. पृष्ठ तापेल तोंवरि=अपराण्हकाल होईपर्यंत. [अ० १४४ श्लो० ३० टीका. मोरोपंत—वनपर्व—अ० ११४ गी० १६.] १०. पाठ. (अ० १४४ श्लो० २९ टीका पहा.) ११. जपाच्या शेवटीं. १२. अधिरथाचा पुत्र. [अ० १४५ श्लो० १.] १३. अभिवंदन करतों. १४. राधापुत्र. [राधायाः अपत्यं पुमान् राधेयः.] कुंती कर्णासि म्हणेः—वत्सा! (बालका! कर्णा!) तूं कौंतेय (कुंतीपुत्र) [आहेस], राधेय (राधापुत्र) [नव्हेस]. 'राधे' [असे वर्ण अथवा असा शब्द] यथेष्ट (खुशालपणें) म्हण (उच्चार). 'राधे' असा शब्द खुशाल म्हण, मला तो अप्रिय होण्यास कारण नाहीं, परंतु 'राधेय' असें म्हणूं नकोस, कारण त्यांतील 'य' हें अक्षर माझ्या कानाला फार क्लेश देतें. १५. 'राधे' म्हण, परंतु 'राधेय' म्हणूं नको. [राधेनें तुझें पालनपोषण केल्याबद्दल पाहिजे तर तिला **'राधे! राधे!'** असें खुशाल म्हण, परंतु आपल्याला **'राधेय'** म्हणून घेऊं नकोस. तुझा **'राधे'** हा शब्द माझ्या कर्णास बाधत नाहीं, परंतु 'राधेय' यांतील 'य' फार बाधतो.]

हे[1] मात्र न ऐकवती, सुखद[2] मला मनुदुमिलित[3] राधेय, ।

---

१. राधेय हे वर्ण. २. (राधेय) हे (वर्ण) मात्र (माझ्यानें) न ऐकवती. ३. मनुदुमिलित [असे यथानुक्रम] राधेय मला सुखद [आहेत], (मयुक्त रा=राम; नुयुक्त धे=धेनु; दुयुक्त य=यदु हे वर्ण मला सुख देतात, आवडतात). [ज्या शब्दांत रा वर्ण आहे असा राम शब्दांतील 'रा,' ज्या शब्दांत धे वर्ण आहे असा धेनु शब्दांतील] 'धे,' ज्यांत य वर्ण आहे असा यदु शब्दांतील 'य' हे वर्ण मला अप्रिय नाहींत.] [हे] कर्णा! तूं माझा कानीनपुत्र (कन्यास्थितींत झालेला पुत्र) [आहेस], तूं कौंतेय (कुंतीपुत्र आहेस), तूं राधेय न (राधापुत्र नाहींस). [अध्याय १४५ श्लो० ३.] [राम हा तुझा गुरु (भार्गवराम), यदु हा माझा मातृपक्षीय वंशाचा व कृष्णाचा मूळ पुरुष, आणि धेनु ही कृष्णाची (गोपाळाची) प्रिय सखी–तेव्हां त्यांच्या नांवातील रा, धे, य हे वर्ण मला सुखदच होत असें कुंतीचें म्हणण्याचें तात्पर्य दिसतें.] मोरोपंतास एखाद्या शब्दावर अपूर्व कोटी रचून शब्दचमत्कार करून दाखविण्याची हौस होती असें दिसून येतें. त्यानें आपल्या काव्यांत असे शब्दचमत्कार कोठें कोठें योजिले आहेत त्यांतील कित्येकांचा समावेश येथें केला आहे:—(१) **वामाद्यदेव** जाणे त्या अपरिज्ञेयवीर्यजलधेंती. [मंत्रभागवत–अष्टम स्कंध–गीति ९८], (२) स्वैर क्रीडावयाचा रतिनिजमतिचा **दीर्घपूर्व प्रसाद** [कृष्णविजय–अ० ५५ श्लोक १३], (३) **वामादिदेव** वेगा धरिल भगीरथ म्हणे अघहि गंगे [मंत्रभागवत–नवम स्कंध–गी० १२८], (४) वाटे सुभटें पुत्रें मेळविला विप्रसेवनीं नव **'ट'** [उद्योगपर्व–अ० १० गीति ३२], (५) ब्रह्मा नामीं दुसरा योग्य क्षत्रा न जळजनाभा **'ट'** [उद्योगपर्व–अ० १० गीति ३३], (६) 'राधे' यथेष्ट म्हण, परि कर्णा! कर्णासि फार बाधे **'य'** [उद्योगपर्व–अ० ११ गीति ९], (७) हे मात्र न ऐकवती; सुखद मला **मनुदुमिलित राधेय** [उद्योगपर्व–अ० ११ गीति १०], (८) बहुधा गुरुसंकोच ग्रासी तन्नामवर्ति **सुसकारा**,। ऐसें ऐकुनि सोडी अहिपतिसा **भीमसेन** सुसकारा. ॥ [सभापर्व–अ० ६ गीति २३], (९) तो **क्षेमपूर्वधन्वा** ज्याच्या सुयशें समस्त वुध धाला [हरिवंश–अ० १ गीति ८८], (१०) लिहिति **रतिस्तुति**पूर्वीं मात्रा देऊनि वा **यकारा** ज्या [द्रोणपर्व–अ० ५ गी० ६९], (११) पुसतां कसें श्रुत असे आपणचि **'कृपा'** पुढें तरि म्हणा **'ण'** [द्रोणपर्व–अ० १५ गी०२७],(१२)व्याया त्या दुष्टांच्या जणु **अंतःपूर्वपुर** विलापाला [विराटपर्व–अध्याय १ गीति १६२], (१३) **रा** मग **ता** आधीं हें नाम जिचें तीस घे जग नयानें [नामांकरामायण–गीति ११४], (१४) **राग अनुपूर्व** भगवद्दास्यीं बहु ज्यासि तो महासुकृति [नामांकरामायण–गीति ९९], (१५) कुलजविरोधें संतत **तापगुण** मनीं अपूर्वता पावे [आदिपर्व–अ० ३६ गीति ७८], (१६) जाणों ते मदमत्त क्रोधोद्धत **दंपतीच** अप**कार** [कर्णपर्व–अ० ४५ गीति १], (१७) **श्रीपूर्ववत्सवक्षा** दशरथसुत होय, दे जगा तोष [सप्तमस्तोत्ररामायण–गीति १], (१८) **उत्पूर्व स्व** जगा दे ब्रह्मसुख म्हणुनि जया म्हणति कवि क [अष्टमस्तोत्ररामायण–गीति १४], (१९) गृहीं भेटला सर्व लोकप्रभू ती, सुसंपत्ति नोहे **परापूर्वभूती**। [कृष्णविजय–अ० ५६ श्लोक २८], (२०) आम्हां व्यायासि

कानीन[1] पुत्र माझा **कर्णा!** **कौंतेय** तूं, न **राधेय.** ॥ १०
रविचा[2] औरस,[3] पांडुक्षेत्रज[4] तूं, पाळिलें **अधिरथानें,** ।

---

केली असतचि, दिधली तेचि **गो पूर्वविंदा** [कृष्णविजय–अ० ५७ श्लोक ५], (२१) आधीं **भ** या वर्णापुढें यावे **रत** स्थापी असें (सूरारामायण), (२२) यन्नामीं आधि **त्रि** प्रांतीं **टा** हा **ज**कार त्यांमध्यें (दिव्यरामायण), (२३) '**ण** पुढें मागें **रा** ज्या, तो राय कपीस भेटला वानी' (मात्रारामायण), (२४) सुमृदु सुमंत्रीहि म्हणुनि त्यांशि म्हणे नामगा नसावी **त्री** (वनपर्व–अध्याय १३), (२५) **स्वाद्या मित्रा** तीचे दोघे तज्जन्में धन्यला तो घे (सौम्यारामायण), (२६) यन्नामीं **लक्ष्मा**च्या अंतीं **ण** प्रेमानें घ्यावा संतीं (सौम्यारामायण), (२७) होतें आंगीं **भट**पण त्याचा आला उमाप तिटकारा । त्यांतचि मला दुसरिया देता झाला उमापति **ट**कारा ॥ (अनुशासनपर्व–अध्याय ६ गीति ३२), (२८) दवडाया दीनांचीं दुःखें सर्वस्व वेचिती संत । संतप्ता निववी घन वन श्रृंगारीं **व**कारवान् संत ॥ (नामरसायन ६४), (२९) प्रथमचि सुगल मथी त्या; ज्याच्या नामांत **या** पुढें ये **तु**. (द्वितीय स्तोत्ररामायण–गीति ५६ उत्तरार्ध), (३०) **य** प्रथम बंधु जीचा देह अशी भेटली पथीं रामा। ते प्रेमें अनुलेपन देउनि दे तोष माधवा रामा ॥ (मंत्रभागवत–दशमस्कंध–गीति ५१७). यासारखीं थोडीं वहुत स्थळें **पं**तांच्या काव्याचें पर्यालोचन केलें असतां आढळणार आहेत. वृत्तसुखार्थ असा खटाटोप करणें कांहीं ठिकाणीं भाग पडलें आहे आणि कांहीं ठिकाणीं तो मुद्दाम केला आहे ही गोष्ट विसरतां कामा नये. ४.मनुदु या वर्णांनीं मिलित (युक्त) जे राधेय हे वर्ण ते म्हणजे राम, धेनु, यदु, असे.

१. कन्यावस्थेंतला. [मनुस्मृति–अ० ९ श्लो० १७२ पृ० २१०.] २. सूर्याचा. ३. औरस=उरसा निर्मितः औरसः 'स्वक्षेत्रे संस्कृतायां तु स्वयमुत्पादयेद्धि यम्। तमौरसं विजानीयात्पुत्रं प्रथमकल्पिकम् ॥ १६६ ॥' याचा भावार्थः–विवाहसंस्कारयुक्त, सजातीय अशा आपल्या स्त्रीचे ठायीं आपण उत्पन्न केलेला असा जो पुत्र तो **औरसपुत्र** जाणावा, हा सर्व पुत्रांमध्यें मुख्य आहे. [मनुस्मृति–पृ० २०९.] ४. पांडुनृपाच्या क्षेत्राच्या (पत्नीच्या ठायीं) ज (झालेला) क्षेत्रजपुत्र=वारा जातींच्या पुत्रांपैकीं एक, स्वस्त्रीच्या ठायीं गोत्रजापासून पतीच्या आज्ञेनें उत्पन्न झालेला पुत्र. औरस, क्षेत्रज, दत्तक, कृत्रिम, मूढोत्पन्न, अपविद्ध, कानीन, सहोढ, क्रीत, पौनर्भव, स्वयंदत्त आणि पारशव असे वारा प्रकारचे पुत्र आहेत. [मनुस्मृति–अध्याय ९ श्लोक १६६-१७८.] 'यस्तल्पजः प्रमीतस्य क्लीबस्य व्याधितस्य वा । स्वधर्मेण नियुक्तायां स पुत्रः क्षेत्रजः स्मृतः ॥ १६७ ॥ याचा भावार्थः–मृत झालेला अथवा नपुंसक किंवा रोगी अशा पुरुषाची, पिता इत्यादिकानें नियुक्त अशा स्त्रीचे ठायीं घृताभ्यंगादि नियम धारण करून उत्पन्न केलेला जो पुत्र तो क्षेत्रजपुत्र म्हटला आहे. [मनुस्मृति–अध्याय ९. ]

स्रवती पय न, न [१]परिसति, [२]जाणों तीं जाहलीं बधिर [३]थानें. ॥ ११
[४]मुग्धत्वें त्यजुनि तुला [५]चुकल्यें, आतां स्वबंधु रक्षावे, ।
साधो! धर्मज्ञें त्वां [६]अनुज [७]स्वतनुजसमान लक्षावे. ॥ १२
ज्येष्ठ श्रेष्ठ [८]प्रेष्ठ प्रभु तूं, देतिल तुला पद भ्राते, ।
'जी जी' [९]म्हणतिल, [१०]चरणीं वाहतिल धना यशा [११]अदभ्रा ते. ॥ १३
सेवावें शेळीचें कीं रसिकें धेनुचें [१२]रसवराज्य? ।

---

१. पुत्राला पाहून अथवा त्याचा मधुर शब्द ऐकून प्रेमानें मातेच्या स्तनाला पान्हा फुटावा, पण तसा प्रकार कांहींएक झाला नाहीं म्हणून कुंतीनें आपल्या स्तनांवर 'हे स्तन बधिर झाले, हे दुधाचा पान्हा सोडीत नाहींत व ऐकत नाहींत' असा बधिरत्वाचा आरोप उत्प्रेक्षाद्वारा केला आहे. २. हा उत्प्रेक्षा नामक अलंकार. बधिरत्व या धर्माचा आरोप स्तनांवर केला आहे म्हणून येथें '**चेतनधर्मारोपोक्ति**' (Personification) हा अलंकार उत्प्रेक्षेच्या आश्रयानें झाला आहे. जेथें अचेतन पदार्थावर सचेतनत्वाचा आरोप करून सचेतनाचा धर्म दाखविला असतो तेथें हा अलंकार होतो. येथें स्तन अचेतन असून त्यांची क्रिया सचेतन ज्ञानसंपन्न मनुष्याप्रमाणें समजून त्यांची निंदा केली आहे. याच अलंकारास 'अनेकविद्यामूलतत्व'ग्रंथांत 'चेतनगुणोक्ति' असें नांव दिलें आहे. हा अलंकार इंग्रजी साहित्यशास्त्रांतून घेतला आहे. या अलंकाराचीं अन्य उदाहरणें:—(१) कार्णि म्हणे पळ इकडे पाहुत सज्जन न पत्रिकेतु कडे। चर्मापरि लिहिलें कीं वपुचे मज्जननपत्रिके! तुकडे ॥ [द्रोणपर्व–अध्याय ३ गीति १३१ पहा], (२) दावी रडोनि झाले जे गंध उगाळितां स्वहात किणी। भीम म्हणे 'विधिलेखनि! लेखनिं नच वचकलीस घातकिणी?॥ [मोरोपंत–विराटपर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला–पृष्ठ २५ गीति १०६], (३) आलेति केव्हां नकळे मनासी, निद्रा अशी पापिणि कार्यनाशी. ॥ ६९ ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला–वामनपंडितकृत काव्यें (भाग २) राधाभुजंग–पृष्ठ १२]. ३. थान=स्तन. ४. अज्ञानपणानें. ५. येथें कुंतीनें कर्णाचें मन वश करण्याची कमाल करून सोडिली आहे. कुंतीचें साधें, सरळ आणि नम्र भाषण अत्यंत कळकळीचें असल्यामुळें तें हृदयास द्रव आणणारें आहे. तसेंच 'साधो' आणि 'धर्मज्ञें' या दोन पदांनीं कर्णाचा गौरव आणि सन्मान इतका केला आहे कीं तिच्या बोलण्याप्रमाणें वागण्यास त्यानें तत्क्षणींच तयार व्हावें. ६. धर्मादिक धाकटे बंधु. ७. पुत्राप्रमाणें. ८. प्रियतम. (प्रिय, प्रेयस् आणि प्रेष्ठ अशीं रूपें जाणावीं.) ९. आज्ञा वंदन करतील. [जी म्हणणें=जीजी करणें, हांजी करणें, पुढच्या पुढें नाचणें, थुंकी झेलणें, भजनीं लागणें]. १०. चरणीं वाहणें=समर्पण करणें, देणें, देवाच्या पायावर पूजानिमित्त ठेवणें, नम्रपणें सादर करणें, स्वाधीन करणें. ११. दभ्र=अल्प, अदभ्र=विपुल. [दभ्र=अल्प. 'स्तोकाल्पक्षुल्लकाः श्लक्ष्णं सूक्ष्मं दभ्रं कृशं तनु' इत्यमरः.] १२. रस+वर+आज्य=रसांत श्रेष्ठ–आज्य तूप.

त्वां सर्व [1]अनुभवावें भ्रात्यांसह हें [2]यश:प्रसव राज्य. ॥ १४
सोडुनि [3]सूतसुयोधनपक्षांतें [4]झडझडोनि बा! निव रे! ।

---

१. या गीतींत **'प्रतिवस्तूपमा'** नामक अलंकार झाला आहे. येथें पूर्वार्धांतील वाक्य उपमान आणि उत्तरार्धांतील वाक्य उपमेय. या दोन स्वतंत्र वाक्यांमध्यें 'सेवावें' आणि 'अनुभवावें' या शब्दांतरानें एकाच (समान) धर्माचें अभिधान झालें आहे. म्हणजे वस्तुप्रतिवस्तुभाव प्रकट झाला आहे तेव्हां ही **'प्रतिवस्तूपमा'** होय. याचें लक्षण:–(१) '········ प्रतिवस्तूपमा तु सा। सामान्यस्य द्विरेकस्य यत्र वाक्यद्वये स्थितिः'। [काव्यप्रदीप–दशम उल्लास–श्लो० १५-१६ काव्यमाला–पृ०४०२], (२) 'वाक्ययोरेकसामान्यता प्रतिवस्तूपमा' [वाग्भट्टविरचिता अलंकारकौमुदी], (३) 'अनुपात्ताविवादीनां वस्तुनः प्रतिवस्तुना । यत्र प्रतीयते साम्यं प्रतिवस्तूपमा तु सा' ॥ ७१ ॥ [वाग्भटालंकार–परिच्छेद ४ काव्यमाला ४८ पृ० ४५.] (४) 'उपमानोपमेयार्थौ पृथग्वाक्यद्वये यदि । सामान्येन विनिर्दिष्टौ प्रतिवस्तूपमा मता । साधर्म्यवैधर्म्यभेदात्सा द्वेधा परिकीर्तिता. ॥' [मन्दारमरन्दचम्पू–व्यंग्यविन्दु–पृ० १२५] (५) 'वाक्ययोरेकसामान्ये प्रतिवस्तूपमा मता । तापेन भ्राजते सूरः शूरश्चापेन राजते ॥' [कुवलयानन्द १७], (६) 'वाक्यार्थगतत्वेन सामान्यस्य वाक्यद्वये पृथङ्निर्देशे प्रतिवस्तूपमा' [अलंकारसर्वस्व–काव्यमाला–पृ० ७४.] याचा भावार्थ:–जेथें 'इव' इत्यादिक शब्द न योजतां वस्तूचें साम्य प्रतिवस्तूनें दाखविलें असतें तेथें **प्रतिवस्तूपमा** होते. जेथें उपमानवाक्यांत आणि उपमेय वाक्यांत एकाच सामान्य धर्माचें कथन शब्दभेदानें (क्वचित् त्याच शब्दानें) केलें असतें तेथें **प्रतिवस्तूपमा** होते. याचीं उदाहरणें:–(१) त्या त्या क्रीडेंत मुलें भीमापासूनि पावती भंग । सन्माणिक्यमणिपुढें गोमेदाचा फिका पडे रंग. ॥ [आदिपर्व–अध्याय १९ गीति ३], (२) तो त्वदधिक मदधिक मज निंदो, तूं निंदिसी बळें कवणें? । गुड निंदिजे तदधिकें खंडें, परि कोणत्या गुणें लवणें? ॥ [कर्णपर्व–अध्याय ४२ गीति ३०], (३) श्रमला, परि भीम उठे, सुचवी 'व्याकुळ न हो' असें तिजला । गज गांजितां व्रजस्थां सिंहीं, राहेल सिंह कां निजला? ॥ १६० ॥ [विराटपर्व–अ० १], (४) स्पर्शो न देचि बाई! स्वप्नींही मन्मना विवेक मला, । गगनमणिकरींच्या तम केव्हां तरि काय हो! शिवे कमला ॥ १६ ॥ [विराटपर्व–अ० १], (५) नररत्न तोचि, तूंचि स्त्रीरत्न उदंड आड नांवाची । न बुडविति न वा तारिति चित्रें बरवींहि आडनांवांचीं ॥ ३५ ॥ [वनपर्व–अ० ४] प्रतिवस्तूपमा वैधर्म्यानेंही होते, जसें–'विद्वानांचे परिश्रम विद्वान् मात्र समजतो, दुःसहप्रसववेदना वंध्या कधींही जाणत नाहीं' या उदाहरणांत 'समजतो' आणि 'जाणत नाहीं' या दोन भिन्न शब्दांनीं वैपरित्य (वैधर्म्य) दर्शविलें आहे तरी येथें प्रतिवस्तूपमा होते. २. कीर्ति प्रसवणारें. यशाचा प्रसव (उद्भव) ज्यापासून आहे तें (राज्य). ३. सूत (कर्ण)+सुयोधन (दुर्योधन) यांच्या पक्षातें. ४. सपाट्यानें, झराझर, भराभर, झपकन, तडकाफडकीं.

वि[1]घरो दो[2]यादाचें बळ मन, ढेंकुळ जसें जळीं विघरे. ॥ १५
तूं [3]आत्मासा, [4]पंचप्राण तसे बंधु सत्य, बापा! हें, ।
नांदा एकत्र, नको द्वेष करूं, [5]मजकडेचि बा! पाहें. ॥ १६
बा! कर्णा! तूं अर्जुन [6]रामजनार्दनसमान साजाल, ।
हंस तसें साधूंच्या सोडुनि तुम्हीं न [7]मानसा जाल. ॥ १७
जेंवि [8]महाध्वरवेदीमाजि [9]ससुर [10]सत्यनायक विराजे, ।
तेंवि वि[11]राज स्वपदीं भ्रात्यांसह, '[12]वर्णितील कवि राजे.' ॥ १८
[13]कुंतीवचोवसानीं [14]सूर्यापासुनि असी निघे [15]वाणी, ।
'सत्य पृथोक्ति, [16]गुरुवचननिरता सुखकीर्तिची नसे [17]वाणी.' ॥ १९

---

१. विरून जावो. २. आप्तांचें. [दायाद=दायमत्ति यद्वा आदत्ते । 'दायादौ सुतबांधवौ' इत्यमरः । 'दायादस्तु भवेत्पुंसि सपिंडे तनयेऽपि च' इति मेदिनी । दायाद या शब्दाचा मूळ अर्थ वारस, पुत्र, सपिंडबांधव असा असून कालांतरानें त्याचें अर्थांतर आणि रूपांतरही झालें आहे. दायाद=दाईज=वांटा घेणारा शत्रु, जे दायाद असतात ते दायासाठीं (दाय–वांटा, भाग, अंश) भांडतात हें सुप्रसिद्ध आहे.] ३. आत्म्यासारखा प्रियतम. ४. पांच प्राणांप्रमाणें प्रिय हे धर्मादिक बांधव होत. [पंच प्राण=प्राण, अपान, समान, उदान आणि व्यान हे शरीरस्थ पांच वायु आहेत. यांच्या स्नेहभावानें आणि एकमतानें जीव चालतो तसे तुम्ही चाला.] ५. [हे कर्णा!] माझें म्हणणें तुला रुचत नसेल तरी माझ्यासाठीं इतकें अवश्य कर, असें करुणापूर्वक कुंती प्रार्थीत आहे. ६. बलराम आणि कृष्ण यांसारखे. [अ० १४५ श्लो० १०.] ७. मानस=(१) मानस नामक सुप्रसिद्ध सरोवर; (२) चित्त, मन. येथें **श्लेषोपमा** झाली आहे. या उत्तरार्धांत 'मानस' हा शब्द श्लिष्ट आहे. जसे हंस मानससरोवरास सोडून जात नाहींत तसे तुम्ही (कर्णधर्मादिक पांडव) साधूंच्या मानसा (मनाला) सोडून जाणार नाहीं. येथें हंस हे कर्णधर्मादिक पांडव (तुम्ही) आणि मानसा सोडून न जाणें हा समान धर्म श्लेषानें योजिला आहे. येथें 'मानस' हें पद अर्थश्लेषपर आहे. या अलंकाराचें अन्य उदाहरणः– 'शिशिरांशुप्रतिस्पर्धि श्रीमत्सुरभिगंधि च । अंभोजमिव ते वक्त्रमिति श्लेषोपमा स्मृता ॥' [दंडिकृत काव्यादर्श–द्वितीय परिच्छेद–श्लो० २८ पृ० ११६.] ८. यज्ञवेदिकेमध्यें. अ० १४५ श्लो० ११ याचा हा भावार्थ आहे. ९. देवांसह. १०. सत्यलोकाचा स्वामी ब्रह्मा. ११. शोभा पाव, विराजमान हो. १२. स्तवितील. १३. कुंतीच्या भाषणान्तीं. १४. सूर्यापासून उत्पन्न झालेली (वाणी=भारती). १५. 'हे कर्णा! पृथा जें वचन बोलली तें खरें आहे. मातेचें वचन पाळ, आईच्या वचनाप्रमाणें आचरण करणाऱ्या हे नरव्याघ्रा! तुझें कल्याण होईल' अशी सूर्यवाणी झाली. [अ० १४६ श्लो० २.] १६. गुरुवचनपालका. १७. न्यूनता.

कर्ण म्हणे, '[1]सन्माता [2]तोकीं सुख व्हावया [3]असु [4]खरचिती, ।
किंवा, नेत्रें [5]झांकुनि, व्हाया सुख आपणा, असुख [6]रचिती? ॥ २०
माझा घात [7]पुरवला तुज, [8]त्यांचा मात्र घात पुरवेना! ।
काय असें [9]अघ? विटलें कां त्वन्मन मज? जसें स्वपुर [10]वेनां. ॥ २१

---

१. साध्वी माता. २. बालकीं. ३. प्राण. ४. मुलाला सुख होण्यासाठीं प्राण वेंचतात, प्राणांचीही पर्वा बाळगीत नाहींत. असु खरचणें=प्राण देणें, प्राण वेंचणें. ५. डोळेझांक करून, डोळे मिटून. यांत 'लोकोक्ति' नामक अलंकार आहे. जेथें लोकप्रवादाचें अनुकरण होतें तेथेंच 'लोकोक्ति' नामक अलंकार होतो. याचें लक्षणः—'लोकप्रवादानुकृतिर्लोकोक्ति-रिति भण्यते' [कुवलयानंद १५५.] 'हे सखि! डोळे मिटून कांहीं महिने सहन कर' या वाक्यांत 'डोळे मिटून' हें प्रसिद्ध लोकवादाचें अनुकरण आहे म्हणून यांत 'लोकोक्ति' अलंकार आहे. या अलंकाराचीं अन्य उदाहरणें:–(१) भीम तयासि पुसे, 'तूं कोण बळी? करिशि काय हा कवळ। मद्गति हे, अन्याचें येथें मारील काय हाक बळ?' [काव्यसंग्रह-ग्रंथमाला–मोरोपंत–वनपर्व–अध्याय ६ गीति ३ पृ० ९३.] ६. या गीतींतील प्रश्नानें स्व-सुखासाठीं कुंतीनें मागें पुढें न पाहतां आपल्या कानीन पुत्राचें अकल्याण केलें असा अ-परिमार्जनीय दोषारोप कर्ण करीत आहे हें वाचकांस सांगावयास नको. तसेंच या गी-तीच्या पूर्वार्धांत सन्मातेची स्वपुत्राविषयीं इतिकर्तव्यता कोठें संपते, याचेंही साहजि-कपणें दिग्दर्शन केलें आहे. [ज्या] तोकीं सुख व्हावया [निज] असु खरचिती [त्याच] सन्माता [होत] अशी 'सन्माता' या पदाची सुरेख व्याख्या पंतांनीं केली आहे, तिला कोण नांव ठेवील? ७. येथें 'माझा घात पुरवतो' आणि 'पांडवांचा घात पुरवत नाहीं' असे घात पुरवणें व घात न पुरवणें हे विरुद्ध गुण दाखविले आहेत. यास्तव या पूर्वा-र्धांत '**विरुद्धगुणन्यास**' नामक अलंकार झाला आहे. या अलंकारास इंग्रजी साहित्य-ग्रंथांत Antithesis असें नांव आहे. या अलंकारांत शब्दार्थविरोध अथवा शब्दार्थवि-पर्यास असतो. ८. त्या पांडवांचा. ही कर्णाची उपालंभोक्ति उग्र, कटु आणि अरुंतुद अ-सून तींत असभ्य, ग्राम्य अथवा अश्लील शब्दांचा प्रयोग केलेला नाहीं. शिष्टमान्य उपालंभोक्तीचा हा एक उत्तम मासला समजला पाहिजे. ९. पातक. [माझ्या हातून कोणतें असें अघोर पातक झालें कीं त्याच्या क्षालनार्थ माझा घात व्हावा ही गोष्ट तुला पतकरते? माझ्या हातून कांहीं एक पातक घडलें नसून जें काय झालें तें सर्व तुझेंच कृत्य होय व त्या तुझ्या कृत्याचें गोपन व्हावें म्हणून तूं माझा त्याग केलास व आपला बचाव करून माझा सर्वस्वी घात केलास, असें खोंचून बोलून उदार कर्ण आपल्या निर्दय मातेच्या चरणीं आक्षेपगर्भ वचनपुष्पांजलि वाहत आहे. कर्ण प्रत्येक लहान लहान वा-क्यांत सभ्य शब्दयोजना करून आपल्या उक्तिकुंतलानें कुंतीला मर्मस्थानीं बोंचून विव्हल करीत आहे.] १०. वेनराजास. मागें पृष्ठ ८८ टीप ५ पहा.

न[1] म्हणेल काय माता 'व्हावा लोकांत आत्मज न नीच?' ।
रक्षील[2], धर्म रक्षुनि, जी ती भलतीहि आत्मजननीच. ॥ २२

अरिहि न करिल असें त्वां केलें[3], कां नख[4] न लाविलें[5] जननीं[6]? ।
जन[7] नीच मज न म्हणते, परि काय करील नियतिला[8] जननी[9]? ॥ २३

कृष्णें[10] जसी यशोदा त्यजिली, तसि न त्यजीन राधा मी, ।

---

१. 'आत्मज (मुलगा) लोकांत नीच न व्हावा' [असें] माता न म्हणेल काय?—असा अन्वय. २. धर्म रक्षुनि (धर्माचें रक्षण करून, धर्मपालन करून) [पुत्रांस नीचपणा येऊं न देतां] जी रक्षील (जी त्याचें जीवित रक्षील, जी त्या पुत्राचें पालन करील) ती भलतीहि (कोणीही असली तरी, ती आईवांचून दुसरी कोणीही असली तरी) आत्मजननीच [होय.] (आपली मातोश्रीच होय. धर्म रक्षण करून जी आपलें रक्षण करील ती कोणी कां असेना, ती आपली माताच असें समजलें पाहिजे. तीच निजमाता समजली पाहिजे कीं जी धर्माचें रक्षण करून आपलें संरक्षण करते.) या उत्तरार्धात 'आत्मजननी' शब्दाची व्याख्या पंतांनीं केली आहे. ३. माझा त्याग करून तूं अपकीर्तिदोषापासून मुक्त झालीस. मी जन्मतः क्षत्रिय असून तुझ्यामुळें क्षत्रसत्क्रिया मला प्राप्त झाली नाहीं. तुझ्यासारिखी पापिणी या जगतावर कोणी नाहीं, तुझ्याकरितां माझी जन्माची हानि झाली. तूं केवळ आत्महितैषिणी आहेस—अशा अर्थाचें कर्णाचें भाषण मूळांत आहे. [अ० १४६ श्लो० २-८.] ४. जन्मतांच मला मारण्यासाठीं कंठास नख कां न लावलें? ५. नख लावणें=नखानें बोंचून जीव घेणें. ६. जन्मतां, जन्मसमयीं. ७. हें 'दामयमक' आहे. ८. दैवाला. ९. माता. माझ्या दैवींच जर सूतपण लिहिलें होतें, तर त्यांत मातेचा तरी काय दोष आहे? [स्वभाषणपारुष्यानें क्षुब्ध, रुष्ट, खिन्न, हताश आणि विव्हल होणाऱ्या कुंतीचें कर्ण दैववादाचा आश्रय करून तोंडापुरतें समाधान करूं पाहत आहे. तिच्यावर जेवढी कांहीं पुष्पांजलि वाहावयाची होती ती वाहण्यास यत्किंचित्‌ही मागें पुढें न पाहतां पुनः त्याच समयीं आणि त्याच स्थळीं तिचें समाधान करूं पाहणें म्हणजे दुःखावर डाग देण्यासारखें आहे. या दैववादाचा आश्रय पंतांनीं अन्यत्रही केला आहेः—(१) 'न चुकेचि भावि.' [आदिपर्व—अ० १४ गी० १७ पृ० ९०], (२) 'माद्री म्हणे न न्यां, नरदेव नियतिनेंचि भुलविला साचा.' [आदिपर्व—अ० १९ गी० ११ पृ० ११२], (३) 'चाला अवश्य येतों, भावि चुकेनाचि जें भलें खोटें' [सभापर्व—अ० ३ गी० ६२ पृ० २५], (४) 'कृष्णा म्हणे समर्थ न कोणीही सुज्ञ भावि टाळाया' [सभापर्व—अ० ४ गी० १०१ पृ० ३६], (५) 'बलजलनिधिनें विधिनें श्रीराममुखींहि भरविला पाला' [सभापर्व—अ० ७ गी० ५५ पृ० ६८], (६) 'जायचि, अवश्य होतो होणार अनर्थ अर्थ जो भावी' [मंत्रभागवत—स्कंध ४ गी० ४४], (७) 'मग पुण्यश्लोक म्हणे—नसतीचा दोष, हा नियतिचा कीं' [वनपर्व—अ० ४ गी० २१८]. याप्रमाणें पंतांनीं दैववादाचा उपयोग अनेक ठिकाणीं करून आपला कार्यभाग साधला आहे. १०. कृष्णानें आपल्या पालनपोषणकर्त्या मातेचा (यशोदेचा) जसा त्याग केला तसा मी

ती[1] यातना न नरकीं होय, कृतघ्ना न जी नरा धामीं[2]. ॥ २४

राधेचा त्याग करणार नाहीं. [कृष्णाची जन्मदात्री माता देवकी आणि पालयित्री माता यशोदा–ही पौराणिक कथा ध्यानांत असली पाहिजे. सभ्य शब्दांनीं कुंतीची यथेच्छ निर्भर्त्सना करण्याचें तोंडसुख प्रथम घेऊन तिला जास्त क्षुब्ध करण्यासाठीं कर्ण कुंतीचा सकल विपदाधारस्तंभ व कल्याणनिधान जो कृष्ण त्याचें आतां साक्षेप स्वरूपाविष्करण करीत आहे. कृष्णानें पालयित्री मातेचा त्याग केला म्हणून तो कृतघ्न ठरला असें कर्णाच्या भाषणाचें तात्पर्य आहे.]

१. जी यातना नरकीं न होय ती [यातना] कृतघ्ना नरा धामीं न [होय]–असा अन्वय लावावा. या अर्धांत दोन नकार आहेत त्यांच्या योगें प्रकृतार्थ उत्पन्न होतो तो असाः– जी यातना नरकांत भोगावी लागते तीच यातना कृतघ्न पुरुषाला आपल्या घरांत भोगावी लागते, नरकीं जी यातना आहे ती सर्व यातना कृतघ्न पुरुषाला घरींच भोगणें भाग पडतें, नरकयातना म्हणून ज्या कांहीं आहेत, त्या भोगण्यास नरकांत जावयास नको, त्या यातना कृतघ्न मनुष्याला या लोकीं स्वगृहींच होतात. या अर्धाचा दुसरा पाठ आढळतो तो असाः–'ती यातना न नरकीं होय, **कृतघ्नास** जी नरा धामीं.' याचा अन्वयः–जी कृतघ्नास नरा (कृतघ्ना नरास) धामीं यातना होय तीं नरकीं न [होय]= कृतघ्नास पापाचें फळ या जन्मींच मिळतें. तें फळ नरकयातनेपेक्षां दुःसह आहे. नरकयातनेपेक्षांही कृतघ्न नरास बसल्याठिकाणीं या जन्मींच अधिक दुःख भोगावें लागतें. नरकयातनेपेक्षां या लोकीं कृतघ्नाला होणाऱ्या यातना प्रखरतर असतात. कृतघ्नास जशी घरांत यातना होते तशी नरकीं देखील होत नाहीं–असें तात्पर्य. या अर्धांत 'होय' हें क्रियापद अर्थव्यक्तीसाठीं पुनः ग्रहण करावें लागतें म्हणून हें **क्रियादीपक** अलंकाराचें उदाहरण होय. 'दीपक' अलंकाराचे 'कारकदीपक' आणि 'क्रियादीपक' असे दोन भेद आहेत. जेथें अनेक कर्त्यांचा एका क्रियापदाशीं अन्वय (संगति) असतो तेथें **'क्रियादीपक'** अलंकार होतो. जेथें अनेक क्रियापदांचा एका कर्त्याशीं संबंध (अन्वय) असतो तेथें **'कारकदीपक'** अलंकार होतो. या अलंकाराचे अनेक सूक्ष्म भेद आहेत. रुद्रटप्रणीत **'काव्यालंकार'** अध्याय ७ पृ० ८८-८९ पहा. [काव्यमाला–२] दंडिकृत **काव्यादर्श** नामक ग्रंथांत क्रियादीपकाचा खुलासा केला आहे. [काव्यादर्श– द्वितीय परिच्छेद–श्लोक ९९ पृ० १५४.] उपकार करणारावर अपकार करणारा जो (कृतघ्न) पुरुष त्याची प्राचीन ग्रंथांत फार निंदा केलेली आढळते व ती रास्त नाहीं असें म्हणण्याचें साहस कोण करील? कृतघ्नाचें अन्न सेवूं नये, कृतघ्नाला प्रायश्चित्त नाहीं, कृतघ्नाला नरक प्राप्त होतो, असें वर्णन **मनुस्मृतीं**त आढळतें. [मनुस्मृति–अध्याय ४ श्लोक २१४; अध्याय ८ श्लोक ८९.] हाच कृतघ्ननिंदेचा प्रकार प्राचीन सुभाषितग्रंथांतही आढळून येतो. 'परोपकारशून्यस्य धिङ्मनुष्यस्य जीवितम् । यावन्तः पशवस्तेषां चर्माप्युपकरिष्यति ॥ ब्रह्मघ्ने च सुरापे च चोरे भग्नव्रते तथा । निष्कृतिर्विहिता लोके कृतघ्ने नास्ति निष्कृतिः ॥' [सुभाषितरत्नभांडागारम्–श्लोक १-२ पृष्ठ १०८.] २. गृहीं.

वसु[1] जेंवि वासवाच्या[2], माझ्या सानुज[3] सुयोधन मनातें ।
रंजवितो, मज करिती सर्व तदाश्रितसुयोध[4] नमनातें. ॥ २५
अर्जुनवधप्रतिज्ञा[5] केली ती कसि दहांत[6] सोडावी ? ।
तोडावी कुरुपतिची प्रीति कसी म्यां ? अकीर्ति जोडावी ? ॥ २६
म्हणतील प्रकट सकल लोक मज त्वन्मतानुगा[7] 'भ्याला,'[8] ।
यावें कर्पूराच्या काय मषीगर्भसाम्य[9] गाभ्याला ? ॥ २७

---

१. अष्टौ वसु. ध्रुव, धर, सोम, अन्ह, अनिल, अनल, प्रत्यूष आणि प्रभास हे वसुसंज्ञक आठ देव. २. इंद्राच्या. [अ० १४६ श्लो० १२.] ३. धाकट्या भावांसह. [स+अनुज=सह+धाकटा बंधु.] ४. त्या सुयोधनाचा आश्रय धरणारे उत्तम वीर, दुर्योधनपक्षीय योद्धे. ५. कर्णानें केलेली अर्जुनवधाची प्रतिज्ञा अशी होती:– तें सत्र पूर्ण होतां, कर्ण म्हणे, 'पांडवायु हरशील, । ऐसाचि कुरुपते! तूं विश्वस्तुत राजसूय करशील. ॥ जोंवरि न अर्जुनातें मारीन रणांगणांत मी स्वशरें, । तोंवरि न पादधावन करवीन करीन आपुल्याचि करें. ॥ सेवीन न मांसातें, जैसा मोक्षेच्छु सुजन न सुरेतें, । न तदुक्त मृषा ज्याचें सुक्षेत्रामाजि सुजनन सुरेतें. ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–वनपर्व–अ० ७ गीति ११७-११९ पृ० १२०.] ६. चारचौघांत. 'दहांत' म्हणजे विपुलजनसमूहांत असा अर्थ ग्रहण केला पाहिजे. [मागें पृष्ठ ५३ टीप २५ पहा.] ७. तुझ्या मताला अनुसरणाऱ्या. ८. मी तुझ्या मताला या प्रसंगीं जर अनुसरलों तर लोक मला 'भ्याला' असें दूषण लावतील. ९. हें **'रूपकातिशयोक्ति'** नामक अलंकाराचें उदाहरण आहे. जेथें वर्णनीय विषयाचा त्याचे वाचक शब्दांनीं उल्लेख नसून उपमानवाचक शब्द उपमेयच समजतात, तेथें **'रूपकातिशयोक्ति'** नामक अलंकार होतो. यांत **उपमान**वाचक पदानेंच **उपमेया**चा बोध होतो व उपमेयवाचक पद उक्त नसतें. 'नीलोत्पलापासून तीक्ष्ण शर निघतात पहा'–या उदाहरणांत नीलोत्पल (नीळें कमळ) आणि शर (बाण) हीं उपमानवाचक पदें आहेत व नेत्र आणि कटाक्ष हीं उपमेयवाचक पदें आहेत. नीलोत्पल आणि शर या शब्दांनीं नेत्र व कटाक्ष या उपमेयवाचक पदांचें ग्रहण केलें आहे. याचें लक्षण:–(१) **रूपकातिशयोक्तिः** स्यान्निगीर्याध्यवसानतः । पश्य नीलोत्पलद्वंद्वान्निःसरंति शिताः शराः ॥ [**कुवलयानंद.**] प्रस्तुत उत्तरार्धांत 'कर्पूराचा गाभा' आणि 'मषीगर्भ' या उपमानवाचक पदांनीं यथानुक्रम कर्ण आणि तेजोहीन मनुष्य या उपमेयवाचक पदांचें ग्रहण करावयाचें आहे. कर्पूराच्या गाभ्याला (कापुराच्या अंतर्गत भागाला, कापुरासारख्या अत्यंत विमल पदार्थाला–कर्णासारख्या तेजस्वी वीराला) मषीगर्भसाम्य (काजळाच्या अंतर्गतभागाचें साम्य, अत्यंत काळेपणाचें साम्य, अत्यंत काळपुरुषाची समता) यावें काय ? [कधींही येऊं नये–असें उत्तर. कापूर आणि काजळ यांची समता कधींही व्हावयाची नाहीं.] या अलंकाराचें अन्य उदाहरण:–हरिच्या पुन्हा पुन्हा कां काळ्या नाकांत घालिशी शशका! । यश काय पक्षिपतिचें येइल

मारीन अर्जुनासचि समरीं, धर्मादिकां [1] न चववां मी, ।
[2] करिच्या मदीं [3] अलिस जी बहु, तीहि मिळेल काय चव घामीं? ॥२८
[4] म्हणतों [5] मीच, नतजननमरण हरी, परम सुख करी [6] नवधा, ।

---

हे चार करुनि तुज मशका! ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला–सभापर्व–अ० ४ गी०८४ पृ० ३४.] या गीतींत हरि धर्म आणि शशक दुर्योधन, तसेंच पक्षिपति धर्म आणि मशक दुर्योधन असें ग्रहण करावयाचें आहे. ही गीति अन्योक्ति समजली तरी चालेल. १०. कज्जल.

१. अ० १४६ श्लोक २१-२१ पहा. २. हत्तीच्या आंगापासून घाम उत्पन्न होतो आणि हत्तीच्या गंडस्थलापासून मदोदक उत्पन्न होतें, परंतु भ्रमराला हत्तीच्या अंगापासून उत्पन्न झालेला घाम प्रिय नसतो. त्याप्रमाणें धर्मादिक चौघां पांडवांवर सरसी करून मिळविलेला जय मला प्रिय नाहीं, परंतु अर्जुनाचा पराभव करून प्राप्त झालेला जय मला प्रिय आहे असें दर्शवीत होत्साता कर्ण म्हणतोः–अलिस (भ्रमराला) करिच्या मदीं (हत्तीच्या दानोदकीं) जी बहु चव (जी विपुल गोडी) [मिळते] ती (चव [करिच्या] घामींहि मिळेल काय? अर्थात् मिळावयाची नाहीं–असें उत्तर. भृंगाला हत्तीच्या मदाचे ठायीं जी चव लागते ती घामाच्या ठिकाणीं कोठून लागणार? येथें कर्णानें आपणास भृंगाचा, अर्जुनास मदाचा, व धर्मादि चौघां पांडवांस घामाचा दृष्टांत दिला आहे, म्हणून हा **'दृष्टांत'** नामक अलंकार झाला आहे. [अलंकारमीमांसा–पृ० २९-३० व साहित्यशास्त्र–द्वितीय आवृत्ति–निर्णयसागरमुद्रणालय आवृत्ति–पृ० ७८-७९.] ३. भ्रमरास. ४. वध करीन असें मीच म्हणतों. ५. नवधा यद्भक्ति नतजननमरण हरी [व] परम सुख करी तत्सख्याच्या वधा मी करीन [असें] कवण प्रभु म्हणेल? मीच तत्सख्याच्या वधा करीन असें] म्हणतों–असा अन्वय. नवधा यद्भक्ति (ज्याची नऊ प्रकारची भक्ति, ज्या प्रभूची नवविध भक्ति) नतजननमरण हरी (शरण आलेल्या जनाचें जन्ममरण चुकविते, [व] परम सुख करी (अत्यंत सुख–मुक्तिलाभ–देते) तत्सख्याच्या वधा (त्या प्रभूच्या सख्याच्या–त्या प्रभूचा सखा (मित्र) जो अर्जुन त्याच्या वधा) मी करीन असें म्हणण्यास कोण समर्थ आहे? [असें कोणी म्हणण्यास समर्थ नाहीं–असा भाव. हा **प्रश्नालंकार** जाणावा.] मीच म्हणतों (मी मात्र तसें म्हणतों.) [एथें मजसमान दुसरा कोणी नाहीं, मीच आहें असें ध्वनित केलें आहे, यास्तव हा **'अनन्वयध्वनि'** नामक अलंकार होय. **रसगंगाधर–पृ०** २०९-२१० काव्यमाला–१२ पहा. चित्रमीमांसाखंडन–पृ० १७ काव्यमाला–३८ पहा.] जेथें सादृश्यवाचक शब्दप्रयोगानें अथवा व्यंगार्थानें दोन पदार्थांची तुलना केली असते तेथें **उपमा**लंकार होतो. जसें–तुझें तोंड चंद्रासारखें आहे. जेथें ज्याची त्यालाच उपमा दिली असते तेथें **अनन्वय** अलंकार होतो. जसें–गगन हें गगनासारखें आहे, अर्जुन हा अर्जुनासारखा आहे. जेथें उपमाच नाहीं असें वर्णन असतें तेथें **असम** नामक अलंकार होतो. यांत उपमेचा निषेध साक्षात् अथवा परंपरया सर्वथैव केलेला असतो तेथेंच हा **'असम'** नामक अलंकार होतो. **'सर्वथैवोपमानिषेधो-**

यद्भक्ति, तत्सख्याच्या प्रभु कवण म्हणेल मी करीन वधा? ॥ २९
जा, [1]भागलीस, [2]कल्पद्रुमसंश्रितकाम कां न पुरतील? ।
स्वस्थ रहा, पांच तुझे सुत [3]सार्जुन कीं सकर्ण उरतील.' ॥ ३०
[4]कुंती [5]म्हणे, 'अभयवर आत्मा, आम्हीं जडें असों देहें, ।

---

ऽसमाख्योऽलंकारः' [रसगंगाधर–पृ० २१०] असें याचें लक्षण आहे. [वामनशास्त्री झळकीकरप्रकाशित काव्यप्रकाश–पृ० ६३९ पंक्ति २३.] जसें:–(१) या ललनेच्या मुखास उपमा नाहीं; (२) हे राजा! जो तुझी बरोबरी करतो असा पुरुष आज नाहीं, झाला नाहीं व होणार नाहीं. याप्रमाणें उपमाननिषेधात्मक उपमालंकार आहे. जेथें एका वस्तूस दुसरी उपमा नाहीं असा अर्थ असून, त्या वस्तूस त्या वस्तूची उपमा दिली आहे असा अर्थ असतो तेथें **अनन्वयध्वनि** अलंकार होतो. या अलंकाराचें उदाहरण **जगन्नाथ**-पंडितांनीं स्वकृत 'गंगालहरीं'तीलच दिलें आहे:–'नगेभ्यो यान्तीनां कथय तटिनीनां कतमया पुराणां संहर्तुः सुरधुनि! कपर्दोऽधिरुरुहे । कया वा श्रीभर्तुः पदमितरयाक्षालि सलिलैस्तुलालेशो यस्या तव जननि! दीयेत कविभिः ॥' याचें वामनपंडितकृत समश्लोकी भाषांतर:–'नद्या शैलांहूनी किति न निघती त्या क्षितितळीं, वदावें शंभूच्या शिरिं गुरुपणें कोण जडली । स्वतोयें कोणें श्रीदयितचरणालागिं धुतलें, जियेतें योजावें जळ तुज न लेशाप्रति भलें ॥' [गंगालहरी–२२.] हे गंगे! दुसऱ्या कोणत्या नदीनें श्रीहरिपाद स्वजलानें धुतले आहेत कीं कवी त्या नदीची तुलना तुझ्याशीं करतील? अर्थात् कोणत्याही नाहीं– असें उत्तर आहे. येथें तुझीच तुलना तुला आहे असा ध्वनि निघतो म्हणून हा **अनन्वयध्वनि** होय. दुसरें उदाहरण:—'भुवनत्रितयेऽपि मानवैः परिपूर्णे विबुधैश्च दानवैः । न भविष्यति नास्ति नाभवत्क्षितिप! त्वत्तुलनापरोऽपरः ॥' [चित्रमीमांसाखंडन–पृ० १७.] **अनन्वयां**त उपमान व्यक्त असतें आणि **अनन्वयध्वनीं**त तें अव्यक्त असतें, इतकाच भेद आहे. टीकाविषयक उत्तरार्धांत 'कवण' हें पद नसतें तर हा **असमा**लंकार झाला असता. या अध्यायांतील प्रथम गीतींत '**अनन्वय**' अलंकार आहे हें पूर्वींच सांगितलें आहे. ६. नवविधा.

१. दमलीस, श्रांत झालीस. २. कल्पवृक्षाश्रितांचे मनोरथ. ३. अध्याय १४६ श्लोक २३. 'न ते जातु न शिष्यंति पुत्राः पंच यशस्विनि! निरर्जुना सकर्णा वा सार्जुना वा हते मयि ॥' असें कर्णाचें मूळांत भाषण आहे. ४. अध्याय १४६ श्लो० २५-२६ पहा. युद्धांमध्यें धर्मादिक चार भ्रात्यांशीं युद्ध करणार नाहीं असें जें अभय दिलें आहे त्याचें स्मरण ठेव असें कुंतीचें भाषण आहे. ५. कुंती कर्णाला म्हणते:–अभयवर आत्मा [आहे] (तूं धर्मादिकांविषयीं दिलेला अभयवर हाच आमचा आत्मा आहे.) आम्ही देहें (शरीरानें) [केवळ] जडें (निर्जीव चैतन्यशून्य) असों (आहों. आमच्या जड देहांत तुझा अभयवर हा चैतन्यप्रद आत्मा होय, हा आत्मा जर नाहीं तर आमचीं जड चलनवलनशून्य शरीरें व्यर्थ होत. तुझ्या अभयवरानें आम्ही सप्राण

बहु तुजपुढें न वदवे, यश जोडीं, स्मरण बा! असों दे हें.' ॥ ३१
आलिंगुनि कर्णातें भिजवुनियां अश्रुंनीं पृथा [1]पैरते, ।
चित्तीं [2]म्हणे, 'सखे जे होती, फिरतांचि [3]विधि, वृथा [4]पैर ते.' ॥ ३२
सुज्ञ म्हणति, 'कोपावा विधि, परि [5]ज्याचे न पाय कोपावे.' ।
धर्माप्रति [6]वात्सल्यस्वीकृतदूतत्व देव तो [7]पावे. ॥ ३३
भेटुनि [8]अजातरिपुला संक्षेपें [9]वृत्त कथुनि आधीं, तें ।
[10]रात्रौ सविस्तर कथी, [11]त्यांच्या नाशावयासि [12]आधींतें. ॥ ३४
कृष्ण म्हणे, '[13]खळ न वळे, कथिला [14]धर्मार्थलाभ सुगमहि म्यां, ।
श्रमले [15]नारद कण्वहि बोधुनि त्या [16]मूर्तपापयुगमहिम्या. ॥ ३५

---

झालों—आमच्या जीवांत जीव आला; नाहींतर आम्ही प्राणरहित नुसतीं जड शरीरें आहोंत. प्राणरहित देहाचा जसा उपयोग नाहीं तसा तुझ्या अभयवरहित अशा आमचाही कांहीं उपयोग नाहीं. तुझा अभयवर हाच आमचा आत्मा होय. तुजपुढें बहु न वदवे (हे कर्णा! तुला मी अधिक काय सांगणार? तुझ्यापुढें ज्यास्त बोलण्याचें सामर्थ्य मला कोठें आहे? बा! (कर्णा!) हें स्मरण असों दे (दिलेल्या अभयवचनाची आठवण ठेव) [आणि] यश जोडीं (यश संपादन कर, प्राणावर बेतली तरी प्रतिज्ञाभंग तिलप्राय न करतां वचन परिपालन करणें हें यश प्राप्त करून घे. रणांत यश मिळविण्यासाठीं भांड, परंतु पांडवांस मारणार नाहीं—असा जो अभयवर दिला आहेस त्याचें स्मरण ठेव.

१. मागें आली, परतली. २. कुंती आपल्या चित्तीं म्हणे:—विधि फिरतांचि (नशीब उलट झालें म्हणजे, दैव प्रतिकूल होतांच) वृथा (निष्कारण, निमित्तावांचून) सखे (मित्र) जे ते[ही] पर (शत्रु) होती (बनतात), जे मित्र असतात तेच दैव फिरल्यावर उगीच्या उगीच शत्रु होतात. कर्ण हा आपला पुत्र असतांही दैव फिरल्यामुळें आपल्या म्हणण्याप्रमाणें वागत नाहीं असें पाहून कुंतीनें हा दुःखोद्गार काढिला आहे. ३. दैव. ४. शत्रु. ५. ज्या देवाचे (ज्या श्रीकृष्णाचे). हें **पर्यायोक्त** अलंकाराचें उदाहरण आहे. ६. वत्सलतेनें ग्रहण केलें दूतत्व ज्यानें. ७. केशव हास्तिनपुराहून उपप्लव्य नगराला परत धर्मापाशीं आला. (अ० १४७ श्लो० १.) ८. धर्मराजाला. ९. कौरवांकडील वर्तमान. १०. 'रात्रौ' हें रात्रिशब्दाच्या सप्तमीचें एकवचन आहे. असे प्रयोग **पं**तांच्या काव्यांत अनेक आहेत. [सूर्यास्त झाल्यावर संध्यावंदन करून धर्मानें कृष्णाला कांहीं विचारण्यासाठीं रात्रीं पुनः आमंत्रिलें तेव्हां श्रीकृष्ण पांडवाकडे आले. अ० १४७ श्लो० ४ पहा.] ११. धर्मराजाच्या. १२. मनोव्यथांतें. १३. दुष्ट दुर्योधन. १४. धर्म व अर्थ या पुरुषार्थांचा लाभ. १५. अ० ८ गी० ४८-१०५ पहा. १६. मूर्तिमंत पापयुग (कलियुग) त्याच्या महिम्या (दुर्योधनास).

भीष्में स्वकथा कथिली [1]सत्यवतीप्राप्तकाम जाणूनी, ।
होऊनि [2]ऊर्ध्वरेता शीघ्र दिली [3]ती [4]पित्र्यासि आणूनी. ॥ ३६
दिधलें [5]विचित्रवीर्या सत्यवतीच्या सुता [6]पद भ्रात्या, ।
[7]त्यांचे विवाह तन्मृति ऐशा कथिल्या कथा [8]अदभ्रा त्या. ॥ ३७
प्राणांसहि त्यजिति परि न त्यजिति क्षणहि जीप्रति [9]ज्ञाते, ।

---

१. सत्यवतीविषयीं प्राप्त झाला काम (इच्छा) ज्याला तो (पिता शंतनु). [विचारी लोक एक पुत्राला अपुत्र समजतात म्हणून शंतनूला दुसरा पुत्र असावा अशी इच्छा उत्पन्न झाली ही पित्याची इच्छा जाणून भीष्मानें सत्यवतीला बापापाशीं आणिलें. अ० १४७ श्लो० १८-२०. काव्यसंग्रहग्रंथमाला–मुक्तेश्वर–आदिपर्व–अध्याय २३ ओव्या ४०-७८ पृ० १९८-२०० पहा.] २. ब्रह्मचारी. ३. ती=सत्यवती. ४. शंतनूला. ५. विचित्रवीर्य हाच भीष्माचा धाकटा भ्राता. ६. शंतनु स्वर्गवासी झाल्यावर भीष्मानें स्वराज्यपद विचित्रवीर्याला दिलें. ७. मोरोपंत–आदिपर्व–अध्याय १४ पहा; मुक्तेश्वर–आदिपर्व–अध्याय २३ ओव्या ८४-१६८ पहा. ८. बहुत. दभ्र=अल्प, अदभ्र=पुष्कळ. ९. ज्ञाते (विचारी पुरुष) प्राणांसहि त्यजिति, परि जीप्रति (ज्या प्रतिज्ञेला) क्षणहि न त्यजिति (क्षणभरसुद्धां ज्या प्रतिज्ञेला सोडीत नाहींत) [आणि] जी मातेच्याही (सत्यवतीच्याही) वचनें न त्यजिली (भीष्मानें जी प्रतिज्ञा मातेच्या सांगण्यावरून सुद्धां टाकिली नाहीं) ते प्रतिज्ञा [त्या प्रसंगीं भीष्मानें दुर्योधनास] कथिली=कृष्ण धर्मास म्हणतो:–ज्ञाते लोक प्राण गेला तरी बेहत्तर आहे, पण जिचा त्याग कधीं करीत नाहींत आणि जी मोडावी असें आईनें आग्रहपूर्वक सांगितलें असतांही भीष्मानें मोडिली नाहीं ती प्रतिज्ञा भीष्मानें बोध करण्याच्या प्रसंगीं दुर्योधनास सांगितली. भीष्मानें केलेली प्रतिज्ञा केवळ असामान्य होती:–गांगेय म्हणे, 'त्यजिला स्त्रीसंग; सशंक दाशवर ज्यांत; । अनृत वदेन, तरि गळो हें, न रणमखीं कदा, शव रजांत. ॥ ९६ ॥ [मोरोपंत–आदिपर्व–अध्याय १२ गीती ९३-१०० पृ० ८८-८९ पहा.] भीष्म म्हणे, 'माते! त्वां धर्मचि कथिला, परि प्रतिज्ञा ते । अत्याज्य भीति सत्यभ्रंशासि, न बहु अरिप्रति ज्ञाते. ॥ ५ ॥ म्यां ब्रह्मचर्यसुव्रतनियम स्वमुखें त्वदर्थ जो केला, । देह त्याज्य, परि न तो त्याज्य; न सेवील सुज्ञ ओकेला. ॥६॥ त्यजितील पंचभूतें स्वगुणासि, रवी छवीस सोडील, । शीतत्वातें चंद्रहि, शक्रहि करविक्रमासि तोडील. ॥ ७ ॥ उष्णत्व त्यजिल दहन, मर्यादेतेंहि सिंधु सोडील, । धर्मपर धर्मराजहि सद्धर्मप्रीतिलाहि तोडील; ॥ ८ ॥ परि हा शांतनव, तुझा सुत, केवळ कृपण मान सत्य जितां । मेल्याहि न टाकील, प्राणासि न भीतमानस त्यजितां. ॥ ९ ॥ [मोरोपंत–आदिपर्व–अ० १५ गी० ५-९ पृ० ९१ पहा.] या प्रसंगाचें वर्णन अन्यत्र असें आहे:– 'कथं त्वयि स्थिते वीर दौहित्रो मे नृपो भवेत् । इत्युक्ते दाशराजेन वीरः शांतनवोऽब्रवीत् ॥ नाहं राज्यं करिष्यामि सत्योऽयं समयो मम । इति ब्रुवाणं गांगेयं दाशराजोऽब्रवीत्पुनः ॥ सत्यसंध प्रतिज्ञैषा तव तावदनश्वरी । त्वत्सुतानां तु वीराणां राज्यं को वार-

कथिली मातेच्याही[1] वचनें त्यजिली न जी प्रतिज्ञा, ते. ॥ ३८
जन्म व्यासापासुनि[2] कथिलें धृतराष्ट्रपांडुविदुरांचें, ।
सर्वासुखदाराजकपीडितलोकाधिशैलभिदुरांचें.[3] ॥ ३९
क्षितिनें[4] अंध त्यजिला, वरिला जो पांडु उचित राज्याला; ।
चोखील[5] तैल रसना[6] काय त्यागूनि शुचितराज्याला[7]? ॥ ४०
विश्व ज्येष्ठ श्रेष्ठ प्रेष्ठ[8] असें ज्या[9] स्वंपितृनिभा[10] गातें, ।
तो पांडव धर्म कसा सांग नव्हे योग्य या विभागातें[11]? ॥ ४१
गाती अजातरिपुच्या हे सर्व परा सुयोधना[12]! महिम्या, ।

---

यिष्यति ॥ देवव्रतस्तदाकर्ण्य दाशराजमभाषत । व्येतु ते मत्सुतभयं ब्रह्मचारी भवाम्यहम् ॥ इत्युक्ते राजपुत्रेण गगनात्पुष्पवर्षिणः । भीषणा ते प्रतिज्ञेयं भीष्मेति प्रोचिरे सुराः ॥' [काव्यमाला–अंक ११३–भारतमञ्जरी–श्लोक ४४३-४४७ पृष्ठ ३७.] मुक्तेश्वरानें या प्रसंगाचें वर्णन फार सुरेख केलें आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मुक्तेश्वर–आदिपर्व–अध्याय २४ ओव्या ४-१० पृ० २०६.] येथें पूर्वार्धांत सामान्य प्रतिज्ञेचें महत्व सांगून उत्तरार्धांत भीष्मानें केलेल्या विशेष प्रतिज्ञेचें महत्व सांगितलें आहे.

१. 'हे भीष्मा! तूं राजा हो आणि प्रजेचें पालन कर' असें सत्यवतीचें वचन भीष्मानें पाळिलें नाहीं या गोष्टीस अनुलक्षून हें वर्णन आहे. [अ० १४७ श्लो० २९-३१.] 'मी राजा होणार नाहीं व विवाह करणार नाहीं' असें भीष्मानें उत्तर दिलें. [अ० १४७ श्लो० ३३-३५.] २. मोरोपंत–आदिपर्व–अध्याय १५ गीति ३४-८३ यांत धृतराष्ट्र, पांडु आणि विदुर यांचें जन्मवृत्त सांगितलें आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–आदिपर्व–पृ० ९४-९७.] ३. सर्व+असुखद+अराजक+पीडित+लोक+आधि+शैल+भिदुरांचें=सकल+दुःखप्रद+राजरहितता+व्यथित+जन+मनोव्यथा+पर्वत+वज्रांचें=सर्वांस दुःख देणारें जें अराजक (अनीश्वरता–राजाभाव, राजविप्लव) त्यानें पीडिलेल्या लोकांच्या आधिरूप पर्वतास जे वज्राप्रमाणें विध्वंसक त्यांचें (त्या धृतराष्ट्रपांडुविदुरांचें). हें उत्तरार्ध एक सामासिक पद आहे; अशीं समासघटित लांब लांब पदें पंतांच्या ग्रंथांत विपुल आहेत. ४. पृथ्वीनें ज्येष्ठ पुत्र धृतराष्ट्र अंध होता म्हणून राजा स्वीकारिला नाहीं. [अ० १४७ श्लो० ३९.] ५. या उत्तरार्धांत **'प्रतिवस्तूपमा'** अलंकार आहे. ६. जिव्हा. ['रसना कांचिजिव्हयोः' इति विश्वप्रकाश.] ७. शुचितर आज्याला. अतिशयित पवित्र अशा घृताला. ८. प्रियतम. ९. ज्या धर्मराजाला. १०. पितृतुल्या. ११. राज्यार्धातें. १२. [हे] सुयोधना! अजातरिपुच्या (अजातारि धर्मराजाच्या) परा महिम्या (अत्यंत श्रेष्ठ अशा माहात्म्याला, अत्युच्च थोरपणाला) हे सर्व (हे सकल सभाजन) गाती (गातात, स्तवितात, वर्णितात.) [यास्तव] [सर्व सभाजन धर्मराजाच्या विमल कीर्तीचें गान करतात म्हणून] त्यासचि (त्या धर्मराजालाच) वसुधा (पृथ्वी, क्षिति) म्यां द्यावी (म्यां भीष्मानें धर्मराजाला राज्यपद दिलें पाहिजे). [आतां

द्यावी त्यासचि वसुधा निरवूनि परासुयोधनामहि म्या. ॥ ४२
तातचि[१] योग्य नव्हे, मग राज्याला योग्य तूं कैसा? वद रे![२] ।
पद[३] रेखिलें कपाळीं विधिनें त्याच्या[४], तुज्या अयश[५] सदरे[६]!' ॥ ४३
ऐसें बहु भीष्म वदे, गुरुहि[७] म्हणे, 'मिळुनियां[८] स्वभावांसीं, ।

---

ही वसुधा धर्मराजाला दिली पाहिजे हें भीष्म सांगत आहे.] परासुयोधनामहि निरवूनि [वसुधा द्यावी] परासु (मृत, गतप्राण अशा) परलोकवासी अशा (पूर्वज) योधाचें (वीरांचें, शूराचें) नामहि (कीर्ती देखील) निरवूनि (स्वाधीन करून, स्वर्गवासी पूर्वज शूरांची कीर्ति देखील-धर्माच्या स्वाधीन करून वसुधा दिली पाहिजे. धर्माच्या स्वाधीन पृथ्वी केली पाहिजे व मृत शूरांची कीर्ति ही केली पाहिजे, वसुधा व कीर्ति या दोहोंचेंही रक्षण धर्मराजानें करावें म्हणून त्या दोहोंस त्याच्या स्वाधीन केलें पाहिजे). या उत्तरार्धाचा जो अर्थ दिला आहे तो आम्हास सर्वथा संमत आहे असें नाहीं. येथें 'निरवून' या ठिकाणीं 'नुरवून' असा पाठ एका पोथींत आढळतो व तोच सुरस दिसतो. 'परासु योध नामहि नुरवून म्यां त्यासचि वसुधा द्यावी'=युद्धाचा प्रसंग न आणतां त्यास (धर्माला) वसुधा द्यावी=रक्तस्राव न करितां त्यास वसुधा द्यावी. युद्धाचा प्रसंग येऊन त्यांत योध (योद्धे) परासु झाले असें नांवही न उरतां त्यास वसुधा द्यावी-असा अर्थ बरा दिसतो. पर+असु=शत्रु+प्राण; योध+नाम=वीर+नाम=शत्रूंचे प्राण आणि योधांचें नांव ही न उरवितां म्हणजे सर्वांला जिंकून निष्कंटक अशी सर्व पृथ्वी धर्माला द्यावी-असाही अर्थ संभवनीय आहे. येथें पहिल्या अर्धांतील वाक्यांत 'कारण' आणि दुसऱ्या अर्धांतील वाक्यांत 'कार्य' असा दोन वाक्यांत कार्यकारणभाव स्वीकारला आहे आणि 'म्हणून' हा शब्द अध्याहृत आहे, यास्तव हा **काव्यलिंग** अलंकार समजावा. [अलंकारमीमांसा-पृ० ४२.] याचें लक्षण व उदाहरण:-(१) **काव्यलिंगं** हेतुना स्यात्समर्थव्यसमर्थनम् । वाक्यार्थत्वे पदार्थत्वे हेतोर्द्वैविध्यमिष्यते ॥ जितोऽनया स्मरो नूनं यामालिंगति वल्लभः । कंदर्पमजयद्विप्रस्त्रिनेत्राक्रांतमानसः ॥ [मंदारमरंदचंपू-व्यंग्यबिंदु-पृष्ठ १४१.] (२) समर्थनीयस्यार्थस्य काव्यलिंगं समर्थनम् । जितोऽसि मंद कंदर्प! मच्चित्तेऽस्ति त्रिलोचनः ॥' [कुवलयानंद.] (३) हेतोर्वाक्यपदार्थता काव्यलिंगम्. [अलंकारसर्वस्व.] जेथें समर्थनीय अर्थाचें समर्थन (सयुक्तिक प्रतिपादन) केलें असतें तेथें **काव्यलिंग** अलंकार होतो. यांत कार्यकारणभाव मानिला असून 'म्हणून' 'कारण' असा शब्द अध्याहृत असतो. याचीं उदाहरणें:-(१) हे मदना पीडूं नको, माझ्या अंतरीं हर आहे. (२) या आर्येचा अर्थ हरिपंतच लावतील, ते जाडे पंडित आहेत. (३) ज्याचा संकल्पचि हें अद्भुत ऐसें अतर्क्य विश्व रची । अत्यद्भुत पुर तें कां नोहे शिल्पी जयास ईश्वरची ॥२॥ [मोरोपंत-बृहद्दशम-उत्तरार्ध.]

१. पिता धृतराष्ट्र. २. हें **काव्यार्थापत्ति** नामक अलंकाराचें उदाहरण. ३. राज्यपद. ४. त्या धर्माच्या. ५. तुझ्या कपाळीं विधिनें अयश रेखिलें-असा भाव. ६. हे साधुशत्रो. ७. द्रोणाचार्य म्हणे. [अध्याय १४८ श्लो० ११-१६.] ८. आपल्या बंधुजनाशीं ऐक्य करून.

भोगीं राज्यसुख; वृथा कां करिसी भेद [1]सुस्वभावांसी? ॥ ४४
हा ब्राह्मण [2]भीष्माश्रित साक्षात् [3]त्वद्दत्तवृत्ति कारा या, ।
[4]सदहितजनसंपर्कें [5]सुकृताची होय [6]मृत्तिका, [7]राया! ॥ ४५
मी गुरु त्यांचा तुमचा, त्यांचें तुमचेंहि सत्य जें [8]विहित, ।
तेंचि [9]कथावें म्यां, या [10]अश्वत्थाम्या सुतासि जेंवि हित. ॥ ४६
धर्माला [11]भीष्मप्रभुवचनें राज्यार्धभाग दे, [12]वांचें; ।
न भलें [13]आग [14]भल्याचें, क्षणतरिहि पचेल [13]आग देवांचें. ॥ ४७
जिकडे [15]नदीज तिकडे मी, मन्मन [16]अक्षकाळकेतुकडे; ।

---

१. उत्तम स्वभाव ज्यांचा अशा सुशीलसंपन्न भावांशीं. २. 'द्रोण भीष्माचा आश्रित'–असें येथें म्हणतो, परंतु भीष्मानें द्रोणाचा मोठा गौरव करून त्यास राजकुमारांला धनुःश्रुतिहृदय शिकविण्यास ठेविलें इत्यादि वर्णन इष्ट तर आदिपर्वांत पहावें. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–आदिपर्व–अध्याय २२-२३ पृ० ११९-१२४.] ३. तूं दिलेली वृत्ति (उपजीविका) याला साक्षात् कारा (बंदिशाळा) होय. ४. साधुद्वेष्ट्या जनाच्या समागमानें. ५. पुण्याची. ६. माती. [तुमच्या सारख्या साधुद्वेषकांच्या संसर्गानें माझ्या पुण्याची माती होणार असें सांगून द्रोण दुर्योधनाची निर्भर्त्सना करीत आहे.] ७. हे दुर्योधना! ८. उचित, योग्य. ९. उपदेशावें. १०. जसा हा अश्वत्थामा तसाच मला श्वेतहय अर्जुन असें मूळांत आहे. [अ० १४८ श्लो० १६.] **पं**तांनीं येथें मूळांतील वर्णन सुधारून द्रोणाच्या मुखें त्याच्या पदवीला अनुरूप असा समदृष्टिद्योतक उदात्त विचार वदविला आहे, यामुळें ही गीति **पं**तांच्या मार्मिकतेची साक्ष पटवीत आहे असें कोण कबूल करणार नाहीं? मी आपल्या पुत्राला जसा हितोपदेश करीन तसाच तुम्हां पांडवधार्तराष्ट्रांस करणार असें द्रोणाचें म्हणणें आहे. ११. भीष्मप्रभूच्या आज्ञेनें. १२. जीविताचा बचाव कर. १३. अपराध. १४. भल्याचें (साधुजनाचें) आग (अपराध) भलें न=सज्जनाचा अपराध केला असतां तो कधींही पचणार नाहीं, साधुजनांचा अपराध कधीं सुसह असावयाचा नाहीं, साधुजनांचा अपराध केला तर त्याजबद्दल भलेंच शासन क्षणांत व्हावयाचें, त्या अपराधाबद्दल जबरदस्त पारिपत्य झाल्याशिवाय राहावयाचें नाहीं. देवांचें आग क्षणतरिहि पचेल=देवाचा अपराध केला असतां तो क्षणभर तरी पचेल, देवाचा अपराधी क्षणभर शिक्षा चुकवूं शकेल अथवा बचावला जाईल, पण तसें साधुजनाचें नाहीं. त्यांचा अपराधी दंड भोगल्याशिवाय कधीं राहावयाचा नाहीं. देवाचा अपराध केला तर क्षणभर पचेल पण सज्जनांचा अपराध कधींही पचणार नाहीं. यांत **व्यतिरेका**लंकार झाला आहे. १५. भीष्म. [नदीज=नदीपासून–गंगानदीपासून, ज=झालेला, जात, जन्मलेला=भीष्म.] १६. अक्षकाळ हनूमान् तो केतूवर म्हणजे ध्वजावर ज्याच्या त्या अर्जुनाकडे. हें 'असंमित वाक्या'चें उदाहरण आहे. खंडित, व्यस्तसंबंध, असंमित, अपक्रम, छंदोभ्रष्ट, रीतिभ्रष्ट, यतिभ्रष्ट आणि असत्क्रिय वाक्य असे वाग्भटानें वाक्यांचे आठ दोष

सोडुनि सदन्न सेविल कोण सुधी अशुचि वाळके तुकडे?' ॥ ४८

विदुरहि सभेंत वदला तीतातें, तेंहि आयका सारें, ।

कैविनेंचि तृप्ति कर्णा द्यावी, तृषितासि काय कासारें? ॥ ४९

---

'वाग्भटालंकार' नामक ग्रंथांत सांगितले आहेत. [वाग्भटालंकार–२ परिच्छेद–श्लोक १७–काव्यमाला पृ० २१.] हे वाक्याचे आठ दोष सलक्षण आणि सोदाहरण द्वितीय परिच्छेदांत दर्शविले आहेत. 'मन्मन अक्षकाळकेतुकडे' हें वाक्य **असंमित** दोषयुक्त आहे. या दोषाचें लक्षणः–'शब्दार्थौ यत्र न तुलाविधृताविव संमितौ । तदसंमितमित्याहुर्वाक्यं वाक्यविदो यथा ॥' [वाग्भटालंकार–२ परिच्छेद–श्लो०.२०–काव्यमाला पृ० २१]. ज्या वाक्यांत शब्द आणि अर्थ हे तुलाविधृत पदार्थांप्रमाणें तुल्य नसतात, शब्द बहु आणि अर्थ अल्प, जेथें शब्दबाहुल्य आणि अर्थस्तोकत्व असतें त्या वाक्याला विद्वान् लोक असंमित असें दूषण लावतात. याचें उदाहरणः—'मानसौकः पतद्यानदेवासनविलोचनः । तमोरिपुविपक्षारिप्रियां दिशतु वो जिनः ॥' [वाग्भटालंकार–२ परिच्छेद–श्लो० २१]. हें इतकें शब्दबाहुल्य 'कमलनेत्रो जिनो वो लक्ष्मीं दिशतु' ह्या अल्प अर्थासाठीं योजिलें आहे. या उदाहरणांत शब्द पुष्कळ आणि अर्थ अगदीं अल्प अशी रचना आहे. या उदाहरणास '**असंमित** वाक्य' असा दोष दिला आहे. यांत शब्दांच्या बरोबरीनें अर्थ नाहीं म्हणून हें वाक्य सदोष होय. 'मन्मन अक्षकालकेतुकडे' हें वाक्य ही याच दोषाला पात्र आहे? कारण यांत शब्द बहुत आहेत आणि त्या मानानें तत्तुल्य अर्थ पाहिजे होता तो फारच अल्प आहे. 'मन्मन अर्जुनाकडे' इतकाच उद्दिष्ट अल्प अर्थ असून त्याच्या व्यक्तीसाठीं पुष्कळ शब्द योजिले आहेत. हा पददोष नसून वाक्यदोष आहे. भोजराज, वामन, प्रतापरुद्र, विश्वनाथ हे साहित्यशास्त्रकार या दोषाला '**क्लिष्ट**' किंवा '**अपुष्टार्थ**' असें नांव देतात.

१. या उत्तरार्धांत **दृष्टांत** नामक अलंकार झाला आहे. येथें सुधी=द्रोण; सदन्न=भीष्मकृष्णपांडवपक्ष; वाळके तुकडे=दुर्योधनपक्ष. 'मन्मन अर्जुनाकडे असणें' व 'वाळके तुकडे सेवणें' या दोन धर्मांमध्यें बिंबप्रतिबिंबभाव आहे व हीं दोन वाक्यें स्वतंत्र आहेत, अन्योन्यापेक्ष नाहींत, तेव्हां हा '**दृष्टांत**' अलंकार समजावा. २. भीष्मातें. ३. [अहो पांडव!] ऐका [विदुर भीष्माच्या तोंडाकडे पाहून जें बोलला तें ऐका–असें मूळांत आहे. अ०१४८ श्लो० १७-२७. ४. कविनेंचि कर्णा तृप्ति द्यावी, कासारें तृषितास काय [द्यावी?]–असा अन्वय. कविनेंचि (ज्ञात्यानेंच) कर्णा तृप्ति द्यावी (कर्णाला खरी तृप्ति द्यावी, ज्ञात्या पुरुषानेंच आपल्या सुरस भाषणानें कर्ण तृप्त करावे), कासारें (सरोवरानें) तृषितासि (तान्हेल्यास) काय तृप्ति द्यावी? (ती तृप्ति कांहींच नाहीं, तलावानें तान्हेल्याची तान काय भागवावयाची आहे? [जशी कवि तृप्ति कर्णास देतो, तशी तृप्ति कासार तृषितास देत नाहीं, कमी देतो–असा भाव. द्रोणादिकांच्या भाषणांत अर्थ व तत्व असेल, पण त्याहून विदुराच्या भाषणांत हे गुण अधिक–असें सांगण्याचें धोरण आहे.] ५. सरोवरानें.

'लीलेनें उद्धरिला स्पष्ट बुडविलाचि वंश पर मागें; ।
कां आजि बुडों देतां या पामरपापपौत्रपरमागें? ॥ ९०
बुडविल कुळ हा लोभी हा क्रोधी हा असाधु हा कामी, ।

---

१. परंतु. २. पूर्वीं बुडालेला वंश भीष्मानें व्यासाची प्रार्थना करून सहज उद्धरिला. [मागें गी० ३६-४१ पहा.] ३. हे भीष्मतात! आज हा वंश कां बुडों देता? [जेणेंकरून कुरुवंश बुडणार नाहीं असें करणें हें तुमचें कर्तव्य आहे असें सूचविलें आहे.] ४. पामर आणि पाप जो पौत्र (नातू–सुयोधन). त्याच्या परम आगानें–म्हणजे मोठ्या अपराधानें. ५. हा लोभी (दुर्योधन) जे कामी आणि क्रोधी असतात त्यांचें पंतांनीं सुरेख वर्णन केलें आहे:–कामाची क्रोधाची ज्यांही केली जपोनि आज्ञा, ते । चुकले, स्वहिता मुकले, त्यांतें पाहोनि म्हणति 'हा!' ज्ञाते. ॥ ९३ ॥ [मोरोपंत–आदिपर्व–अध्याय ३३–पृ० १८०.] ६. खल, दुष्ट. ७. कामासक्त. कामी क्रोधी लोभी हे केवळ अविचारी असतात. हे कांहीं पाहत नाहींत. 'नैव पश्यति जात्यंधः कामांधो नैव पश्यति । न पश्यति मदोन्मत्तस्त्वर्थी दोषान्न पश्यति।। दश धर्मं न जानंति धृतराष्ट्र! निबोधनात्। मत्तः प्रमत्त उन्मत्तो जातिक्रुद्धो बुभुक्षितः ।। त्वरमाणश्च भीरुश्च लुब्धः कामी च याचकः ।।' [मेघदूत–सारोद्धारिणी टीका.] या पूर्वार्धांत '**समुच्चय**' नामक अलंकार झाला आहे. दुर्योधनाचें लोभित्व, क्रोधित्व, असाधुत्व व कामित्व या सर्व कारणांचा अन्वय कुळ बुडविणें या क्रियेकडे केला आहे व त्या चारही पदार्थांचा सहभाव कवीस इष्ट आहे म्हणून हा '**समुच्चय**' नामक अलंकार जाणावा. याचें लक्षण:–अनेक पदार्थ, अनेक गुण किंवा अनेक क्रिया यांचा युगपद्भाव (सहभाव–अन्वय) एकाच कार्याच्या ठिकाणीं इष्ट असतो किंवा त्यांचें निबंधन एकाच कार्याच्या ठायीं केलें असतें तेव्हां **समुच्चय** अलंकार होतो. या अलंकाराचें लक्षण असें:–(१) 'बहूनां युगपद्भावभाजां गुंफः समुच्चयः' [कुवलयानंद–११३], (२) 'युगपत्पदार्थानामन्वयः समुच्चयः' [रसगंगाधर–पृ० ४८९], (३) 'तत्सिद्धिहेतावेकस्मिन्यत्रान्यत्तत्करं भवेत्। समुच्चयौऽसौ' [काव्यप्रदीप ३०–पृ० ४२७]. (४) गुणक्रियायौगपद्यं समुच्चयः [अलंकारसर्वस्व], (५) यत्रैकत्रानेकं वस्तु परं स्यात्सुखावहाद्येव। ज्ञेयः समुच्चयोऽसौ त्रेधान्यः सदसतोर्योगः ॥ [रुद्रटप्रणीत काव्यालंकार–पृ० ७८.] गुणक्रियोभयेषां वा यौगपद्यं समुच्चयः। माधव तव दयितेयं विरहपरीवाहविप्लुता सुतनुः। अलसा मलिना दीना विवशा शुष्का निरीक्षते मार्गम् ॥ किं चास्याः शृणु वृत्तं माधव यमुनातटीनिकुञ्जेषु। विलुठति ताम्यति शेते भ्राम्यति नितरां मुहुर्मुहुः श्वसिति ॥ धावति मुहुरुत्कम्पं व्याकुलतारं समीक्षते भूयः। प्रलपति विस्खलदक्षरमुदयद्दैन्यं तनोति सा चेष्टा ॥ केचित्तु भिन्नविषयेऽप्येनमाहुः समुच्चयम्। माधवः प्रेक्षते राधां कंदर्पो विशति स्वयम्। अहंप्रथमिकाभाजां बहूनां कार्यसाधने। कारणानां समुद्योगः स द्वितीयः समुच्चयः। विनयो दक्षता त्यागो माधुरी चातुरी धनम्। विद्या वयः कुलं रूपमुत्तमं कथयंति तम् ॥ [मंदारमरंदचंपू–व्यंग्यबिंदु १०.] (७) एकत्र यत्र वस्तूनाम-

कां न तुम्हींही परिसां? मारित आलों अशाचि हांका मी.[1] ॥ ९१
बापाजी! आम्हीं हीं चित्रें,[2] तुमचा अनुग्रह चितारी,[3] ।
निर्मुनि शोभवुनि पदीं स्थापुनि पूजुनि अनुग्रहचि तारी.[4] ॥ ९२

---

केषां निबंधनम्। अत्युत्कृष्टापकृष्टानां तं वदंति समुच्चयम्. ॥ १३१ ॥ [वाग्भटालंकार–परिच्छेद ४, पृष्ठ ५७.] जेथें अनेक पदार्थ, अनेक गुण किंवा अनेक क्रिया यांचा युगपद्भाव (सहभाव–गुंफ–संदर्भ) इष्ट असतो तेथें हा 'समुच्चय' होतो. जेथें एका कार्याच्या सिद्धीसाठीं अनेक कारणांचा एकाच वेळीं खलेकपोतन्यायानें संबंध जोडिला असतो तेथें 'समुच्चय' अलंकार होतो. 'भुलला धर्म द्युतिला, धृतिला मतिला तिच्या तथा स्तुतिला' [वनपर्व–अ० १३ गीति ७८.] या गीतींत द्युति, धृति, मति आणि स्तुति या सावित्रीच्या एकवटलेल्या चार पदार्थांस यमधर्म अतिशय भुलला असा या चारांचा युगपद्भाव इष्ट आहे; म्हणून हा 'समुच्चय' अलंकार होय. सावित्रीच्या एका पदार्थासही भुलून जाणें साहजिक आहे. मग येथें तर चारीही एकवटले आहेत तेव्हां त्यांस यमधर्म भुलला यांत नवल नाहीं. धर्माच्या भुलून जाण्यास एक द्युति हा पदार्थ पूर्ण कारण असून धृति, मति, स्तुति हे पदार्थही त्याच कार्याच्या सिद्धीकरितां कारणत्वानें मिळून प्राप्त झाले आहेत. तेव्हां 'समुच्चय' अलंकार होय. याचीं अन्य उदाहरणें:—(१) पाय धरुनियां म्हणती, 'रामा! आम्ही तुझेचि सांगाती'। रडती, पडती, पढती स्तोत्रें, त्याच्याचि कीर्तिला गाती. ॥ ३७ ॥ [मंत्ररामायण–अयोध्याकांड, काव्यसंग्रह–पृष्ठ ४९], (२) मज शंतनुगंगागुरुगोविप्रवरप्रसादपात्रास। यात्रासमयभ्रंशें दुर्गति, ऐसा धरूं नका त्रास. ॥ १२९ ॥ [भीष्मपर्व–अध्याय ११ वा], (३) तव संततिच न केवळ, बुडविलि निखिला महीहि या पापें; । निर्दय निर्भय निस्त्रप भस्म करावाचि हा तुवां शापें. ॥ ५१ ॥ [स्त्रीपर्व–अध्याय ३ रा], (४) म्हणतें तुझ्या सख्याला, 'बा कोणिकडे झुगारिलें शिर तें;। चिरतें काळिज; कानीं कन्येचें करुण वच जसें शिरतें' ॥ २३ ॥ [स्त्रीपर्व–अध्याय ५ वा.]

१. मी हांका मारीत आलों=मी सांगत आलों. येथें '**लोकोक्ति**' नामक अलंकार झाला आहे, कारण यांत लोकांच्या सामान्य भाषणाचें अनुकरण केलें आहे. २. आलेख्य. ३. चित्रकार. (अध्याय १४८ श्लो० २३.) या पूर्वार्धांत **रूपका**लंकार झाला आहे. विदुरानें बापाजी भीष्म याचा अनुग्रह यास चितार्‍याची उपमा दिली आहे व आपणा सर्वांस चित्राची. आपणा सर्वांस चित्राची उपमा दिल्यानें आपण सर्व चित्राप्रमाणें सामर्थ्यहीन व भीष्म महापराक्रमी कर्ता असें ध्वनित केलें. ४. [तुमचा] अनुग्रहचि (तुमची कृपाच केवळ) [आम्हांस] निर्मुनि (जन्म देऊन) शोभवुनि (आम्हास उत्तम शिक्षणानें सुशोभित करून) पदीं स्थापुनि (राज्याधिकार देऊन) पूजुनि (आमचा गौरव करून, आमची योग्यता वाढवून) तारी (शत्रूंपासून रक्षण करी, शत्रूंनीं जिंकण्यास अशक्य अशा अजय्य आणि अधृष्य स्थितीस पोंचवून रक्षण करी.)

गेली वृद्धपणीं [1]मति, जोडा सुतपोवनांत [2]सुतपातें, ।
[3]धृतिला पळवुनि [4]मूर्छा न शिरो तुमच्या मनांत [5]सुतपातें. ॥ ९३
घ्या **धृत**राष्ट्रासि, [6]चला, ही जसि तसि वृत्ति ती न [7]सापाया, ।
कीं सदनांतुनि काढा न, करूनि उपाय, [8]तीन सापा या. ॥ ९४

---

१. 'अथ तेऽद्य मतिर्नष्टा विनाशे प्रत्युपस्थिते' (अ० १४८ श्लो० २४). २. उत्तम तपाला. ३. धैर्याला. ४. मोह. येथें मूर्च्छेवर चेतनधर्मांचा आरोप केला आहे म्हणून हें **'चेतनधर्मारोपोक्ति'** नामक अलंकाराचें उदाहरण झालें. जेथें अचेतन पदार्थावर सचेतनत्वाचा आरोप करून सचेतनाचा धर्म दाखविला असतो तेथें हा अलंकार होतो. येथें मूर्च्छा अचेतन असून तिची क्रिया सचेतन ज्ञानसंपन्न मनुष्याप्रमाणें समजून वर्णिली आहे. याच अलंकारास 'अनेकविद्यामूलतत्व' ग्रंथांत **'चेतनगुणोक्ति'** असें नांव दिलें आहे. हा अलंकार इंग्रजी साहित्यशास्त्रांतून घेतला आहे. या अलंकाराचीं अन्य उदाहरणें:– (१) 'कार्ष्णि म्हणे पळ इकडे पाहुन सजन न पत्रिकेतुकडे । चर्मोपरि लिहिलें कीं वपुचे मज्जननपत्रिके! तुकडे ॥' [द्रोणपर्व–अध्याय ३ गीति १३१ पहा], (२) 'दावी रडोनि झाले जे गंध उगाळितां स्वहात किणी. । भीम म्हणे, 'विधिलेखनि! लेखनिं नच वचकलीस घातकिणी ॥.' [विराटपर्व–काव्यसंग्रहग्रंथमाला–पृष्ठ २५ गीति १०६ पहा], (३) जातां सूत अनिद्रास्त्री भेटे नूतनाचि रायास, । कीं संतोषा बाळा ये चिंतापूतना चिरायास. ॥' [मागें अध्याय ३ पृष्ठ ४६ गी० ७७ पहा.] ५. पुत्राच्या पतनानें. ६. वनांत जाऊं चला. धृतराष्ट्राला बरोबर घेऊन वनांत तपश्चर्येला चला जाऊं. ही वृत्ति (आपल्या दृष्टीसमोर अन्यायाचरण होऊं देणें व तें आपण घरांत राहून स्वस्थपणें पाहणें ही स्थिति) जसि सापाया (अपाययुक्त, विघ्नसहित, विघ्नपरिपूर्ण दुःखप्राप्तिकारक आहे) तशि ती [वृत्ति] न (वनांत राहून शांत चित्तानें तपश्चर्या करणें, अरण्यवास स्वीकारून अक्षुब्ध व शांत मनानें तपस्या करणें, सापाय (धोक्याचें) नाहीं. [जशी स्वसदनवास वृत्ति सापाय (धोक्याची) आहे तशी वनवासवृत्ति धोक्याची नाहीं.] कीं (कारण कीं–ज्यापेक्षां) [तुम्ही] उपाय करूनि (उपाय योजून, युक्ति लढवून) या तीन सापा (कर्ण, शकुनि आणि दुर्योधन या तीन सापांला) सदनांतून (आपल्या घरांतून) काढा न (काढीत नाहीं.) [विदुर भीष्मास म्हणतोः–अहो बापाजी! तुम्ही वृद्ध झालां, तुमची साठी बुद्धि नाटी झाली. तुम्ही ज्या अर्थीं घरांतून या तीन सापांला काढीत नाहीं, त्या अर्थीं हे साप घरांतच राहिले. 'ससर्पे च गृहे वासः मृत्युरेव न संशयः' या न्यायानें घरांत राहणें (स्वसदनवास) तुम्हास अपायकारक आहे. याकरितां धृतराष्ट्राला घेऊन वनांत जा, ती वृत्ति बरी. भीष्माचार्यांस असें चापून आणि खडखडावून सांगणारा पुरुष किती तरी स्पष्टवक्ता आणि निःस्पृह असला पाहिजे! ७. अपायसहित. ८. कर्ण, शकुनि दुर्योधन, या तीन सापांस.

राज्य कराल तरि, जना तारुनि, आपण तराल [1]राघवसे; ।
[2]त्या काय राज्य? [3]जेथें कामक्रोधादि [4]दुस्तराघ वसे. ॥ ५५
[5]स्वपरविनाशोपेक्षा कां करितां? व्हा प्रसन्न, यश रक्षा. ।
[6]भोगार्थ काय रामें होऊं न दिलें [7]कलत्र वश [8]रक्षा?' ॥ ५६
चिंताग्नीनें [9]अंतःसंतप्ता सर्वकाळ, जी चुल, ती ।
बहु वदली, वाहतसे बहु तुमची सर्व काळजी [10]चुलती. ॥ ५७

---

१. राघवाप्रमाणें. [राघव लोकांना तारून स्वतः तरला तसे.] २. त्या पुरुषांला राज्याचा काय उपयोग? राज्य प्राप्त करून त्यांस काय कर्तव्य आहे? ३.ज्या पुरुषांमध्यें कामक्रोधप्रभृति अपरिमार्जनीय पाप वसतें त्यांस राज्य काय कामाचें? कामी क्रोधी पापी पुरुष राज्याला अपात्र होत. ४, दुस्तर+अघ=भयंकर, दारुण+पातक. ५. स्वपर-विनाशोपेक्षा कां करितां? (स्वकीय आणि परकीय यांचा नाश ज्या कारणानें होणारा आहे त्याची उपेक्षा कां करितां? असें करूं नका) प्रसन्न व्हा (मी प्रार्थितों कीं कृपा करा) [आणि] यश रक्षा (यशाचें रक्षण करा, स्वपरघातक कारणांची उपेक्षा केली असतां यशाचें रक्षण व्हावयाचें नाहीं तरी तसें करूं नका.) [तुम्हासारख्या असामान्य शूरांला यश जर प्रिय नसावें तर प्रिय अशी अन्य वस्तु तरी कोणती आहे? अर्थात् कोणतीही नाहीं.] रामें (दाशरथि रामानें) स्वकलत्र (आपल्या बायकोला—सीतेला) रक्षा (राक्षसाला—रावणाला) वश होऊं न दिलें (ताब्यांत ठेवूं दिली नाहीं) [तें केवळ] भोगार्थ [काय?] (केवळ भोगासाठीं वश न होऊं दिलें काय? यशासाठीं नव्हे काय?) [यशोर्थ रामानें आपल्या सीतेला रावणाला वश होऊं दिली नाहीं ही गोष्ट तुम्ही ध्यानांत आणा आणि यश राखा.) आपली स्त्री सीता दशाननास वश होऊं न देतां तिला त्याच्या हातून सोडविलें हें कृत्य रामानें केवळ स्त्रीभोगेच्छेनें प्रवृत्त होऊन केलें नाहीं, तर त्यानें हें यशोरक्षणार्थ केलें. तसेंच तुम्ही यशोरक्षण करा असा विदुरोक्तीचा भाव. या गीतीच्या उत्तरार्धांत **प्रतिवस्तूपमा** अलंकार झाला आहे. 'भोगेच्छा नसणें' व 'यशोरक्षण करणें' हे धर्म अभिन्न होत, भिन्न नव्हत, आणि 'जसा' इत्यादि उपमाद्योतक पद स्पष्ट नसून उपमेंत पर्यवसान झालें आहे, तेव्हां हा '**प्रतिवस्तूपमा**' जाणावा.] ६. गी० ३५ पासून कृष्ण आपली शिष्टाई सांगत आहे. यांत भीष्म, द्रोण व विदुर यांच्या भाषणाचा अनुवाद आला आहे. [गी० ३५-५६.] ५७ वी गीति हींत कृष्णाचें धर्मास भाषण आहे. गीति ५८-६४ यांत गांधारीच्या उपदेशाचा अनुवाद कृष्णानें धर्मापाशीं केला आहे. ५६ व्या गीतींत विदुरोक्तीचा अनुवाद संपला. ७. स्त्री. ८. रावणास. ९. हृदयांत संताप पावलेली, अंतर्यामीं संतप्त झालेली. १०. गांधारी. (सुबलस्य पुत्री—असें मूळांत आहे. अ० १४८ श्लो० २८ पहा.)

'[1]दुर्योधना! [2]तुझे हे जन्मप्रद, हेहि विदुर [3]भावोजी, ।
यांसह म्हणत्ये होउनि बद्धांजलि ज्यासि **कुरुसभा** 'वो! [4]जी!' ॥ ५८
दे[5]वव्रत मामाजी प्रभु यांचें राज्य, **[6]भारतापसदा**! ।
**[7]गुरुचा** प्रसाद नसतां **हरिसहि** दे राज्यभार ताप सदा. ॥ ५९
भज [8]थाला, हे [9]कामद ईश्वर, हितबोध परिस, हे **व्यास**, ।
**धर्मासीं** सख्य करीं, स्वप्नींहि करूं नकोचि हे[10]व्यांस. ॥ ६०
[11]हेही '[12]**पांडुहि** **विदुरहि** या यांच्या भोगमूर्ति, हे **शिव** रे! ।

---

१. गांधारीचें भाषण अध्याय १४८ श्लो० २८-३६ यांत आहे. गी० ५८-५९ ह्या अर्थानें अन्योन्यापेक्ष आहेत म्हणून हें 'युग्मका'चें उदाहरण समजावें. २. दुर्योधना! तुझे जन्मप्रद हे (हे धृतराष्ट्रराज तुझे जन्मदाते जनक) [आणि] विदुर भावोजी हेही, यांसह (या दोघांसहित) कुरुसभा (कुरुवंशीयांचा आणि कुरुसभेंतील पार्थिवादिकांचा समुदाय) बद्धांजलि होउनि (हात जोडून) ज्यासि (ज्या महनीय भीष्माचार्याला) 'वा! जी!' म्हणत्ये (आज्ञा वंद्य मानून संमानित्ये, ज्याची आज्ञा पाळून ज्याला वंदन करत्ये) [ते] मामाजी (श्वशुर) देवव्रत (भीष्म) प्रभु यांचें [हें] राज्य [होय.] [हे] भारतापसदा! (हे अधमा दुर्योधना!) [यांचा प्रसाद संपादन कर, म्हणजे तूं राज्याला योग्य होशील] [कारण असा प्रकार आढळतो कीं] हरिसहि (इंद्रालाही) गुरूचा (बृहस्पतीचा) प्रसाद नसतां (इंद्रावर बृहस्पतीची कृपा नसेल तर) राज्यभार सदा ताप दे (सदा दुःख देतो, कधींही सुख देत नाहीं.) ३. भावोजी=भावू, भावोजी, भावूजी, भाऊजी=नवऱ्याच्या भावाला सन्मानार्थीं भावोजी असा शब्द लावतात. ४. जी म्हणणें=हांजी हांजी करणें, वो (ओ) म्हणणें=उत्तर देणें [ओ स्थानीं वारंवार वो आढळतो–जसें वोकणें, वोझें, वोटी, वोणवा, वोंगळ इत्यादि.] ५. देवव्रत=भीष्म. [गंगा म्हणते.] (१) 'म्यां **देवव्रत** ऐसें याचें अन्वर्थ ठेविलें नाम'–मोरोपंत–आदिपर्व १३।६९ पृ० ८६. (२) 'इत्युक्त्वा प्रययौ गंगा तूर्णमादाय तं शिशुम्। **देवव्रता**भिधानोऽभूद्यो देवैर्विहितव्रतः॥' क्षेमेंद्रविरचिता भारतमंजरी–आदिपर्व–श्लोक ४२८. (३) 'देवैः कृतव्रत इति श्रुतो **देवव्रता**ख्यया । मयायं गंगया जातः ख्यातो गांगेय इत्यपि ॥' बालभारत–आदिपर्व–सर्ग ४ श्लो० ४८. (४) मुक्तेश्वर–आदिपर्व–अध्याय २३ ओंव्या २२-८४ यांतही असेंच वर्णन आहे.] ६. भरतवंशामध्यें नीचा. ७. बृहस्पतीचा. ['गुरुस्तु गीष्पतौ श्रेष्ठे गुरौ पितरि दुर्भरे' इति शब्दार्णवे.] ८. या भीष्म मामाजीला. ९. इच्छापूरक देव. १०. मत्सराला. ११. धृतराष्ट्रहि. १२. [हे दुर्योधना!] हे (भीष्म) शिव (शंकर ईश्वर) [होत.] [आणि] हेहि (धृतराष्ट्र) पांडुहि विदुरहि या (तीन) यांच्या (भीष्माच्या) भोगमूर्ति [होत]. भोगमूर्ति=देवाच्या उत्सवासाठीं केलेली त्या देवाची मूर्ति, ईश्वरास अर्पण करावयाचे भोग ज्या मूर्तीला देतात ती मूर्ति.] [हे भीष्म बापाजी हातांत शस्त्र न घेतां केवळ शब्दानें] तुज (दुर्योधनाला) पाण्यापरीस पातळ करिते

पाण्यापरीस[1] पातळ करिते[2] तुज, परि न्हेत हे शिवरे[3]. ॥ ६१
धर्म न्याय पहातां, धर्मासचि सर्व राज्य ओपावें[4], ।
मामाजीनीं तुजवरि त्या द्यूतोपक्रमींच[5] कोपावें. ॥ ६२
घ्यावें[6] सर्व जिहीं जें, अर्ध, करुनि साम, देववावें तें, ।
'हूं' म्हण, भेटों आला तुज पसरुनि वामदेव[7] वावेतें[8]. ॥ ६३
शक्रासहि[9] न मिळालें मूर्खा! मिळतें कसें तुला यश तें? ।
महिषघ्नीभंग[10] रणीं[11] करिजेल[12] प्राकृतें[13] लुलायशतें[14]?' ॥ ६४

---

(नाहींसा करते, साफ बुडवून टाकिते, तुला जमीनदोस्त करते, तुझा सत्यानाश करते) परि (परंतु) हे शिवरे (शिव्या शाप देणारे, कठोर भाषण उच्चारणारे) नव्हते (नाहींत). [हे क्रोधी आणि शापप्रद नव्हत म्हणून, हे दुर्योधना! तुझे हे ढंग चालले आहेत. तुला दोरासारखा नरम आणि सरळ करण्याचें सामर्थ्य यांच्या आंगीं आहे परंतु हे वाग्दुष्ट व तोंडाळ नाहींत.] या गीतींत 'पाण्यापरीस पातळ करणें' या लोकप्रवादाचा उल्लेख झाला आहे म्हणून हा **लोकोक्ति** नामक अलंकार होय.

१. पाण्यापरीस पातळ करणें=हा शब्दप्रयोग **मोले**स्वर्थच्या कोषांत आढळत नाहीं, याचा समावेश करणें अवश्य होतें. याचा अर्थ नरम करणें, वठणीस आणणें, भोंवळ जिरवणें, दर्पोपशांति करणें, नाककाटणी करणें, पाण्यापेक्षां पातळ करणें, तेजोभंग करणें= To humiliate. २. करणारे. ३. शाप देणारे (शिव्या देणारे). ४. अर्पण करावें. ५. त्या सुप्रसिद्ध द्यूताच्या आरंभींच. [मोरोपंत–सभापर्व–अध्याय ४-५-६ पृष्ठें २५-६२ काव्यसंग्रहग्रंथमाला.] ६. जिहीं (ज्या पांडवांनीं) जें (राज्य) सर्व (सकल) घ्यावें (ग्रहण करावें, ज्यांना सर्व राज्य घेण्याचा अधिकार आहे, ज्या पांडवांनीं सर्व राज्य घेणें, हें यथान्याय आणि धर्मसंमत आहे) [त्या पांडवांकरवीं तुमच्याशीं] साम करुनि (सलोखा करून, संधि करून, सख्य करून) [भीष्म मामांजींनीं] अर्ध [राज्य] [तुम्हाला] देववावें [असा हा शुभ समय प्राप्त झाला आहे, यास्तव या गोष्टीस] 'हूं' म्हण (मान्य हो, कबूल कर, रुकार दे, राजी हो) वामदेव (शंकर) वावेतें पसरुनि (हात पसरून, भुज पसरून) तुज (दुर्योधनाला) भेटों आला [आहे.] [हे दुर्योधना! ही वेळ तुझ्या कल्याणाची आहे, तर माघार घेऊन घालवूं नको–असा भाव.] ७. शिव. ['लोकाचारविपरीतत्वाद्वामश्चासौ देवः' इति रायमुकुटीकारः । वामः सुंदरो देवः । संसारवामत्वाद्वेति **वा**मदेव इति ॥.' स्तुतिकुसुमांजलि–स्तोत्र ९ श्लोक १४ टीका, काव्यमाला–२३.] ८. वावेतें पसरुनि=हात पसरून. हें भाषण लोकप्रवादाचें अनुकरण आहे म्हणून हा **लोकोक्ति** अलंकार समजावा. ९. शक्रासहि (इंद्रासारख्या प्रतापी पुरुषाला) [गुरुप्रसाद नसल्यामुळें] [जें यश] न मिळालें (मिळालें नाहीं) तें यश तुला मूर्खा (मूढमते दुर्योधना!) कसें मिळतें? (कोठून मिळणार?) [अर्थात् मिळावयाचें नाहीं]. १०. महिषासुराचा भंग करणारी जी देवी तिचा भंग. ११. यांत काक्वर्थ आहे. भंग करवणार नाहीं–असा अर्थ. येथें वैधर्म्यानें **प्रतिवस्तूपमा**

[1]धृतराष्ट्र [2]म्हणे, 'पुत्रा! [3]सोमापासुनि ययाति जो [4]सावा, ।
[5]ज्याच्या [6]भुजें प्रजाभर, [7]भूभर शेषें तसाचि सोसावा. ॥ ६५
[8]तत्पुत्र पांच, त्यांत ज्येष्ठ [9]यदु समर्थ [10]शुक्रकन्याभू, ।
त्या [11]अवशा तद्गुरुची शापोक्ति 'प्राप्त होय अन्या [12]भू.' ॥ ६६
न करी [13]गुरुवच म्हणुनि ज्येष्ठा यदुवरिहि होय भू रुसती, ।
अनुसरलीच कनिष्ठा [14]असुरसुतेच्या सुताहि पूरुस ती. ॥ ६७

---

अलंकार झाला आहे. १२. 'करिजेल' हें भविष्यकाळाचें कर्मणिरूप आहे. हें कवितेंत मात्र आढळतें, '**करिजेल** हास्य आस्य प्रेक्षुनि नगगांत बायकांनीं कीं' [मोरोपंत]. अशीं अन्य उदाहरणें पंतांच्या काव्यांत अनेक आढळतात. १३. सामान्यें. १४. महिषशतें. [लुलाय=रेडा, महिष । 'लुलापो महिषो वाहद्विषत्कासरसैरिभाः' इत्यमरः. लुलाप=लुलाय.]

१. अध्याय १४९ पहा. २. गांधारीचें भाषण झाल्यावर जनेश्वर धृतराष्ट्रानें दुर्योधनाला हितबोध केला. ३. कुरुवंशवर्धन जो सोम प्रजापति त्याजपासून. ४. सहावा. [१ सोम (चंद्र), २ बुध+इला, ३ पुरूरवा+उर्वशी, ४ आयु, ५ नहुष, ६ ययाति–अशी वंशावळ आहे. ही सर्व सोमाची (चंद्राची) संतति म्हणून या वंशांस 'चंद्रवंश' असें म्हणतात.] ५. ज्या ययातीच्या. ६. येथें 'भुजें' हें उपमेय, 'शेषें' हें उपमान, 'तसाचि' उपमावाचक शब्द, आणि 'सोसावा' हा साधारण धर्म म्हणून ही '**पूर्णोपमा**' जाणावी. ७. पृथ्वीभार. ८. त्या ययातीचे पांच पुत्र (ययातीला शर्मिष्ठेपासून झालेले तीन पुत्र–द्रुह्यु, अनु आणि पुरु आणि देवयानीपासून झालेले दोन–यदु आणि तुर्वसु.) 'क्रमात्प्रसूते स्म सुतौ यदुं च सा तुर्वसुं चाथ कवेस्तनूजा । दैत्यात्मजा गुप्तरता त्वसूत द्रुह्याणुपूरून्नृपतेः कुमारान् ॥' [अमरचंद्रसूरिप्रणीत बालभारत–आदिपर्व–सर्ग १ पृ० ९ श्लो० १००] 'ततः प्राप सुतौ देवी देवयानी नराधिपात् । यदुं च तुर्वसुं चेति काले कुवलयेक्षणा ॥ रममाणस्तया राजा गूढा बाला मृगीदृशा । द्रुह्युं चानुं च पूरुं च कालेन प्रापदात्मजान् ॥' [भारतमंजरी–आदिपर्व–पृ० २७-२८ श्लो० ३३२ व ३४१ पहा.] ९. यदु हा काव्याचा दौहित्र होय. हाच यादववंशाचा मूळपुरुष. ययातीचा हा ज्येष्ठ पुत्र होता, परंतु यानें बापाची आज्ञा मानिली नाहीं म्हणून 'याला राज्य मिळावयाचें नाहीं' असा बापानें शाप दिला. ययातीचें राज्य कनिष्ठ पुत्र पूरु याला मिळालें. १०. देवयानीपासून भू (जन्म) ज्याचें. ११. त्या अवशा (त्या अवशवर्ती पुत्राला–यदूला–बापाच्या वशांत न राहणाऱ्या यदूला) तद्गुरुचि (त्याच्या बापाची ययातीची) शापोक्ति (शापवचन) [झाली कीं] 'अन्या (अन्य पुत्राला–पुरूला) भू (राज्यपद) प्राप्त होय' (प्राप्त व्हावयाची–यदूला राज्यभू मिळावयाची नाहीं असा शाप झाला होता.) १२. पृथ्वी, राज्य. १३. बापाचें वचन–यदूनें बापाच्या आज्ञेचा स्वीकार केला नाहीं. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–आदिपर्व–अध्याय ११–गीति ६४-६५ पृ० ७०-७१]. १४. वृषपर्व्याची कन्या शर्मिष्ठा तिच्या.

[1]यत्कीर्तिपरिस अधिक न तृप्ति [2]सुधेची [3]सुरांसि दे [4]वापी. ।
[5]प्रपितामह प्रतीप प्रभु, त्याचा [6]ज्येष्ठ पुत्र देवापी; ॥ ६८
वदल्या [8]प्रजा असें कीं, 'आम्हां [9]भर्ता नकोचि हा [10]कुष्ठी.' ।
[11]काय करावी श्वानें केली चाखोनि जी [12]सुधा उष्टी? ॥ ६९

---

१. ज्या पूरूच्या कीर्तीपेक्षां. २. अमृताची. ३. देवांला. ६८ ह्या गीतीच्या पूर्वार्धाचा संबंध मागील गीतीशीं आहे, उत्तरार्धाशीं नाहीं. ४. तळी. ५. पणजा. (पितामहाचा पिता=आजाचा बाप, धृतराष्ट्राचा पणजा.) ६. प्रतीपाचा ज्येष्ठ पुत्र देवापि. (बाल्हीक आणि शंतनु हे दुसरे दोन पुत्र. अध्याय १४९ श्लो० १६.) ७. प्रतीपानें आपण वृद्ध झाल्यामुळें देवापीला राज्याभिषेक करण्याची तयारी केली, तेव्हां देवापीला कुष्ट आहे म्हणून हा जरी ज्येष्ठ आहे तरी राजा होण्याला अयोग्य आहे असें प्रजाजनांनीं प्रतीपाला सांगितलें. [जो गुणांनीं श्रेष्ठ आहे मग तो वयानें कनिष्ठ असला तरी त्यालाच राज्य मिळतें असा पुरातन संप्रदाय आपल्या कुलांत चालत आला आहे असें सांगण्याचें धृतराष्ट्राचें तात्पर्य आहे.] ८. राजा. ९. देवापि. १०. त्वग्दोषी. [अ० १४९ श्लो० १७.] ११. सुधा (अमृत—अमृतसमान स्वादु अन्न) श्वानानें (कुत्र्यानें चाटून) उष्टी केली म्हणजे ती ज्याप्रमाणें त्याज्य होते त्याप्रमाणें अंगास कोड झालेला राजपुत्र देवापि प्रजेला त्याज्य (राजासनानर्ह) असा वाटला. कुत्र्यानें उष्टें केलेलें अन्न जरी अमृत असलें तरी ज्याप्रमाणें असेव्य व त्याज्य होतें त्याप्रमाणें देवापि जरी ज्येष्ठ पुत्र होता तरी तो कुष्ठी असल्यामुळें प्रजेला असेव्य आणि त्याज्य असा वाटला. १२. यांत देवापि आणि सुधा, कुष्ट आणि श्वान यांच्या भिन्नधर्मांत बिंबप्रतिबिंबभाव असून एक सामान्य धर्म नाहीं म्हणून हा **दृष्टांत** नामक अलंकार होय. हा अलंकार साधर्म्य आणि वैधर्म्य यांनीं होतो म्हणून द्विविध आहे. उत्तरार्धाचा पूर्वार्धाशीं संबंध असाः—देवापि कुष्टी होता, त्याचा राज्यावर बसण्याचा ज्येष्ठत्वामुळें हक्क होता, पण प्रजा त्यास कबूल करीनात. त्या म्हणाल्याः—अमृत फार उत्तम आहे, पण तें जर कुत्र्यानें चाटून उष्टें केलें तर काय उपयोगी आहे? हा देवापि ज्येष्ठ आहे, पण हा कुष्टी आहे, तेव्हां आम्हास काय उपयोगी आहे? '**दृष्टांत**' अलंकाराचें लक्षणः—(१) चेत् बिंबप्रतिबिंबत्वं **दृष्टांत**स्तदलंकृतिः। त्वमेव कीर्तिमान् राजन् विधुरेव हि कांतिमान् ॥ ५३ ॥ (कुवलयानंद). जेथें बिंबप्रतिबिंबन्यायानें उपमानोपमेय वाक्यांत भिन्न धर्म दाखविले असतात, तेथें **दृष्टांत** नामक अलंकार होतो. 'हे राजा! तूंच कीर्तिमान् आहेस, चंद्रच कांतिमान् आहे' या उदाहरणांत कीर्ति आणि कांति या भिन्न धर्मांचें वर्णन बिंबप्रतिबिंब न्यायानें केलें आहे अथवा कीर्ति आणि कांति या भिन्न धर्मांचा बिंबप्रतिबिंबभाव दाखविला आहे. (२) 'अर्थविशेषः पूर्वं यादृङ् न्यस्तो विवक्षितेतरयोः। तादृशमन्यं न्यस्येद्यत्र पुनः सोऽत्र **दृष्टांतः** ॥' [रुद्रटप्रणीत **काव्यालंकार**—अध्याय ८ श्लो० ९४ पृ० ११८]. जेथें प्रस्तुत व अप्रस्तुत अशा अर्थविशेषांमधून ज्या प्रकारचा अर्थविशेष पूर्वीं

रडत प्रतीप वदला, 'याहि भवविषोदधीस देवा! पी,'[१]।

सांगितला आहे त्याच प्रकारचा अर्थविशेष वक्ता जर पुनः सांगेल तर तेथें **दृष्टांत** नामक अलंकार होईल. जेथें प्रकृत अर्थविशेषाच्या बोधासाठीं अप्रकृत अशा अर्थविशेषाचा दाखला दिलेला असतो तेथें **दृष्टांत** अलंकार होतो. (३) 'अन्वयख्यापनं यत्र क्रियया स्वतदर्थयोः। **दृष्टांतं** तमिति प्राहुरलंकारं मनीषिणः ॥' [वाग्भटालंकार–परिच्छेद ४ श्लो० ८२ पृ० ४७.] जेथें उपमान (स्वार्थ) आणि उपमेय (तदर्थ) यांच्या परस्पर योग्य-गुणसंबंधाचें (सादृश्याचें) कथन केलें असतें तेथें **दृष्टांत** अलंकार होतो. (४) 'तस्यापि बिंबप्रतिबिंबभावतया निर्देशे दृष्टांतः' [अलंकारसर्वस्व–पृ० ७५.] (५) (अथ दृष्टांतः– चेद्बिंबप्रतिबिंबत्वं भिन्नवाक्यार्थधर्मयोः। दृष्टांतः स तु साधर्म्यवैधर्म्याभ्यां द्विधा मतः ॥ मुकुंद एव गोपीनां कदंबं तोषयत्यहो। वासंत एव वल्लीनां विकासयति संचयम् ॥ ८८ ॥ मुकुंददर्शनादेव सस्मितं राधिकाननम्। निद्राति तावन्नलिनं यावन्नोदेति भानुमान् ॥ ८९ ॥ [मंदारमरंदचंपू–व्यंग्यबिंदु १०–पृ० १२६] या अलंकाराचीं उदाहरणें:–(१) असोत लक्षावधि अन्य भूपती, राजन्वती याचि नरेश्वरें क्षिती। तेजस्वि तारे दिसती जसे हिरे, ज्योतिष्मती होय निशा निशाकरें ॥ [लेलेकृत रघुवंश–सर्ग ६ श्लो० २२ पृ० ७२.] (२) न कळतां पद अग्निवरी पडे, न करि दाह असें न कधीं घडे। अजितनाम वदो भलत्या मिसें, सकळ पातक भस्म करीतसे ॥ [वामनपंडित.] करिल कसें मांजर जें, दुष्कर हरिहनन काज वाघांस। न शकति अग्नि विधु कसा, दिनमणिचा करिल काजवा घांस ॥ १ ॥ परकरगस्वकलत्र स्पर्शेंचि महायशासि वाहविते। कोण प्राज्ञ म्हणेल, श्वा शिवला जा तशा शिवा हवि तें ॥ १ ॥ पडतांच भीष्म गेले, सर्वांचेही पळांत आवांके। नसतां धुरंधर वृषभ बाळ वृषभरें करोनि, आ वांके॥१॥ अक्षज्ञ नसोनि भरीं भरला स्वगुणेंचि अर्थ हारविला। पडतां गांठ गतश्री होय शशी दोष काय हा रविला ॥ १ ॥ [साहित्यशास्त्र–निर्णयसागर आवृत्ति दुसरी].

१. देवापि प्रजेच्या प्रतिषेधानें खिन्न होऊन वनास गेला म्हणून दुःखित होऊन प्रतीप म्हणाला:–[हे] देवा! (शंकरा!) या भवविषोदधीस (संसाररूपविषाचा सागर हा जो मी प्रतीपभूप त्या मला) पी (प्राशन कर, पिऊन टाक). हें शंकरा! ज्याप्रमाणें तूं सागरमंथनप्रसंगीं कालकूट नामक भयंकर विष प्यालास, त्याप्रमाणें या प्रसंगीं संसारविषसागर जो मी प्रतीप राजा त्या मला पिऊन टाक. शंकर ही जगत्संहारक देवता आहे, म्हणून तिचेंच आव्हान प्रतीपानें केलें आहे. कालकूटप्राशनानें तें विष जसें नाहींसें केलेंस तसेंच मलाही नाहींसा कर. देवापि वनास गेला त्या पुत्रशोकातिवेगानें प्रतीप राजा वारला–हा ध्वनि. मराठींत ध्वनिकाव्य नाहीं म्हटलें तरी चालेल. ध्वनिकाव्याविषयीं हंसकृत निबंधांतील विवेचन वाचनीय आहे:–'साहित्यशास्त्रांत काव्याचे तीन भेद केले आहेत. उत्तम, मध्यम आणि अधम. केवळ शब्दचमत्काराचेंच ज्यांत प्राधान्य तें अधम काव्य; व ज्यांत व्यंग्यार्थाचें प्रधानत्व असतें त्यास उत्तम अथवा ध्वनिकाव्य असें म्हणतात. गुणीभूतव्यंग्यास मध्यम काव्य मानितात. महाराष्ट्र कवींमध्यें साहित्यशास्त्रज्ञ फारच थोडे झाले. त्यांतही **वामन**पंडित व **मोरोपंत**

जेव्हां तपोवनाला गेला सदन त्यजूनि देवापी. ॥ ७०
होता पितृमृतिसमयीं[1] दूर महाराज बाल्हिक[2] भरतसा; ।

हेच प्रमुख होत. **वामन**पंडिताच्या ग्रंथांत ध्वनिकाव्य मुळींच नाहीं. वाच्यार्थावर व शब्दचमत्कृतीवर मात्र त्याच्या कवितेचा भर दिसतो. साहित्यशास्त्रोक्त लक्षणाप्रमाणें लोकरंजनार्थ काव्य करण्याचा त्यानें यत्नच केला नाहीं; हें त्यानें कित्येक ठिकाणीं प्रकट केलेल्या उद्गारांवरूनही दिसतें. आपल्या वाणीस साध्या पोषाखानें शृंगारून त्यानें केवळ ईश्वरपरायण तिचा उपयोग केला आहे हें उघड दिसतें. **पं**तांचाही काव्य करण्याचा हेतु कीर्तीकरतां अथवा लोकमनोरंजनाकरतां आहे असें दिसत नाहीं. त्यानेंही आपली वाणी निरंतर ईश्वरभजनींच समर्पण केलेली दिसते; तथापि **वामन**पंडिताचा भर जसा केवळ अद्वैतावर आहे तसा **मोरोपंता**चा दिसत नाहीं. त्यानें अवतारादिकांच्या चरित्रास अनुलक्षूनच सर्वत्र स्तुतिस्तोत्राची रचना केली आहे. **पंतां**स अद्वैत अवगत अथवा अनुमत नव्हतें म्हणून त्यानें त्या विषयावर स्वतंत्र ग्रंथ लिहिले नाहींत असें नाहीं. मंत्रभागवतांत अद्वैतविवेचनही त्यानें केलें आहे; तथापि त्याची सगुणभक्तीवर दृढतम श्रद्धा होती यामुळेंच अद्वैतविवेचन फारसें त्याच्या ग्रंथांत आढळत नाहीं. **वामना**च्या काव्यापेक्षां **मोरोपंता**च्या कवितेस सरसत्व व गुरुत्व जें आलें आहे त्याच्या अनेक कारणांपैकीं हेंही एक कारण आहे कीं, **मोरोपंता**चे सर्वच ग्रंथ सगुण ईश्वरास अनुलक्षून लिहिलेले आहेत. सगुण ईश्वराच्या अनेक अद्भुत लीला आणि तत्संबंधानें त्याच्या भक्तांचीं चरित्रें यांचें **पं**तानें वर्णन केल्यामुळें संसारांतील अनेक प्रकारचीं सुखदुःखजन्य फलें ग्रंथांत येऊन नाना प्रकारचे चमत्कार चित्तावर प्रतिबिंबित होण्याजोगें साधन त्यांत फार आलेलें आहे. **मोरोपंता**च्या काव्यांत ही ध्वनियुक्तता बहुतकरून आढळत नाहीं; तरी केवळ वाच्यार्थावर अथवा शब्दचमत्कृतीवरच लक्ष्य ठेवून त्यानें पोकळ ग्रंथ भरला आहे असेंही दिसत नाहीं. वाच्यार्थ, लक्ष्यार्थ आणि व्यंग्यार्थ हे प्रत्येक शब्दांत आणि वाक्यांत प्रसंगाप्रमाणें न्यूनाधिक प्रमाणानें असतातच. तेव्हां कोणत्याही कवीच्या काव्यांत व्यंग्यार्थसूचक शब्द आणि वाक्यें असण्याचा उघड संभव आहे. त्या मानानें **वामना**दि महाराष्ट्र कवींच्या काव्यांतही व्यंग्यार्थसूचकता आढळेल, पण नैषध काव्य, शालिवाहनसप्तशती, गोवर्धनसप्तशती, सत्सई इत्यादि काव्यांत जसा मुख्यार्थ चमत्कारिक रीतीनें इंगित केलेला असतो तसा कोणत्याही महाराष्ट्र कवीच्या कवितेंत आढळत नाहीं. मोरोपंताच्या काव्यांत कोठें कोठें सहज रीतीनें ध्वनीची झांक आलेली दिसते पण बुद्धिपूर्वक त्याचा तदर्थ यत्न नसल्यामुळें त्याचें ध्वनिकाव्य आहे असें म्हणतां येत नाहीं.' [हंसकृत मोरोपंतावरील निबंध–पृ० ११०-१२.] २. संसाररूपविषसागरास.

१. पित्याच्या (प्रतीपाच्या) मरणप्रसंगीं. २. भरताप्रमाणें बाल्हीक हा आजोळास (मातुलकुलीं) होता. (अ० १४९ श्लो० २७.) यानें राज्याचा त्याग करून मातुलकुलाचा आश्रय केला होता.

[1]शंतनुला दे क्षिति, कीं याचा राज्यांत मात्र न भर तसा. ॥ ७१
तैसाचि अंध म्हणउनि मी [2]अनुचित जाहलों [3]अवन्यवना, ।
अनुभविल कसा [4]मादृश गहना राज्या जसा [5]अवन्य वना? ॥ ७२
पांडु कनिष्ठहि राजा, कीं विश्वहि तृप्त [6]यत्सुगुणपानें, ।
कार्य कृशेंहि सजीवें, तें होइल काय पुष्ट [8]कुणपानें? ॥ ७३
[9]राज्यानर्ह पिता मी, कैसा राज्यार्ह तूंचि? वद [10][11]नातें, ।
[12]परधन हरुनि न लाजसि, दाखवितां या दहांत वदनातें? ॥ ७४
धर्माचें राज्य [13]दिलें [14]सदनुमतें [15]तत्पित्यासि [16]मत्तातें, ।
मत्ता! तें तुज [17]नुमजे, [18]कोर्णं करिल सावधान [19]मत्तातें?' ॥ ७५
वदला यापरि [20]बा, परि खापरिला परिस तेंवि त्या बोध; ।

१. प्रतीपानें आपलें राज्य शंतनुला दिलें कीं (कारण कीं) याचा (या बाल्हीकाचा) राज्यांत (राज्य करण्याच्या कामीं) मात्र तसा (शंतनुप्रमाणें) भर (उमेद) न (नव्हता.) बाल्हीकाचें मन राज्यकारभारांत नसल्यामुळें तो वडील होता तरी त्याला प्रतीपानें राज्य दिलें नाहीं. [मोरोपंतांच्या आदिपर्वांत बाल्हीक अनुज असें वर्णन व येथें तो ज्येष्ठ असें वर्णन आहे. आदिपर्व–अध्याय १३ गीति २८-३५ पहा.] २. अयोग्य. ३. अवनी+अवना=भूरक्षणा. ४. माझ्यासारिखा. ५. जो वनांत न राहणारा. ६. ज्याच्या उत्तम गुणाच्या प्राशनानें. ७. यांत सप्रश्न **दृष्टांत** अलंकार आहे. अशक्त पण सजीव मनुष्याच्यानें जें काम व्हावयाचें तें पुष्ट प्रेताच्यानें होईल काय? अर्थात् नाहीं हें उत्तर. ८. पुष्ट शवानें. ९. राज्याला अयोग्य. १०. मी धृतराष्ट्र. ११. वद नातें=संबंध सांग. मी पिता जर राज्याला अनधिकारी आहें, तर तूं पुत्र राज्यार्ह कसा होशील? राज्यपदाशीं तुझें स्वामीपणाचें नातें कसें पोंचतें हें सांग. मी बाप अनधिकारी आणि तूं पुत्र अधिकारी हा संबंध कसा पोंचतो तें सांग. १२. अध्याय १४९ श्लोक ३०-३१ पहा. १३. 'धृतराष्ट्र अंध, शूद्रीसुत विदुर, म्हणोनि राहिले दोघे. । भीष्में केला राजा पांडु; तदाज्ञावळेंचि पद तो घे.' ॥ ८१. [मोरोपंत–आदिपर्व–अ० १५ गी० ८१ पृ० ९७ काव्यसंग्रहग्रंथमाला.] १४. साधूंच्या अनुमतानें. १५. पांडूस. १६. भीष्में. १७. कळत नाहीं. १८. हा प्रश्नालंकार समजावा. १९. उन्मत्तातें. येथें धृतराष्ट्राचा उपदेश संपला. २०. बा (बाप धृतराष्ट्र) यापरि वदला (याप्रमाणें दुर्योधनाला बोलला.) परि (परंतु) खापरिला परिस (खापरीला परिसाचा स्पर्श झाला असतां जसें सोनें होत नाहीं तसा) तेंवि (त्याप्रमाणें) त्या (दुर्योधनाला) बोध (उपदेश व्यर्थ झाला). बा! (धर्मा!) तो (दुर्योधन) धन्य आग्रही!! (शाबास त्याची) शोध केलिया तैसा (दुर्योधनासारखा आग्रही पुरुष) न मिळेल. धन्य त्या दुर्योधनाची! त्याच्या सारखा आग्रही पुरुष शोध केला तरी मिळणार नाहीं. [येथें दुर्योधनास तुलना नाहीं असें वर्णन आहे, तेव्हां हा **'असम'** नामक अलंकार होय.] 'धन्य' हा शब्द प्रशंसावाचक आहे परंतु त्याची योजना प्रस्तुतस्थळीं औपरोधिक समजावयाची.

तो धन्य आग्रही बा! तैसा न मिळेल केलिया शोध. ॥ ७६
बहु [1]मीहि [2]भागलों बा! बोधुनि दगडासि कां न भागावें? ।
खळहृदय [3]शून्य केवळ, [4]शून्य असें व्यर्थ कां नभा गावें? ॥ ७७
भेदितें होतों, देउनि राज्य सकळ, करुनियां [6]सुवर्णन, गा! ।
परि न ढळे कर्ण, तशा यत्नलवें ढाळितों सुवर्णनगा. ॥ ७८
देतो प्राण, न हृतधन, दृढ निजकर्माभिमान चोरा ज्या, ।
युद्धार्थ [10]कुरुक्षेत्रा गेला घेऊनि सैन्य [11]तो राजा. ॥ ७९

१. कृष्ण. २. श्रमलों, थकलों. ३. खळाचें हृदय खरोखर शून्य असतें, आकाश हें शून्य आहे असें जें म्हणतात तें व्यर्थ होय—असें या उत्तरार्धांत वर्णिलें आहे म्हणून हा **'सापन्हवातिशयोक्ति'** नामक अलंकार समजावा. याचें लक्षण:—'यद्यपन्हुतिगर्भत्वं सैव **सापन्हवा** मता । त्वत्सूक्तिषु सुधा राजन्! भ्रांताः पश्यन्ति तां विधौ ॥' [कुवलयानंद—३८.] जेथें अपन्हुति (निषेधोक्ति) गर्भित असते तेथें **'सापन्हवा अतिशयोक्ति'** होते. जसें:—हे राजा! सुधा तुझ्या सूक्तींत आहे, भ्रांत मनुष्य चंद्रीं सुधा आहे असें म्हणतात. येथें राजाचें सूक्तिमाधुर्य हेंच अमृत अशी अतिशयोक्ति असून चंद्रमंडळांतील जें अमृत तें अमृत नव्हे अशी अपन्हुति (निषधोक्ति) तींत गर्भित आहे. ४. शून्य आणि नभ हे शब्द समानार्थक आहेत. ५. कौरवपक्षांतून वेगळा करीत होतों. ६. स्तुति. ७. हालविला असता. तशाप्रकारचा अल्पही यत्न केला असता तर मोठ्या मेरुपर्वताला सुद्धां हालवून टाकिला असता. इतका मोठा प्रयत्न करून कर्ण वळला नाहीं असें सांगण्याचें तात्पर्य. ८. सुवर्ण+नगा=सोनें+पर्वता=मेरुपर्वता. ९. [जो राजा दुर्योधन] प्राण देतो [परंतु] हृतधन (हृतपांडवधन, चोरून घेतलेलें पांडवांचें राज्यधन) न [देतो] [आणि] ज्या चोरा (दुर्योधनास) निजकर्माभिमान दृढ [होय] तो राजा युद्धार्थ कुरुक्षेत्रीं गेला. जो प्राण द्यावयास सिद्ध झाला पण हृतधन देण्यास तयार झाला नाहीं व ज्या चोरास आपल्या कृत्याचा अभिमान फार बळकट होता तो दुर्योधन युद्धार्थ कुरुक्षेत्रास गेला. 'ज्या चोरा निजकर्माभिमान दृढ [असतो, तो] प्राण देतो [पण] हृतधन न [देतो] [असा] तो राजा कुरुक्षेत्रा गेला—असा अन्वय लावावा. ज्या चोराला आपल्या चौर्यकर्माचा अभिमान बळकट असतो तो प्राण गेला तरी बेहत्तर, पण चोरलेलें धन म्हणून सांपडूं देत नाहीं (असा दुर्योधन राजा) कुरुक्षेत्रास गेला. यांत 'देतो' हें पद दोहोंकडे अन्वित होतें म्हणून **'दीपक'** अलंकार समजावा. १०. हें हिंदूचें पवित्र स्थान ठाणेश्वराचे नैर्ऋत्येस व दिल्लीचे वायव्येस सरस्वती आणि दृषद्वती या दोन नद्यांचे मध्यें आहे. याच ठिकाणीं महाभारतांत वर्णिलेला घनघोर युद्धसंग्राम झाला. कुरुक्षेत्र, मत्स्यदेश, पंचालदेश आणि शूरसेनदेश यां सर्वांस ब्रह्मर्षिदेश म्हणतात. यावरून कुरुक्षेत्राची पवित्रता व्यक्त होते. कुरुक्षेत्राच्या आसपास पांच सरोवरें आहेत. तीं जमदग्निपुत्र परशुराम यानें सर्व क्षत्रियांचा संहार करून त्यांच्या रक्तानें निर्माण केलीं अशी कथा आहे. कुरुक्षेत्र हें भारती युद्धाविषयीं

जो मी हितार्थ गेलों, कीं, दु:खीं मग्न [1]ससुत अंध न [2]हो, ।
त्या मज करीत होता दुर्योधन नृप धरूनि [3]बंधन, हो ! ॥ ८०
[4]वदले न युक्त कुलगुरु, [5]सम्यक्कवि विदुरमात्र वदला हो ! ।
एकें काय करावें? परि म्हणतो, 'धर्म राज्यपद [6]लाहो.' ॥ ८१
[7]धृष्टद्युम्न [8]शिखंडी द्रुपदनृप विराट चेकितान तथा, ।
[9]युयुधान, भीमकर्मा भीमहि, ज्याची [10]परां असह्य कथा; ॥ ८२
ऐसे धर्में केले सातां अक्षौहिणींत [11]सात [12]पती, ।
जे [13]तपन ताप द्याया रात्रिहि [14]अरिघूकमानसा तपती. ॥ ८३

---

जसें प्रसिद्ध आहे तसेंच तें आलीकडील कांहीं लढायांविषयीं प्रसिद्ध आहे. कुरुक्षेत्राजवळ पुष्कळ पवित्र स्थानें आहेत. कुरुक्षेत्रमाहात्म्यांत तीं १८० आहेत असें सांगितलें आहे. त्यांपैकीं सरस्वतीच्या उत्तर प्रांतांत ९१ आहेत. याविषयीं सविस्तर माहिती गोपाळ-रघुनाथ-नंदर्गीकर-प्रकाशित 'मेघदूता'च्या इंग्रजी टिप्पणींत आहे. [मेघदूत-इंग्रजी टीपा पृ० ५५-५९ पूर्वमेघ श्लो० ५२.] ११. तो दुर्योधन नृप. (अ० १५० श्लो० ३-१९.)

१. सपुत्र. २. होवो. ३. अध्याय १५४ श्लोक १० पहा. ४. कुरुगुरु कांहींच वदले नाहींत असा अर्थ नाहीं, कारण भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र, गांधारी या सर्वांनीं दुर्योधनाला बोध केला आहे, तेव्हां ते बोलले नाहींत असें म्हणणें अवास्तव होय. ते जें कांहीं बोलले तें युक्त (सयुक्तिक) नव्हतें इतकेंच म्हणण्याचें तात्पर्य समजावें. मूळांतही असेंच आहे:-'न च भीष्मो न च द्रोणो युक्तं तत्राहतुर्वचः.' [अध्याय १५४ श्लोक ११.] विदुर मात्र सम्यक् (सर्वोत्कृष्ट) वदला (विदुरासारखें सर्वोत्तम भाषण दुसऱ्या कोणीही केलें नाहीं.) एकें (विदुरें) काय करावें? (एकट्या विदुराचा काय उपाय चालणार?) परि (परंतु) [तो विदुर] म्हणतो (सदां मनापासून म्हणतो कीं) 'धर्म राज्यपद लाहो' (धर्माला राज्यपद अवश्य मिळालें पाहिजे.) ५. कवि विदुर मात्र सम्यक् वदला. ६. कृष्णाच्या भाषणास आरंभ ३५ व्या गीतींत झाला असून तें भाषण ८१ व्या गीतींत पुरें झालें आहे. ७. धृष्टद्युम्न याची जन्मकथा मोरोपंत-आदिपर्व-अ० ३१ गीति ४-२६ येथें पहा. [काव्यसंग्रहग्रंथमाला-पृ० १६२-१६४.] ८. शिखंडीची कथा मोरोपंत-उद्योगपर्व-अ० १३ गीति १८६-२२५ येथें पहा. ९. सात्यकि. १०. शत्रूला. ११. अध्याय १५१ श्लोक २-५ पहा. १२. गीति ८२ व ८३ या अर्थासाठीं एकदम घेतल्या पाहिजेत म्हणून या दोन गीति 'युग्मका'चें उदाहरण आहेत. या युग्मादि पारिभाषिक शब्दांविषयीं मागें पृ० ६२ टीप १ यांत थोडी माहिती दिली आहे. या संबंधानें पुढील वचनही लक्षांत ठेवण्यासारखें आहे:—'यत्र वाक्यार्थविश्रांतिः श्लोकेनैकेन जायते । तन्मुक्तकं युगं द्वाभ्यां त्रिभिः स्यात्तिलकं पुनः ॥ चतुर्भिः स्याच्चकलकं पंचभिः कुलकं ततः । महाकुलकमित्यार्थाः कथयंति ततः परम् ॥.' [समन्वयप्रदीप.] १३. सूर्य. १४. अरि+घूक+मानसा=शत्रु+घुबड+चित्ताला=शत्रुरूप घुबडाच्या मनास. [घूक=घुबड.]

[१]द्रोण कृप शल्य [२]सैंधव [३]गुरुनंदन शकुनि कर्ण कृतवर्मा ।
भूरिश्रवा सुदक्षिण, बाल्हिक विख्यात तो [४]सुकृतवर्मा, ॥ ८४
[५]अक्षौहिणीहि अकरा कल्पुनि त्यांचे पती असे अकरा ।
भ्रात्यांसि म्हणे, 'यांच्या सत्कारीं आळस क्षणहि न करा.' ॥ ८५
मग भीष्मासि सुयोधन नमुनि [६]म्हणे, 'व्हा तुम्हीच [७]सेनानी, ।
सुज्ञसमर्थपतिविना जय कैसा पाविजेल [८]सेनानीं? ॥ ८६
[९]ख्यात यशस्वी [१०]इच्छामृत्यु तुम्हीं कुरुकुळांत [११]वासवसे, ।
स्थिर तुमच्या [१२]धन्वीं यश, कीं [१३]सुरतरुच्या फुलांत वास [१४]वसे. ॥ ८७
सेनापति मुख्य तुम्हीं व्हाल, तरि विभो! करूनि शुद्ध रण ।

---

१. अ० १५५ श्लो० ३१-३४ पहा. २. जयद्रथ. ३. अश्वत्थामा. ४. सुकृत (उत्तम केलेलें) वर्म (कवच) ज्याचें तो. दृढकवची. ५. गीति ८४-८५ यांचें 'युग्म' समजावें. ६. अ० १५६ श्लो० १-१५ पहा. ७. सेनानी=वाहिनीपति. सेनां नयतीति सेनानीः. 'सेनानीः स्यात्पुमान्कार्तिकेये सेनापतौ पुमान्' इति मेदिनी. सेनापति. सेनापतीचें लक्षण असें आढळतें:—'शीलवान्सत्यसंपन्नस्त्यक्तालस्यः प्रियंवदः । पररंध्रविधिज्ञश्च यात्राकालविशेषवित्. ॥ ६७ ॥ अर्थशास्त्रज्ञतत्वज्ञो ह्यनुरक्तः कुले वृतः । देशवित्कालविच्चैव भवेत्सेनापतिर्गुणैः ॥ ६८ ॥ [श्रीभरतमुनिप्रणीत नाट्यशास्त्र—अध्याय २४ पृ० २७७. काव्यमाला ४२.] सेनापतीचें वर्णन अन्यत्र आढळतें तें असें:—'समस्तनीतिशास्त्रज्ञो वाहने पूजितश्रमः । शौर्यवीर्यगुणोपेतः सेनाध्यक्षो विधीयते ॥ १ ॥ शूरोऽर्थशास्त्रनिपुणः कृतशास्त्रकर्मा संग्रामकेलिचतुरश्च तुरंगयुक्तः । भर्तुर्निदेशवशगोऽभिमतश्च तंत्रे सेनापतिर्नरपतेर्विजयागमाय. ॥ २ ॥' ८. सैन्यांनीं. ९. प्रसिद्ध. १०. इच्छेस येईल तेव्हां ज्यास मृत्यु येतो तो इच्छामृत्यु, इच्छामरणी. 'मर्जीस येईल तेव्हां मरण्याची शक्ति तुला असो'—असा आशीर्वाद शांतनूनें भीष्माला दिला होता म्हणून त्याला 'स्वच्छंदमृत्यु' असें म्हणतात. 'दिधली सुदुर्लभा त्या सत्पुत्रें त्या पित्यासि सत्यवती. । 'स्वच्छंदमृत्यु हो' अशि आशी तातेंहि त्यासि सत्यवती ॥.' [मोरोपंत—आदिपर्व—अ० १३ गीति १००.] 'तत्तां दाशपतिप्रत्तां स नृपाय सुदार्पयत् । भीष्मः पित्राप्ययं स्वेच्छाहूतमृत्युवरः कृतः ॥' [बालभारत—आदिपर्व—सर्ग ४ श्लोक ८०.] 'स्वच्छंदनिधनं तस्मै ददौ तुष्टः पिता वरम् । किमदेयमकृतज्ञानामनुक्त्वेवोपकारिणम् ॥.' [भारतमंजरी—आदिपर्व—श्लोक ४५० पृ० ३१.] ११. इंद्रासारिखे. १२. चापीं, धनुष्याच्या ठायीं. धन्वन्=चाप. ['धन्वा तु मरुदेशे ना क्लीबे चापे स्थलेऽपि च' इति मेदिनी.] १३. कल्पवृक्षाच्या. १४. येथें 'वसणें' हा धर्म दोहों वाक्यांत समान आहे म्हणून **'प्रतिवस्तूपमा'** नामक अलंकार झाला आहे. 'वसणें' या धर्माचें अभिधान एकाच शब्दानें झालें आहे म्हणून हा वस्तुप्रतिवस्तुभाव आहे व तो दोन वाक्यांत स्वतंत्र आहे तेव्हां हा **'प्रतिवस्तूपमा'** अलंकार जाणावा.

[1]लीलालेशें [2]मद्रिपुविषवृक्षांचें कराल [3]उद्धरण. ॥ ८८
[4]अरिबळ तसें तुम्हां, [5]तम दावीना जेंवि वदन दीपातें, ।
तुमचा प्रताप रिपुतें नुरवि, जसा [6]घटज [7]नदनदीपातें. ॥ ८९
चालों पुढें तुम्हांला करुनि, जसे करिति लोक रात्रि दिवा, ।
[8]केला त्या **गां**[9]गेयें विस्मय जो काय तो करा त्रि[10]दिवां.' ॥ ९०
**भी**ष्म [11]म्हणे, 'काय करूं? समर्यी शरणागता न सांडावें, ।
आलें असे कपाळा, कीं स्वभुजांशीं स्वयेंचि भांडावें. ॥ ९१
स्वहित पुसतील **पां**डव, तरि सांगुनि संकटांत तारीन, ।
प्रकट प्रहार पहिला केल्यावांचुनि [12]परां न मारीन. ॥ ९२

---

१. अल्प लीलेनें. २. माझ्या शत्रुरूप विषवृक्षांचें. ३. उत्पाटन, उपटणें, उन्मूलन. ४. अरिबल. (शत्रुसैन्य) तुम्हां (अहो भीष्म! तुम्हाला) तसें (त्याप्रमाणें) [वदन दावणार नाहीं] जेंवि (ज्याप्रमाणें) तम (अंधकार) दीपातें वदन दावीना. [पूर्वार्ध व उत्तरार्ध यांत उपमा अलंकार आहे. जेथें दोन पदार्थांचें आनंदकारक साहश्य (साधर्म्य) वर्णिलें असतें तेथें **उपमा** अलंकार होतो. पूर्वार्धांत 'वदन' हें पद दोहों ठिकाणीं घेऊन अन्वय लावावा लागतो म्हणून हें **'दीपक'** अलंकाराचें उदाहरण होय. एकदेशस्थित दीप असून देशांतरीय पदार्थाला काकाक्षिगोलकन्यायानें जसा दाखवितो तसा 'दीपक' अलंकारही वाक्यांतरस्थ पदार्थाचा अन्वय दाखवितो. 'प्रकृतानामप्रकृतानां चैकसाधारणधर्मान्वयो **दीपकम्'** [रसगंगाधर–पृ० ३२२.] जेव्हां प्रकृताचा (उपमेयाचा, प्रस्तुताचा) धर्म अप्रकृताला (उपमानाला, अप्रस्तुताला) दाखवितो अथवा प्रकाशित करतो, तेव्हां **दीपक** अलंकार होतो. 'आदिमध्यांतवर्त्यैकपदार्थेनार्थसंगतिः । वाक्यस्य यत्र जायेत तदुक्तं **दीपकं** यथा ॥' [वाग्भटालंकार–परिच्छेद ४–श्लोक ९९.] दीप जसा एक ठिकाणीं ठेविला असतां अन्य ठिकाणच्या पदार्थास प्रकाशित करतो तसा हा अलंकार आदिस्थ मध्यस्थ अंतस्थ एका पदानें वाक्यार्थाची संगति बसवितो म्हणून याला **दीपक** असें म्हणतात ] ५. अंधार. ६. अगस्त्य. ७. नद+नदी+पातें=नद+नदी+रक्षित्याला. नद आणि नद्या यांचा जो पति त्यातें, सागरातें. ८. त्या गांगेयें (त्या सुप्रसिद्ध कार्तिकानें) जो काय विस्मय त्रिदिवा (स्वर्गाला, स्वर्गस्थ अमरांला) केला, तो [विस्मय] करा (तसा विस्मय तुम्ही सेनापति होऊन आम्हां सर्वांला करा.) [गांगेय=महादेवाचें रेत शरवण नामक नदींत स्कन्न (पतित) झालें व पुढें तें गंगेनें कांहीं काळ धारण केलें म्हणून कार्तिकेयाला अनुक्रमें स्कंद आणि गांगेय अशीं नांवें आहेत. कार्तिकेयानें देवांचें सैन्यापत्य स्वीकारून तारकासुराचा वध केला अशी कथा आहे. हरचरितचिंतामणि–प्रकाश ८-९ पहा. कुमारसंभव–सर्ग ९-१७ पहा.] ९. गांगेय=(१) कार्तिकेय (२) भीष्म. असे दोन अर्थ आहेत. १०. स्वर्गाला. ११. अध्याय १५६ श्लोक १६–२४ पहा. १२. शत्रूला.

ज्याशीं युद्ध करावें म्यां, क्षितिवरि कोण गा! असा मान्य? ।
कीं मजवरि प्रसाद [1]श्रीमद्गुरुचा जगीं [2]असामान्य. ॥ ९३
मत्सम एक [3]**ध**नंजय योद्धा [4]गुरुसंकटींहि [5]अभ्रांत, ।
प्रकट न भिडेल मजसीं, इच्छील मयूर काय [6]अभ्रांत? ॥ ९४
[7]सद्गुरुलब्धास्त्रबळें क्षणमात्रें करिन निर्मनुष्य जगा, ।
[8]सुर असुरहि न मजपुढें टिकतिल, उरतिल कसे [9]मनुष्यज गा? ॥ ९५
न घडेल [10]**पां**डवक्षय, [11]दहनांतहि [12]शुचि **सु**योधना! वांचे, ।
परि [13]अनृण व्हावया मी मारीन [14]अयुत [15]सुयोध [16]नांवाचे. ॥ ९६
स्पर्धा करितो मजसीं [17]सूतात्मज, हा करो प्रथम रण हो! ।

---

१. श्रीपरशुरामाचा. २. अलौकिक, लोकोत्तर. मजवर गुरूचा जो प्रसाद आहे तो असामान्य (अतुल, असम) आहे, त्यास उपमा नाहीं असें येथें वर्णन आहे, यास्तव हा **'असम'** अलंकार होय. (मागें पृ० २१४ टीप ५ पहा.) ३. अध्याय १५६ श्लोक १८-२० पहा. ४. मोठ्या संकटींहि. ५. निःसंशय, अस्खलितमति, अभ्रमाधीन. ६. मेघनाश. हें **प्रश्न**ालंकाराचें उदाहरण आहे. ७. सद्गुरूपासून प्राप्त अस्त्राच्या बळानें. ८. मी ससुरासुरराक्षस अशा जगाचा संहार करीन—असा भाव. ९. मनुष्यापासून झालेले. १०. पांडवांचा उच्छेद माझ्या हातून होणें अशक्य आहे. या प्रसंगाचें वर्णन पहाः—'नोच्छेदनीया मम पांडुपुत्रा भेत्स्यामि योधानयुतं दिनेन । इदं वदन्सिंधुसुतोऽभिषिक्तः सेनापतित्वेन सुयोधनेन ॥.' [बालभारत—उद्योगपर्व—स० ५ श्लो० ८१ पृ० २८८.] ११. अग्नींतही. १२. जो शुद्ध तो दहनांतही वांचे, निष्पाप पुरुष अग्नींत जरी पडला तरी बचावतो. १३. ऋणमुक्त. १४. दशसहस्र. १५. उत्तम वीर. सुयोध नांवाचे=(१) सुयोध असें ज्यांस नांव आहे असे दशसहस्र योद्धे मारीन. सुयोध असें नांव धारण करणारे अयुतसंख्य वीर मारीन. (२) ज्यांस कांहीं नांव आहे, रथी अतिरथी महारथी असें सन्मानसूचक पद (नांव) आहे, असे अयुत सुयोध मारीन. (३) येथें 'नांवाचे' हें पद तिरस्कारसूचक समजावें हें बरें दिसतें, जसें:—हा नांवाचा ब्राह्मण म्हणजे खरा ब्राह्मण नव्हे, हा नांवाचा वीर म्हणजे खरा वीर नव्हे. हा नांवाचा राजा आहे.=हा खरा राजा नव्हे, नुसता नाममात्रधारी राजा. नांवाचा=नामधारी. नांवाचे सुयोध=आडनांवाचे सुयोध, खरे सुयोध नव्हत असे दहा हजार योद्धे मारीन. कौरवांचें अन्न खाल्लें हें कर्ज फेडण्यासाठीं कांहीं पांडवपक्षीय लोकांचा नाश करून ऋणोत्तीर्ण व्हावयाचें आहे, जय मिळवावयाचा आहे असें नाहीं, तेव्हां हलक्यासलक्या योधांचा नाश केला म्हणजे आपलें कार्य झालें असें भीष्मोक्तीचें धोरण दिसतें. १६. अध्याय १५६ श्लोक २१ पहा. १७. कर्ण. (अध्याय १५६ श्लोक २४.)

कीं मजचि पांडुपुत्रांपासूनि प्राप्त [1]सुप्रथ मरण हो.' ॥ ९७
कर्ण [2]म्हणे, 'कुरुराया! जें समरीं पावतील [3]हे मरण, ।
तेंच करिन [4]विजयाशीं रक्षाया हें [5]स्वमित्रहेम रण.' ॥ ९८
अभिषेक स्वीकारुनि जेव्हां गांगेय होय [6]सेनानी, ।
तेव्हां वंदुनि केले बहु जयजयकार [7]सर्वसेनांनीं. ॥ ९९
झाले [8]भूकंपोल्कापाताद्युत्पात तेधवां [9]बहुत, ।
कीं होणार [10]तदस्त्रज्वलनीं बहु [11]शस्त्रभृत्कदंब [12]हुत. ॥ १००
जो द्रोणाचार्याचा द्रुपदें [13]यज्ञें विनिर्मिला काळ ।
तो [14]धृष्टद्युम्न करुनि [15]निजसप्ताक्षौहिणीचमूपाळ. ॥ १०१
धर्में [16]सेनापतिपति केला [17]सुमहायशा [18]धवलवाजी ।
वदले [19]ज्यासि सुर, 'वधुनि अस्मद्रिपु जग यशें [20]धवलवा जी!' ॥ १०२
जाय कुरुक्षेत्राला आधीं [21]धृतराष्ट्रसुत, [22]अनंतर [23]तो ।

---

१. विख्यात. २. अध्याय १५६ श्लोक २५ पहा. ३. हे भीष्म. ४. अर्जुनाशीं. ५. मित्ररूप सुवर्ण. ६. सेनानेता. ७. सकल सैन्यांनीं. ८. भूकंप+उल्कापात+आदि+उत्पात= पृथ्वीप्रकंप, तारे पडणें इत्यादि अशुभ चिन्हें. ९. 'शतशः' असें मूळांत आहे. (अध्याय १५६ श्लोक २८-३१). १०. तद्+अस्त्र+ज्वलनीं=त्याचीं, भीष्माचीं+अस्त्रें+वन्हींत. भीष्माचीं अस्त्रें हाच अग्नि त्यांत. ११. शस्त्रधरराजसमूह. शस्त्रधारी वीरांचा किंवा राजांचा समुदाय. १२. होमद्रव्य. (हुत=हवन केलेलें वस्तु.) १३. मोठा यज्ञ करून द्रुपदानें धृष्टद्युम्न संपादित केला. धृष्टद्युम्न हा प्रदीप्त अग्नीपासून द्रोणाचा अंत करण्यासाठीं उत्पन्न झाला. (मोरोपंत–आदिपर्व–अध्याय ३१ पृष्ठ १६२-१६४ पहा.) १४. 'धृष्टद्युम्न' या शब्दाचा अर्थ असा आहे. धृष्ट म्ह० प्रगल्भ आणि द्युम्न म्ह० वित्त (राजांचें बलरूप धन). बल, शत्रूत्कर्षासहिष्णुत्व, कवचकुंडलादिकांसह जन्म, शस्त्रास्त्रशौर्य इत्यादि गुणांनीं संपन्न असल्यामुळें या अग्निसमुत्पन्न कुमारास धृष्टद्युम्न असें नांव ठेविलें. (महाभारत–आदिपर्व–अध्याय १६७ श्लोक ५३.) १५. आपल्या सात अक्षौहिणींचा स्वामी. (अध्याय १५७ श्लोक १३.) १६. सेनापतींचा नायक. १७. फार मोठें यश ज्याचें तो. १८. धवल (शुभ्र) आहेत वाजी (अश्व) ज्याच्या रथांचे तो अर्जुन (श्वेताश्व). १९. ज्यासि (ज्या अर्जुनाला) सुर (देव) वदले (म्हणाले) जी! (अहो अर्जुनजी!) अस्मद्रिपु (आमचे शत्रु) वधुनि (मारून) जग (विश्व) यशें (कीर्तीनें, यशाच्या शुभ्रवर्णानें) धवलवा (धवल–शुभ्र–करा, धवलवर्ण करा). [धवलवणें=हें क्रियापद संस्कृत 'धवलयति' क्रियापदासारखें आहे. हें 'धवल' या विशेषणापासून साधलेलें आहे. हा 'नामधातु' समजावा–प्रौढबोध मराठी व्याकरण–नियम २७२ पहा. २०. शुभ्र करा. २१. दुर्योधन. २२. अनंतर तो (धर्म) जाय–असा अन्वय. येथें 'जाय' हें पद पुनः घेऊन अन्वय लावला पाहिजे, यास्तव दीपक अलंकार समजावा. २३. धर्मराज.

[1]जो साधु म्हणे, 'मन हरिचरणीं व्हायासि सुख [2]अनंत, [3]रतो.' ॥ १०३
[4]तेथें भेटुनि केला हर्षित [5]शंकित [6]बळें [7]अजातारी, ।
[8]तोहि, [9]जेयाचा [10]द्व्यक्षर उपदेश महाभ्रमीं [11]अजा तारी. ॥ १०४
[12]बळ धर्मासि म्हणे, 'बहु वदलों, कीं योग्य [13]केशवा [14]समता, ।
परि अर्जुनप्रियास्तव झाली न [15]मदुक्ति केशवास [16]मता. ॥ १०५
कृष्णावांचुनि कांहीं संसारीं प्रिय मला नसे लवही, ।
हे [17]मूर्ति मज जसी, तसि [18]धनिकाला बहुमता नसेल [19]वही. ॥ १०६
भुलला हा तुज जैसा भागवताच्या [20]सुभागवत [21]नाचा, ।

---

१. जो (धर्म) म्हणे. हें **पर्यायोक्त** अलंकाराचें उदाहरण होय, 'धर्म' या पदाऐवजीं हा उत्तरार्ध योजिला आहे. २. अमित, अपार, निरवधि, विपुल. ३. रममाण होवो. ४. त्या कुरुक्षेत्रांत. ५. भीतिग्रस्त. [अक्रूर, सांब, गद, प्रद्युम्न इत्यादिकांसह बलराम पांडवांकडे येऊन कृष्णासह सर्वांस भेटला. कृष्णानें उभयपक्षांचा समेट करून रणाचा विचार रहित केला नाहीं म्हणून बलरामाला वाईट वाटलें. आपले गदायुद्धविशारद दोघे शिष्य भीम आणि दुर्योधन यांजवर आपला सारखाच लोभ व स्नेह आहे इत्यादि सांगून व जेथें कृष्ण तेथेंच जय असें कळवून तीर्थयात्रेस जाता झाला. अध्याय १५० श्लोक २३-३५.] बलरामाच्या भाषणानें धर्म आणि कृष्ण या दोघांसही शंका उत्पन्न झाली. ६. बळरामें. ७. युधिष्ठिर. ८. कृष्ण. हें **पर्यायोक्त** आहे. ९. ज्या कृष्णाचा. (विष्णूचा.) १०. तपतप असा. जगाचा मुख्य गुरू ब्रह्मदेव आपल्या कमलावर वसून सृष्टि कोणत्या रीतीनें उत्पन्न करावी याचा विचार करीत होता पण सृष्टि करण्याच्या कामीं त्याची मति चालेना. तो विचारनिमग्न असतां पाण्यांतून दोनअक्षरी शब्द मोठ्या आदरानें दोनवेळां उच्चारलेला त्याला ऐकूं आला. त्या शब्दांतील पहिलें अक्षर 'त' आणि दुसरें 'प' अशीं होतीं. 'तप' 'तप' असा दोनवेळां झालेला ध्वनि ऐकून तो शब्द कोणी उच्चारिला हें पाहण्यासाठीं ब्रह्मदेव आपल्या आसनावरून उठला आणि सर्व दिशांकडे पाहूं लागला. पण त्याला कोणीही दिसलें नाहीं. तो पुन्हां आपल्या आसनावर येऊन बसला व त्या शब्दाप्रमाणें आचरण केलें असतां आपलें कल्याण होईल असा निश्चय करून तो तप करूं लागला—अशी कथा श्रीमद्भागवतांत आहे. [भागवत—स्कंध २ अध्याय ९ श्लोक ३-८.] **पंतांच्या 'मंत्रभागवतां'**तही या कथेचा उल्लेख आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मंत्रभागवत—स्कंध २ गीति १०२-१०७ पृ० ४०-४१.] ११. ब्रह्मदेवास. १२. बलराम. १३. केशवाला उभय पक्षांस सारखे समजून तसें वर्तन ठेवणें हें उचित होय. १४. समवृत्ति, समचित्तभाव. १५. माझी उक्ति. १६. मान्य. १७. ही कृष्णमूर्ति. १८. सावकाराला. १९. जमाखर्चाची वही. २०. उत्तम भगवद्भक्त. २१. नाचाला.

न असा प्राकृतहि झटे साधाया निज सुभाग वतनाचा. ॥ १०७
अभिमान यांस तुमचा जैसा, ऐसा न आमचा कांहीं, ।
त्वत्कार्य यां भुजांहीं शकटाचें जेंवि काम चाकांहीं. ॥ १०८
हा जिकडे तिकडे जय येतो, संबंधिवध पहावेना, ।
भेटाल पुन्हा मजला 'तीर्थस्नानोद्यता रहावेना.' ॥ १०९
जातां मागुनि भगवान् बळभद्र बळें निजानुजा फिरवी, ।
मिरवी प्रभु प्रभूत प्रेम, प्रेमाश्रु लोचनीं जिरवी. ॥ ११०
रुक्मी सहाय व्हाया आला अक्षौहिणीबलासहित, ।
कीं वाटलें करावें धर्माचें त्या तशा खलास हित. ॥ १११
तो प्रभुसमक्ष गर्वेंकरुनि म्हणे अर्जुनासि, 'साधि न हो, ।
भ्यालां कां? लीलेनें तुमचें मी सर्व कार्य साधिन, हो! ॥ ११२
'भीष्मकसुत मी परि भुजवीर्यें केवळ नऱ्हेंचि भीष्मकसा, ।
वांचेल मजपुढें तो द्रोण कसा? तो हि वृद्ध भीष्म कसा? ॥ ११३
द्या भाग कर्ण, कीं कृप, कीं भीष्म, द्रोण, सर्व अथवा द्या, ।
धर्मस्थापनमद्यश गावू वाजवुनि चित्ररथ वाद्या." ॥ ११४

---

१. क्षुद्र मनुष्यही. २. उत्तम अंश, हिस्सा, वांटा. ३. या कृष्णाला. ४. आम्हा यादवांचा, आम्हा आप्तांचा. ५. ज्याप्रमाणें शकटाचें (गाड्याचें) काम चाकांनीं करावें त्याप्रमाणें तुझें काम या कृष्णाच्या भुजांनीं करावें, या कृष्णाच्या मदतीनें तुला जयप्राप्ति व्हावयाची. ६. गाडीचें. ७. आप्तजनांचा नाश (कौरवांचा नाश). ८. तीर्थस्नानाविषयीं उद्युक्त (मला). ९. निज+अनुज=कृष्णाला. १०. परतवी, मागें जाण्यास सांगे. (अ० १५७ श्लो० ३५.) ११. दाखवी. या उत्तरार्धाला मूळांत आधार नाहीं, तथापि प्रसंग मनांत आणून पंतांनीं तदनुरूप वर्णन केलें आहे अशीं जीं अनेक स्थळें आहेत त्यांपैकींच हें एक होय. यांत 'प्र' 'भू' आणि 'म' यांची आवृत्ति अनेकवार झाली आहे तेव्हां हा **'लाटानुप्रास'** होय. १२. बहुत. १३. प्रेमाश्रु बाहेर पडले नाहींत. १४. रुक्मी=भीष्मकराजाचा पुत्र व रुक्मिणीचा बंधु. याला गंधमादनवासी किंपुरुषसिंहाच्या प्रसादानें चतुष्पाद धनुर्वेद आणि माहेंद्र धनुष्य प्राप्त झालें होतें. [अ० १५८.] १५. एक अक्षौहिणी सैन्यासहित. १६. श्रीकृष्णासमक्ष. १७. आधियुक्त सचिंत चिंतायुक्त होऊं नको. १८. भीमकाचा पुत्र. १९. बाहुवीर्यानें. २०. ढेंकुणसा. [भीष्म किंवा भीष्मक हें व्याजोक्तिपर सांकेतिक नांव ढेंकुणाला आहे. सुप्रसिद्ध शांतनव भीष्माच्या कटाक्षपातानें वीरांचीं जशीं वक्षःस्थळें फुटत तशीं ढेंकुणाच्या रक्तानें हीरकरळें फुटतात म्हणून याला असें नांव पडलें.] २१. अध्याय १८ श्लोक २१-२४ पहा. २२. धर्माची राजपदावर स्थापना केल्याचें माझें यश. २३. चित्ररथनामा गंधर्व.

जेंवि [1]अमृतप्रदाला कांजिक दावूनि '[2]सुरस हा, यातें ।
प्या.' पामरें म्हणावें, [3]तोहि म्हणे तेंवि [4]सुरसहायातें. ॥ ११५
[5]सस्मितमुख [6]नर नारायणमुख पाहुनि म्हणे, 'सहाय मला ।
[7]श्रीगुरुपदप्रसादचि बहु, [8]तदितर तुच्छ सर्वथा गमला. ॥ ११६
भ्यालों कसें म्हणेन? क्षत्रिय मी, [9]द्रोणशिष्य [10]हरदास, ।
उखळीन [11]ईश्वरीच्या [12]हरिच्याहि [13]महाभयावह [14]रदांस. ॥ ११७
करितां कृपा [15]सुरासुर, मोडुनि, जाळूनि [16]खांडवास, [17]मयीं, ।
सांग सहाय तशा त्या होता जन कोण पांडवा समयीं? ॥ ११८
खळ [18]कालकेय, दुर्मद [19]गंधर्व, [20]निवातकवच यां गमला ।

---

१. अमृत देणाऱ्याला. २. 'उत्तम रस हा आहे, याचें प्राशन करा' असें कांजी दाखवून म्हणावें. ३. तो मूढ पामर रुक्मी. ४. सुर (देव) आहेत सहाय ज्याचे त्या अर्जुनाला. ५. मंदहास्ययुक्त मुख ज्याचें तो. ६. अर्जुन. ७. गुरूच्या पायांची कृपा. ८. गुरुपदप्रसादाहून अन्य. ९. हें **'समुच्चय'** नामक अलंकाराचें उदाहरण समजावें. येथें क्षत्रियत्व, द्रोणशिष्यत्व आणि हरदासत्व या तीन गुणांचा सहभाव कवीला इष्ट आहे. १०. शिवाचा दास. ११. दुर्गेच्या. १२. सिंहाच्या. १३. अत्यंत भयप्रद अशा. १४. दांतांस. १५. अध्याय १५८ श्लोक २९ पहा. १६. खांडववनाला. सुरासुर मोडुनि, खांडवास जाळूनि, मयीं (मय नामक असुरावर) कृपा करितां, तशा त्या समयीं पांडवा (मला, अर्जुनाला) सांग कोण जन सहाय होता?—असा अन्वय. सुरासुरांस मारिलें, खांडववन जाळिलें आणि मयासुरावर कृपा केली त्या अवघड प्रसंगीं पांडवाला कोण बरें इतर जन सहाय होता तें सांग? [खांडववनदाहाची कथा मोरोपंत—आदिपर्व—अध्याय ३७ गीति ९२-१०१ पृ० २१९-२२१.] येथें अर्जुनानें 'पांडव' असें स्वनाम घेऊन सिद्ध गोष्टीचेंच विधान केलें आहे म्हणून हा **विधि** अलंकार समजावा. १७. मयासुरीं. या अग्निप्रलयापासून अर्जुनानें नमुचीचा बंधु मयासुर याचें संरक्षण केलें. हे उपकार फेडण्यासाठीं मयासुरानें मोठ्या कौशल्यानें पांडवांकरितां एक उत्तम सभागृह बांधिलें. १८. पुलोम आणि कालका अशा दोन दैत्यकन्यका होत्या. त्यांस ब्रह्मदेवाच्या प्रसादानें पौलोम आणि कालकेय असे अनुक्रमें पुत्र झाले. ते देवांस अवध्य होते. परंतु त्यांचा मृत्यु मनुष्यापासून होता. त्यांचें नगर यथेच्छगामी हिरण्यपुर म्हणून होतें. त्यांस अर्जुनानें मारिलें. (अध्याय १७३.) १९. चित्रसेन गंधर्व. मोरोपंत—वनपर्व—अध्याय ७ गीति ३०-५६ पहा. २०. निवातकवच हे प्रल्हादाचा भ्राता संऱ्हाद याचे पुत्र. इंद्रानें अर्जुनास अस्त्रविद्या शिकविली म्हणून गुरुदक्षिणा देण्यासाठीं अर्जुनानें या असुरांचा संहार केला. 'या दानवांचा पराभव कर म्हणजे मला गुरुदक्षिणा पावली' असें इंद्रानेंच अर्जुनास सांगितलें होतें. या दानवांपासून देवांस त्रास होऊं लागला तेव्हां ते इंद्रासह ब्रह्मदेवास शरण गेले. त्यानें इंद्र अन्य

हाही, तेव्हां होता समरांत सहाय कोण सांग मला? ॥ ११९
हा कौरवांस हरिहरदास[1], जसा, नकुळ[2] घोणसा[3] गमला।
काळचि विराटनगरीं, होता सुसहाय कोण सांग मला? ॥ १२०
आराधुनि हरिहरगुरु, येतांही तत्प्रसाद[4] हातातें।
'भ्यालों' म्हणेल त्याच्या कां न म्हणावें देहांत[5] 'हा!'[6] तातें? ॥ १२१
नाहीं भ्यालों, नाहीं किमपि सहायप्रयोजनहि[7], राया!।
जा कीं, अन्यत्र रहा[8], धर्मबळ असे द्विषद्यश[9] हिराया.' ॥ १२२
दुर्योधनाकडे[10] मग जाता[11] झाला, असेचि गर्व तसा।
कोणाला बुडवीना अयशीं, उदकीं शिरस्थ[12] पर्वतसा? ॥ १२३

---

## अध्याय बारावा.

अंध कुरुक्षेत्रकथा पुसतां, संजय म्हणे, 'कृतात्यनयें[13]।
धर्माकडे उलूकाभिधदूत[14] प्रेषिला तुझ्या तनयें[15]. ॥ १

---

देहानें (पुत्ररूपें अर्जुनहस्तें) याचा वध करील असा त्यांस आशीर्वाद दिला. त्याप्रमाणेंच घडून आलें. (अध्याय १६८-१७२.) हा (अर्जुन)ही [जेव्हां] खळ कालकेय, दुर्मद (अदम्य, अधृष्य) गंधर्व (चित्रसेन) [आणि] निवातकवच यां (सर्वांला) [काळासारखा] गमला, तेव्हां समरांत मला साहाय्य कोण होता [तें] सांग—असा अन्वय.

१. कृष्ण (विष्णु) व शंकर यांचा दास. (मोरोपंत—वनपर्व—अ० ७ गी० ४४-४७.) २. मुंगुस. ३. घोणस म्हणून सर्पजातीय एक जनावर आहे, आणि तो कोंकणांत असतो. ४. त्या गुरूचा प्रसाद. ५. चारचौघांत. ६. हायहाय. ७. कारणहि. ८. यथाकाम आणि यथायोग जा किंवा अन्य ठिकाणीं रहा. [अ० १५८ श्लो० ३५.] ९. द्वेष्टयाचें यश. १०. [तो रुक्मी] मग (अर्जुनानें धिक्कार केल्यावर) दुर्योधनाकडे जाता झाला. तसा गर्व असेचि. उदकीं शिरःस्थ पर्वतसा (पर्वत जसा) [जनाला बुडवी] तसा गर्व कोणाला अयशीं बुडवीना? डोक्यावर पर्वत घेऊन खोल पाण्यांतून जाणाऱ्याला जसा पर्वत बुडवितो तसा गर्व वाहून त्या प्रमाणें कृति न करणाऱ्या जनाला गर्व अयशांत बुडवितो. रुक्मीचा गर्व तसाच होता, तो अर्जुनाच्या धिक्कारानें कमी झाला नाहीं. डोक्यावरील पर्वतासारखा गर्व अपयशोरूप उदकांत कोणाला बुडविणार नाहीं? अर्थात् सर्वांला बुडवील—हें उत्तर. ११. रुक्मी जाता झाला. १२. मस्तकीं ठेवलेला. १३. कृत+अति+अनयें=केला+मोठा+अन्याय=ज्यानें मोठा अन्याय केला अशा (तनयें दुर्योधनें). १४. उलूक+अभिधा=उलूक+नाम=उलूक नामक, उलूक नांवाचा. [येथें उलूकदूतागमन नांवाच्या पर्वाला आरंभ होतो. अध्याय १६०-१६३.] उलूक हा शकुनीचा पुत्र, याला दुर्योधनानें पांडवांकडे उपप्लव्य नगरीस पाठविलें होतें. हा परत यावयास निघाला तेव्हां सहदेवानें त्याची पुष्कळ निर्भर्त्सना केली व

धर्मासि[1] म्हणे, 'धरिता झाला व्रत मूषकार्थ[2] ओतू[3] तें ।
स्वीकारिलें म्हणुनियां आलें तत्साम्य देत ओ[4] तूतें[5]. ॥ २
आजिवरि तुझें[6] धार्मिकपण आम्हां सत्य भासलें होतें, ।

---

'तुझ्या पित्यासहित तुला युद्धांत मारीन' अशी प्रतिज्ञा केली व अखेरीस ती शेवटासही नेली. याला कैतव्य असें दुसरें नांव आहे. १५. दुर्योधनानें.

१. उलूक धर्मराजाला म्हणतो किंवा दुर्योधन उलूकाचे मुखानें धर्मराजाला म्हणतो. २. मूषकार्थ (उंदीर खाण्यासाठीं) ओतू (मार्जार) [जें] व्रत (कपटाचरणरूप व्रत) बैडालव्रत धरिता झाला तें [व्रत] [त्वां] स्वीकारिलें (तें व्रत, हे धर्मराजा! तूं पत्करलें आहेस) म्हणुनियां (यास्तव, म्हणून) तत्साम्य (त्या मार्जाराचें, बोक्याचें सादृश्य) ओ देत (हाका मारीत, आपोआप, तूं बोलाविलें नसतांही) तूतें आलें (तुला प्राप्त झालें). हे धर्मराजा! बोका उंदरास मारण्यासाठीं जसें कपट करिता झाला, तसें तूं आतां कपटाचरण आरंभिलें आहेस, म्हणून तुला त्या बोक्याचें साम्य हुडकित आलें आहे. उंदरास खाण्याच्या हेतूनें बोक्यानें साधुपणाचें सोंग घेतलें होतें. तुझा, हे धर्मा! हा साधुपणा ढोंग आहे. तूं सामाच्या मोठ्या गोष्टी सांगतोस, पण त्या सर्व ढोंगी मार्जाराप्रमाणें स्वहिताच्या होत; याचमुळें बोक्याचें साम्य तुला निश्चयेंकरून आलें आहे. [बैडालव्रत=जो कोणी आपल्या हातांत पवित्र दर्भ इत्यादि घेऊन मी मोठा धार्मिक आहें असें दुसऱ्यास समजण्यासाठीं धर्मचिन्हें दाखवितो तो गुप्त पापें निश्चयेंकरून करतो, तो लोकांस दांभिकपणानें ठकवितो. अशा आचरणाला बैडाल व्रत असें नांव आहे. अध्याय १६० श्लोक १४.] ३. मार्जार. ४. 'ओ देत' आलें–ही लोकानुवादाची अनुकृति आहे म्हणून हा **लोकोक्ति** अलंकार समजावा. ५. तुला धर्मराजाला. [ही मूषिकमार्जारकथा अथवा बैडालव्रताख्यान उद्योगपर्व–अध्याय १६० श्लो० १३-४१ यांत आहे. कोणी एक मार्जार ऊर्ध्व बाहु करून गंगातीरीं निश्चळ बसला होता. मी मनःशुद्धि करून उत्तम धर्म आचरीत आहें असें तो प्राणिमात्रांस म्हणे. कांहीं काळ गेल्यावर पक्ष्यांचा त्या मार्जारावर विश्वास बसला. परंतु तो चोरून पक्षिशावकांचें भक्षण करीत असे. ही गोष्ट पक्ष्यांच्या लक्षांत आली नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं तेथें मूषकांचा समुदाय आला. हा मार्जार दांभिक आणि खोटा आहे असें त्या मूषकांला वाटलें, तथापि हा आपला मातुल आहे तेव्हां हा आपलें तसेंच बाल व वृद्ध यांचें संगोपन करील असें समजून त्यांनीं त्यास विनंति केली. मार्जारानें त्यांचें रक्षण करण्याचें कबूल केलें. नंतर सर्व बाल व वृद्ध मूषक हे मार्जारापाशीं राहूं लागले. पुढें पाहतात तों मूषकांची संख्या कमी झाली व मार्जार पुष्ट व तेजस्वी झाला. नंतर कांहीं दिवसांनीं ही गोष्ट बाहेर फुटली. कोलिक नांवाचा एक मूषक होता त्यानें ह्या मार्जाराच्या गुप्त दांभिकपणाचा परिस्फोट केला. तेव्हां सर्व मूषक ह्या मार्जाराला सोडून गेले. अशी ही कथा आहे.]
६. धर्मराजाचें.

म्हणति [१]कवि स्तविलें परि लोभें साधुत्व नासलें हो! तें. ॥ ३
[२]समर स्वधर्म सुगतिद, यांत तरि सुरुचि असो, नहो [३]कुरुची ।
[४]कुरुचीका माशीशी न शिवे क्लीबासि कीर्ति हो! [५]कुरुची. ॥ ४
कृष्णासि [६]म्हणे, 'दावूं ऐशा आम्हींहि [७]इंद्रजालातें ।
हें [८]किति? धीरांसि न दे भय, पूजी नित्य इंद्र [९]ज्याला [१०]तें. ॥ ५

---

१. कवि म्हणति (म्हणतात) [तुझें साधुत्व] स्तविलें (आम्ही फार वर्णिलें, गाइलें) परि (परंतु) तें साधुत्व लोभें (राज्याचा, राज्यश्रीचा लोभ उत्पन्न झाल्यामुळें) नासलें (बिघडलें, व्यर्थ गेलें, लोभानें तुझ्या साधुत्वाचा नाश झाला). उलूकाच्या दृष्टीनें राज्यलक्ष्मीलोभानें धर्माच्या साधुत्वाचा नाश झाला–असा भाव. २. समर (युद्ध) [हा क्षत्रियांचा] स्वधर्म [आहे] [हा] सुगतिद (उत्तमगति–मुक्ति–देणारा आहे). यांत (या समरधर्मांत) सुरुचि असो (उत्तम गोडी असो, याची आवड असो, याचा वीट न येवो, युद्ध करण्याविषयीं उत्साह असावा, मन विटूं नये), कुरुचि नहो (या समरधर्माविषयीं अप्रीति उत्पन्न होऊं नये.) [कारण] हो! (अहो!) कुरुचिका (वाईट असा जो रुईचा चीक त्याला) माशीशी (जशी माशी तशी) कुरुची (कुरुवंशाची) कीर्ति क्लीबासि (नपुंसकाला, पौरुषहीनाला, नामर्द मनुष्याला) न शिवे (प्राप्त होत नाहीं–स्पर्श करीत नाहीं– उलूकाच्या म्हणण्याचा भाव असा कीं धर्मराजाला तो दांभिक असल्यामुळें कीर्ति मिळावयाची नाहीं). [या गीतींत कुरुकीर्तीला माशीची आणि कुरुचिकाला क्लीबाची उपमा दिली आहे. रुईचा चीक वाईटच, तेव्हां त्याला क्लीबाची उपमा दिली ती शोभते पण कुरुकीर्तीला माशीची उपमा म्हणजे फार विसदृश आणि कमी दर्ज्याची होय. 'दामयमक' नामक शब्दालंकार साधण्याच्या नादांत अर्थाची केवढी हानि झाली ही! ही उपमा सदोष समजली पाहिजे. 'हीनाधिकत्वं वचनलिंगभेदो विपर्ययः । असादृश्यासंभवौ च दोषाः सत्योपमागताः ॥' असे प्राचीन साहित्यकारांनीं उपमेचे दोष सात वर्णिले आहेत. प्रस्तुत उपमा ही **हीनोपमत्वाचें** उदाहरण होय. अन्य उदाहरणः–'शुनेव सारंगकुलं त्वया भिन्नं द्विषां बलम्' [अलंकारशेखर–पृ० १८–अर्थदोषमरीचि.] हे राजा! कुत्र्यानें ज्याप्रमाणें हरिणें पळवावीं त्याप्रमाणें त्वां शत्रूंची दाणादाण केली. येथें राजाला श्वानाची उपमा दिली आहे ती हीनोपमा होय. ३. अनावडी. ४. कुत्सित रुईच्या चिकास माशी शिवत नाहीं तशी. ५. कुरुवंशाची. ६. म्हणे=म्हण, सांग, वद, बोल– असाही अर्थ संभवनीय आहे. दुर्योधन उलूकाला म्हणतो:—हे उलूका! तूं कृष्णाला म्हण. ७. गारुडाला, मायेला. [आमच्या सभेंत मायेनें जें विराटरूप दाखविलेंस तसें रूप दाखविण्याच्या कुहकाला. अध्याय १६० श्लो० २४-५५]. ८. तुझ्या ह्या इंद्रजालाची कोण पर्वा करतो? ९. ज्या वज्राला इंद्र नित्य पूजितो तें वज्रसुद्धां जे धीर (वीर) आहेत त्यांस भयग्रस्त करीत नाहीं, तेव्हां तुझ्या इंद्रजालाला कोण भितो आहे? १०. वज्र.

[१]स्मर [२]वचन, 'वधुनि कौरव दे हें धर्मासि राज्य साधूनी' ।
कीं अर्क [३]देखिजेतो देखोनि [४]असत्यसंध साधूनीं. ॥ ६
[५]आहेत [६]भृत्य बहु, मी स्पर्श करिन न तुज [७]कंसभृत्यातें, ।
[८]जो [९]अयशोवायसभृत् स्पर्शेना [१०]कीर्तिहंसभृत् त्यातें. ॥ ७

---

१. [कौरव वधून धर्माला राज्य देईन असें तुझें] वचन स्मर (ध्यानांत आण, स्मरण कर) [आणि] कौरव वधुनि हें राज्य धर्मासि साधूनी (मिळवून) दे. (देण्यास विसरूं नको.) कीं (कारण) असत्यसंध देखोनि (खोटी प्रतिज्ञा करणारा पुरुष पाहिला तर, ज्यानें आपली संधा (प्रतिज्ञा) असत्य (खोटी) केली अशा पुरुषाला पाहिलें तर) [त्या पापाच्या क्षालनार्थ] साधूंनीं (सज्जनांनीं) अर्क (सूर्य) देखिजेतो (पाहिला जातो). [असत्यभाषण करणाऱ्या अधमाचें तोंड पाहिलें असतां पाप लागतें व त्याबद्दल प्रायश्चित्त घेणें जरूर असतें. 'नानृतात् पातकं परम्। पापिष्ठं दुर्भगं चांधं नग्नमुत्कृतनासिकम्। प्रातरुत्थाय यः पश्येत्तत्कलेरुपलक्षणम् ॥' इति कात्यायनः. 'तरणि **विश्वदर्शतो ज्योति**ष्कृदसि सूर्य' [ऋग्वेद–सौर.] हे सूर्या! तूं उपासकांचें रोगापासून तारण करणारा, सर्वांहि–प्रायश्चित्तादि करितां अवलोकनीय व स्वयंप्रकाश आहेस. याप्रमाणें सूर्याचें वर्णन आहे, त्याजवरून तो 'सकल पापनाशक' होय असें दिसतें. २. कृष्णाच्या वचनाचा उल्लेख दुर्योधनानें येथें केला आहे तें वचन उद्योगपर्व–अध्याय ५ गीति ११-१४. यांत पहावें. संजयानें पांडवांकडून येऊन कौरवांकडे जो निरोप सांगितला त्या भाषणांवर येथें दुर्योधनाचा कटाक्ष आहे. ३. असत्यसंधाचें तोंड पाहिलें तर साधु तद्दोषपरिहारार्थ सूर्यावलोकन करितात. ४. या उत्तरार्धांत–तूं असत्यसंध होऊं नकोस–हा वाच्यार्थ प्रकारांतरानें सांगितला आहे. ५. मजपाशीं पुष्कळ चाकर आहेत, त्यांपैकीं कोणीही तुझ्याशीं लढेल किंवा तुला मारील. मी तुला स्पर्श देखील करणार नाहीं, कारण तूं कंसाचा चाकर आहेस. [तुझा मातुल व स्वामी जो कंस तो माझ्याहून कमी योग्यतेचा तेव्हां त्याच्या चाकरास मी स्पर्श कसचा करणार? अर्थात् नाहीं.] ६. सेवक. ७. अध्याय ६० श्लोक ६४ पहा. ८. जो अयशोवायसभृत् [आहे] त्यातें कीर्तिहंसभृत् स्पर्शेना–असा अन्वय. जो कीर्तिहंस धारण करणारा आहे तो अयशोवायस धारण करणाऱ्या पुरुषाला स्पर्श करणार नाहीं. हंस जसे वायसास (कावळ्यास) स्पर्श करीत नाहींत, त्याची उपेक्षा करतात, तद्वत् कीर्तिभृत् जो मी तो अयशोभृत् अशा तुला अधमाला हातसुद्धां लावणार नाहीं. असा तूं नीच व अधम पापी आहेस. ९. अकीर्तिरूप काकपक्षी धारण करणारा त्याला. १०. येथें अयश यास वायसाची आणि कीर्तीस हंसाची उपमा योजून रूपक केलें आहे. पूर्वार्धघटित अर्थास उत्तरार्धघटित अर्थाची उपमा आहे व दोन्ही स्वतंत्र वाक्यांत वस्तुप्रतिवस्तुभाव आहे आणि 'स्पर्शणें' हा समानधर्म आहे म्हणून ही '**प्रतिवस्तूपमा**' झाली.

भीमासि म्हणे, 'रण तुज काय? तुवां विविध अन्न रांधावें, ।
सुजला अससिल आधीं मागाया अन्न मन्नरां धावें. ॥ ८
तूं बरवा न रणीं, तूं स्पष्ट पुरस्कार्य पुष्कळीं अशनीं, ।
तूं किति बाळा! अक्षम दुःशासनरक्त प्यावया अशनी.' ॥ ९

---

१. अध्याय १६० श्लो० ६५-६६. २. भीमासि [उलूक] म्हणे (म्हणाला); अथवा, हे उलूका! त्वां भीमाला म्हणावें, असा अर्थ करावा. ३. तुला रणासीं काय कर्तव्य आहे? लढाई मारणें हें तुझें काम नव्हे, त्या संग्रामकार्याला तूं अनुचित आहेस असा गर्भितार्थ जाणावा. हा भीमाला टोमणा मारला आहे. ए भागूबाई! रणांत आपण काय ध्वज लावणार! अशीही साधिक्षेप उक्ति आहे. ४. अनेक प्रकारचें, अनेक जातीचें (अन्न). ५. अ० १६० श्लो० ६५-७० पहा. ६. शिजवावें. [भीम अज्ञातवासांत विराट भूपतीच्या महानसांत राहून सूदाचें काम करीत असे या गोष्टीस अनुसरून हें वर्णन आहे. काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–विराटपर्व–अ० १ गी० ८ पृ० ३.] ७. कोणा मनुष्यास कोणता एखादा पदार्थ खाण्याची इच्छा झाल्यास आणि त्याला तो पदार्थ न मिळाल्यास पोटाला बेंबीजवळ सूज येते, आणि त्यास तो पदार्थ मिळाला म्हणजे ती सूज उतरते अशी समजूत आहे. यावरून 'सुजणें' या धातूचा अर्थ आसक्त होणें, इच्छा उत्पन्न होणें, आशाळभूत असणें अशा अर्थीं उपयोग करितात. 'हा अन्नाकारणें नसे सुजला' असें वाक्य उद्योगपर्व–अ० ७ गी० ६५ यांत आहे. सुजणें या शब्दानें अत्यंत आसक्ती, हांव, उत्कट इच्छा, यांचा बोध होतो.] उलूक म्हणतोः–[हे भीमा! तूं अन्नासाठीं] सुजला असशील (अत्यंत आसक्त झाला असशील, नडला असशील, अडला असशील, तुला खा सुटली असेल), [तर हा युद्धप्रसंग टाकून] आधीं अन्न मागाया मन्नरां (माझ्या सेवकांकडे, माझ्या मुदपाकखान्यांतील सूपकारांकडे) धांवे (जा, धांव घे, अन्न खाण्यासाठीं आधीं माझ्या स्वयंपाकगृहांत जाऊन सूदांपाशीं अन्न मागून घे). ८. माझ्या नोकरांकडे. ९. तुझा युद्धाच्या कामीं कांहीं उपयोग नाहीं. १०. पुढें करावयाजोगा. ११. भक्षणाविषयीं. (आणि पेयाविषयीं असें ज्यास्त मूळांत आहे. अ० १६० श्लो० ६८.) १२. [हे] बाळा! (मुला भीमा!) तूं किति? (तुझा पाड काय? तुला कोठचें सामर्थ्य बरें?) १३. दुःशासनरक्त (दुःशासनाचें रक्त) प्यावया अशनी (वज्र) अक्षम (असमर्थ) [आहे, तेथें हे] बाळा! तूं किति? दुःशासनाचें रक्त प्यावें म्हणून वज्रानें जरी मनांत आणिलें तरी तेंही असमर्थ आहे, तर तेथें तुझी काय कथा? तेथें तूं कोण झाडाचा पाला? दुःशासनाचें रक्त जर वज्रालाही मिळणें अशक्य, तर तुला बापड्या मुलास कसें मिळेल? 'बाळा' हा शब्द निंदाव्यंजक, असामर्थ्यद्योतक आहे आणि याची योजना सहेतुक आहे. मी दुःशासनाचें रक्त प्राशन करीन अशी भीमाची प्रतिज्ञा होती तिला अनुलक्षून उलूकमुखें दुर्योधन भीमाची निर्भर्त्सना करीत आहे. या भीमाच्या प्रतिज्ञेचें वर्णन **बालभारतां**त असें केलें आहेः—अतिप्रकर्षेऽशुककर्षणानाममर्षतोऽभाषत भीमसेनः । अनध्वनीनां श्रवणध्वनीनां मम प्रतिज्ञां

मा[१]द्रीपुत्रासि म्हणे, ‘म्हणसि करुनि युद्ध कां मरेन? कुळा ।
रक्ष, रहा सा[२]नुज, दे जळ, हाही शुद्ध काम, रे न[३]कुळा!’ ॥ १०
सहदेवासि म्हणे, ‘त्वां कां रे! [४]जीव न दिला? प[५]रवश स्त्री[६] ।
कसि देखिली? सहाता दासीचाहि न वि[७]लापरव श[८]स्त्री.’ ॥ ११

शृणुत क्षितीशाः ॥ ५१ ॥ दुःशासनस्यास्य विदार्य वक्षः पिबामि नासृग्चलुकत्रयं चेत् । लिप्ये तदस्यैव दुराशयस्य पापेन साध्वीपरितापजेन ॥ ५२ ॥ [बालभारत–सभापर्व–सर्ग ५ पृ० १७२.] पंतांनीं ही प्रतिज्ञा थोडक्यांत सांगितली आहे. ‘भीम म्हणे, ‘राजे हो! तरि पूर्वजगति न हो मला परिसा, । जरि दुःशासनवक्षःक्षतज न सेवीन मी स्वयें हरिसा ॥.’ [सभापर्व–अ० ५ गी० ९१ पृ० ४७.] १४. वज्र.

१. नकुलाला. २. बंधुसहित. ३. रे नकुळा! [युद्धांत न मरतां] सानुज (सहदेवासह, धाकट्या भावासह) रहा (जीवंत रहा) [आणि मृतांला, मृत पूर्वजांला] जळ दे (मृतांची श्राद्धादिक क्रिया कर, जलांजलि देणें हें श्राद्धाचें प्रधान अंग आहे–) कुळा रक्ष (वंशाचें रक्षण कर, कुळ निःसंतान होऊं देऊं नकोस) हाही शुद्ध काम [आहे]=कुलरक्षण आणि विशेषतः जलांजलिदान करणें हा चांगलाच हेतु आहे, हें करणें प्रशस्त आहे. [युद्धांत मरणें जसें योग्य आहे तसेंच पितरांच्या पिंडदानादिक पारलौकिक क्रिया यथाशक्ति संपादणेंही योग्यच आहे, हाही सद्धर्मच आहे, तर] युद्ध करुनि मरेन [असें तूं हें नकुळा!] कां म्हणसि? (कशास्तव म्हणतोस? असें म्हणूं नको). ४. [स्वपत्नी परकरगत झाली असें पाहून द्रौपदीच्या वस्त्रहरणप्रसंगीं] त्वां प्राण कां सोडला नाहीं? प्राण देणें हेंच तुला योग्य होतें तें त्वां कां केलें नाहीं? [या पूर्वार्धांत **निदर्शना** नामक अलंकार झाला आहे. स्त्री परवश देखणें आणि जीव देणें सारखेंच आहे असें येथें सुचविलें आहे म्हणजे दोहों वाक्यांत अभेद वर्णिला आहे म्हणून ही **निदर्शना** जाणावी.] ५. पराधीन, शत्रूच्या कवज्यांत गेलेली. ६. द्रौपदी. ७. रोदनशब्द. ८. शस्त्री (शस्त्रधर पुरुष). [आपल्या] दासीचाही विलापरव (आक्रोशशब्द) न सहाता (न सोसता, जो सामान्य शस्त्रधर आहे तो आपल्या घरांतील कुणबिणीचाही शोकशब्द सहन न करता; ज्यानें तिला दुःख दिलें त्याचें शासन करण्यास कंबर बांधून धांवता आणि त्या खलाचा यथेच्छ समाचार घेता. तेव्हां तुझ्या सारख्या शूर वीरानें स्वपत्नीधर्षण निमुटपणें पहावें हें अत्यंत अनुचित होय.) येथें [जो] शस्त्री [आहे, तो] दासीचाही विलापरव न सहाता–असा अन्वय लावून या सामान्य विधानानें सहदेव शस्त्रधारी वीर असता तर त्यानें पत्नीधर्षण सोसलें नसतें, पण ज्यापेक्षां त्यानें ती गोष्ट निमुटपणें डोळे झांकून सहन केली त्यापेक्षां तो शस्त्रधारी वीर नव्हे असें विशेष विधान गर्भितार्थानें सूचविलें आहे. या उत्तरार्धाचा अन्य रीतीनेंही अर्थ लावितां येतो व तोच कदाचित् सरस आणि सयुक्तिक समजला जाणार आहे. दासीचाही विलापरव शस्त्री [होत्साता] न सहाता [त्वां] स्त्री (द्रौपदी) परवश (पराधीन) कसि देखिली? दासीचा विलापरव ऐकून तुम्ही शस्त्रें घेऊन तिच्या

विजयासि म्हणे, 'आम्हां आहे दिव्यप्रभाव धनु ठावें, ।
त्वां खद्योतें इच्छुनि कुरुगुरुभानुप्रभावध नुठावें. ॥ १२
कंसारि सहाय तुझा, ठावा न असेल कां मला खोटा? ।
वरि बरवा, आंत न जो, तो काय करील काम लाखोटा? ॥ १३

संकटाचें निवारण करण्यास सिद्ध असतां असें जर खरें आहे तर स्वतःची स्त्री सभेंत शत्रूंनीं घेरली असतां तें तुमचें सुप्रसिद्ध तेज कसें प्रकट झालें नाहीं? येथें असहनता अथवा तेजःप्रकटन हें कार्य कारणसामग्री पुष्कळ असतांही घडलें नाहीं म्हणून हा **विशेषोक्ति** अलंकार होय. याचें लक्षणः–(१) कारणसामग्र्ये कार्यानुत्पत्तिर्**विशेषोक्तिः**। [अलंकारसर्वस्व–पृ० १२६.] (२) **विशेषोक्ति**रखंडेषु कारणेषु फलावचः । [काव्यप्रकाश–पृ० १७८. अखंडेषु (मिलितेषु) कारणेषु (प्रसिद्धकारणेषु सत्सु) फलावचः (कार्याभाववचनं) **विशेषोक्तिः**] (३) **विशेषोक्ति**रनुत्पत्तिः कार्यस्य सति कारणे. [मंदारमरंदचंपू–व्यंग्यबिंदु १०–पृ० १३२.] (४) प्रसिद्धकारणकलापसामानाधिकरण्येन वर्ण्यमाना कार्यानुत्पत्तिर्**विशेषोक्तिः** [रसगंगाधर–पृ० ४३७.] (५) सति हेतौ फलाभावो **विशेषोक्तिः** [साहित्यदर्पण.] कारणसामग्री विपुल असूनही जेथें अवश्य कार्याची अनुत्पत्ति वर्णिली आहे तेथें **विशेषोक्ति** अलंकार होतो. हा अलंकार **विभावने**च्या विरुद्ध आहे, कारण नसतांही कार्याची उत्पत्ति वर्णिली असली म्हणजे **विभावना** अलंकार होतो. [विनापि कारणं कार्यस्योत्पत्तिः स्याद्विभावना–मंदारमरंदचंपू.]

१. अध्याय १६० श्लोक ८०-१२५ पहा. २. अतुलप्रभाव (गांडिवधनु), प्रखर पराक्रम ज्याचा तें. ३. काजव्यानें. [खद्योत=ज्योतिरिंगण, काजवा । खे द्योतते खं द्योतयति वा खद्योतः । 'खद्योतो ज्योतिरिंगणः' इत्यमरः.] हें **रूपक** अलंकाराचें उदाहरण आहे. [मूळांत वायूनें मेरुपर्वत उन्मथित केला असें कधीं ऐकिलें नाहीं असें वर्णन आहे. अ० १६० श्लो० ९८.] ४. द्रोणरूप सूर्याच्या तेजाचा नाश. ५. न उठावें. येथें परसवर्ण झाला आहे. ६. वासुदेव, कृष्ण. [कंसाला कपटानें मारणारा वासुदेव असा 'कंसारि' पदानें अर्थ दाखविण्याच्या आहे तेव्हां हें पद साभिप्राय आहे व म्हणूनच हा **परिकर** नामक अलंकार झाला.] ७. मला दुर्योधनाला. ८. महाकपटी, दुष्ट, घातकी. ९. जो वरि बरवा (बाहेरच्या अंगानें चांगला) [आणि] आंत (बरवा) न (आंतून चांगला नाहीं) तो लाखोटा (लाखेचा भांड्याला दिलेला लेप) काय काम करील? (काय उपयोगाचा? कांहीं काम करणार नाहीं–असा भावार्थ.) येथें हा **प्रश्ना**लंकार समजावा. बाहेरचा लाखोटा जसा कांहीं कामाचा नाहीं, तसा तुझा सहाय जो कृष्ण तो कांहीं एक कामाचा नाहीं, तो काय पराक्रम करणार? 'देखनेमे ढब्बू आणि चलनेमे शिवराई' अशासारखा कुचकामाचा कृष्ण आहे. लाखोटा वरून चांगला दिसतो व आंतून तसा चांगला नसला म्हणजे कांहीं उपयोगीं पडत नाहीं, अशा लाखोट्यांत ठेवलेला पदार्थ पाणी मुरल्यामुळें नासतो तसा हा कृष्ण बाहेरून गोड पण आंतून फार कडू महाघातकी होय असें म्हणण्याचें तात्पर्य. येथें वरून चांगला, पण आंत चांगला नाहीं अशा लाखोट्याचा दृष्टांत कृष्णास दिला आहे म्हणून

कर्ण [1]नदीसुत [2]कुरुगुरु [3]कोण रणीं पळविना [4]शतमखातें? ।
या जिंकितासि तरि [5]जरि रविसि करुनि बळविनाश तम खातें. ॥ १४

हा **दृष्टांत** अलंकार होय. तसेंच 'बरवा' हें पद दोन वाक्यांस प्रकाशक आहे म्हणून **दीपक** अलंकार होय. १०. मातीचें भांडें टणक आणि मजबूत व्हावें म्हणून त्यास आंत बाहेर लाखेचा लेप चढवितात याला लाखोटा म्हणतात आणि त्या भांड्यास लाखलोटा (रोगण लावलेलें, लाखटलेलें भांडें) म्हणतात. भांड्यास वरच्या आंगानें लाखोटा (रोगण) करून आंतल्या आंगासही केलें पाहिजे, नाहीं तर तें भांडें कांहीं उपयोगीं पडत नाहीं. भांड्यांत पातळ पदार्थ असणार तेव्हां त्याचा परिणाम मातीवर होऊं नये आणि पदार्थ पाझरून बाहेर निचरूं नये म्हणून हा लखोटा (लाखेचा लेप–रोगण) बाहेरच्या अंगापेक्षां आंतल्या अंगानेंच चांगला केला पाहिजे आणि तो तसा नसला म्हणजे भांडें फुकट जातें आणि बाहेरच्या लाखोट्याचा कांहीं उपयोग होत नाहीं.

१. भीष्म. २. द्रोण. ३. कर्ण, भीष्म आणि द्रोण यांतून कोण रणामध्यें शतमखातें (शतक्रतूला–इंद्राला) पळविना? कोणीही इंद्राला घाबरवून त्यास पळायास लावील, युद्धांत इंद्राचा मोड करून त्याचा धुवा उडवील–असा भाव. ४. इंद्रातें. ५. जरि बलविनाश करुनि तम रविसि खातें तरि [तूं हे अर्जुना!] यां जिंकितासि–असा अन्वय. जर अंधकारानें सूर्याच्या शक्तीचा नाश करून सूर्याला गिळून टाकिलें असतें तर तूं या कर्णभीष्मद्रोणांस जिंकिलें असतेंस. पण ज्या अर्थीं अंधकारानें सूर्याला जिंकिलें नाहीं त्या अर्थीं तुझ्यानेंही यांस जिंकवत नाहीं. येथें **मिथ्याध्यवसिति** नामक अलंकार झाला आहे. याचें लक्षण:– (१) किंचिन्मिथ्यात्वसिद्ध्यर्थं मिथ्यार्थांतरकल्पनम् । **मिथ्याध्यवसिति**र्वेश्यां वशयेत् खस्रजं वहन्. ॥ [कुवलयानंद], (२) (अथ मिथ्याध्यवसितिः–) वस्तुनः कस्यचिदत्रात्यंतमिथ्यात्वसिद्धये । मिथ्याध्यवसितिर्मिथ्याभूतार्थांतरकल्पनम् ॥ दुष्कीर्तिर्बधिरश्राव्या मूकगेयास्य भूभुजः [मंदारमरंदचंपू–१० व्यंग्यविंदु–पृ० १४१.] जेथें कांहीं दुर्घट कार्याच्या सिद्धीसाठीं मिथ्याभूत अर्थाची कल्पना केलेली असते तेथें **मिथ्याध्यवसिति** नामक अलंकार होतो. जसें (१) पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवेल तेव्हां या मूर्खाची समजूत पडेल, (२) वंध्यापुत्र मूर्खजनरंजन करतो, या दोन उदाहरणांत सूर्य पश्चिमेस उगवणें आणि वांझेस पुत्र होणें या दोन मिथ्याभूत अर्थांची कल्पना अत्यंत असंभवनीय आणि दुर्घट असें जें मूर्खचित्तसमाधानरूप कार्य त्याच्या सिद्धीकरितां केली आहे, म्हणून हा **मिथ्याध्यवसिति** नामक अलंकार होय. (३) जो खपुष्पमालाधारी आहे तो वेश्येतें वश करतो. येथें वेश्येस वश करणें ही गोष्ट होणारी नव्हे, ती अत्यंत असंभवनीय आहे, तरी ती होते असें मिथ्या धरून त्याच्या सिद्धीसाठीं वश करणारा पुरुष आकाशपुष्पमाला घालणारा कल्पिला आहे (आकाशपुष्पमाला घालणें या मिथ्याभूत अर्थाची कल्पना केली आहे.) जसें आकाशाचें फूल मिळणें असंभवनीय आहे तसेंच वेश्येला वश करणें हें असंभवनीय आहे; जसा आकाशपुष्पमाला घालणारा पुरुष मिळणार नाहीं (कारण आकाशपुष्प मिथ्या आहे) तसा वेश्याप्रेमसंपादकही कोणी होणार नाहीं.

[1]किति दोघे कृष्ण तुम्हीं? असतां [2]शत, जिंकिते तथापि कवी, ।
हें तो असो, तयांची समरक्षेत्रांत जय कथा पिकवी. ॥ १५
रे [3]कूपदर्दुरा! किति टुरटुर करिसी? वृथा न [4]भाग, [5]रहा; ।
काय तुझें भाग्य? अरे! मंदा त्वां पाहिला न [6]सागर हा.' ॥ १६

---

एकंदरींत एका अर्थाचें मिथ्यात्व सिद्ध करण्यासाठीं दुसऱ्या मिथ्याभूत अर्थाची कल्पना केली आहे. प्रस्तुत आर्येंत कर्णादिकांस जिंकणें ही गोष्ट मिथ्या, पण ती गृहीत धरून तिची सिद्धता तमानें सूर्याला गिळणें ह्या मिथ्याभूत गोष्टीचा संभव करून कल्पिली आहे म्हणून हा **मिथ्याध्यवसिति** अलंकार होय. तमानें सूर्याला गिळणें, आणि अर्जुनानें कर्णादिकांस जिंकणें सारखेंच असा गर्भितार्थ आहे म्हणून हा **निदर्शनागर्भित मिथ्याध्यवसिति** अलंकार होय. याचीं अन्य उदाहरणें. (४) प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे, तृषार्तांची तृष्णा मृगजळ पिऊनीहि वितळे । सशाचेंही लाधे विपिन फिरतां शृंगहि जरी, परंतु मूर्खाचें हृदय धरवेना क्षणभरी ॥ १ ॥ [वामनपंडित—नीतिशतक], (५) जिंकिल काय हरा तो जिंकी कुतुकेंचि मन्मथ नरा ज्या ॥ करिल हरि मथन शश तरी करिल सुयोधनहि मन्मथन राजा ॥ २ ॥ [मोरोपंत—उद्योगपर्व], (६) बळानें काढूं ये मणि मकरदाढेंत दडला, महासिंधूतारातरण करूं येई भुजबळा । महासर्पातेंही सुमसम धरूं ये निजशिरीं, परंतु क्षुद्राचें हृदय धरवेना क्षणभरी ॥ ३ ॥ [वामनपंडित—नीतिशतक.]

१. तुम्हीं दोघे कृष्ण किति? [तुम्हीं] शत असतां तथापि कवी [तुम्हांला] जिंकिते; हें तो असो; तयांची कथा समरक्षेत्रांत जय पिकवी—असा अन्वय. तुम्ही दोघे कृष्ण (कृष्ण व अर्जुन) किती? (तुम्हा दोघांची कथा काय? तुमची पर्वा काय? तुमची लेखा काय? [अर्जुनाला कृष्ण असेंही नांव आहे.] तुम्ही शत (शंभर—शेंकडों) जरी असतां तरी तुम्हास कवी (कर्णादिक) जिंकिते (सहज जिंकून टाकतील—कारण ते तसेच मोठे शूर आहेत). हें तो असो, (यांत कांहीं विशेष नाहीं, ही गोष्ट तर राहूंद्या एकीकडे). तयांची (त्या कर्णभीष्मादिकांची) कथा (चरित्रकथा, पराक्रमवर्णना) समरक्षेत्रांत (युद्धभूमीवर) जय (जयरूप फळ) पिकवी=या कर्णभीष्मद्रोणाचें पराक्रमचरित असें कांहीं आहे कीं त्याच्या श्रवणानें वीरांला समरांगणांत स्फुरण येऊन जयप्राप्तिच व्हावयाची. २. मूळांत सहस्र कृष्ण आणि शेंकडों अर्जुन असले तरी ते मला पाहून दशदिशा पळत सुटतील असें वर्णन आहे. [अध्याय १६० श्लोक ११९]. ३. विहिरींतील बेडुका. (अध्याय १६० श्लोक १०२.) कूपशय दर्दुर (मंडूक). ४. क्लेश घेऊं नको. ५. स्वस्थ रहा, चूप बैस. ६. येथें **अप्रस्तुतप्रशंसा** नामक अलंकार झाला आहे. येथें अप्रस्तुत व्यवहारानें प्रस्तुत व्यवहार वर्णिला आहे म्हणून **अप्रस्तुतप्रशंसा** (अन्योक्ति) अलंकार होतो. [रसगंगाधर—पृ० ४०२.] जेथें ज्या गोष्टीचें वर्णन करावयाचें त्या गोष्टीचें वर्णन न करितां, ज्या गोष्टीचें उदाहरण द्यावयाचें असतें तिचेंच वर्णन केलें असतें म्हणजे जेथें साक्षात् गोष्टीचें कथन न करितां तिचा प्रत्यय यावा म्हणून अप्रस्तुत गोष्टीचें वर्णन असतें आणि या प्रकारें प्रस्तुत गोष्ट ग-

[1]यापरि **उलूकवदनें** ऐकविल्या [2]विषकटूग्र [3]संदेशें ।
केले वृद्ध **विराट द्रुपदहि** बहु तप्त त्या [4]सुमंदेशें. ॥ १७
[5]खळवाक् कोप पराच्या उठवी, होताचि **भीमयोधमनीं**; ।

---

भितार्थानें दर्शविली असतें तेथें **अप्रस्तुतप्रशंसा** अलंकार होतो. याचीं अन्य उदाहरणें:– (१) द्वारीं मृगपतिहस्तांतूनि अहो वीरराय! जी मुक्ता । ती सेविजेल इतरें सिंहावांचोनि काय जी मुक्ता?॥८॥[मोरोपंत–आदिपर्व–अध्याय ११], (२) उंच वाढला एरंड । तरि का पावे इक्षुदंड?॥, (३) मालाचे पैं पेटे, वाहताति उंटें । तयांलागीं कांटे भक्षावया॥, (४) साखरेच्या गोण्या बैलाचिये पाठी । तयाशि शेवटीं करवाडें ॥ [तुकाराम.]

१. याप्रमाणें वर वर्णिलेल्या संदेशें (निरोपानें). अध्याय १६०-१६१ पहा. २. विषाप्रमाणें कडू उग्र (निरोपें). ३. उलूकानें सुयोधनाचा निरोप धर्मादिकास विराट द्रुपद आणि इतर भूमीप यांच्या समक्ष सांगितला, तो ऐकून ते सर्व राजे फार संतापले. [अध्याय १६१ श्लोक ५.] या उलूकसंदेशाचें वर्णन **बालभारतां**त पुढें दिल्याप्रमाणें केलें आहे:–'उलूकनामाथ सुयोधनेन दूतो नियुक्तः समरोत्सुकेन । कोपाग्निकीलाकटुभिर्वचोभिः सभागतं धर्मसुतं बभाषे ॥ १०१ ॥ राजन्रणं कस्य बलेन कर्तुमुत्कोऽसि साकं कुरुकुंजरेण । न द्यूतमेतद्विजितः क्षणेऽस्मिन्न यासि जीवन्सह बंधुभिः स्वैः ॥ १०२ ॥ जीवन्व्रजाशु त्यज युद्धबुद्धिं मिष्टान्नभोजी भव सर्वदापि । विराटभूपौकसि सूपकारभूतस्य भीमस्य करप्रसादात् ॥१०३॥ किरीटिकोदंडगुणाग्रधूततूलालिसंपादितसूत्रजातिः । विप्राकृतेस्तत्र नवांशुकानि ददाति साध्वी विशदानि कृष्णा ॥ १०४ ॥ निश्चितमेवं कशिपुस्तवास्ति मा मृत्युदूतीं भज राज्यचिंताम् । इमानपि श्रीपतिसात्वतादीन्किं कालभोज्यं कुरुषे विमूढ ॥ १०५ ॥ अथो रथाश्वेभनृवाहनाधिरोहस्पृहा काचन ते चकास्ति । तद्दासतामाशु सुयोधनस्य भज स्वयं सेवककामधेनोः ॥ १०६ ॥ इत्यस्य वाग्भिः स्फुटनिष्ठुराभिर्भुजाभृतां कोपकुटुंबितानाम् । अक्ष्णां द्युतिः कौरवकालरात्रिसंध्येव मध्ये जगदुद्दिदीपे ॥१०७॥ क्रोधज्वलच्चक्षुरभीशुभिन्नाः कनीनिकांशुप्रकरा न केषाम् । दूतेऽत्र पेतुः प्रलयानलार्चिर्जटालकालायसदंडचंडाः ॥ १०८ ॥ [श्रीमदमरचंद्रसूरिविरचितबालभारत उद्योगपर्व–सर्ग ५ पृ० २९०], 'त्वमिदं वचनं ब्रूहि ह्येष संदेश इष्यते' [भरतप्रणीत नाट्यशास्त्र–अध्याय २२ श्लोक ५४ पृ० २४५ काव्यमाला ४२]. ४. अत्यंतमूर्खशिरोमणिनें. ५. खलवाक् पराच्या [मनीं] कोप उठवी; [तो कोप] भीमयोधमनीं [पूर्वींच] होताचि; रुद्रालिकनयनदहन कल्पांतीं 'धमनी यो' [असें] म्हणे काय?– असा अन्वय. खलवाक् (खळाचें–उलूकाचें–भाषण) पराच्या (अन्याच्या, भीमाहून इतर जे धर्मादिक पांडव आणि पांडवपक्षीय राजे त्यांच्या) [मनांत] कोप (क्रोध) उठवी (जागृत करी. उलूकाच्या दुष्ट भाषणानें धर्मादिक पांडवांचीं मनें क्रोधानें भरून गेलीं.) [हा कोप] भीमयोधमनीं [भीमवीराच्या मनांत] होताचि (पूर्वींपासूनच जागृत झालेला होताच. उलूकाच्या भाषणानें भीमाचे मनांत क्रोध उत्पन्न झाला असें नाहीं तर तो पूर्वींपासूनच क्रोधानें कढत होता. भीमाचा कोप उलूकाच्या भाषणानें अधिक प्रज्वलित व्हावयाचा

काय म्हणे [1]कल्पांतीं [2]रुद्रालिकनयनदहन, 'यो [3]धमनी ?' ॥ १८
[4]आला कोप जन्हि तन्हि न सोडिति सहज क्षमेसि सुरसिक ते, ।
येते, तरि यांपाशीं यांच्या सुगुणांसि कां न सुर सिकते ? ॥ १९

---

होता असें नाहीं, भीमाच्या कोपास कांहीं उत्तेजक कारणाची गरज होती असें नाहीं. उलूक येण्याच्या पूर्वींच भीमाचें मन क्रोधानें परिपूर्ण व्यापिलें होतें.) [यास दृष्टांत असा.] रुद्रालिकनयनदहन (रुद्र+अलिक+नयन+दहन=शंकर+कपाळ, ललाट+नेत्र+अग्नि=शंकराच्या मस्तकावरील नेत्रांतील अग्नि, रुद्राच्या तृतीय नेत्रसंबंधी अग्नि) कल्पांतीं (प्रलयसमयीं) 'धमनी यो' (धमनी=पुकणी, यो=येवो=फुंकणी येऊं द्या म्हणजे मग मी प्रज्वलित होईन, मला पेटण्यास फुंकणीनें वारा घातला पाहिजे) असें म्हणे काय? (असें म्हणतो काय, असें म्हणत बसतो काय? असें म्हणत फुंकणीची वाट पाहत बसतो काय? अर्थात् तो हरविषमलोचनाग्नि असें म्हणत नाहीं, तो प्रलयसमयीं पराकाष्ठेचा प्रज्वलित होऊन विश्व दग्ध करण्यास सिद्ध असतो, धमनीची वाट पाहत नसतो, भीमाचा कोपही रुद्राच्या कोपासारखा सिद्ध आणि प्रथमपासून प्रज्वलितच होता–असें तात्पर्य). [येथें भीम व रुद्र, भीमयोधमन व अलिकनयनदहन, खलवाक् आणि धमनी यांचा धर्मामध्यें बिंबप्रतिबिंबभाव असून दोन्ही वाक्यें स्वतंत्र आहेत, यास्तव हा **दृष्टांत** अलंकार जाणावा. द्वितीयार्धांत प्रश्न केला आहे त्याचें उत्तर पूर्वसिद्ध, अपेक्षित व ठराविक असेंच आहे म्हणून हा **प्रश्नालंकार** होय. बोलणारा प्रश्न विचारतो, पण त्याला त्या प्रश्नाचें उत्तर माहीत असून त्याजविषयीं त्याचा निश्चय अगोदरच झाला असतो अशा स्थळीं हा अलंकार होतो. याला इंग्रेजींत Erotesis असें म्हणतात. या अलंकाराला साहित्यशास्त्रवेत्ते फारसें महत्व देत नाहींत.

१. कल्पाच्या शेवटीं, प्रलयकाळीं. [कल्प=प्रलय अथवा ब्रह्मदेवाचें अहोरात्र; ४३२००००००० इतकीं सौरमानाचीं वर्षें.] २. शिवाच्या ललाटनेत्रावरील वन्हि. ३. फुंकणी. ४. जन्हि कोप (त्या पांडवांस) आला तन्हि ते सुरसिक सहज क्षमेसि न सोडिति. [शिकून सुगुण जर] येते, तरि सुर (देव) यांपाशीं सुगुणांसि कां न शिकते ?–असा अन्वय. त्या वेळीं जरी पांडवांला कोप आला तरी ते सुरसिक (रसज्ञ–सारासारविचारज्ञ पांडव) सहज क्षमेसि (आपल्या स्वाभाविक शांतीला–आपल्या नैसर्गिक सहनशीलतेला) न सोडिति (त्यांनीं आपला शांत स्वभाव टाकिला नाहीं,) त्यांनीं आपल्या नैसर्गिक (उपजत) शांतीचा त्याग केला नाहीं. [त्यांच्या शांतीचें आणि इतर सुगुणांचें वर्णन करून उपजत गुण शिक्षणानें म्हणजे शिकल्यानें येत नसतात असें प्रतिपादीत होत्साता कवि म्हणतो.] येते (सुगुण शिकून येत असते) तरि (तर) सुर (देव) यांपाशीं (या पांडवांपाशीं) यांच्या सुगुणांसि (या पांडवांच्या उत्तम गुणांला) कां न शिकते ? (कां शिकले नसते ? अर्थात् देव शिकले असते. जे उपजत सुगुण आहेत ते शिकल्यानें प्राप्त होण्यासारखे असते तर देव पांडवांशीं ते सुगुण खचित शिकले असते, अवश्यमेव शिकते. पांडवांचे सुगुण प्रयत्नसाध्य नव्हते-असा मथितार्थ.)

तेव्हां [1]भीम हरिकडे पाहे नेत्रेंकरूनि [2]शोणाभें, ।
बहुधा देवहि भ्याला, [3]त्याचें वाटेल मग न कोणा [4]भें? ॥ २०
देव [5]म्हणे, '[6]शकुनिसुता! जा, म्हण त्यालाहि, ऐक [7]फटकाळा! ।
जागविला पुच्छीं [8]त्वां देउनि [9]पद बहु [10]संपूर्वफट [11]काळा. ॥ २१
वांचाया ब्रह्मांडाबाहिर जाऊनि जरि रहासील, ।
[12]मत्प्रापित अर्जुनरथ [13]निजकर्मविपाकसा पहासील.' ॥ २२
[14]मारुति म्हणे, 'उलूका! हें कुरुकुळ बुडविलें तुझ्या [15]तातें, ।
यास्तवचि बुध न घेती संबंधीं सर्वथा [16]कुजातातें. ॥ २३
म्हण त्यासि [17]मत्प्रतापज्वलनासि बळेंचि लाव [18]कच पेट, ।
साहेल काय [19]हरिची गज, गरुडाचीहि [20]लावक, [21]चपेट? ॥ २४
आतांचि [22]पडोनि गळां रड, मग [23]समरक्रतूत्तमीं न रडें, ।
[24]दुःशासनरुरुचें [25]क्षतज [26]प्राशिन, पिळुनि, [27]सिंहें मी, नरडें. ॥ २५

---

१. अध्याय १६२ श्लो० ४ पहा. २. शोण+आभा=रक्त+कांति=रक्तवर्ण अशा (नेत्रें.) ३. देव (कृष्ण) सुद्धां भ्याला, मग इतरांची काय कथा?–असा अर्थ. त्याचें (त्या भीमाचें) कोणा (कोणा पुरुषाला) भें (भय) न वाटेल? (सर्वांला भय वाटेल–असा अर्थ. येथें **काव्यार्थापत्ति** अलंकार झाला आहे.) ४. भीति. ५. अध्याय १६२ श्लो० ५-६ पहा. ६. हे कैतव्या! ७. हे दुष्टा! ८. त्वां (दुर्योधनानें). ९. पुच्छीं पद देणें=पायानें (सापाचें) पुच्छ ताडणें, सापाच्या पुच्छावर पाय देऊन त्याला खवळणें. १०. 'स' हें अक्षर पूर्वी ज्याच्या असा फट=सफट=फणासहित. ११. सर्पा. १२. मीं पोंचविलेला, मीं आणिलेला. (ज्या अर्जुनाच्या रथाचा मीं अशस्त्रपाणि कृष्ण सारथि आहें असा अर्जुनरथ.) १३. आपल्या कर्माचा विपाक (परिणाम) असा. १४. भीम. १५. बापानें (शकुनिनें). १६. कुजात=नीच कुलांत उत्पन्न झालेला. १७. माझ्या प्रतापाग्नीला. [हे उलूका!] त्यासि (त्या दुर्योधनाला) म्हण (सांग कीं) [हे दुर्योधना!] मत्प्रतापज्वलनासि बळेंचि कच (केश–आपली लंव–अर्थात् निजशरीर) लाव (स्पर्शू दे) [आणि] पेट (प्रज्वलित हो, जळून जा; माझ्या प्रतापरूप अग्नींत आपण होऊनच केस लाव आणि स्वशरीर जाळून ये–असें दुर्योधनास सांग जा, माझ्या प्रतापरूप अग्नींत जळून भस्म हो.) १८. केश. १९. सिंहाची. येथें हरि (भीम) गज (दुर्योधन) गरुड (भीम) आणि लावक (दुर्योधन) यांत बिंबप्रतिबिंबभाव आहे म्हणून हा **दृष्टांत** अलंकार समजावा. २०. लावपक्षी. २१. चपराक. २२. गळां पडणें=विनंति करणें, आर्जव करणें, शरण येणें. २३. युद्धयज्ञोत्तमीं. २४. दुःशासनरूप रुरुमृगाचें. २५. रक्त. २६. अध्याय १६२ श्लो० २७ पहा. **भट्टनारायण**विरचित **'वेणीसंहार'** नामक नाटकांत भीमाची उक्ति आहे:—'मथ्नामि कौरवशतं समरे न कोपात् दुःशासनस्य रुधिरं न पिबाम्युरस्तः । संचूर्णयामि गदया न सुयोधनोरू संधिं करोतु

आधीं वधीन [१]अधमा! अनुज तुझे; मग तुला [२]गदाघातें, ।
होइल मद्यश लोकीं तुझिया, [३]कुरुकुळमहागदा! [४]घातें. ॥ २६
धर्मासमक्ष ठेविन, तुज पाडुनि, तव शिरीं स्वपद डावें, ।
न चुकेल हें, परि तुवां मात्र [५]रणमख त्यजूनि, न दडावें.' ॥ २७
जिष्णु म्हणे, 'आर्या! [६]हर म्हणतिल साक्षात् तुजप्रति ज्ञाती, ।
जी [७]दुष्करा महेंद्रा केवळ सुकरा तुज प्रतिज्ञा ती. ॥ २८
शकुनिसुता! सांगाया [८]त्याला माझ्याहि या निरोपा पी, ।
उदकें भेंडा तैसा [९]याच्या श्रवणेंचि तो [१०]विरो पापी. ॥ २९
[११]केवळ मूर्ख अधम तूं ऐसें कळलें तुझ्याचि [१२]संदेशें, ।
कीं योजिला [१३]परबळें [१४]अस्मत्परिभव तुवां [१५]सुमंदेशें. ॥ ३०
[१६]यावरुनि गमे अशनहि निजजठर भरावयासि, मंदेशें, ।

---

भवतां नृपतिः पणेन ॥' [अंक १ श्लो० १५ गोडबोलेप्रकाशित पुस्तक–पृ० ७.] २७. येथें **रूपक** अलंकार झाला आहे.

१. हे नीचा! दुर्योधना! २. गदा+आघातें=गदा+प्रहारानें. ३. कुरुकुळाला मोठ्या रोगासारिख्या दुर्योधना. ४. मरणानें, वधानें. ५. रणरूप यज्ञ. ६. शंकर. ७. तडीस नेण्यास कठिण. ८. त्या दुर्योधनाला. ९. या माझ्या निरोपाच्या. या उत्तरार्धांत **उपमा** अलंकार झाला आहे. १०. तो पापी (तो अधम दुष्ट दुर्योधन) विरो (विरघळून जावो). ११. हा अर्जुनाचा दुर्योधनाला निरोप आहे. (आर्या ३०-३७.) १२. निरोपानें. १३. दुसऱ्याच्या बळानें. १४. आमचा पराभव. १५. मूर्खशिरोमणीनें. (अध्याय १६३ श्लो० ४-५ यांत दुसऱ्याच्या बळावर शत्रूंशीं लढणारा योद्धा 'पुरुषाधम' आणि 'कापुरुष' होय असें सांगितलें आहे.) १६. यावरुनि (दुसऱ्याच्या सामर्थ्यावर भरंवसा ठेवून आमचा पराभव करून जय मिळण्याची आशा धरतोस यावरून) [असें] गमे (मला वाटतें) [कीं] निज जठर भरावयासि (आपलें पोट भरण्यासाठीं) त्वां मंदेशें (त्वां मंदाच्या ईशानें=मूर्खांच्या शिरोमणीनें, त्वां अत्यंत मूढ दुर्योधनानें) परमुखें (दुसऱ्याचे तोंडानें) अशनहि (भोजन सुद्धां) करिजेल (केलें जाईल) कीं (कारण) जेंवि (जसे) [जनांहीं] शें (शेंकडों) धंदे (भोजनव्यतिरिक्त इतर व्यापार) करिजेताति (केले जातात) यावरून तूं इतका महामूर्ख दिसतोस कीं लोक ज्याप्रमाणें इतरांकरवीं शेंकडों कामें करवितात त्याप्रमाणें तूं दुसऱ्याच्या मुखानें जेवण देखील जेवशील. इतर धंदे (कामें) दुसऱ्याच्या द्वारें होण्यासारखे असतात, पण भोजन दुसऱ्याच्या मुखानें होण्यासारखें नाहीं, पण हा असंबंध तुला मूर्खाला कोठून कळणार? तूं परमुखें भोजन करावयास सिद्ध होणार असा महामूर्ख आहेस. येथें परमुखें अशन करून निजजठर भरण्याच्या संभवाचा असंबंध असतां, संबंध कल्पिला आहे म्हणून हा **संबंधातिशयोक्ति** नामक अलंकार जाणावा. ही असंबंधीं संबंध कल्पिणारी **अति-**

त्वां करिजेल परमुखें, कीं करिजेताति जेंवि[1] धंदे[2] शें. ॥ ३१
कैवार तुझा घेउनि आम्हांवरि शस्त्र धरुनि [3]यो जीर्न[4], ।
सोडुनि घृणा[5], तृणावरि[6] दवसे[7], शर, नमन करुनि, योजीन. ॥ ३२
[8]भीष्मासूतें म्हणतिल मच्छर, 'दुष्टाकडे[9] नका राहूं;' ।
गुरुसहि[10] सुखें म्हणावें, करितां विहितीं हितीं नकारा, हूं. ॥ ३३
होउंत[11] सहाय तुज जे **रामा शक्रा** सहाय कपि नाकी[12], ।
**कुरुगुरु भीष्म द्रोण**हि, किंबहुना लोकनायक[13] **पिनाकी**[14]. ॥ ३४

---

**शयोक्ति** आहे. असंबंधीं (अयोगीं) संबंधाची (योगाची) कल्पना करणें याला **संबंधातिशयोक्ति** म्हणतात. '**संबंधातिशयोक्तिः** स्यादयोगे योगकल्पनम् । सौधाग्राणि पुरस्यास्य स्पृशंति विधुमंडलम्. ॥ [कुवलयानंद]. याचीं अन्य उदाहरणें:—(१) जो अंबरीं उफळतां खुर लागलाहे, तो चंद्रमा निजतनूवर डागलाहे। जो या यशास्तव कसें धवलत्व नेघे, शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे. ॥ ८ ॥ [रघुनाथपंडित—नलोपाख्यान], (२) किंबहुना बहु शोणितपूरीं योधबळ वाहवी राया; । तेव्हां सुरर्षि वदले, 'सद्यश यो धवलवाहवी-राया ॥.' [द्रोणपर्व—अ० १४ गी० १९], (३) श्रीरामें हा रथ मज दिधला, यावरुनि पार्थ मारीन; । तद्रक्षणासि अंतक आला, तरि मी तयासि वारीन. ॥ [कर्णपर्व—अ० २५ गी० १४.] येथें पहिल्या उदाहरणांत घोड्याच्या खुराचा व चंद्रावरील डागाचा संबंध नसतांही संबंध कल्पिला आहे. दुसऱ्या व तिसऱ्या उदाहरणांत अशीच असंबंधाची कल्पना केली आहे. १७. 'गमे' हें पद असलें म्हणजे बहुधा **उत्प्रेक्षा** होते, तें पद आल्हादकत्वाचें पोषक नाहीं म्हणून येथें उत्प्रेक्षा झाली नाहीं.

१. 'जेंवि' हें पद **उपमा**वाचक आहे खरें, पण त्यांत आल्हादकत्व नाहीं म्हणून उपमालंकार नाहीं. अलंकार होण्यास मनास कांहीं चमत्कार वाटला पाहिजे अशी रचना असली पाहिजे. २. एकशत. ३. येवो. ४. वृद्ध. (भीष्म.) ५. कृपा, दया. ६. गवतावर जसा वणवा तशाप्रकारें. [अध्याय १६३ श्लो० ७-८ व श्लो० १२-१९.] ७. दावाग्नीसे. ८. भीष्म+असूतें=भीष्माच्या प्राणातें. ९. दुर्योधनाकडे. १०. विहितीं हितीं [गुरुनें] नकारा करितां, गुरुसहि सुखें 'हूं' म्हणावें—असा अन्वय. विहितीं (उचित, योग्य अशा) हितीं (कल्याणाविषयीं, मित्राविषयीं) [गुरुनें जर] नकारा केलें तर त्या गुरुला सुद्धां 'हूं' असें निषेधसूचक अथवा प्रतीकारदर्शक किंवा धिक्कारसूचक वचन बोलावें. गुरुनें योग्य कामाविषयीं आपली असंमति दाखविण्यास अथवा योग्य काम असून तें करूं नये असें म्हटल्यास, 'आपण असें कां म्हणतां?' म्हणून त्याला खुशाल पुसावें आणि त्याच्या नकाराविषयीं तिरस्कार दाखवावा. ११. रामा (रामचंद्राला) जे कपि सहाय [होते, व] शक्रा (इंद्राला) जे नाकी (स्वर्गवासी देव) सहाय [होते] ते तुज सहाय होउत—असा अन्वय. १२. स्वर्गस्थ. १३. लोकपति आठ लोकपाल. १४. शंकर. येथें **संबंधातिश-**

होतिल भग्न मजपुढें जेंवि रविपुढें बलीहि [1]मंदेह, ।
[2]धर्माश्रित [3]जय पावे, न [4]अधर्माश्रित न यांत संदेह. ॥ ३५
[5]जो दुखविला जिहीं त्या वि[6]करांघ्रिहि साप मानवां चावे, ।
मग कैसे भीमाचे रिपु [7]कृतहासापमान वांचावे ? ॥ ३६
पापडशा भीमगदाघातें चुरतील तव [8]चमूढाला, ।
रक्षिल पळहि न तुज जरि धरिलें [9]पविचेंहि कवच मूढाला.' ॥ ३७
धर्म [11]म्हणे, 'शकुनिसुता ! माझाहि निरोप सांग त्यातें, गा ! ।

---

**योक्ति** आहे. दुर्योधनाचें रक्षण करण्यासाठीं कपि देव लोकपाल शंकर इत्यादिकांचा साहाय्य करण्याच्या क्रियेशीं असंबंध असतां संबंधाची कल्पना केली आहे म्हणून ही असंबंधीं संबंधाची कल्पना करणारी **संबंधातिशयोक्ति** होय.

१. दैत्य. **मंदेह**–या नांवाचे साडेतीन कोटी राक्षस सकाळीं व संध्याकाळीं सूर्याचा ग्रास करण्याकरितां उत्पन्न होत असतात. त्यांचा नाश करण्याकरितां गायत्रीमंत्र म्हणून सूर्यास अर्घ्यें देण्याचा संप्रदाय आहे. गायत्रीमंत्रानें तयार केलेलें पाणी वज्ररूप होऊन त्या राक्षसांचा नाश करितें असा समज होता. 'तिस्रः कोट्योऽर्धकोटी च **मंदेहा** नाम राक्षसाः । उदयंतं सहस्रांशुमतियुध्यंति ते सदा ॥ गायत्र्या चाभिमंत्र्योर्ध्वं जलं त्रिःसंध्ययोः क्षिपेत् । तेन शाम्यंति ते दैत्या वज्रभूतेन वारिणा ॥ **मंदेहान्**युध्यतः क्रूरान्निःक्षिपेत्तेष्वथांजलिम् । × × एवं त्रिवारमावृत्य दग्धस्तां**नसुरान्**द्विजः ॥' सदर **मंदेहांचा** उल्लेख संस्कृत काव्यांतून अनेक ठिकाणीं आढळतो. उदाहरणार्थ–नैषधीयचरित–सर्ग १७ श्लोक ९४ (पृ० ७४२); सर्ग १९ श्लोक ४१ (पृ० ८५७) पहा. २. धर्माश्रित=(१)उत्तम मार्गाचा आश्रय करणारा; (२)युधिष्ठिराचा आश्रित. येथें 'धर्म' शब्द श्लिष्ट मानावा. ३. 'जय पावे' हीं पदें दोन वाक्यांस सुप्रकाशित करतात म्हणून **'दीपक'** अलंकार होय. ४. या उत्तरार्धात विशेष विधानावरून सामान्य विधान केलें आहे. विशिष्ट गोष्ट सांगून तिला बळकटी आणण्यासाठीं सामान्य नियम दाखल केला असतां **'अर्थांतरन्यास'** अलंकार होतो. येथेंही तसेंच प्रतिपादन आहे म्हणून **अर्थांतरन्यास** झाला. ५. जिहीं (ज्या मानवांनीं) जो साप दुखविला त्या मानवां [तो साप] विकरांघ्रिहि (करपदरहित असला तरी देखील) चावे (डसतो)–असा अन्वय. ६. हस्तचरणशून्यही. ७. केला उपहास व अपमान ज्यांनीं (ते रिपु). ८. चमूरूप ढाला. 'चमूढाला' हा समास चिंतनीय आहे. ९. पविचेंहि कवच [त्वां] धरिलें जरि [तरि] तुज मूढाला पळ हि न रक्षिल–असा अन्वय. तूं पविकवच जरी ल्यालास तरी तें तुला मूर्खाला कधींही बचावणार नाहीं. येथें पविचें कवच रक्षण करण्यास अत्यंत समर्थ असें कारण असतां, रक्षणरूप कार्याची अनुपपत्ति वर्णिली आहे म्हणून हा **विशेषोक्ति** अलंकार समजावा. १०. वज्राचें. ११. अध्याय १६३ श्लो० २४-३० पहा.

१शुचिकवितें निंदिसि, तरि कळत ३अमेध्यांत २.गत्यातें ३गा. ॥ ३८
४मज सर्व सुज्ञ म्हणती, 'जरिहि तुझें शील साधु, वत्सा! हें ।
दंडीं खळांसि, न च्छळ दत्तात्रेयादि साधुवत् साहें. ॥ ३९
५मज सांगुनि धाडावी ऐसी हे ओतु६ची कथा नीचा! ।
हें वाटलें रुईचा वदनीं बहु ओतु चीक थानीच्या. ॥ ४०
सोडूनि हरिजनाची स्तुति, निंदा करिसि कां मरायास? ।

---

१. शुचिकवितें निंदिसि (शुद्ध आचरण ज्यांचें अशा ज्ञात्या पुरुषांची निंदा करतोस, ज्या अर्थीं तूं शुद्ध आणि शहाणे अशांची निंदा करतोस) तरि (त्या अर्थीं) कळत (समजून उमजून) अमेध्यांत रांगत्यातें (अमंगलांत वागणारा जो त्याला, समजून उमजून अमंगल पदार्थांत लोळणारा जो पापी नीच पुरुष त्याला) गा (स्तव, स्तवन कर, वर्णन कर) [तूं जर चांगल्या वस्तूला वाईट म्हणतोस—निंदितोस, तर वाईट वस्तूला तूं खुशाल चांगली म्हण, तूं अमेध्यालाच चांगलें म्हण, यापेक्षां तुला मूर्खाला दुसरें काय सांगावें? ज्यापेक्षां तुझें वर्तन उलटें दिसतें त्यापेक्षां तुला असेंच सांगितलें पाहिजे—असा भावार्थ.] २. अपवित्रांत रांगणारा जो त्याला. ३. गा, स्तुति कर. ४. [मी जरी शांतिप्रिय आहें आणि शांति मुख्य समजतों, तरी युद्धास प्रवृत्त झालों आहें. याचें कारण असें आहे असें धर्म सांगतो.] सर्व सुज्ञ मज म्हणती (सकल ज्ञाते लोक मला सांगतात) [कीं, हे] वत्सा! (धर्मा!) तुझें हें शील साधु जरिहि [आहे] (शांति हें जरी तुझें व्रत आहे, शांतिप्रिय आणि क्षमाप्रिय असा जरी तुझा स्वभाव उत्तम आहे) [तरी] खळांसि दंडीं (दुष्टांस शासन कर, दुष्टांचें पारिपत्य कर—दुष्टांचा नाश केल्यानें जगतावर उपकार होतील हा भाव) दत्तात्रेयादि साधुवत् छळ न साहें (दत्तात्रेयादि साधूंप्रमाणें छळ सोसून स्वस्थ राहूं नकोस, दुष्टांनीं केलेला छळ साधूप्रमाणें सोसून राहूं नकोस, दत्तात्रेयादि साधु त्रिशूल, परशु इत्यादि आयुधें धारण करून दुष्टांचा निःपात करतात, तसा तूं दुष्टकृत छळ न सोसतां त्यांचा नाश कर—असा भाव.) ५. [हे] नीचा! (दुष्टा! दुर्योधना!) ऐशी (उलूकानें सांगितलेली) हे ओतुची कथा (ही बोक्याची गोष्ट, ही मार्जाराची कथा, ही वैडालव्रतसंबंधिनी कथा—अध्याय १६२ श्लोक ५२) मज (धर्माला) सांगुनि धाडावी? (ही मार्जाराची कथा तूं मला सांगून धाडावी हें चांगलें काय? थानीच्या वदनीं रुईचा बहु चीक ओतु [असें] हें वाटलें—असा अन्वय. दुधाचे स्थानीं रुईच्या चिकाची योजना कोणी दुष्ट करतो असें हें (दुर्योधनाचें कृत्य) वाटलें. तान्ह्या आंगावरच्या मुलाच्या तोंडांत रुईचा पुष्कळसा चीक दुधाऐवजीं घालावा असें हें तुझें दुष्ट कृत्य वाटलें. येथें तान्ह्या बालकाचा दृष्टांत अनुपद्रवकारकत्वासाठीं घेतला आहे. तान्ह्या मुलाच्या तोंडांत रुईचा चीक घालण्याची योजना दुष्ट दुर्योधन करीत आहे तर खुशाल करो. त्याला ह्या दुष्ट कृत्याचा परिणाम भोगावा लागेल. ६. मार्जाराची. ७. बालकाच्या. ८. हरिभक्तांची, कृष्णदासांची. (आम्ही जे हरिसेवक त्यांची.)

आयु हरी सन्निंदा[1], हा योग्य नव्हेचि काम[2] रायास. ॥ ४१
लंघिसि मज सिंहाला[3] मरणार्थ अरे! सुयोधना! कीशा[4]! ।
जिंकूं जातां उरतिल, पुरतिल मानव सुयोध नाकीशा[5]? ॥ ४२
चुकलास रे! सुयोधन राजा! भिववुनि हरीस[6] चुकलास[7], ।
भुंकलास[8] कसा मंदा! श्वा[9]! कीं तूं [10]जीवनास मुकलास. ॥ ४३
येणें[11] हातीं धरिलें प्रणता कोणा न दे वरा यवस[12]? ।
[13]स्तोत्या कोणा न म्हणे स्वर्गी होऊनि देवराय वस[14]? ॥ ४४
जी न[15]हुषगति तुझीही गति तीच, धरूं नकोचि संदेहा, ।
धिक्! धिक्! कु[16]संगतें त्वां केला श्रित[17]सर्वघात [18]मंदें हा!' ॥ ४५
[19]नकुळसहदेवसात्यकिपांचाळविराटराजसंदेश, ।
नेउनि उलूक सांगे ऐके सावज्ञ[20] तोहि मंदेशें[21]. ॥ ४६
'इकडे[22] तिकडे[23] किति रथ अतिरथ सांगा' असा धुनीजाला[24], ।

---

१. सत्+निंदा=साधु+निंदा. साधुनिंदा ही निंदकाचें आयु (जीवित) हरी (हरण करते). २. मनोरथ, इच्छा. ३. येथें **रूपक** अलंकार योजिला आहे. ४. मर्कटा. ५. नाकी+ईशा=देव+स्वामीला=देवेंद्रास. ६. कृष्णा, (पक्षीं) सिंहाला. ७. येथें 'चुकलास' या पदाची द्विरुक्ति केली आहे तिचा अर्थ अवधारणा अथवा दृढता समजावा. कोणतीही गोष्ट आग्रहपूर्वक सांगावयाची असली म्हणजे क्रियापदाची द्विरुक्ति करतात. या गीतींतील वर्णयोजना ही मनोहर आणि लक्षणीय आहे. ८. भोंकलास. ९. कुत्र्या! १०. तुझ्या भोंकण्याचा परिणाम प्राणहानिप्रद झाला असें समज. ११. येणें (कृष्णानें) हातीं धरिलें (हातांत धरिलेलें) यवस (तृण–गवत) ही कोणा प्रणता (शरणागताला वरा न दे? गवताची काडी देखील सर्व शरणागतांला वर देण्यास समर्थ आहे असा भाव १२. तृण. १३. स्तवन करणाऱ्याला. १४. वास कर. १५. नहुष राजा अगस्त्यमुनिशापानें साप होऊन पदच्युत झाला, अशीच अवस्था तुझीही होईल–असें सांगण्याचें तात्पर्य. [नहुषकथा–मोरोपंत–वनपर्व–अध्याय ६ गीति २-३१ पहा.] १६. दुष्ट संगतीनें. १७. श्रितांचा (आश्रितांचा) सर्व घात. १८. मूर्खें. १९. नकुल, सहदेव, पांचाल राजा (द्रुपद) विराट, शिखंडी, धृष्टद्युम्न इत्यादिकांनीं दुर्योधनास पाठविलेल्या निरोपाचें वर्णन मूळांत आहे. [अ० १६३ श्लो० ३६-४७.] आम्ही दास आहों अथवा अदास आहों याचा प्रत्यय रणभूमीवर येईल असा द्रुपदविराटांचा निरोप, मी भीष्मास मारीन व मी द्रोणास मारीन असा यथानुक्रम शिखंडी व धृष्टद्युम्न यांचा निरोप होता. २०. अवज्ञापूर्वक. २१. मंद+ईश=मूर्ख+राजा=मूर्खांचा राजा (दुर्योधन). येथें 'उलूकदूतागमनपर्व' संपलें. २२. आमच्याकडे. (कौरवांकडे.) २३. पांडवांकडे. २४. भीष्माला.

प्रश्न करी तो [1]राजा, [2]कुमति सिकविली असाधुनीं ज्याला. ॥ ४७
भीष्म म्हणे, 'कुरुराजा! [3]सानुजहि [4]रथांत तूं उदार सदा, ।
वांछितसां युद्धाला, तृषित जसे इच्छिती [5]उदा [6]रसदा. ॥ ४८
ठावें असेचि तुजला, माझें मज न स्वरूप कथवे गा! ।
गरुड सवेग न कथिल, [9]कथिल [8]समस्तान्यपत्ररथवेगा. ॥ ४९
अतिरथ कृप कृतवर्मा बाल्हिक मद्रेश शल्य जाणावे, ।
द्विगुणरथ [10]जयद्रथ, रथ [11]शकुनि तुझ्या हें मनांत बाणावे. ॥ ५०
[12]द्रौणी द्रोणचि; देवहि म्हणतिल, याचें करूनि अप्रिय, '[13]हा!' ।
परि न [14]महारथ न रथहि कीं आयुष्काम जीवितप्रिय हा. ॥ ५१

---

१. दुर्योधन. आपली व पांडवांची रथसंख्या किती आहे ती सांगा, असा सुयोधनानें भीष्माला प्रश्न केला. [अ० १६५ श्लो० १५.] येथें 'रथातिरथसंख्यानपर्वा'ला आरंभ होतो. २. दुष्टबुद्धि. हें **पर्यायोक्ता**चें उदाहरण जाणावें. ३. बंधुयुक्तहि. ४. रथी योद्ध्यांत, ज्यांना रथी अशी संज्ञा आहे त्यांत तूं उदार आहेस. [तूं व तुझे बंधु हे महारथ नव्हत. अ० १६५ श्लो० १९ टीका पहा.] ५. उदकास. ६. रस (गोडी) देणाऱ्या=गोड अशा उदकाला. या उत्तरार्धांत **प्रतिवस्तूपमा** अलंकार झाला आहे. ७. या गीतीच्या पूर्वार्धांत भीष्मानें आपलें असंख्येयत्व सूचित केलें आहे. [अ० १६५ श्लोक २४ यांत असेंच वर्णन आहे.] ८. समस्त+अन्य+पत्ररथ+वेगा=सकल+इतर+पक्षी+वेगाला=इतर सर्व पक्ष्यांच्या वेगास. [पत्ररथ=पक्षी. 'पतत्रिपत्रिपतगपतत्पत्ररथांडजा' इत्यमरः. पत्रं रथ इव यस्य स पत्ररथः.] ९. अध्याय १६५ श्लोक २५-२६ पहा. १०. जयद्रथ द्विरथ होय. ११. शकुनि एकरथ होय. [अ० १६७ श्लो० १.] १२. द्रौणी (अश्वत्थामा हा) द्रोणच होय. याचें (द्रौणीचें) अप्रिय (अनिष्ट, अकल्याण) करूनि (केलें असतां, देवहि (देव देखील) 'हा!' (हाय! हाय!) [असें] म्हणतील (दुःखोद्गार काढतील). परि [असा हा अश्वत्थामा पराक्रमी आहे परंतु] (याची गणना) रथ किंवा महारथ यांत होत नाहीं. [कारण यांच्यांत एक मोठा दोष आहे] हा आयुष्काम [व]जीवितप्रिय असा आहे. [अध्याय १६७ श्लो०३-११.] १३.हाय!.१४. महारथी—रथांत राहून युद्ध करणाऱ्या वीरांचे महारथ, अतिरथ, रथ आणि अर्धरथ असे चार वर्ग मानले आहेत. त्यांची व्याख्या अशी:—'एको दशसहस्राणि योधयेद्यस्तु धन्विनाम् । शस्त्रशास्त्रप्रवीणश्च महारथ इति स्मृतः ॥ अमितान्योधयेद्यस्तु संप्रोक्तोऽतिरथस्तु सः । रथस्त्वेकेन यो योद्धा तन्नूनोऽर्धरथः स्मृतः ॥.' याचा भावार्थः—जो शास्त्रविद्येमध्यें प्रवीण असून एकटा दहा हजार धनुर्धर वीरांशीं युद्ध करतो त्यास 'महारथ' असें म्हणतात. जो अगणित धनुर्धारी वीरांशीं युद्ध करतो त्यास 'अतिरथ' असें नांव आहे. जो एकट्या वीराशीं लढतो तो 'रथ' आणि जो त्याहून कमी तो 'अर्धरथ.' यांसच महारथी, अतिरथी, रथी आणि अर्धरथी असें म्हणतात.

[1]रथयूथपयूथांचा यूथपति **द्रोण** हा महातेजा; ।
करिल असें कर्म रणीं, भ्रमतिल [2]लोकेशही पहाते ज्या. ॥ ९२
मारिल सुरासुरांसहि, न धरीलचि हा समर्थ विप्र भया, ।
होतील द्वादशही [3]आदित्य प्रेक्षितांचि वि[4]प्रभ या. ॥ ९३
समरीं ऐरावतही [5]शोणितपूरीं [6]न्हात [7]वाहेल, ।
[8]परि परमप्रिय **अर्जुन** त्यावरि याचा न[9]हात [10]वाहेल. ॥ ९४

---

१. रथ+यूथ+प+यूथांचा=रथ+समूह+पालक, पति+समुदायांचा=रथसमूहाचे नायकांचा समुदाय त्यांचा (यूथपति). मूळांत ही 'रथयूथपयूथानां यूथपो' असें वर्णन आहे. [अध्याय १६७ श्लो० १२·१४.] २. लोकपाल. ३. आदित्य बारा आहेत. (श्लोक ४४.) 'आदित्या द्वादश प्रोक्ता विश्वेदेवा दश स्मृताः । वसवश्चाष्टसंख्याताः षट्त्रिंशत्तुषिता मताः ॥ आभास्वराश्चतुःषष्टिर्वाताः पञ्चाशदूनकाः । महाराजिकनामानो द्वे शते विंशतिस्तथा ॥ साध्या द्वादश विख्याता रुद्राश्चैकादश स्मृताः ॥' [श्रीभानुजिदीक्षितकृत अमरकोषव्याख्या–पृ० ८.] बारा आदित्यांचीं नांवें अशीं आढळतातः–(१) शुक्र, विष्णु, अर्यमा, धाता, त्वष्टा, पूषा, विश्वावसु, मित्र, वरुण, अंश, भग, अतितेज. (सूर्यवंशावळी.) (२) विवस्वान्, अर्यमा, पूषा, त्वष्टा, सविता, भग, धाता, विधाता, वरुण, मित्र, शक्र, उरुक्रम. (भागवत.) (३) मित्र, रवि, सूर्य, खग, भानु, पूषा, हिरण्यगर्भ, मरीचि, आदित्य, सविता, अर्क, भास्कर. ४. कांतिरहित, निस्तेज. ५. रक्तपूरांत. ६. स्नान करीत. ७. वाहून जाईल. ८. या गीतीच्या पूर्वार्धात **अतिशयोक्ति** नामक अलंकार झाला आहे. द्रोणानें मारलेल्या योद्ध्यांच्या शोणितपूरांत (रक्ताच्या पूरामध्यें) ऐरावत (इंद्राचा गज देखील) वाहून जाईल–अशी असंबंधीं संबंधाची कल्पना करणारी ही '**असंबंधातिशयोक्ति**' आहे. ऐरावतही रक्ताच्या पूरांत वाहतील मग इतरांची काय कथा–असा गर्भितार्थ आहे म्हणून येथें '**काव्यार्थापत्तिध्वनि**' अलंकार मानावा. दोन्हीं अर्धें मिळून म्हणजे या गीतींत **विशेषोक्ति** अलंकार आहे. द्रोणाचा पराक्रम मोठा आहे परंतु तो अर्जुनावर बाण टाकून त्याचा पराभव करणार नाहीं असें वर्णन आहे. येथें द्रोणाचा मोठा पराक्रम (शोणितपुरीं ऐरावताचें वाहणें) हें कारण उपस्थित असतांही अर्जुनाचा पराभव (अर्जुनावर हात वाहणें) या कार्याची अनुत्पत्ति दाखविली आहे यास्तव ही **विशेषोक्ति** होय. कार्यानुत्पत्ति होण्यास अर्जुनाविषयीं परमप्रियत्व हें निमित्त दाखविलें आहे म्हणून ही **उक्तनिमित्ता विशेषोक्ति** झाली. अनुक्तनिमित्ता, उक्तनिमित्ता आणि अचिंत्यनिमित्ता असे विशेषोक्तीचे तीन प्रकार सांगितले आहे. यांत रागातिशयाची प्रतीति आहे. [काव्यप्रदीप–पृ० ४१२; रसगंगाधर–पृ० ४३७ पहा.] 'परमप्रिय' हें हेतुगर्भ विशेषण आहे म्हणून हा **परिकर** नामक अलंकारही समजावा. ९. हात वाहणें ही लोक अपवादाची अनुकृति आहे म्हणून हा '**लोकोक्ति**' अलंकार मानल्यास चालेल. १०. उठेल.

[1]भिडले [2]भगदत्तविजय [3]शस्त्रक्षतशुद्धकाय हे [4]मागें, ।
[5]गमले तैं करिजे तें [6]विंध्यासीं युद्ध काय हे[7]मागें ? ॥ ५५
[8]शक्रें या [9]स्वसख्याला पूर्वीं प्रार्थूनि पार्थ भेटविला, ।
याचा प्रताप जैसा [10]लयवातानें [11]लयाग्नि पेटविला. ॥ ५६
[12]ज्याच्या [13]बळें तुवां त्या [14]सत्पुरुषाशीं विरोध हा केला, ।
न वळसि, बरें नव्हे हें, या ऐशा आमुच्याहि [15]हाकेला. ॥ ५७
[16]सहजकवचकुंडलबलहीन [17]गुरुब्रह्मशापपविदग्ध, ।

---

१. लढले. २. भगदत्त=प्राग्ज्योतिषाधिप भौमासुराचा पुत्र. विजय=अर्जुन. राजसूययज्ञ केला तेव्हां अर्जुन उत्तरदिशा जिंकीत जात असतां याजकडे आला होता. तेव्हां भगदत्त व अर्जुन यांचें आठ दिवस घोर युद्ध झालें. हा मोठा गजयुद्धकुशल होता, पण अर्जुनाच्या मारानें जर्जर झाला. पुढें यानें युक्तीनें अर्जुनाचें मन वश केलें. 'इंद्र माझा सखा आहे, तूं तर इंद्राचा पुत्र, तेव्हां तूं माझाही पुत्र, यास्तव तुझें इष्ट काय करावें तें मला सांग, मी करण्यास सिद्ध आहें.' असें सविनय सांगून अर्जुनाच्या मागणीप्रमाणें पुष्कळ द्रव्य दिलें आणि अशा रीतीनें यानें अर्जुनाला मार्गस्थ केलें—अशी कथा आहे. [सभापर्व—अ० २६.] इंद्राच्या मध्यस्थीनें या उभयतांची मैत्री झाली असेंही वर्णन आहे. [अ० १६७ श्लो ३५-३८.] ३. शस्त्र+क्षत+शुद्ध+काय=आयुध+जखमी झालेले+पवित्र, निर्मल+शरीर=शस्त्राघातांनीं क्षतयुक्त झाले शुद्ध देह ज्यांचे (असे भगदत्तविजय). ४. पूर्व प्रसंगीं. राजसूययज्ञार्थ केलेल्या दिग्विजयाच्या प्रसंगीं. ५. 'गमले' व 'काय' या पदांच्या सामर्थ्यानें **उत्प्रेक्षा** अलंकार झाला आहे. ६. विंध्याचल पर्वतासीं. ७. मेरूनें. ८. इंद्रानें. ९. भगदत्ताला. १०. प्रलयकालचे वायूनें. ११. प्रलयाग्नि, कल्पांतवन्हि. १२. ज्या कर्णाच्या. १३. बळावर भरंवसा ठेवून, सामर्थ्याचा विश्वास बाळगून. १४. कृष्णाशीं. १५. हाकेला वळणें=हाकेला अनुसरणें, आमच्या म्हणण्याप्रमाणें करणें. १६. सहज+कवच+कुंडल+बल+हीन=उपजत झालेलीं+कवच+कुंडल+सामर्थ्य, तेज+वियुक्त=सहज कवच व कुंडलें यांच्या सामर्थ्यानें विरहित. [जोंपर्यंत कवचकुंडलयुक्त कर्ण असेल तोंपर्यंत तो संग्रामांत अवध्य राहील असा त्या कवचकुंडलांचा प्रभाव होता. इंद्रानें कर्णापाशीं त्याच्या आंगचीं कुंडलें व कवच यांची याचना केली व कर्णानें तीं आनंदानें त्याला दिलीं—अशी कथा आहे. काव्यसंग्रहग्रंथमाला—मोरोपंत—वनपर्व—अध्याय १४ पृ० २१२-२१८.] १७. गुरु (परशुराम) ब्रह्म (ब्राह्मण अग्निहोत्री द्विज)+शाप (अभिशाप)+पवि (वज्र)+दग्ध (हत, भस्मीभूत)=परशुरामाचा अभिशाप आणि अग्निहोत्री द्विजाचा अभिशाप यांनीं दग्ध झालेला. [कर्ण महेंद्रपर्वतावर भार्गवरामापाशीं धनुर्वेदाचा अभ्यास करीत होता. एका प्रसंगीं त्यानें एका तपस्विवर द्विजाच्या धेनूच्या वत्सास हरिण समजून चुकून बाणानें मारिलें, तेव्हां त्यानें कर्णाला शाप दिला, तो असाः— 'घे पदरांत फळातें पाप्या ! या वत्सरलहानीच्या। विफल असो स्पर्धेनें ज्याकरितां करिसि

अतिरथ नव्हे, रथ नव्हे, हा केवळ अर्धरथचि अविदग्ध. ॥ ९८
वधिल विजयशर अमरा वज्रमय प्रोच्चगगनयानींच्या, ।

---

यत्न हा नीचा! ॥ ज्यातें मारिन म्हणसी दुष्टा तूं वृत्र जेंवि शक्रातें। त्यासीं करितां समर, क्षिति गिळिल तुझ्या शतांगचक्रातें.॥ रथचक्रातें धरणी ग्रासिल तूं तेधवां असावध हो। वधिला असावधपणें वत्स जसा त्वां तुझा असा वध हो ॥'[मोरोपंत–शांतिपर्व–अ० २ गी० १७-१९.] कर्ण परशुरामापाशीं आपण ब्राह्मण आहों, असें ब्रह्मास्त्रप्राप्तीच्या लोभानें सांगून त्या अस्त्राचा अभ्यास करीत होता. पण कांहीं काळानें हा क्षत्रिय आहे, अशी भार्गवरामाची खात्री झाली. तेव्हां त्यानें कर्णाला शाप दिला तो असाः—'ब्रह्मास्त्र जोडिलें त्वां हा! हतभाग्यांगणीं स्वरग रुजला। सदृशासीं रण करितां वधकाळीं न स्फुरेल तें तुजला ॥ ब्रह्मास्त्रसिद्धि झाली कष्टें अब्राह्मणा जरि नरा हे। अकुलीनीं अनयज्ञीं श्रीसी चिर बहु भजे तरि न राहे ॥ अनृता आजिच जा गा! जागा आश्रमपदीं नसे तुज या। कैसा तरेल बहुमत सत्याभिध भवनदी न सेतु जया ॥ यापरि गुरु दे व्हाया शिष्यपरोत्कर्षहानि शाप वर । रामद्विजराजयशें नच पाहें म्हणुनि हा निशाप वर ॥' [मोरोपंत–शांतिपर्व–अ० २ गी० ४९-५२.] या कर्णशापाचें वर्णन श्रीमदमरसूरिविरचित **बालभारतां**त केलें आहे तें असें आहेः—'गुरुप्रसादोरुमदात्कदाचित्काचिन्मया मोहमयाशयेन। तपोवनांतर्भ्रमता हता गौस्त्रस्तो भियेवाशु वृषस्तदैव ॥ अथाकुलं कश्चन तद्धनो मां शशाप विप्रः कटुकोपकम्पः। यं जेतुमिच्छन्नसि तन्मृधे ते रथांघ्रियुग्मं गिलतु क्षमेति ॥ मया स विप्रश्चटुचातुरीभिराराध्यमानोऽपि न कोपमौज्झत्। प्रज्वालितः शैलवनेष्वदग्ध्वा जलादिसेकैर्न निवर्ततेऽग्निः ॥ [बालभारत–उद्योगपर्व–सर्ग ५ श्लो० ४५-४७.] क्रुधाभ्यधान्मामथ कोपधामव्याधामधामाक्षि दधन्मुनींद्रः। रे क्षत्रगात्र क्षतितोऽप्यकम्प्रो विप्रोऽसि न त्वं क्व नु तस्य सत्त्वम् ॥ निर्माय मायामिति कामितास्त्रविद्यानवद्या शठ ही गृहीता। महाम्बुदे व्योमनि सोममूर्तिरिवोज्ज्वलापि त्वयि निष्फलास्तु ॥ प्राप्तं त्वया ब्राह्मणमायया यद्ब्रह्मास्त्रमेतत्तदहो महाजौ। मृत्योर्दिने द्विषिहतिप्रयुक्तं विनाशमेष्यत्यकृतार्थमेव ॥ इत्यत्र तादृग्गुरुसेवयापि तापाय शापोऽजनि नास्त्रशक्तिः। अभाग्यभाजां व्यवसायकर्म महन्महत्यै विपदे प्रदिष्टम् ॥ [बालभारत–सर्ग ५ श्लो० ५४-५७]

१. अध्याय १६८ श्लो० ५-१३ पहा. २. अपंडित, महामूर्ख, विचेतन. ३. वज्रमय प्रोच्चगगनयानींच्या अमरा विजयशर वधिल, कनकमय नगहि आड येउनि या नीचा (कर्णा) न रक्षूं शकेल—असा अन्वय. वज्रमय (वज्राप्रमाणें मजबूद, अर्थात् वज्रानें बनविलेल्या अशा) प्रोच्च (उंच, अत्यंत उंच) गगनयानींच्या (आकाशांत संचार करणाऱ्या विमानांतील) अमरा (देवाला, ज्याला मृत्यु नाहीं अशा देवाला देखील) विजयशर (अर्जुनाचा बाण) वधिल (मारील, मग कर्णाला वधील यांत संशय काय?) या नीचा (या अधम कर्णाला) कनकमय नगहि (मेरुपर्वतही) [अर्जुनाच्या बाणाच्या] आड येउनि रक्षूं न शकेल (मेरुपर्वतही आड आला तरी तो रक्षण करूं शकणार नाहीं.) येथें पूर्वार्धांत **काव्यार्थापत्तिध्वनि** अलंकार समजावा आणि उत्तरार्धांत **अतिशयोक्ति** जाणावी.

रक्षूं शकेल येउनि आड कनकमयहि नग न [1]या नीचा.' ॥ ५९
स्मित करुनि '[2]एवमेतत्' द्रोण [3]म्हणे; त्या द[4]हांत [5]कुरुगुरुनीं ।
अपमान असा करितां, पाहे तो [6]वीरसिंह गुरुगुरुनी. ॥ ६०
कर्ण [7]म्हणे भीष्माला, 'रक्षूं द्यावी नि[8]जप्रभा [9]वढिला! ।
होतो ई[10]र्ष्यासूयाहंकृतिनीं प्रबळहि [11]प्रभाव ढिला. ॥ ६१
कां या [12]कुगुणें बुडविसि जें [13]म्हणति तुला भले [14]कुरूपम तें? ।
[15]काय उपाय सुरूप न व्हावाचि जगत्रयीं कुरूपमतें? ॥ ६२
जेव्हां तेव्हां करिसी [16]मत्तेजोवध दहांत [17]शांतनवा! ।
शब्देंचि कळे सुज्ञा स्वाभाविक कीं उगाचि शांत [18]नवा. ॥ ६३
[19]शब्दशरीं विंधुनि त्वां केलें काळिज पितामहा! [20]घिरडें, ।

---

[कनकमय=सुवर्णमय. नग=पर्वत. मेरुपर्वत सुवर्णरत्नमणिमय आहे अशी प्राचीन समजूत आहे.] ४. फार उंच आकाशामध्यें रहाणाऱ्या देवाला.

१. कर्णास. २. या प्रकारचें हें माझेंही असेंच मत आहे. ३. अध्याय १६८ श्लो० ८-९ पहा. ४. चारचौघांत. [पुढें गीति ६३ व ६६ पहा. मोरोपंत–शांतिपर्व–अध्याय २ गीति ८.] ५. भीष्म व द्रोण यांनीं. ६. कर्ण. ७. रागानें डोळे वटारून–प्रतोदवत् भीष्माचें वाणीनें ताडण करीत कर्ण म्हणतो. [अ० १६८ श्लो० १०-२९.] ८. आपली कांति, आपली तेजस्विता. ९. वडिला! येथें 'ड' स्थानीं 'ढ' सवर्ण समजून योजिला आहे. १०. ईर्षा (अक्षमा)+असूया+(निंदा; गुणाच्या ठायीं दोषारोप) अहंकृती=अहंकार यांनीं. ११. मोठेपणा, पराक्रम. हा येथें सामान्य नियम सांगितला आहे. हें **अर्थांतरन्यास** अलंकाराचें उदाहरण समजावें. १२.या मत्सरानें, असूयागुणानें. १३. तूं कुरुराजासारखा आहेस अशी भले (सुजन) तुझी स्तुति करतात. १४. कुरूसारखा. १५. उपाय काय? कुरूपमतें (ज्याचें रूप वाईट असतें त्याच्या मतीनें, कुरूप पुरुषाच्या मतानें) जगत्रयीं (त्रिजगतांत) सुरूप (सुंदर पुरुष) न व्हावाचि (उत्पन्न होऊं नये, ईश्वरानें उत्पन्न करूं नये. सुंदर पुरुष त्रिजगतांत उत्पन्न व्हावयाचाच नाहीं असें कुरूप पुरुषाला वाटतें, यास उपाय काय? असा हा जगताचा नियमच आहे. हे भीष्मा! तूं स्वतः हीनबल कुगुण आणि मत्सरान्वित आहेस, तेव्हां दुसरेही सर्व पुरुष तसेच होत, असें तुला वाटावयाचेंच, यांत तुझा दोष नाहीं व याला कांहीं उपाय नाहीं. याप्रमाणें कर्ण भीष्माची निंदा करीत आहे.) १६. माझा पाणउतारा, माझा मानभंग, मानखंडना, तेजोभंग, मानविध्वंस. १७. हे शांतनुसुता! (भीष्मा!) १८. कोणी पुरुष स्वाभाविक (जात्या, निसर्गतः) शांत (क्षमाशील, शांतिप्रिय) आहे किंवा उगाचि नवा (नूतन झालेला) शांत आहे हें त्याच्या शब्दांवरून चतुर पुरुषांस समजतें. १९. अध्याय १६८ श्लो० ११ पहा. २०. घिरड्यासारखें अनेकरंध्रयुक्त.

शिकविसिल तूं, शिकेलचि या कुरुपतिचा पिता महाधि रडें. ॥ ६४
मी साहतों तुझ्या या मित्रसुयोधननृपार्थ अपराधा, ।
'वृद्धांचें सोशीसा हो सुत' म्हणउनि करी सुतप राधा. ॥ ६५
राया! 'अर्धरथ' असें मज म्हणतो हा दहांत आजोबा, ।
साजो बाहुबळें यश जोडुनि याचेंचि नांव गाजो, बा! ॥ ६६
भूषार्थ वृद्धतरुवाक्कुसुमातें मर्त्यनायका! वेंचँ, ।
अतिवृद्ध पुनर्बालचि, निःसार तदुक्त नायकावेंच. ॥ ६७
मारीन पांडवां मी, आप्तांआंतुनि अनाप्त हा निवडा, ।

---

१. दुर्योधनाचा. २. बाप. (धृतराष्ट्र.) ३. महा+आधि=मोठा+मनोव्याधि=ज्याला मोठी चिंता लागली आहे तो, अतिचिंताग्रस्त. ४. अ० १६८ श्लो० १२ पहा. हे भीष्मा! तुझा हा दुर्भाषणरूप अपराध मी मित्रसुयोधनाकडे पाहून सहन करतों. ५. वृद्धांचें (वयोवृद्ध जनाचें) [दुर्भाषण, दुर्वृत्त इत्यादि) सोशीसा (सहन करील असा) सुत (पुत्र) हो (व्हावा) म्हणउनि (यास्तव) राधा माझी माता (राधा) सुतप (उत्तम तपश्चर्या) करी (संपादी) [तेव्हांच तिला मी हा असा सहनशील पुत्र झालों व म्हणूनच तुझा अपराध मी सहन करीत आहें.] येथें माझ्या मातेनें जणूं काय वृद्धांचें दुर्भाषण सोशील असा मला पुत्र होवो अशा हेतूनें मोठी तपश्चर्या केली आणि म्हणून मी असा सोशिक पुत्र झालों असा गर्भितार्थ आहे. या उत्तरार्धावर **उत्प्रेक्षाध्वनी**ची सावली पडली आहे असें मानलें तरी चालेल. ६. हे दुर्योधना! ७. शोभेसाठीं. ८. वृद्ध भीष्म हाच कोणी एक वृक्ष याची वाणी हेंच एक पुष्प यातें. ९. हे मनुजाधिपा दुर्योधना! १०. वेंचणें=निवडणें, गोळा करणें. यांत **रूपक** अलंकार आहे. ११. अतिवृद्ध [जे फार म्हातारे झाले ते] पुनः बाल (अर्भकसमान झालेले पुरुष समजावे अथवा होत). निःसार तदुक्त (त्याचें भाषण निरर्थक, गतसत्व होय). [भीष्माचें वय फार झालें त्यामुळें त्याला बुद्धिमांद्य आलें आहे, तेव्हां त्याचें भाषण ऐकण्याचें कारण नाहीं–असें सांगण्याचें तात्पर्य. जितके वृद्ध आहेत त्यांचीं भाषणें अर्थशून्य आहेत. जे अतिवृद्ध आहेत त्यांची गणना बालांत करावी. अ० १६८ श्लो० २६.] १२. न आयकावेंच. १३. आप्त (मित्र) नव्हे असा, शत्रु. १४. हा (भीष्म) अनाप्त (शत्रु आहे यास्तव) आप्तांआंतुनि (आप्तजनसमुदायांतून, हितैषी जनाच्या समुदायांतून) निवडा (हाकलून द्या). मी (कर्ण एकटा) पांडवा मारीन (पांडवांना मारण्याचें काम माझ्या हातूनच व्हावयाचें आहे). मत्तगजापासुनि आणि कुठारधरापासूनि (कुऱ्हाड हातीं धरणारा जो पुरुष त्याजपासून) वडा (वटवृक्षाला, वडाच्या वृक्षाला) हानि प्राप्त होय (हानि प्राप्त व्हावयाची, नाश व्हावयाचा) [एखाद्या वृक्षाचे नाशास भक्कम कुऱ्हाड धारण करणारा अथवा मस्त हत्ती पाहिजे, तसा पांडवरूप वृक्षास नाश करणारा मी शस्त्रास्त्रप्रवीण कर्ण आहें पण तसा भीष्म नाहीं–असें सांगण्याचें तात्पर्य आहे. 'मत्तगज' झाडांचा पाला वगैरे खातो

मत्तगजकुठारधरापासूनि प्राप्त होय हानि वडा. ॥ ६८
हा सेनापति[1] घेइल जें जें अर्जुनवधादि[2] मद्यश तें, ।
कैंचा[3] विचार? भुलतें थोरपणें मन, तसें न मद्यशतें[4]. ॥ ६९
आधीं मरेल हा, मग मारीन धनंजयास[5] मी परहा[6], ।
वृद्ध व्याकुळ होतां मांडी[7] द्यायासि यासमीप रहा.' ॥ ७०
भीष्म[8] म्हणे, 'रे! नीचा! भेद[9]भयातें मनीं जरि न धरितों, ।
आतांचि वारिजापरि[10] लीलेनें त्वच्छिरासि[11] मी हरितों. ॥ ७१
दुर्योधनप्रिय म्हणुनी वांचसि तूं, नीच[12]कुलभवा! नीचा! ।
वांचे गजमुखमूषक[13] लंघुनि पंचानना[14] भवानीच्या[15]. ॥ ७२

---

पण अखेरीस त्यांना मोडून टाकितो, म्हणून तो आप्त असूनही अनाप्त होय. कुठारधर (लांकुडतोड्या, कुऱ्हाडवाला) हा झाडाच्या लांकडाचाच दांडा कुऱ्हाडीस करतो, पण त्या दांड्याचा उपयोग झाडें तोडण्याच्या कामीं करतो म्हणून तो आप्त असूनही अनाप्त होय. याप्रमाणें येथें भीष्म आणि मत्तगज अथवा कुठारधर यांचा बिंबप्रतिबिंबभाव आहे म्हणून हा **दृष्टांत** अलंकार समजावा.

१. भीष्म हा सेनापति आहे, आणि रणांतील सर्व यश सेनापतीचें असतें, इतर योद्ध्यांला यश मिळत नाहीं, यशाचा अधिकारी सेनापति असतो. या समजुतीला अनुसरून कर्ण म्हणतो. [स० १६८ श्लो० २७-२८.] २. अर्जुनवध इत्यादिक माझें यश. ३. या रणप्रसंगीं विचार (सारासारविचार) कैंचा (कोण करतो, कोठून सुचणार). ४. शेंकडों मद्यांनीं. येथें **व्यतिरेक** नामक अलंकार झाला आहे. थोरपण आणि मद्यशत या दोहोंचें साधर्म्य 'मन भुलविणें' असून उपमेय जें थोरपण त्याची उपमान जें मद्यशत त्यावर कडी आहे असें वर्णन केलें आहे. या उदाहरणांत उपमेयाधिक्याकडे दृष्टि पोंचवून वर्णन केलें आहे. ५. अध्याय १६८ श्लोक २९ यांत असाच अभिप्राय वर्णिला आहे. ६. शत्रुहंता, मी कर्ण. ७. ज्या पुरुषाचें मरण अत्यंत समीप आलें आहे त्याला त्याच्या आप्तांनीं पुत्रांनीं मांडी मस्तक ठेवण्यासाठीं द्यावी व नंतर मरूं द्यावें असा लोकाचार प्रचलित आहे त्यास अनुसरून हें वर्णन आहे. ८. अध्याय १६८ श्लोक ३०-३८ पहा. ९. फुटाफूट होण्याचे भयाला. १०. कमलाप्रमाणें. (वारि+ज=उदक+झालेलें=उदकांत झालेलें कमळ.) ११. तुझ्या शिराला. [मला भेद करावयाचा असता तर तो करून तुझा प्राण केव्हांच घेतला असता. मला परस्परांत भेद कर्तव्य नाहीं म्हणून हे कर्णा! तूं आजपर्यंत वांचला आहेस—असा भाव.] १२. नीचकुलोत्पन्ना. १३. गजमुखाचा मूषक, गजाननाचा उंदीर. १४. सिंहाला. १५. पार्वतीच्या, मृडानीच्या. [या गीतींत **प्रतिवस्तूपमा** अलंकार झाला आहे. येथें कर्ण व गजमुखमूषक यांचा आणि भीष्म व भवानीचा पंचानन यांचा वस्तुप्रतिवस्तुभाव दोन वाक्यांत आहे व वांचणें हा साधारण धर्म आहे, तेव्हां हा **प्रतिवस्तूपमा** अलंकार होय. याला '**दृष्टांत**' मानल्यास चालेल.

गुरुसहि नाहीं भ्यालों बहुदिन करितां तशाहि समरा मी, ।
सामर्थ्य जरि पहावें तरि साक्षात् कामकालसम रामीं. ॥ ७३
केला अपूर्णकाम प्रभु मन्निधनैककाम रामहि म्या, ।
हरिल्या काशिपतिसुता, सांगों तुज काय पामरा! महिम्या? ॥ ७४
लाजविली जिंकुनि महिपति षंढस्त्री जसी तसी महि म्या, ।

---

'दृष्टांतः पुनरेतेषां सर्वेषां प्रतिबिंबनम्' ॥ ९६ ॥ काव्यप्रदीप–पृ० २०३. वरील गीतींत 'दुर्योधन,' 'कर्ण' व 'भीष्म' हे बिंबस्थानापन्न व 'गजमुख,' 'मूषक' व 'पंचानन' हे अनुक्रमें प्रतिबिंबस्थानापन्न होत. '[दुर्भाषण करून] वांचसि' व 'लंघुनि वांचे' ह्या धर्मांतही बिंबप्रतिबिंबभाव समजावा. दोन्हीं वाक्यें ही स्वतंत्र आहेत, तेव्हां येथें **दृष्टांत** मानल्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. उत्तरार्धांतील **दृष्टांत** अत्यंत उत्कृष्ट व हृदयंगम आहे. [भवानी=भव+आनी=शर्व+स्त्रीप्रत्यय=शर्वपत्नी. 'आनी' प्रत्यय पुल्लिंगात्मक नामास लागून स्त्रीलिंग नामें होतात; जसें शर्वाणी, मृडानी.]

१. परशुरामाला. २. त्या सुप्रसिद्ध अशा परशुरामाशीं झालेल्या रणाला. [काशीराजाची कन्या अंबा हिच्या निमित्त परशुराम आणि भीष्म या लोकोत्तर युद्धविद्याप्रवीण गुरुशिष्याचें युद्ध झालें, त्या प्रसंगाला अनुलक्षून ही भीष्मोक्ति आहे. मोरोपंत–उद्योगपर्व–अध्याय १३ पहा.] ३. सामर्थ्य जरि पहावें (सामर्थ्याची कसोटी जर पहावयाची आहे) तरि साक्षात् रामीं (परशुरामीं) [पहावें, कारण तो परशुराम] कामकालसम (रुद्रतुल्य, शंकरसमान, महादेवासारखा, सर्व जगतास जिंकणाऱ्या मदनाला ज्या शंकरानें भस्मीभूत केलें त्यासारखा आहे). [शस्त्राचें जर पाणी पहावयाचें असलें तर तें अत्यंत कठिण पदार्थावर चालवून पाहतात, मृदु पदार्थावर शस्त्र चालवून पाहण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तसें कर्णाचा वध करून अथवा त्याच्याशीं सामना करून त्याजवर कडी करण्यांत कांहीं पुरुषार्थ नाहीं. परशुरामाशीं युद्ध होऊन या भीष्माचें सामर्थ्य कसोटीस उतरून पूर्वींच सकल जनास सुविदित झालें आहे–असें भीष्माच्या म्हणण्याचें तात्पर्य.] ४. रुद्रतुल्य. ५. भग्नमनोरथ. ६. मत्+निधन+एक+काम=माझा वध करावा हाच आहे एकच काम (मनोरथ) ज्याचा. ७. काशिराजाच्या कन्या. [अ० १६८ श्लो० ३५.] मागें पृ० १२ टीप १३ पहा. ८. महिपति (पृथ्वीपाल राजे). [काशीपतिकन्यांचें हरण केलें त्या प्रसंगीं] जिंकुनि (पराभूत करून) षंढस्त्री (नपुंसकाची पत्नी) जशी, तशी महि (पृथ्वी) म्यां (भीष्में) लाजविली (सलज्ज केली, मी हा असा मोठा पराक्रम केला–असें तात्पर्य.) तें राहो (तें एकीकडे असो, त्या पराक्रमाचें स्वमुखानें स्तवन करणें योग्य नाहीं), [कारण] सद्रसना (सद्+रसना=साधु+जिव्हा=साधूची वाणी) आपुल्या महिम्या कसी वाखाणील? (थोर पुरुष आपल्या मुखानेंच आपल्या थोरवीचें स्तवन करीत नसतात) या गीतीच्या पूर्वार्धांत **उपमालंकार** झाला आहे. 'जशी तशी' हीं पदें साम्यबोधक आहेत. 'लाजविली' या पदानें लाजण्याचा धर्म महीवर आरोपित केला आहे, म्हणजे सचेतन पदार्थाचा धर्म अचेतन पदा-

राहो तें; वाखाणिल [१]मद्रसना आपुल्या कसी [२]महिम्या ?' ॥ ७५
[३]भूप म्हणे, 'भेद नसो, म्या हा केला तुम्हांसि [४]अंजलि हो ! ।
तुमच्या [५]प्रसादविधिचें मद्भाळीं विजय पाणिकंज लिहो. ॥ ७६
प्राप्त [६]महत्कर्म तुम्हीं दोघेहि [७]मदाप्ततम कराल [८]पणें, ।
भासाल शत्रुसेनानयनाला [९]रुद्रसम [१०]करालपणें. ॥ ७७

र्थावर (महीवर) स्थापित केला आहे, म्हणून हा **'चेतनधर्मारोपोक्ति'** (चेतनगुणोक्ति) अलंकार समजावा. उत्तरार्धांत अंतीं प्रश्न आहे म्हणून **प्रश्ना**लंकार जाणावा.

१. साधूंची जिव्हा. २. कर्णभीष्मांच्या उक्तिप्रत्युक्ति संस्मरणीय आहेत. हीं भाषणें मार्मिक, तीक्ष्ण आणि जोरदार आहेत. यांत जें सत्व आहे त्याचा मूळग्रंथांतील भाषणांत थांग सुद्धां दिसून येत नाहीं. यांतील मर्मभेदकत्व, तीव्रत्व आणि प्रखरत्व जो कोणी मूळांतील भाषणांशीं ताडून पाहील त्यास **लक्ष्मीसुतानें सत्यवतीसुता**वर कडी केली आहे असें ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं. कर्णभीष्मांचा हा वाद मोठ्या कडाक्याचा आणि जोरदार आहे. ३. धार्तराष्ट्र दुर्योधन. [अ० १६८ श्लो० ३९-४२.] ४. अंजलि करणें=हात जोडणें. ५. प्रसादरूप ब्रह्मदेवाचें. [या उत्तरार्धांत **परिणाम** नामक अलंकार झाला आहे. याचें लक्षणः–(१) **परिणामः** क्रियार्थश्चेद्विषयी विषयात्मना । प्रसन्नेन दृगब्जेन वीक्षते मदिरेक्षणा ॥ [कुवलयानंद.] (२) आरोप्यमाणस्य प्रकृतोपयोगित्वे परिणामः [अलंकारसर्वस्व–पृ० ४०.] (३) विषयी यत्र विषयात्मतयैव प्रकृते प्रकृतोपयोगी न स्वातंत्र्येण स परिणामः. [रसगंगाधर–पृष्ठ २४८.] प्रकृतस्योपयोगित्वाद्विषयात्मतया भवेत् । आरोप्यमाणो विषयी परिणामस्तदा मतः ॥ सामानाधिकरण्येन व्यधिकरणतया तथा । विषयात्मत्वमापन्नः स द्वेधा द्विविधो यथा ॥ प्रसन्नेन दृगब्जेन राधिका वीक्षते हरिम् । विधाय राधिका शश्वत्कटाक्षैः पुष्पमालिकाम् । प्रत्यग्रामर्पयामास प्रसन्नां नंदनंदन ॥ ६४ ॥ [मंदारमरंदचंपू–व्यंग्यबिंदु–पृ० १२०-१२१.] या उत्तरार्धांत 'प्रसाद' हा विषयी 'विधि' विषयात्मतेमुळें भाललेखनप्रकृतकृत्योपयोगी झाला आहे, स्वातंत्र्यानें झाला नाहीं, म्हणजे 'विधी'चें भालीं लिहिण्याचें सामर्थ्य 'प्रसादा'वर आरोपित केलें आहे म्हणून येथें **परिणामा**लंकार झाला आहे. येथें **रूपका**लंकार साहाय्यार्थ आहे, परंतु तो परिणामालंकारामुळें दाबला गेला आहे. **रूपक** आणि **परिणाम** या अलंकारांतील भेद ध्यानांत असणें अवश्य आहे. 'उपमानप्रतियोगिकाभेदो **रूपकम्** । उपमेयप्रतियोगिकाभेदो **परिणामः**.' [रसगंगाधर–पृ० २४८ नागेशभट्टकृत टीका.] ६. प्राप्त झालेलें मोठें कार्य. [अ० १६८ श्लो० ४०.] ७. मत्+आप्ततम=माझे अत्यंत आप्त–हितकर्ते. ['तम' हा तारतम्यभाव दाखविणारा प्रत्यय असून हा विशेषणाला लागल्यानें 'सर्वांत ज्यास्त' असा अर्थ होतो, जसें हिततम=सर्वांत ज्यास्त हित करणारा. पवित्रतम=सर्वांत पवित्र, पुण्यतम, कष्टतम. **जोशीकृत 'प्रौढबोध मराठी व्याकरण'** आवृत्ति दुसरी–कलम ६७३ पृ० ३३७.] ८. पणानें, प्रतिज्ञापूर्वक, खात्रीनें. ९. शंकरासारखे. १०. उग्रपणानें, विकाळपणानें.

[1]प्या स्वजनार्थ क्रोधा, जेंवि विषा [2]विश्वनायक [3]पियाला, ।
नरचि [4]विवेकें कोपा [5]वारी, वारील काय [6]कपि [7]याला? ॥ ७८
इकडिल जसी तसी मज तिकडिलहि [8]रथातिरथकथा सांगा, ।
[9]न भल्या दुरुक्ति, देती यापरि हृदयांत न व्यथा [10]सांगा.' ॥ ७९
भीष्म [11]म्हणे, 'सकलरथामाजि [12]महोदार धर्म सुतपा हो! ।
[13]तज्ज्ञामरबळहि म्हणे, '[14]इकडे क्रोधें न [15]धर्मसुत पाहो.' ॥ ८०
सर्वांरथांहुनि अधिक बाहुबळेंकरुनि भीम [16]आठपटें, ।
तत्तनुसि त्वद्भट [17]जरि गगनाची झांकितील पाठ [17]पटें. ॥ ८१

---

१. स्वकीय जनासाठीं क्रोधाचें प्राशन करा=शमन करा, कोप आंवरून धरा. २. शिव. ३. प्याला. 'पियाला' हें क्रियापदाचें रूप चिंतनीय आहे. ४. तुम्ही जर विवेकशील नर असाल तर आपल्या रागाचें निवारण करून शांतचित्त व्हाल आणि असें जर न कराल तर तुम्ही 'नर' या पदास नालायक ठराल–असा बोलण्याचा गर्भितार्थ होय. ५. निवारी. ६. वानर. ७. हें प्रश्नालंकाराचें उदाहरण समजावें. ८. कोण रथ आहे, कोणकोण अतिरथ आहेत ही कथा. ९. दुर्योधन भीष्मास म्हणतोः–दुरुक्ति (दुर्भाषणें) भल्या न (चांगलीं नव्हेत). यापरि (या दुरुक्तिप्रमाणें) सांगा (शस्त्रविशेष) हृदयांत न व्यथा देती. (सांगा शस्त्रें देखील हृदयास विद्ध करून इतकें दुःख देत नाहींत जितकें दुःख दुरुक्ति देतात. शस्त्रापेक्षांही मर्मभेदक भाषण दुःसहतर आणि दुःखतर होय. शस्त्राचा आघात पुरवेल परंतु वर्मी भाषणाचा आघात पुरवणार नाहीं. परस्परांस दुर्भाषणांनीं दुखवून आपसांत फूट होईल असें करूं नका, तर पुढील महत्कार्याकडे लक्ष देऊन शांत व्हा–असा भाव.) उत्तरार्धांत **व्यतिरेक** अलंकार झाला आहे. येथें उपमान 'सांगा' व उपमेय 'दुरुक्ति' या दोहोंचें 'हृदयांत व्यथा देणें' हें साधर्म्य दाखवून त्याचें उपमानापेक्षां उपमानांत (दुरुक्तींत) आधिक्य वर्णिलें आहे, म्हणून '**व्यतिरेक**' अलंकार समजावा. [मागें गीति ६१ उत्तरार्ध टीपा पहा.] याचीं उदाहरणें:–(१) नवपीयूषसमुद्रीं पतन चकोरींसि जरि घडे विधिनें । तदपि अमृतकरचि तया प्रिय सुख त्यां त्याचियाचि संनिधिनें. ॥ (२) मोठा शुद्धोद असो, घनाविना चातकीस तो मरुची । तैसें सगुणावांचुनि निर्गुण गोपींस लेश दे न रुची. ॥ [मोरोपंत–मंत्रभागवत]. १०. सांग म्हणून भाल्यासारखें शस्त्र आहे. ११. अध्याय १६९ श्लो० १-२६ पहा. १२. मूळांत 'रथोदार' असें पद आहे व तेंच येथें ज्यास्त शोभतें. [अ० १६९ श्लो० ३.] १३. धर्मतेजातें जाणणारें देवसैन्यही. १४. आमच्याकडे, आम्हां देवांच्या सैन्याकडे. १५. यमधर्माचा पुत्र (युधिष्ठिर). धर्मानें आमच्या सैन्याकडे पाहिलें असतां तो त्याचें दहन करील–असा भाव. १६. अष्टगुणित, अष्टगुणसंमित. [अ० १६८ श्लो० ४.] १७. जरि गगनाची पाठ पटें झांकितील [तरी] त्वद्भट तत्तनुसि [झांकितील]–असा अन्वय. जर आकाशाचें आच्छादन वस्त्रांनीं

माद्रेय[1] रथी, परि त्या तृणसम रथ पंक्ति[2] नाग[3] राऊत[4], ।
येईल तत्प्रतापज्वलदग्न्यतितप्तसागरा[5] ऊत[6]. ॥ ८२
अर्जुनसम[7] वीर नसे मागें, आतां, पुढें न व्हायाचा, ।
हा[8] वीररसौघ, नगहि न उरेल, उरेल जो लव्हायाचा[10]. ॥ ८३
होऊनि वज्रपंजर[11] रक्षितसे वासुदेव कीरा[12] या[13], ।

होईल, तर तुझे योद्धे भीमाच्या शरीरास खचितच आच्छादतील. गगन वस्त्रांनीं आच्छादिलें जाणें जसें असंभवनीय आहे, तसेंच भीमास तुझ्या योधांनीं घेरून जिंकणें असंभवनीय आहे–असें तात्पर्य. या उत्तरार्धांत एका असंभाव्य अर्थाची संभावना दुसऱ्या असंभाव्य अर्थाच्या संभावनेनें केली आहे म्हणून हा **मिथ्याध्यवसिति** नामक अलंकार होय. [मागें गीति १४ टीपा पहा–पृ० २४९.] १८. वस्त्रानें-

१. माद्रीचे पुत्र. नकुल व सहदेव हे दोघेही रथी होत. २. पायदळ. ३. हत्ती. ४. घोडेस्वार. ५. त्याच्या पराक्रमरूप प्रज्वलित अग्नीनें अतितप्त झालेल्या सागराला. ६. ऊत येईल=कढ येऊन पाणी बाहेर पडेल. माद्रेयांच्या प्रतापरूप ज्वलत् (प्रखर) अग्नीनें अतितप्त झालेल्या सागरास ऊत येईल. याप्रमाणें माद्रेयांचा प्रतापाग्नि जाज्वल्य, प्रखर, आणि उग्र आहे–असें तात्पर्य. [उद्योगपर्व–अध्याय १० गीति ९० पूर्वार्ध यांत 'ऊत' शब्द आला आहे.] ७. यांत **'असम'** नामक अलंकार झाला आहे. [**रसगंगाधरांत** याचें लक्षण असें केलें आहे. 'सर्वथैवोपमानिषेधोऽसमाख्योऽलंकारः' [रसगंगाधर–पृ० २१०.] जगन्नाथराय पंडितांनीं या अलंकाराचें उदाहरण 'प्राणाभरण' नामक स्वकाव्यांत दिलें आहे. तें पंतांच्या गीतीशीं बरेंच जुळतें आहे:–'भुवनत्रितयेऽपि मानवैः परिपूर्णे विबुधैश्च दानवैः । न भविष्यति नास्ति नाभवन्नृप! यस्ते भजते तुलास्पदम्. ॥' [श्लो० ३५.] यांतील अलंकाराला प्राचीन साहित्यशास्त्रकार **'उपमानलुप्तोपमा'** म्हणतात व आम्ही **'असम'** म्हणतों असा पंडितरायाचा शेरा आहे.] ८. अध्याय १६९ श्लो० १६-२६ पहा. ९. हा (अर्जुन) वीररसौघ [च] (हा अर्जुन मूर्तिमान् वीररसाचा प्रवाहच होय). [यापुढें] नगहि न उरेल (या वीररसप्रवाहाला नग=पर्वत, जरी आड आला तरी तो टिकावयाचा नाहीं. या प्रवाहास आड येणारा प्रतिपक्षी वीर पर्वतासारखा प्रबल असला तरी टिकावयाचा नाहीं.) जो लव्हायाचा [तो] उरेल (या प्रवाहापुढें नम्र होऊन, खालीं डोकें करून, लवून, जो असेल तो उरेल. जो लवणार नाहीं तो पर्वत कां असेना, तो उरावयाचा नाहीं.) [या अर्जुनवीरापाशीं जो कोणी नम्रभावानें वागेल त्याचा बचाव होईल आणि जो कोणी उद्धटपणानें सामना करायाला येईल त्याचा चुराडा व्हावयाचा, मग तो कसाही बलाढ्य कां असेना. 'महापूरें झाडें जाती । तेथें लव्हाळे वांचती ॥' ही शूद्रसाधुकवीची सुप्रसिद्ध उक्ति समानार्थक आहे.] १०.लव्हायाचा=लवायाचा, नम्र व्हावयाचा. ११. पिंजरा. १२. पोपटाला. १३. या अर्जुनरूप शुकाला. हें **'परंपरित रूपका'**चें उदाहरण आहे. **'साहित्यदर्पण'**कार **विश्वनाथकविराज** यांनीं **रूपकाचे**

[1]तत्संगतिहुनि त्याला बहु न यशोदा न देवकी, [2]राया ! ॥ ८४
[3]दिव्यरथ [4]दिव्यशस्त्रें [5]दिव्यकवच दिव्य[6]सूत कंसारी, ।
ज्याचें साहित्य असें, त्यावरि जाईल कोण [7]संसारी ? ॥ ८५
जाइन मी, कीं जाइल [8]गुरु, जाइल कोण [9]जिष्णुवरि तिसरा ? ।
[10]प्रतिभटहृदया [11]तच्छर तेंवि [12]सुतृषितहि न [13]पांथ [14]वरिति [15]सरा. ॥ ८६

---

तीन भेद केले आहेतः–१ परंपरित २ सांग ३ निरंग [साहित्यदर्पणकारिका–६७० पृ० २७८.] या रूपकाचे अनेक भेद इतर ग्रंथकारांनीं कल्पिले आहेत. [चित्रमीमांसा–पृ० ४४-५३.] 'दोन रूपकें परस्पर सापेक्ष असून, कवीची रूप्य व रूपक यांच्या साधर्म्याकडे दृष्टि पोंचलेली नसली, म्हणजे **'परंपरित रूपक'** झालें.' [अलंकारमीमांसा–पृ० २४.] 'तत्परंपरितं यत्तु रूपकाश्लिष्टरूपकम्' [मंदारमरंदचंपू–पृ० ११९.] येथें, जसें 'वासुदेव' व 'वज्रपंजर' यांच्यामध्यें सांगण्यासारखें साधर्म्य नाहीं, तसें 'अर्जुन' व 'कीर' यांच्यामध्येंही नाहीं. हीं दोन्हीं रूपकें केवळ परस्परांवर अवलंबून आहेत. ('यत्र चारोप एवारोपांतरस्य निमित्तं तत्परंपरितम्'–रसगंगाधर–पृ० २३४ पहा.) येथें 'वासुदेवा'वर 'वज्रपंजरा'चा आरोप व 'अर्जुना'वर 'कीरा'चा आरोप करून पहिल्याला दुसऱ्याचा रक्षणहेतु केला आहे. म्हणून **'परंपरित रूपक'** झालें आहे. याचें अन्य उदाहरण–'वंदुनि पुत्रसुहृज्जन शोकनटाच्या मनोज्ञ अजिरा या । धृतराष्ट्रासि, म्हणे 'मी संजय, व्हा सावधान अजि ! राया ! ॥' [मोरोपंत–कर्णपर्व–अ० १ गीति ५].

१. त्या अर्जुनाच्या संगतीहून त्याला (वासुदेवाला) यशोदा बहु न (श्रेष्ठ, थोर अधिक आवडती नाहीं) देवकी न [बहु] (देवकीही अधिक प्रिय नाहीं). येथें **उपमा** झाली आहे. तत्संगति उपमेय आणि यशोदा देवकी हें उपमान आहे. उपमानापेक्षां बहुत्व (श्रेष्ठत्व, बहुप्रियत्व) हा धर्म उपमेय जें तत्संगति त्याच्या ठिकाणीं सांगितला आहे, म्हणजे उपमेयाचें आधिक्य वर्णिलें आहे. तथापि येथें साम्य प्रतीयमान होतें. **केशवमिश्र**कृत **'अलंकारशेखर'** नामक ग्रंथांत म्हटलें आहे:–'न्यूनता साम्यमाधिक्यं यद्यदेवाभिधीयते । अहो काव्यस्य माहात्म्यं समतैव प्रतीयते. ॥' [अलंकारशेखर–उपमामरीचि ११–पृ० ३२.] २. हे दुर्योधना ! ३. अपूर्व रथ. (अग्नीनें संतुष्ट होऊन दिलेला रथ.) ४. माहेंद्र, रौद्र, कौबेर, याम्य, वारुण अशीं शस्त्रें. (अ० १६९ श्लो० २०-२१.) ५. अभेद्य कवच. ६. सूत=सारथि, संयंता. येथें पूर्वार्धांत **'समुच्चय'** नामक अलंकार झाला आहे. ७. मर्त्य. हें **प्रश्ना**लंकाराचें उदाहरण जाणावें. ८. द्रोणाचार्य. [अ० १६९ श्लो०२४-२५.] ९. अर्जुनावर. १०. प्रतिभट+हृदया=प्रतिपक्षी योद्धा+हृदयाला=प्रतिस्पर्धी वीराच्या हृदयाला. ११. त्या अर्जुनाचे शर. १२. फार तान लागलेला, पिपासार्त, प्यास लागलेला, पिपासु. १३. मार्गस्थ. १४. वरणें=स्वीकारणें, पसंत करणें, प्रेमानें घेणें. येथें 'वरिति' हें क्रियापद देहलीदीपन्यायानें 'तच्छर प्रतिभटहृदया वरिति' असें अर्थग्रहणासाठीं योजिलें पाहिजे. उत्तरार्धांत **व्यतिरेक** अलंकार असून त्यांत **अतिशयोक्ती**ची थोडीशी छटा आहे. १५. सरोवराला.

परि [१]आम्ही म्हातारे, राया! तो [२]श्वेतवाह तरणा रे! ।
[३]काय इतर? तरतिल [४]जलनिधिसि कसे जे [५]नदासि तरणारे? ॥ ८७
[६]दाविल किति स्थविर गुण? पिकतो तरु तरुण कीं जरठ पिकतो? ।
[७]पटु, त्यापुढें वदेसा कवण? रणवसंत आम्रह[८]रिपिक तो? ॥ ८८
सर्व महारथ पंच भ्राते जे [९]द्रौपदेय ते, ज्यांतें ।
[१०]आदर्श म्हणति पांडव दाखविल्यां [११]स्वगुणरूपतेजांतें. ॥ ८९

---

१. आम्ही द्रोण व मी भीष्म हे उभय जीर्ण झालेले आहों. [अ० १६९ श्लो० २६.] २. श्वेत+वाह=शुभ्र+अश्व=ज्याच्या रथाचे घोडे शुभ्र आहेत तो सिताश्व (अर्जुन). आम्ही शूरवीर खरे परंतु म्हातारे झालों म्हणून अर्जुन आम्हास अजेय्य होय, मग इतरांची कथा काय? ३. काय इतर? (मी आणि गुरु द्रोण या दोघांवांचून इतरांची–आम्हांवांचून इतरांची–अर्जुनावर चालून जाण्याची काय प्राज्ञा आहे? आम्ही म्हातारे झालों, तरी समुद्र तरणारे आणि इतर तरुण झाले तरी ते नद तरणारे होत.) जे नदासि तरणारे [ते] जलनिधिसि कसे तरतिल? अर्थात् ही गोष्ट त्यांस अशक्य आहे, त्यांच्यानें सागर तरून जाणें होणार नाहीं. ४. समुद्रासि. ५. नदीस. ६. [आंगांतील खरा गुण–पराक्रम–दाखविण्याचा काळ तरुणपणाच होय, म्हातारपणांत जरी कांहीं गुण दिसला तरी त्यांत फारसें सत्त्व नसणारच–असें प्रतिपादन करीत भीष्म दुर्योधनाला म्हणतो.] स्थविर (म्हातारा) गुण किति दाविल? (वृद्ध मनुष्य कितीसा पराक्रम करणार? थोडा करील–हें उत्तर.) [उदाहरणार्थ] तरु (वृक्ष) तरुण पिकतो कीं जरठ (वृद्ध) पिकतो? (वृक्षास तरुणपणीं फळें अधिक कीं म्हातारपणीं अधिक येतात? तरुण वृक्षास फळें ज्यास्त येतात कीं जरठास येतात? तरुण वृक्षास येतात–हें उत्तर). ७. [कोकिल स्वतः सुस्वर बोलणारा, आणि त्यांत वसंतऋतु प्राप्त व आम्राचा आश्रय, मग त्या कोकिलाला कोण जिंकणार–अशा आशयानें भीष्म म्हणतो.] रण हाच वसंतकाल, [त्याकालीं बहार असतां] आम्राचा (आम्ररूप) हरीचा (कृष्णाचा) [आश्रय करणारा] पिक (कोकिल) असा तो (अर्जुन होय) त्यापुढें (त्या अर्जुनापुढें) वदेसा पटु कवण? (त्यापुढें गोड भाषण करणारा पटु (निपुण, कुशल) कोण आहे? कोणी नाहीं–हें उत्तर.) यांत **रूपक** अलंकार आहे. अर्जुनाशीं समान कोणी नाहीं असें वर्णिलें आहे म्हणून **'असम'** अलंकार झाला आहे. ८. युद्धरूप वसंतामध्यें कृष्णरूप आम्रवृक्षावर अर्जुन हा कोकिळ. ९. द्रौपदीपुत्र. प्रतिविंध्य (धर्मज), सुतसोम (भीमज), श्रुतकर्मा (अर्जुनज), शतानीक (नाकुलि), श्रुतसेन (सहदेवज) असे पांच पुत्र एकेक वर्षाच्या अंतरानें झाले. (आदिपर्व–अध्याय २२१, श्लो० ७९-८६). १०. आरसा. ११. स्वगुण+रूप+तेजांतें=आपले गुण+आकृतिसौंदर्य+पराक्रमांतें=आपल्या गुणरूपतेजांतें दाखविल्यां (दाखविणाऱ्या) [अशा] ज्यांतें (ज्या द्रौपदेयांतें) पांडव (धर्मभीष्मादि पांच पांडव) आदर्श (आरसे असें) म्हणति.

रथयूथपयूथप[1] अभिमन्यु सुरासुरशताहि[2] असुगम[3] तो, ।
जो समगुण[4], पितृमातुलहृदयासि[5] बहिश्चर[6] स्वअसु[7] गमतो. ॥ ९०
सात्यकिही रथयूथपयूथप वृष्णींत तो असामान्य[8], ।
आतांत अर्जुनास श्रीकृष्णासहि नसे असा मान्य. ॥ ९१
द्रुपद विराट महारथ, आणूनि मनांत धर्म नय नातें, ।
वृद्धहि[9] करुनि पराक्रम, निववितिल रणांत धर्मनयनातें. ॥ ९२
द्रुपदसुतशिखंडी तो रथसत्तम[10] होय, पुत्र दुसरा ज्या ।
धृष्टद्युम्न[11] म्हणति तो अतिरथ[12], हें सत्य गुरुसि[13] पुस, राजा[14]!' ॥ ९३
कथुनि रथातिरथ म्हणे[15], 'सर्वांसीं[16] मी करीन युद्धातें, ।
परि न शिखंडीसी कीं बा! योग्य नव्हे मला विशुद्धातें[17].' ॥ ९४
कुरुपति[18] म्हणे[19], 'निराळा कां एकचि वीरें[20] हा निवडिला हो! ।
हरिला[21] हरिणापासुनि तसि त्यांपासुनि[22] न हानि वडिला हो[23].' ॥ ९५

---

१. अध्याय १७० श्लोक २-३ पहा. २. सुरांच्या आणि असुरांच्या (दानवांच्या) शताला देखील. ३. अप्राप्य, प्राप्त होण्यास कठिण. ४. [पार्थ आणि वासुदेव यांच्याशीं] सम आहेत गुण ज्याचे असा. ५. पितृ (अर्जुन)+मातुल (कृष्ण) यांच्या हृदयाला. ६. बाहेर फिरणारा. ७. प्राण. [बाहेर संचार करणारा प्राण.] 'बहिश्चर प्राण' हें पद **पंतांचें** आवडतें आहे. (१) 'जो द्रोणाचार्यांचा अश्वत्थामा बहिश्चर प्राण' [काव्यसंग्रहग्रंथमाला—आदिपर्व—अ० ८ गी० ५३ पृ० ५२], (२) रडत सुनीतिकडे ध्रुव जाय, तिचा तो बहिश्चर प्राण.' [मंत्र-भागवत—स्कंध ४ गीति ७२ पृ० ८८.] ८. लोकोत्तर, असाधारण. यांत **असम** अलंकार झाला आहे. [अ० १७० श्लो० ४.] ९. वयोवृद्ध असतांही क्षात्रधर्मपरायण होतसाते. [अ० १७० श्लो० ८-१०.] १०. उत्तम रथी. [अ० १७१ श्लो० १-३.] ११. 'धृष्टद्युम्न' या शब्दाचा अर्थः—धृष्ट म्ह० प्रगल्भ आणि द्युम्न म्ह० वित्त (राजांचें बलरूप धन) असा होतो. बल-शत्रूत्कर्षासहिष्णुत्व, कवचकुंडलादिकांसह जन्म, शस्त्रास्त्रशौर्य इत्यादि गुणांनीं संपन्न अस-ल्यामुळें कुमारास धृष्टद्युम्न असें नांव ठेविलें. (आदिपर्व—अ० १६७ श्लो० ५३.) १२. अ० १७१ श्लो० ४ पहा. १३. द्रोणाला. १४. हे दुर्योधना! १५. भीष्म म्हणे. [अ० १७२ श्लो० १५-२१.] १६. अर्जुन वासुदेव व अन्य मोठे मोठे शूर राजे यांशीं. १७. पवित्रातें. ब्रह्म-चारीव्रत पाळणारा असा जो मी त्या मला स्त्रीसन्मुख गमन केल्यानें दृष्टिमैथुनाचा दोष लागेल म्हणून शिखंडीसी युद्ध करणें उचित नाहीं. शिखंडीच्या पूर्वील स्त्रीभावाच्या स्मरणानें विकार उत्पन्न होऊन दोष लागेल म्हणून त्याशीं युद्ध करणें उचित नाहीं. [अ० १७२ श्लो० १९ टीका पहा] येथें 'रथातिरथसंख्यापर्व' समाप्त झालें. १८. दुर्योधन. येथें **अंबो-पाख्यानपर्वास** आरंभ होतो. १९. अ० १७३ श्लो० १-२ पहा. २०. शिखंडी. २१. सिं-हाला. २२. त्या शिखंडीपासून. २३. होवो.

[1]भीष्म म्हणे, 'म्यां कन्या हरिल्या [2]भ्रात्रर्थ [3]काशिराजाच्या, ।
[4]मुनिजनहि ज्यांसि [5]भुलला वरि दिसती सकळिका शिरा [6]ज्यांच्या. ९६
[7]बहुसंख्य [8]आडवे मज झाले **दुर्योधना**! नरवरा! जे ।
[9]क्षमले सहावया या [10]चापगुणाचाहि ते न रव राजे. ॥ ९७
बहुसंख्य भूप जिंकुनि म्यां स्वपुरा आणिल्या तिघी कन्या, ।
ज्येष्ठा **अंबा** वदली, '[11]वरिला **शाल्व**, न वरीन मी अन्या.' ॥ ९८
**शाल्वा**कडेचि ती म्यां [12]पाठविली, **अंबिका** [13]स्वभावातें, ।
**अंबालिका**हि [14]दिधली **विचित्रवीर्या** [15]शुचिस्वभावातें. ॥ ९९
**अंबेला शाल्व** म्हणे, 'जा, '[16]**गंगासूनु**चीच नवरी हो.' ।
'[17]परविजिता [18]परपूर्वा' ऐसा ठेवूनि दोष न वरी, हो! ॥ १००
'[19]**भीष्म**परिग्रह कीं तूं करितीस [20]स्वपरघात कां? [21]पावें? ।

१. शिखंडीला न मारण्याचें कारण भीष्म सांगतात. [अ० १७३ श्लो० ३-२३.] २. धाकटा बंधु विचित्रवीर्य याच्यासाठीं. ३. काशीराजाच्या तीन कन्या, यांत अंबा ज्येष्ठा, अंबिका मध्यमा आणि अंबालिका यवीयसी. ४. ज्याच्या (ज्या मुनिजनाच्या) सकळिका (सर्व) शिरा वरी (शरीरावर स्पष्ट मोकळ्या अशा) दिसती (दिसूं लागल्या) [असा अतिवृद्ध आणि क्षीणशरीर झालेला] मुनिजनही (विरक्त तपस्विसमुदायही) ज्यांसी (ज्या काशिपतिकन्यकांला) भुलला पाहून (मोहित झाला). ५. या उत्तरार्धांत 'अतिवृद्ध' म्हणण्या ऐवजीं 'वरि दिसती सकळिका शिरा ज्याच्या' असें पर्यायानें वर्णन केलें आहे म्हणून हा '**पर्यायोक्त**' अलंकार झाला. ६. मुनिजनाच्या शिरा वर दिसती. ७. बहु संख्या आहे ज्यांत असे, असंख्यात, अगणित. ८. आडवे झाले, मला अडविण्याकरितां पुढें आले. ९. समर्थ झाले. १०. धनुष्याच्या दोरीचा. ११. अ० १७४ श्लो० ५-८ पहा. १२. येथें 'पाठविली' हें क्रियापद 'देहलीदीपन्याया'नें योजिलें आहे, यास्तव हा '**दीपक**' अलंकार समजावा. १३. आपल्या भावाला. १४. 'दिधली' हें 'दे' धातूचें भूतकाळाचें रूप होय. 'दिली' ऐवजीं 'दिधली' असें रूप **पंतां**च्या काव्यांत अन्यत्रही आलेलें आहे. अशीं भूतकाळाचीं चमत्कारिक रूपें कवितेंत मात्र योजलेलीं आढळतात. जसें:—'शुक्रें बहु संतोषें दिधली जाया पित्याकडे आज्ञा.' [मोरोपंत.] १५. शुचि+स्वभावातें=विमलशीलातें, आचरणातें. ज्याचा स्वभाव शुचि आहे अशा विचित्रवीर्यातें. १६. गंगा+सूनूची=गंगानदी+पुत्राची=गंगेचा पुत्र जो भीष्म त्याची. [सूनु=पुत्र. 'आत्मजस्तनयः सूनुः सुतः पुत्रः' इत्यमरः. 'सूनुः पुत्रेऽनुजेऽर्के ना' इति मेदिनी]. १७. परानें (अन्यानें) विजिता (जिंकिलेली). १८. पूर्वीं पराची (अन्याची) झालेली. [अध्याय १७५ श्लो० ८.] १९. भीष्माचा भाग, भीष्माचा परिग्रह (पत्नी). 'पत्नीपरिजनादानमूलशापाः **परिग्रहाः**' इत्यमरः. **परिग्रहः** कलत्रे च मूलस्वीकारयोरपि । शपथे परिवारे च राहुवक्त्रस्थभास्करे ॥' इत्यजयः. २०. आपला व दुसऱ्याचा नाश. २१. प्रसन्न व्हावें.

मी [१]काय? तुजकडे मन जातां [२]जगदंतकेंहि कांपावें.' ॥ १०१
ऐसें शाल्व वदे, ही बहुत वि[३]नवितांहि, तो न मूढ वळे, ।
आठवुनि [४]जिंकिल्या मज ती कोपें जेंवि रिपुचमू [५]ढवळे. ॥ १०२
[६]वरिलाचि मनें, [७]व्हावा, परि त्या ती बायको नको [८]पतिला, ।
आला [९]तद्वदनें बहु 'याहि' असें आयकोन कोप तिला. ॥ १०३
रडतचि तपोवनाला गेली पावोनि उग्र ताप सती, ।
[१०]मजवरि दोष[११] स्थापुनि, वृत्त कथुनि, करि सखेद [१२]तापस ती. ॥ १०४
त्यांसि म्हणे, '[१३]पावेना दीन [१४]भल्याच्या पदासमीप [१५]दरा, ।
माहेर हेंच, द्या, वर हाच, पसरित्यें पदास मी[१६] पदरा. ॥ १०५
सांगा तो धर्म मला, ज्या धर्में वर्ततात संन्यासी, ।
अन्यासि [१७]प्रेक्षीना, वर्तेन सुखें वनांत [१८]वन्यासी.' ॥ १०६
ज्या आश्रमांत जातां अतितप्ताचाहि सर्व ताप सरे, ।
त्या आश्रमांत झाले तत्तापें तप्त सर्व [१९]तापस रे! ॥ १०७

---

## अध्याय तेरावा.

राजर्षि **होत्रवाहन भृगुरामाचा** सखा [२०]तिचा [२१]आजा, ।
तो [२२]पातला अकस्मात् [२३]तीर्थतपःपर जसा **भरत** राजा. ॥ १

---

१. मी तर यःकश्चित् पुरुष आहें. तुझ्याकडे जर यमाचें मन गेलें तर त्याला सुद्धां कांपरी सुटेल. २. यमानेंही. ३. अंबेची विनवणी ऐकूनही. [अ० १७५ श्लो० १०-१८.] ४. जिंकिल्या मला भीष्माला. ५. क्षुब्ध होई. ६. शाल्व मनें वरिला. ७. शाल्व पति व्हावा. ८. शाल्वाला. ९. तद्वदनें (त्या शाल्वाच्या मुखानें) याहि (जा, चालती हो, निघून जा. गच्छ गच्छ–असे शब्द मूळांत आहेत. अ० १७५ श्लो० २४.) असें (असें वचन) आयकोन (ऐकून) तिला (त्या अंबेला) बहु कोप आला. १०. मज भीष्मावर. ११. मला दोष लावून. [माझ्या या दुःस्थितीचें कारण शांतनव भीष्म, तपानें अथवा युद्धानें मी भीष्माचा सूड उगवीन, माझ्या दुःखाचा हेतु भीष्म आहे. (अ० १७५ श्लो० ३३-३४) असा दोष लावून.] १२. तपस्या करणारे मुनिजन. १३. अ० १७५ श्लो० ४१-४४ पहा. १४. सज्जनाच्या. १५. भीतीला. १६. मी [अंबा तुमच्या] पदास (चरणास पदर पसरित्यें=मी तुम्हास हात जोडल्यें, मी तुमच्या पायां पडल्यें. १७. पहाणार नाहीं. १८. वनांतील तापसीसारखी. १९. या अर्धांतील अनुप्रास श्रुतिमनोहर आहे. २०. अंबेचा. २१. मातामह. २२. पावला. [अ० १७६ श्लो० १५.] २३. तीर्थयात्रा आणि तपस्या करण्यांत निमग्न, तीर्थपरायण आणि तपस्योयुक्त असा. या चतुर्थ पादांत भरत

तो तें[1] परिसोन, तिला अंकीं[2] घेऊनियां, मुनिजनातें ।
सांगे दौहित्री[3] हे ऐसें, होऊनि साश्रु[4], निज नातें. ॥ २
अंबेसि म्हणे[5], 'वत्से! राम[6] अधिष्ठुनि[7] असे महेंद्रागा[8], ।
जा, सांग नाम माझें, त्या प्रभुसचि[9] गाँ[10], न तूं महेंद्रा[11] गा.' ॥ ३
तोंचि अकस्मात् तेथें अकृतव्रण[12] पातला[13] रहायास, ।
तो[14] सांगे, '**राम** सखा येणार उद्यां तुला पहायास.' ॥ ४
**अकृतव्रणासि अंबा** वंदुनि निज दुःख सर्वही कळवी, ।
तैसीचि[15] लोभ दावुनि सुकृताचा तद्दया तया वळवी. ॥ ५
**राम**हि दुसरे दिवशीं भेटे[16], निववूनि घे स्वकाय कवी, ।
नायक[17] वीरांचा जो त्या तो राजर्षि[18] सर्व आयकवी[19]. ॥ ६
'येती शरण तुला जे ते जन सर्वत्र संपदा[20] वरिती.' ।
ऐसें प्रार्थुनि, जोडी अंजलि[21], घालुनि तत्पदावरि[22] ती[23]. ॥ ७

---

राजाची उपमा होत्रवाहनास दिली आहे, या दोघांत तीर्थतपःपरत्व हें साम्य आहे म्हणून हा **उपमा**लंकार होय. भरतराजा प्रियव्रतवंशीय ऋषभ देवाला जयंतीच्या ठायीं झालेल्या शतपुत्रांतील ज्येष्ठ. यानें अनेक वर्षें राज्य करून अखेरीस पुलह ऋषीच्या आश्रमांत तप केलें. हा पुढें 'जडभरत' झाला. [भागवत—स्कंध ५.] याची कथा **पं**तांच्या मंत्रभागवतांत सविस्तर दिली आहे.

१. अंबेचें वृत्त. २. अ० १७६ श्लो० २० पहा. ३. कन्येची कन्या. दुहितेची दुहिता. ४. उदकपूर्ण नेत्र. ५. होत्रवाहन म्हणे. [अ० १७६ श्लो० २५-२७.] ६. जामदग्न्य राम. ७. बसवून. ८. महेंद्र पर्वतास. [महेंद्र+अगा=महेंद्र=पर्वताला.] ९. परशुरामाला. १०. गायन कर, स्तव कर. ११. इंद्राला. १२. अकृतव्रण=हा रामाचा प्रिय अनुचर. [अ० १७६ श्लो० ३५.] १३. प्रकट झाला, आला. १४. तो (अकृतव्रण) सांगे (होत्रवाहनाला म्हणे), 'राम सखा (तुझा मित्र परशुराम) तुला (होत्रवाहनाला) पहायास उद्यां येणार [आहे].' १५. तैसीच (त्याचप्रमाणें) तद्दया (तिच्याविषयीं त्याला उत्पन्न झालेली दया, अंबेचा वृत्तांत ऐकून तिजविषयीं त्याच्या हृदयांत उत्पन्न झालेली दया) सुकृताचा (पुण्याचा) लोभ दावुनि (अंबेचे मनोरथ सफळ केले असतां पुण्यलाभ होईल असा लोभ दाखवून, अंबेला साहाय्य करण्यांत पुण्यप्राप्ति आहे असें भासवून) तया (त्या अकृतव्रणाला) वळवी (अंबेकडे वळवी. अकृतव्रणाला अंबेची दया आली आणि त्याचें मन तिजकडे वळलें.) १६. होत्रवाहनाला भेटे. [अ० १७७ श्लो० १६-१७.] १७. हें रामाचें वर्णन आहे. द्विजामध्यें जे मोठमोठे पुराणप्रसिद्ध वीर झाले त्यांत भार्गवरामाची गणना अग्रगण्यत्वानें आहे. १८. होत्रवाहन. १९. अंबेचा सर्व वृत्तांत जामदग्न्याला कळवी. २०. साधुपदाला, उत्तम स्थानाला, मोक्षस्थानाला. २१. नमस्कार करी. २२. त्या परशुरामाच्या चरणावर. २३. अंबा.

**राम** म्हणे, 'वत्से! तूं आजवळा[१] पावलीस, न वनातें, ।
जें राजर्षिकडे[२] या ब्रह्मर्षिकडेहि तेंचि तव नातें[३]. ॥ ८
अश्रु पुसों दे, वांछित[४] सांग मज, अनाथसी नकोचि रडूं, ।
आम्हांसि आपणासह या दुः[५]खमहाभरें नको चिरडूं.' ॥ ९
**अंबा** म्हणे, 'असें हें[६] झालें, किति कथिल दुःख हे[७] तूतें? ।
मारावें **भीष्मा**तें या माझ्या परमदुःखहेतूतें[८]. ॥ १०
**भीष्मा**पुढें[९] करावें बळ **शाल्वें** काय? काय मत्तातें[१०]? ।
आजोबा[११]! सांजो[१२] बा! यश, मारीं त्या अतिप्रमत्तातें[१३].' ॥ ११
**राम** म्हणे[१४], 'धरिं न धनु, जरि न विनवितिल मजप्रति ज्ञाते[१५], ।
ब्राह्मणकार्यावांचुनि सोडावी कसि निजप्रतिज्ञा ते?' ॥ १२
**अंबा** वदे, 'प्रतिज्ञा शरणागतरक्षणार्थ सोडावी, ।
तुज ईश्वरासि दुष्कर काय प्रभुजी? सुकीर्ति जोडावी.' ॥ १३
**राम** म्हणे, 'वत्से! तुज **भी**ष्म नमिल, बहुमता[१६] मदाज्ञा[१७] त्यां[१८]; ।

---

१. मातामहाच्या गृहास, आर्यालयाला. २. या संजय राजाकडे (होत्रवाहनाकडे.) ३. दौहित्रीपणाचें नातें. ४. इच्छित, मनोरथ. ५. गीति ८-९ ह्या मूळांतील श्लोक २६ (अध्याय १७७) याशीं लावून पहाव्या आणि **पं**तांच्या करामतीची, मार्मिकतेची आणि सहृदयत्वाची साक्ष पटते कीं काय याचा निवाडा करावा. **पं**तांनीं आपल्या दोन गीति करुणरसानें किती तरी भरून टाकिल्या आहेत! **पं**तांनीं व्यासावर कडी केली असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं. ६. हें सर्व वृत्त. ७. हे=ही अंबा. ८. परम दुःखाला कारण अशा भीष्मातें. ९. शाल्वें भीष्मापुढें बळ काय करावें=शाल्वाचें बळ भीष्मापुढें काय चालणार? शाल्वराजाचें तेज भीष्मापुढें कायसें पडणार? मत्तातें (माझ्या बापानें—काशीपतीनें) [भीष्मापुढें बळ] काय [करावें?]=माझ्या बापानें भीष्मापुढें काय पराक्रम दाखवावा? शाल्व आणि माझा बाप हे भीष्माचें पारिपत्य करण्यास असमर्थ आहेत—असा भाव. १०. माझ्या बापानें. ११. हे पितामह जामदग्न्य! १२. हा छेकानुप्रास कर्णमधुर आहे. १३. मदोन्मत्तातें. १४. अध्याय १७८ श्लोक ४. 'न तु शस्त्रं ग्रहीष्यामि कथंचिदपि भाविनि! । ऋते नियोगाद्विप्राणामेष मे समयः कृत ॥.' १५. ज्ञाते (पंडित विप्र) मजप्रति (मजला) जरि न विनवितील (जर विनंति करणार नाहीं [तर] धनु न धरिं (तर मी हातांत धनुष्य धरणार नाहीं. विप्रांनीं विनविल्याशिवाय मी हातीं शस्त्र धरणार नाहीं). १६. अत्यंत मान्य. येथें 'कारण' हा शब्द अध्याहृत आहे आणि दोन्ही वाक्यांमध्यें कार्यकारणभाव स्वीकारला आहे, यास्तव हा **काव्यलिंग** नामक अलंकार होय. १७. माझी आज्ञा. १८. त्या भीष्माला.

लंघ्या नव्हे प्रतिज्ञा, [1]प्रतिपाल्या होय हे सदा ज्ञात्या.' ॥ १४
[2]काश्या म्हणे, '[3]वधा कीं भीष्म म्हणो 'निर्जितोऽस्मि' आजोबा ! ।
[4]माजो बाहुबळें न [5]छात्र, बहु [6]गुरुप्रताप साजो बा !' ॥ १५
[7]अकृतव्रणहि म्हणे, "[8]जी ! वर्णुत भृगुकुळगुरुप्रति ज्ञाती; ।
[9]स्मरली मज, स्मरावी स्वामींनींही [10]गुरु प्रतिज्ञा ती. ॥ १६
[11]वदलां म्यां शरणागत दंडुनि विप्रादि सर्व तारावा, ।
[12]जो सर्व क्षत्र रणीं जिंकील प्रबळ तोहि [13]मारावा ?' ॥ १७

---

१. सिद्धीसच न्यावी अशी होय. २. काशीराजाची कन्या अंबा. ३. [हे] आजोबा! वधा (भीष्माला मारा) कीं (किंवा) भीष्म निर्जितोऽस्मि [असें] म्हणो (मी जिंकिला गेलों असें तो म्हणो.) मूळांत अंबेचें भाषण असें आहे:–'निर्जितोऽस्मीति वा ब्रूयात्कुर्याद्वा वचनं तव । कृतमस्या भवेत्कार्यं कन्याया भृगुनंदन! ॥' [अ० १७८ श्लो० १०.] ४. उन्मत्त होवो. बाहुबळाचा गर्व शिष्याला न व्हावा. ५. शिष्य भीष्म. ६. गुरूचा (आचार्यांचा तुमचा–परशुरामाचा) पराक्रम. ७. परमधर्मात्मा ऋषि अकृतव्रण. [अ० १७८ श्लो० ८-१५.] ८. जी! (अजि!) ज्ञाती (ब्राह्मणज्ञाती) भृगुकुलगुरुप्रति (भृगुवंशाच्या स्वामीला, परशुरामाला) वर्णूत (स्तवोत, तो स्तवनार्ह आहे–हा भाव). भीष्मक्षत्रियवधेंकरून संतुष्ट होत्सात्या ज्ञाती तुम्हाला वर्णूत; आपली क्षत्रियवधप्रतिज्ञा पुनः एकदां शेवटास नेऊन ज्ञातीकडून शाबासकी मिळवा–असा भाव. ९. [परशुरामानें निःक्षत्रिय पृथ्वी करून शस्त्र खालीं ठेविलें आणि प्रतिज्ञा केली कीं विशेष कारणावांचून पुनः शस्त्र हातीं धरावयाचें नाहीं. ही प्रतिज्ञा (गीति १२) त्यानें अंबेला कळविली. त्या प्रतिज्ञेप्रमाणें अंबेच्या कार्यार्थ शस्त्र धरण्यास हरकत आहे असें तो म्हणाला. हें भृगुरामाचें म्हणणें चुकीचें आहे असें दाखविण्यासाठीं अकृतव्रणानें ती प्रतिज्ञा काय होती ह्याचें (गीति १७) त्याला स्मरण करून दिलें. अंबेच्या कार्यासाठीं परशुरामानें अवश्यमेव शस्त्र हातीं घेतलें पाहिजे, असें त्या प्रतिज्ञेवरून होतें.] ती गुरु प्रतिज्ञा (ती आपली मोठी प्रतिज्ञा) मज स्मरली (मला आठविली). स्वामींनींही [ती] स्मरावी (स्वामींनीं देखील तिचें स्मरण करावें). १०. महत् प्रतिज्ञा. ११. विप्रादि सर्व शरणागत [जन] [खल] दंडुनि म्यां तारावा (रक्षावा) [आणि] जो प्रबळ सर्व क्षत्र रणीं जिंकील तोहि [म्यां] मारावा–असें आपण वदलां (प्रतिज्ञा केली). १२. पंतांच्या या प्रसादसंपन्न रसाळ व सुबोध गीति वाचून त्यांच्या कृतीविषयीं आदरबुद्धि कोणाच्या मनांत उत्पन्न होणार नाहीं? पंतांच्या कवितेच्या सरसत्वाविषयीं आणि सुबोधत्वाविषयीं पुढील उतारा वाचनीय आहे म्हणून येथें वाचकांच्या सोईसाठीं देतों:—"कवीविषयींच पाहिलें तर त्याच्या ग्रंथांतही आपलें काव्य मोठें गहन आहे व तें उकलणें हें पंडितांशिवाय इतर कोणाच्यानेंही होणार नाहीं, अशा प्रकारची कोठेंही प्रौढी झोंकलेली आढळत नाहीं. स्वतःविषयींचे जे त्याचे कोठें कोठें उल्लेख आहेत, त्यांत आपल्या कृतीच्या सरसत्वाविषयींच त्यानें लिहि-

लेलें आढळतें. उलटा एके ठिकाणीं ('मंत्ररामायणा'च्या प्रस्तावनेंत) असा मात्र उल्लेख आढळतो:—'कोठें दूरान्वित पद कोठें चुकली असेल यतिमात्र । अतिमात्र दोष ऐसे न वदोत कवी समस्त गुणमात्र ॥.' जो कवि दूरान्वयाच्या योगानें वाचकांस काव्य समजतांना अडचण पडूं नये याविषयीं येवढा संकोच बाळगीत होता तो आपलें काव्य होईल तितकें दुर्बोध करण्याविषयीं झटेल कीं काय याचें अनुमान कोणासहीं सहज होणार आहे! आतां येवढें मात्र खरें आहे कीं मोरोपंताचें कवित्व केवळ द्राक्षापाकाच्याच वर्गांत येणार नाहीं. साऱ्या महाराष्ट्र कवींत त्याचें काव्य समजण्यास अमळ श्रम लागतील खरे. तरी जो वहुश्रुत आहे म्हणजे ज्यास संस्कृत शब्द वरेच माहीत असून समासांची मोडणी समजली आहे, आणि प्रस्तुत कवींची पद्धतिही ज्यास थोडीशी ठाऊक झाली आहे, त्यास म्हणजे दरएक आर्येशीं अर्थबोध होण्याकरितां थबकून राहवें लागेल असें मुळींच नाहीं. बहुतेक आर्या त्यास वाचतां वाचतां सहज उलगडतील. क्वचित् ठिकाणीं मात्र कीं, जेथें यमकामुळें प्रासामुळें वगैरे वाक्याची रचना अमळ अव्यवस्थित झाली असेल, तेथें थोडासा विचार करावा लागेल, तरी ज्याप्रमाणें सूर्याच्या आड आलेला ढग त्याच्या बिंबावरून निघाला असतां अंधार जाऊन एकदम चक्क होतें, किंवा धुराचा भपकारा वर निघून जाऊन अग्नीची ज्वाला प्रगट होते, त्याप्रमाणें वरील ठिकाणीं एकदम अर्थव्यक्ती झाली असतां मनास चमत्कार व आल्हाद होतो! तसेंच कांहीं थोड्या ठिकाणीं अर्थ खरोखरच दुर्बोधही असेल. 'नवनीतां'तही अशीं कांहीं स्थलें आहेत; तीं आमच्या वाचकांपैकीं पुष्कळांच्या लक्षांत असतीलच; पण हा दुर्बोधपणा वाचकांस मुद्दाम घोळांत पाडण्याकरितां कवीनें आणलेला असतो किंवा यमकादि रचनेमुळें झालेला असतो असें म्हणवत नाहीं. कांकीं असला प्रकार बहुतेक कवींच्या ग्रंथांत आणि त्यांतून ज्यांनीं ग्रंथरचना पुष्कळ केली त्यांच्यांत तर आढळायाचाच. प्रस्तुत कवीविषयीं असें ऐकण्यांत आहे कीं तो एका बैठकीस शंभर शंभर दीडशें दीडशें आर्या रचीत असे, व त्याच्या हातच्या पंढरपूरच्या प्रती ज्यांनीं पाहिल्या आहेत ते सांगतात कीं त्यांत एकही अक्षर कोठें खोडलेलें आढळत नाहीं. यावरून स्पष्ट दिसतें कीं कित्येक इंग्रजी कवींचा जसा प्रघात असे कीं, आपली कृती जितकी उत्कृष्ट व जितकी निर्दोष करवतां येईल तितकी झाली व शेंकडोंवेळां तिजवरून नजर व लेखणी फिरली म्हणजे मग ती बाहेर काढायाची, तसा प्रकार मोरोपंताचा नसावा. तर शेक्सपीयर, ड्रायडन् इत्यादि कवींप्रमाणें जें एकदां पहिल्या तडाक्यास लिहून टाकिलें तें टाकलें, त्यांत पुन्हा फार करून फेरफार व्हावयाचा नाहीं, ही त्याची तऱ्हा असावी. तर या कारणामुळें प्रस्तुत कवीच्या ग्रंथांत कोठें कोठें दुर्बोध स्थलें राहिलीं असावीं असें वाटतें. याखेरीज अपपाठ हेही स्थलविशेषीं अर्थभ्रम होण्यास कारणभूत होत असतील; कांकीं, इंग्लंडांत जसें आहे, व हल्लीं इकडेही चालू झालें आहे कीं छापण्याच्या सोईमुळें ग्रंथकारानेंच खुद्द तयार केलेली प्रत वाचकांस मिळते, तसा प्रकार अर्थातच दुसऱ्या जुन्या महाराष्ट्र कवींस लागू नाहीं. तेव्हां लेखपरंपरेच्या योगानें झालेल्या प्रमादाचें प्रायश्चित्त बिचाऱ्या कवींस भोगणें येतें!" [निबंधमाला—अं० ५७ पृ० १४-१७.] १३. विप्रांची आज्ञा असल्याशिवाय शस्त्रग्रहण करावयाचें नाहीं

भार्गव म्हणे, 'विसरलों होतों कीं मीहि या प्रतिज्ञाता, ।
वत्सा! तुज धन्य म्हणो आधीं, मग सर्व याप्रति ज्ञाता. ॥ १८
सामेंचि कार्य होइल जरि, तरि युद्धासि काय कारण हो! ।
न करील वचन जरि, तरि माराया भरतनायका रण हो.' ॥ १९
ऐसें योजुनि घेउनि त्या मुनिमित्रांसमेत मुलगीतें, ।
प्रस्थान शीघ्र केलें त्या राजामरमहर्षिकुलगीतें. ॥ २०
येऊनि कुरुक्षेत्रीं राहे, सांगोनि पाठवी, राजा! ।
धांवोनि भेटलों मी वेद धनुर्वेद पाठ वीरा ज्या. ॥ २१
मत्कृतपूजन घेउनि राम म्हणे, 'रे! सुरापगांगभवा! ।
भक्त्यर्पित बहु, नाहीं तरि काय असे दुराप गांग भवा? ॥ २२
गरुडें सुधा; तसी त्वां हे अंबा रण करूनि जरि हरिली, ।

---

(अ० १७८ श्लो० ४), ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांतून जो कोणी ब्राह्मणद्वेषी असेल त्याचा वध करावयाचा, शरणार्थी आणि भीतजनाचा कधींही त्याग करावयाचा नाहीं, आणि जो रणांत सकल क्षत्रियांचा पराजय करील त्याचा वध करावयाचा (अ० १७८ श्लो० १२-१५) अशी भृगुरामाची प्रतिज्ञा होती. त्याला तिची आठवण त्याचा शिष्य अकृतव्रण यानें करून दिली.

१. प्रतिज्ञेला. २. मजप्रति. ३. ज्ञाता (पंडित) याप्रति (या मज भार्गवरामाला) मग धन्य म्हणो–असा सान्वय अर्थ. ४. अध्याय १७८ श्लो० १६ पहा. ५. भीष्माला. ६. हो= होवो, होओ. [होवो किंवा होओ याबद्दल कवितेंत 'हो' असें रूप आढळतें. 'सारथि हो या समयीं एकहि वश कौरवांसि गाय न हो.' (मोरोपंत–विराटपर्व–अध्याय ३ गीति २७; काव्यसंग्रहग्रंथमाला–पृ० ६५.) अशीं उदाहरणें पुष्कळ आढळतात. जोशीकृत प्रौढबोध मराठी व्याकरण–कलम २४८ पृ० १५२-१५३.] ७. ब्रह्मवादि तापसांसह. ८. कारयेतें. ९. राजर्षि व देवर्षि यांतील थोरांच्या समुदायानें गीत अशा रामें. १०. हे दुर्योधना! [मी आलों आहें असा निरोप तिसऱ्या दिवशीं पाठविला.] ११. ज्या जामदग्न्याला. १२. सुर+आपगा+अंग+भव=गंगापुत्रा! १३. भक्तीनें अर्पित (दिलेलें) [उदक शिवाला बहु प्रिय होतें] नाहीं तरि भवा (शिवाला) गांग (गंगोदक) दुराप (प्राप्त होण्यास कठिण) असे काय? शिवापाशीं गंगा असूनही भक्तीनें दिलेलें उदक शिवाला बहु (फार प्रिय) वाटतें, त्याप्रमाणें तूं माझी भक्तिपुरःसर केलेली पूजा मला फार प्रिय आहे, भक्तीवांचून केलेली पूजा व्यर्थ होय–असा भार्गवाच्या उक्तीचा भावार्थ. १४. दुष्प्राप. १५. गंगोदक. १६. शिवाला. १७. गरुडानें आपल्या मातेला (विनतेला) कद्रूच्या दास्यांतून मुक्त करण्यासाठीं सुधाहरण केलें आणि अमृतघट कद्रूच्या अपत्यांस (सर्पांस) दिला–अशी कथा आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला–मोरोपंत–आदिपर्व–अध्याय ४ गीति ३६-१५४

तरि [१]हरिलीनमतिजनें [२]संसृतिरुचि तेंवि केंवि [३]परिहरिली ?' ॥ २३
[४]वदलों, 'सत्य, [५]भ्रात्याकरितां हरिली बळें, [६]पर 'स्वामी ।
वरिला **शाल्व**' म्हणे [७]हे, घेऊं जाणुनि कसें [८]परस्वा मी ?' ॥ २४
**राम** [९]म्हणे, '**शाल्व न घे,** मानी [१०]हरि गज परें दिला **न** वरी, ।
त्वां जिंकिली यदर्थ त्वद्भ्राता तो करू इला नवरी.' ॥ २५
मी वदलों, 'जें [११]दुष्कर सुयशस्कर सांग काज **रामा** ! तें, ।
होइल [१२]अकीर्ति, देतां कां हा [१३]उपदेश [१४]काजरा मातें ?' ॥ २६

---

पृ० २२-३१ पहा. क्षेमेंद्रविरचिता भारतमंजरी–आदिपर्व–श्लोक ९८-१४९ पृ० ९-१३. काव्यसंग्रहग्रंथमाला–मुक्तेश्वर–आदिपर्व–अध्याय ५-६ सुपर्णाख्यान पृ० ३६-५०.]

१. हरिच्या ठिकाणीं लीन (मग्न) झाली मति (बुद्धि) ज्याची अशा जनानें (त्वां भीष्मानें). २. संसाररुचि, संसाराची आवड. ३. टाकली. ४. मी (भीष्म) वदलों. ५. विचित्रवीर्यासाठीं. ६. परंतु. ['पर' या शब्दाचा अर्थ 'अन्य, शत्रु, परंतु' असा होतो:—"'परंतु' या शब्दाचे ठिकाणीं 'पर' हा शब्द समंजस लोकांचे बोलण्यांत कधींही येत नाहीं. शूद्रादिक अडाणी लोक मात्र या शब्दाचा प्रयोग करितात; व महाराष्ट्र कवींचे काव्यांतही हा शब्द आढळत नाहीं, असें जरी आहे तरी **पंतांनीं** या शब्दाचा पुष्कळ ठिकाणीं प्रयोग केलेला आढळतो."— (१) कुरुकुंजरासि गेला होता यदुसिंह तो खरा खाया । परते पर तेथूनी प्राणप्रियमित्र तोख राखाया ॥ [भीष्मपर्व], (२) श्री बुडविली महेंद्रश्रीतुल्या मज तिची नसे परवा । पर वामलोचनेच्या ऐकों न शकेंचि या विलापरवा ॥ [सभापर्व], (३) कपटादरें वळो पर पर परमेश्वर कसा वळेल हरी । कृष्णकृपामृतनिधिची अकपट विनताकडे वळे लहरी ॥ [उद्योगपर्व], (४) उत्सुक झाले होते अंकारोहार्थ पुत्र पर तो न । प्रभु घे मग मातेप्रति गेले रोदन करीत परतोन ॥ [आदिपर्व]. [निबंधमाला–अंक ५३ पृ० ३२.] ७. हे अंबा. ८. दुसऱ्याच्या धनाला, परक्याच्या वस्तूला. ९. भार्गवराम म्हणाला:—शाल्व (अभिमानी शाल्व राजा) न घे (अंबेला स्वीकारीत नाहीं) [यांत शाल्वाचा दोष कांहीं नाहीं, त्याची कृति योग्यच आहे कारण] मानी हरि (सिंह) परें (दुसऱ्यानें धरून आणून) दिला (दिलेला) गज (हत्ती) न वरी (घेत नाहीं. जसा मानी सिंह दुसऱ्यानें जिंकून दिलेल्या गजाचा स्वीकार करीत नाहीं, तसा शाल्व राजा तूं जिंकून आणलेल्या अंबेचा स्वीकार करीत नाहीं). या अर्थात **प्रतिवस्तूपमा** अलंकार झाला आहे. १०. सिंह. मानी सिंह परें दिला गज न वरी–इत्यन्वय. ११. जें करण्यास फार कठिण परंतु परिणामीं उत्तम यश देणारें असें काम असेल तें मला सांग. १२. अनुचित काम सांगितल्यानें तुमचा दुर्लौकिक होईल. १३. येथें उपदेश हाच काजरा असें मानिलें आहे म्हणून हें **रूपक** होय. [भीष्माच्या या भाषणांत उदात्तवी पुरुषाला शोभेल असाच अर्थ गुंफिला आहे. महाप्रतापी, गुरुपदलीन, सत्वधीर आणि विचारशील अशा क्षत्रियाला ही भीष्मोक्ति अत्यंत साजते. भीष्मानें आपल्या परम पूज्य गुरूची मर्यादा राखून आपलें व्रत न ढळावें या हेतूनें त्याची कानउघाडणी केली आहे.] १४. विष. (काजऱ्याचें फळ.)

राम म्हणे, 'त्वद्गुरु मी, माझें सुखपुण्यकीर्तिजनक वच, ।
गुरुवचनासचि म्हणती सर्व भले पुण्यकीर्ति जन कवच.' ॥ २७
मी बोलिलों, 'असें तों न घडेल कधीं; दयानदा! पावें; ।
गुरुनें, ज्यासि अधर्माचरण न मानें, तया न दापावें.' ॥ २८
राम म्हणे, 'होय सुखी निजगुरुचें वचन शिष्यजन करिता, ।
नातरि गुरुकुंभभवक्षोभें छात्रामृतांशुजनक रिता. ॥ २९
हे सर्वमता साक्षात् दुर्गासी सर्वकामदा, ज्ञात्या! ।

---

१. तुझा गुरु (भीष्म). [हा परशुरामापाशीं धनुर्वेद शिकला—अशी कथा आहे. "म्हणे, 'हा तुजलागीं वाढविला, । सर्वविद्येनें अलंकारिला, । नेम नेमिला त्या बोला । तुझा ओपिला तुज हस्तीं. ॥ वसिष्ठापासूनि वेदाध्ययन । सांग संपादिलें संपूर्ण, । शास्त्रविद्येंत केला निपुण । शुक्राचार्यें समर्थें. ॥ बृहस्पतीपासून मंत्रशास्त्र । लाधला हा अतिपवित्र, । गुणसंपन्न तुझा पुत्र । पितृलोकीं. ॥ भार्गवापासून धनुर्विद्या । संपूर्ण फळली या सुविद्या, । आतां पृथ्वीपाळवंद्या! । पुत्र नेईं निजगृहा. ॥' [काव्यसंग्रहग्रंथमाला—मुक्तेश्वर—आदिपर्व—अध्याय २३ ओंव्या १६३-१६६; महाभारत—उद्योगपर्व—अध्याय १७८ श्लोक ३९ पहा.] २. सुख, पुण्य आणि कीर्ति यांतें उत्पन्न करणारें. ३. ज्याची कीर्ति पुण्य (पवित्र) आहे असे भले (साधु) जन गुरुवचनालाच कवच असें म्हणतात. ४. मी अथवा माझ्या भ्रात्यानें काश्येचा स्वीकार करणें, हें माझ्या प्रतिज्ञेविरुद्ध आचरण. जिचा परित्याग केला, जिचें मन दुसऱ्यावर गुंतलें होतें अशा स्त्रीचा स्वीकार करणें. [अ० १७८ श्लो० ४३-४६.] [मूळांत व प्रस्तुतस्थळीं भीष्म व जामदग्न्य राम यांच्या उक्तिप्रयुक्ति मोठ्या पाणीदार, जाज्वल्य आणि कडाक्याच्या आहेत.] ५. दया+नदा=कृपा+निधे! ६. प्रसन्न व्हावें, मजवर रुष्ट न व्हावें. ७. [कित्येक शिष्य गुरूच्या संतोषार्थही अधर्माचरण करण्यास नाखुष असतात, अशा शिष्यांस अधर्माचरण करण्याविषयीं गुरूनें आग्रह करूं नये, त्यांत गुरूला कमीपणा येतो व इष्टहेतुही तडीस जात नाहीं—अशा भावानें, आणि कार्याकार्य न जाणणारा, गर्वानें उन्मत्त झालेला व उत्पथगामी असा गुरु जरी असला तरी तो त्यागार्ह होय, अशा भावानें भीष्म जामदग्न्यास म्हणतो] ज्यासि (ज्या शिष्याला) अधर्माचरण न मानें (मानवत नाहीं, पसंत नाहीं) तया (त्याला) न दापावें (दटावूं नये, त्याजवर रागें भरूं नये.) ८. करणारा. ९. येथें गुरु आणि कुंभभव, छात्र आणि अमृतांशुजनक यांचा अभेद वर्णिला आहे म्हणून हें **रूपक** होय. अमृतांशुजनक या सामासिक पदाचा अर्थ पर्यायानें सागर असा होतो म्हणून हें **पर्यायोक्त** समजावें. कुंभभवाच्या क्षोभानें मागें जसा अमृतांशुजनक (समुद्र) रिता पडला (आटला) तसा गुरूच्या क्षोभानें छात्र नष्ट होईल—असा भाव. १०. गुरुरूप अगस्तींच्या क्षोभानें. ११. शिष्यरूप जो चंद्रजनक (सागर) तो रिता होय. १२. [हे] ज्ञात्या! (विद्वन् भीष्मा!) हे (ही मदाज्ञा) सर्वमता (सकलांस मान्य अशी) सर्वकामदा (सकल मनोरथांस पुरविणारी, स-

लंघील खल महिषसा जो, न करिल भस्म कां मदाज्ञा त्या? ॥ ३०
झाले[1] पशुचि न वाहुनि शृंगा पुच्छा वळी[2] मुठा राजे, ।
तैसे ते न क्षितिवरि आढळले[3] न वळले कुठारा जे. ॥ ३१

---

कलमनोरथप्रदा) साक्षात् (प्रत्यक्ष, मूर्तिमती) दुर्गासी (दुर्गेसारिखी, दुर्गासमा) [होय]. जो (कोणी) महिषसा (महिषासुरासारखा) खल (दुष्टजन) [मदाज्ञा=माझी आज्ञा हीच साक्षात् दुर्गा] लंघील (अतिक्रमील, अपमानील) त्या (त्याला, त्या खलाला) [ती मदाज्ञा] भस्म कां न करील? अर्थात् त्याचें भस्म करील.) माझी आज्ञा न मानणाराचा नाश होण्यास विलंब लागणार नाहीं—असा भाव. दुर्गादेवीनें महिषासुराचा नाश केला ही कथा सुप्रसिद्ध आहे. [मोरोपंतकृत स्फुटकाव्यें—दुर्गास्तव—गीति ८, पृ० १८६.]

१. [गरीब, निर्वीर्य, दयापात्र प्राण्यास 'गौ, गाय' असें म्हणण्याचा भाषणसंप्रदाय सुप्रचलित आहे. 'गरीब रे! गरीब!' अथवा 'गाय रे! गाय!' असेंही हतवीर्य मनुष्यास उद्देशून म्हणण्याचा प्रचार आहे. हे शब्द तुच्छताव्यंजक आहेत. 'गो'शब्दानें जसा गाईचा तसा बैलाचाही बोध होतो. बैलाला 'पशु' म्हणण्याचा संप्रदाय आहे. आपण निःक्षत्रिय पृथ्वी केली त्या प्रसंगीं क्षत्रिय राजे कोणत्या प्रकारचे होते हें परशुराम येथें भीष्मास सांगत आहे.] शृंगा पुच्छा वळी मुठा न वाहुनि राजे पशुचि झाले. तैसे जे कुठारा न वळले ते [राजे] क्षितिवरि न आढळले—असा अन्वय. [त्या काळीं मजपुढें सर्व] राजे (क्षत्रिय भूप) पशुचि (गो=बैल) झाले, शृंगा (शिंग) पुच्छा (शेंपटीला) वळी (बैल इत्यादिकांचे पाठीला खोगीर इत्यादि न लागावें म्हणून उशीसारखे दोन अवयव एकत्र शिंवून जी उशी करतात तिला) [आणि] मुठा (ओझें घालण्यापूर्वी बैलाचे पाठीवर गादीसारखा एक पदार्थ ठेवतात त्याला) न वाहुनि (या पदार्थांस न धारण करून, हीं सर्व बैलांचीं जीं सूचक चिन्हें त्यांस न धारण करतांही सर्व राजे पशु (बैल) झाले.) [शिंग, शेंपुट, वळी, मूठ हीं जीं बैलाचीं चिन्हें तीं राजांला नव्हतीं इतकाच काय तो पशु आणि राजे यांमध्यें भेद होता. हीं चिन्हें पशूस असतात, पण ह्या चिन्हांशिवायच राजे पशु झाले=सर्व राजे हतवीर्य, पराजित झाले. अशा रीतीनें माझ्या कुठाराच्या ताब्यांत सर्व आले, माझ्या कुठारानें ह्या भूपपशूंला वठणीस आणिलें.] तैसे जे कुठारा न वळले (जे राजे माझ्या परशूच्या तडाक्याखालीं नम्र झाले नाहींत.) ते (राजे) क्षितिवरि (पृथ्वीवर) न आढळले (सांपडले नाहींत.) २. बैलाचे पाठीवर गोणी घालतात तेव्हां पाठीवर 'वळी' आणि 'मूठ' पाठीला इजा होऊं नये म्हणून घालतात. वळी=कापडाची गुंडाळलेली (वळलेली) गुंडी. ३. येथें मीं सर्व राजांस पराजित केलें असा अर्थ पर्यायानें दर्शविला आहे म्हणून हें **पर्यायोक्त** होय. राजे व पशु यांचा अभेद वर्णून त्यांत न्यूनाधिक्य वर्णिलें आहे म्हणून हें **न्यूनाभेदरूपक** समजावें. येथें राजांचा पशूंशीं अभेद (ऐक्य) सांगून त्यांस शृंग, पुच्छ इत्यादि नाहीं अशा प्रकारें न्यूनत्व प्रतिपादन केलें आहे. या **न्यूनाभेदरूपकाचें** लक्षण असें आहे:—'प्राग्दशातो न्यूनता चेन्न्यूनाभेदरूपकम्' [मंदारमरंदचंपू—

मज गुरुपुढें ‘[1]असें तो न घडेल कधीं’ असें कसें वदसी ? ।
असतां समर्थ [2]अघटितघटनापटु मत्कुठार हा [3]सदसी. ॥ ३२
खचसील [4]कौरवा ! तूं, कीं बहु चढला तुझा मद [5]सिगेला, ।
लंघावया [6]पहासी ? गांवाला काय रे ! मदसि गेला ? ॥ ३३
वधिले क्षिति[7]तलवर्ती क्षत्रिय म्यां [8]एकवीसदा सारे, ।
माझा प्रताप गातां [9]रुद्रभ्रम दे कवीस दासा ! रे !’ ॥ ३४
ऐसें भलतेंचि वदे वर्णावा मुख्य जो [10]गुरु गुरूनीं, ।
पाहे राम मजकडे, जेंवि [11]हरिकडे [11]हरी [12]गुरुगुरूनी. ॥ ३५

---

पृ० ११८.] याचें उदाहरण:–‘असागरोद्भवः साक्षात् सुधांशुस्ते मुखं सखि!’ पंताचें हें आर्यार्ध वाचून ‘साक्षात् पशुः शृंगविषाणहीनः’ या भर्तृहरीच्या सुप्रसिद्ध उक्तीचें स्मरण होतें. ४. कुऱ्हाडीस.

१. स्वीकार, विवाह. गीति २८ पूर्वार्ध पहा. २. न घडणारें तें घडविण्याविषयीं कुशल. ३. सत्+असि=उत्तम तरवार. ४. [हे] कौरवा! (भीष्मा!) तूं खचसील, कीं (कारण कीं) तुझा मद बहु सिगेला चढला [आहे]. [अरे! तूं मला] लंघावया पहासी ? रे! मदसि गांवाला गेला काय ?–असा अन्वय. हे कौरवा! (भीष्मा!) तूं पडसील, कारण तुझा गर्व आतां शिखरास पोंचला आहे (जो चढेल तो पडेल असा न्याय आहे.) [येथें सिगेला चढणें=शिखरास पोंचणें, अति होणें. सिग=शीग=धान्याचें माप भरतात त्या वेळीं मापावर शंक्काकार जी धान्याची भर घालितात तिला शीग असें म्हणतात. कोंकणांत धान्य मापाच्या कांठावर भरून मापण्याची चाल आहे, देशावर बहुधा मापाच्या कांठापर्यंतच धान्य भरून मापण्याचा प्रचार आहे.] तूं माझी अमर्यादा करूं पाहतोस ? अरे भीष्मा! माझी तरवार गांवाला गेली काय ! [माझी तरवार गांवाला गेली नाहीं, तर ती मजपाशीं सज्ज आहे असें समज–असा भावार्थ.] गांवाला जाणें=घरीं नसणें, जवळ नसणें, निघून जाणें, निघून नाहींसा होणें. ‘मदसि गांवाला गेला काय ?’ या पादांत सामान्य लोकप्रवादाचें अनुकरण झालें आहे म्हणून ही **‘लोकोक्ति’** समजावी. ५. मापावरची शीग. ६. येथें ‘पाहणें’ याचा अर्थ ‘इच्छिणें’ असा समजावा. ७. भूमितळावर असणारे. ८. बापाच्या आज्ञेवरून परशुरामानें एकवीस वेळ पृथ्वी निःक्षत्रिय केली–इत्यादि कथा पुराणप्रसिद्ध आहे. ९. हा राम नव्हे, शंकर आहे असा भ्रम. [आपण आपला गुरु शंकर तत्समान आहों असें जामदग्न्याच्या उक्तीचें तात्पर्य जाणावें.] १०. जो गुरु (परशुराम) गुरूंनीं (श्रेष्ठांनीं) मुख्य (प्रमुख) [असा] वर्णावा [तो परशुराम] ऐसें (गीति २९-३४ यांत वर्णिल्याप्रमाणें) भलतेंचि (स्वतःला अनुचित असें) वदे. ११. सिंहाकडे. १२. अध्याय १२ गीति ६० उत्तरार्ध पहा.

वदलों, धर्मन्यायें हा देह तपोवनांत राबावा[1], ।
त्यजुनि दुरभिमान, धरुनि शांतिसि, तारुनि जनांतरा, बावा[2]! ॥ ३६
ठाव्या आहेत मला, सांगा गोष्टी[3] यथेष्ट अन्या या, ।
तरि भय भलत्यापासुनि होइल जरि मी करीन अन्याया. ॥ ३७
वधिले क्षत्रिय[4] तेंव्हां नव्हता हा भीष्म[5] शांतनव[6] समज, ।

---

१. वसावा. २. बाबा! (हे परशुरामा! हे साधुपुरुषा!) दुरभिमान त्यजुनि, शांतिसि धरुनि, जनांतरा (इतर जनांला) तारुनि (उद्धार करून) हा देह (हा तुमचा काय) तपोवनांत राबावा (रहावा, असावा, लोकव्यवहारांत न पडावा) [असें] धर्मन्यायें [आहे] वृद्धपणीं विप्रानें कसें वागणें योग्य आहे हें भीष्म जामदग्न्याला सांगत आहे. त्यानें लढाईच्या गोष्टी सोडून पुण्यारण्यांत तपश्चर्या करावी असें सांगण्याचें तात्पर्य. येथें 'बावा' हें पद 'बाबा' ऐवजीं 'वबयोरभेदात्' या न्यायानें समजावें. 'बावा' हें पद जोग घेतलेल्या साधु पुरुषाला लावतात, त्याजवरून विशिष्ट वृत्तीचा बोध होतो. ३. तुमच्या कुठाराच्या पराक्रमाच्या कथा, तुमच्या दर्पोक्तिप्रचुर कथा. ४. 'न तदा जातवान् भीष्मः क्षत्रियो वापि मद्विधः.' [अध्याय १७८ श्लोक ६३.] ५. या पूर्वार्धांत भीष्मानें स्वतःचें नांव घेतलें आहे तें वीरत्वद्योतक आहे. ज्या वेळीं परशुरामानें क्षत्रिय वधिले त्या वेळीं शांतवन नव्हता ह्या सिद्ध गोष्टीचें विधान येथें केलें आहे असें दिसतें, म्हणून हें **विधि** नामक अलंकाराचें उदाहरण होय. असें वाटण्याचा संभव आहे, निदान तसा भास तरी होण्यासारखा आहे. पण येथें **विधि** अलंकार मानतां येत नाहीं. जेथें सिद्ध अशा गोष्टीचेंच विधान केलेलें असतें तेथें **विधि** नामक अलंकार होतो. याचें लक्षणः-(१) 'सिद्धस्यैव पदार्थस्य विधानं चेत्तदा **विधिः** । सभायां शास्त्रगोष्ठीषु विद्वान्विद्वान् भवेत्सखे ॥.' [मंदारमरंदचंपू-व्यंग्यबिंदु १० पृ० १४९.] (२) सिद्धस्यैव विधानं यत् तदाहुर्विध्यलंकृतिम् । पंचमोदंचने काले कोकिलः कोकिलो भवेत् ॥. [कुवलयानंद-१६४.] याचीं अन्य उदाहरणें:-(१) अहो जें घोडें तें घोडें आणि गाढव तें गाढव. त्यांची बरोबरी कशी होईल? (२) पहा! कसें झालें तरी रत्न तें रत्न आणि कांच ती कांच हें काय सांगावें? (३) अरे सभेंत शास्त्रवादांत जो विद्वान् तोच विद्वान्. ६. शंतनूचा पुत्र. ७. या गीतीच्या संबंधानें अथवा प्रस्तुत भीष्माच्या प्रत्युत्तरासंबंधानें आणि एकंदर पंतांच्या वाणीविषयीं पुढील उतारा अवलोकनार्ह आहे. "ज्या मयूरकवीचा 'अपूर्व टाहो' ऐकून आज शंभर वर्षें आबालवृद्ध महाराष्ट्रीय जन मान डोलवीत राहिले आहेत, ज्याच्या कवितारूप 'मदनमंजरी'नें सोलापुरस्थ फक्कड 'कविराया'च्या गळ्यांत माळ घालून त्याच्या हातचा डफ खालीं ठेविला, ज्याच्या वाणीनें परशुरामपंत गोडबोले, भास्कर दामोदर, शंकर पांडुरंग अशा [जुन्या व नव्या] मंडळीस चटका लाविला, [त्याची स्तुति करावी तेवढी थोडीच. कै० पंडितांसारख्या] रसिक व मार्मिक गृहस्थांचें प्रस्तुत कवीविषयीं काय मत असे तें आमच्या आक्षेपानेंच ६४ व्या अंकांत

[1]देवासि मागते [2]ते झाले, [3]मरणीं, करूनि [4]नवस, मज. ॥ ३८
गेलें [5]गुरुत्व तुमचें, कां हो! म्हणतां वधीन [6]अनघातें? ।
येइल [7]पदरांत कसें यश [8]धर्मन्यायनिष्ठजनघातें? ॥ ३९
सच्छिष्याला विद्या गुरु झाकायासि काय हो! शिकवी? ।
[9]पांडित्य पहा माझें, पाहोनि मला म्हणाल '[10]होशि कवी.' ॥ ४०
हांसुनि **राम** [11]म्हणे, 'रे! हितकर गुरुवचन कां न आइकसी? ।
साहेल तुझी तुजिया [12]दुःसहशोकानलासि [13]आइ कसी? ॥ ४१
**भीष्मा**! [14]मज सिंह गणी, [15]वेड्या! तूं आपणासि [16]कलभ गणीं, ।

---

पत्रद्वारें सादर केलें आहे. बी. ए. च्या परीक्षेंत एके प्रसंगीं त्यांचा पुढील प्रश्नही पाहिलेला आम्हांस आठवतो:—' What was the spirited rejoiner of Bhishma to his preceptor.' [भीष्मानें आपल्या गुरूला जें बाण्याचें उत्तर दिलें आहे तें कोणतें?] वरील उत्तर उद्योगपर्व– अ० १३ यांत आहे. त्याचें स्वरूप पुढील एका गीतीवरूनच लक्षांत येण्यासारखें आहे:—'वधिले क्षत्रिय तेव्हां नव्हता हा भीष्म शांतनव समज । देवासि मागते ते झाले भरणीं करूनि नवस मज ॥' वीररसाचे वरच्यासारखे तडाखे जे सदरील कवीच्या ग्रंथांतून जागोजाग आढळतात त्यांवरून पुढील गीतीची सार्थकता भासते:–'नायक वीरकवींचा ऐसा होईल काय अन्य कवी.'' [निबंधमाला–अ० ७२ पृ० ८.]

१. पूर्वार्धांत सांगितलेले (क्षत्रिय) तुम्हांपासून वध पावतेसमयीं तुमचा दर्पपरिहार करील अशा (परशुरामाला) मला, देवाला नवस करून मागते झाले. २. मारलेले क्षत्रिय. ३. मरणसमयीं, भार्गवाच्या हातून मृत्यु पावते समयीं देवाला नवस करून मला (परशुरामाची खोड मोडणाऱ्या क्षत्रियाला) मागते झाले म्हणून मी जन्मलों आहें. ४. मला परशुरामाला नवस करून देवापासून प्राप्त केलें आहे तेव्हां क्षत्रियांचें इष्ट कार्य सिद्धीस नेण्यास समर्थ असा मी आहें असें सांगण्याचें तात्पर्य. ज्या कार्यासाठीं मला मागून घेतलें आहे तें कार्य तडीस नेण्याचें सामर्थ्य मला दिलें आहे यामुळें नवस करण्याची सार्थकता झाली. ५. गुरुपणा, (पक्षीं) श्रेष्ठपण. ६. पापरहितातें. ७. पदरांत येणें=प्राप्त होणें, मिळणें. ८. धर्म व न्याय यांजवर ज्याची निष्ठा आहे अशा जनांच्या घातानें. येथें पूर्वार्धांत **श्लेष** आणि उत्तरार्धांत **अर्थांतरन्यास** आणि **प्रश्न** असे अलंकार आहेत. ९. धनुर्वेदनैपुण्य. १०. [हे भीष्मा!] तूं कवी (पंडित) आहेस–असें तुम्हीच माझें स्तवन कराल. 'होशि' हें रूप कवितेंत मात्र आढळतें. [जोशीकृत प्रौढबोध मराठी व्याकरण-कलम. २५८ (१) पृ० १६१.] ११. अध्याय १७८ श्लोक ६५-७१ पहा. १२. अति दुःखाग्नीस. १३. माता भागीरथी. १४. परशुरामाला. येथें राम आणि सिंह व भीष्म आणि कलभ यांत अभेद मानावयाचा आहे, म्हणून येथें **रूपका**ची छाया पडली आहे. १५. 'वेड्या' या संबोधनानें वत्सलता, उपदेश करण्याचा अधिकार, कोमलता, शिष्यानें

न रविपुढें मिरवेसे[1] चंद्रींहि, कसें असेल बल भगणीं[2]? ॥ ४२
देसिल सत्यवतीतें शोक बहुत, रडविशील [3]गंगेतें, ।
समज बरें मदूषित जें जें तेज क्षणांत भंगे तें. ॥ ४३

---

कुपथ सोडून वाटेवर यावें अशी मनाची आतुरता, कौतुकबुद्धि इत्यादि वक्त्याच्या गुणांचा बोध होतो. तसेंच व्यास हें संबोधन लाविलें आहे त्याच्या असन्मार्गावलंब, उपदेशपात्रता इत्यादि गुणांची प्रतीति होते. या विशेषणाचें मर्म जाणण्यास अंगीं बरेंच सहृदयत्व असलें पाहिजे. पंतांच्या काव्यांतील रसानुभव घेण्यास वाचकाच्या अंगीं बरीच सहृदयता असली पाहिजे, एरवीं त्यांतील मर्म कळावयाचें नाहीं. ही सहृदयता पुष्कळांच्या अंगीं असते असें नाहीं, तथापि त्यामुळें पंतांच्या काव्यांस कोणताही कमीपणा आला आहे असें नाहीं. या संबंधानें निबंधमालाकारांनीं एका ठिकाणीं जो अभिप्राय दर्शविला आहे तो फार समर्पक आहे:—"जोंपर्यंत हजारों महाराष्ट्रजनांच्या हृदयास आमच्या सरस्वतीप्रिय मयूराचा टाहो भेदून जात आहे, जोंपर्यंत त्याचा सारा पिसारा उभारलेला पाहून त्याच्या अप्रतिम वैचित्र्यानें जनसमूह चकित होऊन राहत आहे, जोंपर्यंत मेघदर्शनजनित हर्षभरांत तो नृत्य करीत असतां वाग्देवीच्या नूपुरांचा मंजुळ रव रसिकजनांस त्यांच्या कर्णांची धन्यता वाटवीत आहे, तोंपर्यंत कितीही [हृदयशून्य वाचकांचे] अभिप्राय त्यास प्रतिकूल पडले तरी त्यास तिळमात्रही धाक बाळगायास नको. एका कवीनें म्हटलें आहे:—'उदितवति द्विजराजे कस्य न हृदयं मुदं परां धत्ते। संकुचसि कमल यदयं हर हर वामो विधिर्भवतः ॥' 'चंद्राचा उदय झाला असतां कोणाचें हृदय आनंदभरानें व्याप्त होत नाहीं? पण अशा वेळींही जेव्हां तुझा संकोच होतो, तेव्हां हे कमला! तुझें दुर्दैव बलवत्तर म्हटलें पाहिजे!' याप्रमाणेंच आमच्या 'द्विजराजा'च्या वाणीचा रसानुभव घडण्यास ज्यांस दुराग्रह किंवा हृदयशून्यपणा आडवा येतो ते अत्यंत अनुकंपनीय मात्र होत!" [निबंधमाला—अ० ५४ पृ० १४.] १६. हत्तीचा छावा. [कलभ='कलभः करिशावकः' इत्यमरः.]

१. चंद्रींहि [बळ असे]. येथें परशुराम (रवि) व चंद्र (कार्तवीर्यादि वीर) आणि भीष्म व भगण यांत बिंबप्रतिबिंबभाव आहे म्हणून **दृष्टांत** अलंकार समजावा. चंद्राचें देखील सामर्थ्य नाहीं मग भगणाचें (नक्षत्रगणाचें) कोठचें? त्याची काय कथा? असा अर्थ आहे म्हणून **काव्यार्थापत्ति** अलंकार झाला आहे. उत्तरार्धात **काव्यार्थापत्ति** आणि **दृष्टांत** यांची संसृष्टि आहे. मी जो रवि (परशुराम) त्या मजपुढें मिरविण्यासारखें तेज जर चंद्राच्या ठायीं (रामचंद्र कार्तवीर्य इत्यादि क्षत्रियांच्या आंगीं) कोठून असणार? अर्थात् असावयाचें नाहीं. २. भ+गणीं=नक्षत्र+गणांत. ३. स्मरणानें, निजपराभवानें, माझ्या हातून तुझा घात झाला असतां तूं भागीरथीतें रडवशील (उभय मातांला शोकग्रस्त करशील). ४. मदानें दूषित झालेलें जें तेज (मोठेपण) असतें तें क्षण न लागतां नष्ट होतें. [हे भीष्मा! तुला गर्व आणि मद झाला आहे तेव्हां तुझ्या तेजाचा नाश एका क्षणांत होईल—असा भाव.]

हो सिद्ध, ये[1]; हरीनें[2] व्यसु[3] आला तो करेणु[4] केला, हो! ।
हो गंगेला शोकद, तोखद[5] हें तोक[6] रेणुंकेला[7] हो.' ॥ ४४
सिंधूंत नग[8] जसा कपि[9] तैसा पाहोनि गर्वनग[10] रामीं, ।
वंदुनि 'येतों'[11] ऐसें बोलुनि आलों फिरोनि नगरा[12] मी. ॥ ४५
सत्यवतीतें सांगुनि नमुनि, तदाशीप्रसाद[13] घेऊन, ।
हा[14] गुरुचें दर्शन घे, हेमंतीं[15] जेंवि[16] अधन[17] घेऊन. ॥ ४६
आम्हां गुरुशिष्यांचा अत्यंताद्भुत पहावया समर[18]; ।
आले बहु सुरराजब्रह्मर्षिसमेत[19] सर्वही अमर[20]. ॥ ४७

---

१. संग्राम करण्यासाठीं पुढें ये. २. सिंहानें. ३. प्राणरहित. ४. हत्ती. ['करेणुर्गजयोषायां स्त्रियां पुंसि मतंगजे' इति मेदिनी.] ५. संतोषप्रद. तोख (तोष) देणारें. ['ष' स्थानीं वारंवार 'ख' उच्चारतात. उषर=उखर, पुरुष=पुरुख, ओषध=ओखद, संतोष=संतोख' विष =वीख.] ६. बालक. ७. माझ्या मातेला. ८. मैनाकपर्वत. [मारुतीला विश्रांति देण्यासाठीं क्षारसागरांत मग्न झालेला मैनाकपर्वत वर आला, त्याला मारुतीनें उरानें ताडण केलें–अशी कथा आहे. (सुंदरकांड–सर्ग १ श्लोक १११-१४९.) 'घ्याया विश्राम उठे मैनाकाचळ तया उरें ताडी । मानुनि विघ्नस्तंभा स्तंबेरमसा तळीं पाडी ॥.' (रामायणें–भाग ३ आर्यारामायण–गीति १०२ पृ० १०.) तों सलिलराशिवाक्यें प्रगटे शिवदारबंधु तो, यातें । विश्राम द्यावयाला, पक्षें भेदूनि सिंधुतोयातें. ॥ वक्षःस्थळें मरुत्सुत पाडी मानूनि विघ्नशंकेला; । मैनाकासि गमे कीं, इंद्रें वज्रप्रहार हा केला. ॥ (रामायणें–भाग १ मंत्ररामायण–सुंदरकांड–गीति २-३ पृ० ७५.] ९. मारुति. १०. गर्वाचा पर्वत. ११. 'येतों' या शब्दप्रयोगावरून 'जातों' असा अर्थ निष्पन्न होतो व असा भाषणसंप्रदायही आहे. 'आम्ही जातों' ह्याबद्दल 'आम्ही येतों' असें बोलण्याचा परिपाठ सुप्ररूढ आहे. हा **विरोधिलक्षणे**चा अथवा **विपरीतलक्षणे**चा मासला होय. कुंकूं वाढलें, तांदूळ वाढले, वांगड्या इत्यादि वाढल्या इत्यादि वाक्यें ह्याच लक्षणेचीं उदाहरणें आहेत. 'येतों आतांचि नको साधाया शत्रुवध मला उशिर' [मोरोपंत–वनपर्व–अध्याय ९. गीति ३७ पृ० १३२ काव्यसंग्रहग्रंथमाला.] येथें विरोधि लक्षणा मानलीच पाहिजे असें नाहीं. [घरीं जाऊन सत्यवतीस] 'वंदुनि येतों' [असें रामास] बोलुनि मी फिरोनि (पुनरपि) नगरा आलों–असा अर्थ केला असतां विरोधिलक्षणा मानण्याचें कारण नाहीं. आतां घरीं जाऊन मातेला नमन करून येतोंच असें समजा–असा भीष्मोक्तीचा भाव समजावा. १२. हस्तिनापुराला. [अ० १७८ श्लो० ७२.] १३. तत्+आशी+प्रसाद=तिचा आशीर्वादरूप प्रसाद. १४. हा भीष्म गुरुचें (जामदग्न्याचें). १५. थंडींत. १६. ही समर्पक **उपमा** आहे. १७. दरिद्री. १८. संग्राम. १९. सुरर्षि, राजर्षि, ब्रह्मर्षि यांसह. २०. देव. [अ० १७८ श्लो० ८३.]

पुत्रस्नेहें मातें ये वाराया भिऊनि [1]देवधुनी, ।
[2]हेनु धरुनि म्हणे, 'बा! [3]हा कालकरीं बहु [4]भटांसि दे वधुनी. ॥ ४८
[5]अनुभावें न [6]जिंतावे [7]भावें गुरु देव सर्वथा [8]पटुनीं, ।
उठविति अनर्थ [9]खिंजतां, [10]रिझतां [11]पुरुषार्थ सर्व [12]थापटुनी. ॥ ४९
सांगोनि [13]कलहकारण वदलों, 'गंगे! वृथा न कोपावें, ।
रामापरि मज तूंही [14]निजधर्मच्युत करूं नको, पावें.' ॥ ५०
[15]सुतजीवदान मागे [16]पसरुनि रामा नदी [17]नता पदर, ।
नमुनि म्हणे, '[18]शरण तुला येतां, पावे न दीन ताप [19]दर.' ॥ ५१
आग्रह कां करितां हो! प्रभुजी! द्या अभय [20]बाळका, पावा, ।
न गिळी [21]कटुकरस म्हणुनि कोप करुनि काय [22]बाळ कापावा?'॥ ५२
राम म्हणे, 'गंगे जें विद्यादिगुणेंकरूनि [23]माते तें, ।
दावी [24]वंध्येहूनि बहु [25]कदपत्य [26]उणेंकरूनि [27]मातेतें. ॥ ५३
या ऐशाही गुरुचें जो वेदवचन [28]सखे! वच न मानी, ।
तो हा मानील असें, तुज गुरु मानुनि, तुझें वचन मानी? ॥ ५४

---

१. देवांची धुनी (नदी)=गंगा. २. हनुवटी. ३. हा परशुराम, हा क्षत्रियहंता हरतुल्यपराक्रम जामदग्न्य. (श्लो० ८९.) ४. योद्ध्यांला. ५. अनुभाव=पराक्रम, तेज, प्रताप. ६. जिंकावे. ७. भक्तीनें. ८. कुशलदक्ष अशा पुरुषांनीं. ९. खिजले असतां, अप्रसन्न झाले असतां, उग्र, असंतुष्ट झाले असतां. १०. प्रसन्न झाले असतां. ११. धर्म, अर्थ, काम, मोक्ष. १२. पाठ थापटून, पाठीवर प्रशंसासूचक थापटी मारून, शाबासकी देऊन. थापटणें=पाठीवर शाबासकी देणें=To pat on the back approvingly. १३. काशिराजसुता अंबा हिच्या संबंधाची हकीकत. १४. स्वधर्मभ्रष्ट, स्वधर्मपतित. १५. पुत्राच्या प्राणाची भिक्षा. १६. पदर पसरुनि=शरण येऊन, दीनपणानें काकळूत करून, मिनतवारी करून. १७. नम्र होत्साती. १८. [हे रामा!] तुला शरण येतां, दीन [जन] ताप [किंवा] दर (भय) न पावे. १९. भय. २०. भीष्मा. २१. तिखट, तीक्ष्ण असा रस. येथें कटुकरस व रामाचा आग्रह, आणि बाळ व भीष्म यांत बिंबप्रतिबिंबभाव आहे. २२. यांत **प्रश्नालंकारानुविद्ध अर्थांतरन्यास** अलंकार आहे. २३. माजे, उन्मत्त होतें. २४. वांझेहून. २५. दुष्ट पुत्र, वाईट अपत्य. २६. उणें करून, हलकी करून. २७. जननीतें. कदपत्याची जननी वंध्येहूनही कमी योग्यतेची होय असें म्हणण्याचें तात्पर्य. २८. [हे] सखे! (गंगे!) जो (भीष्म) या ऐशाही गुरुचें (शापादपि शरादपि शासन करण्यास समर्थ अशा या विप्रोत्तम हरतुल्यपराक्रम परशुरामाचें) वेदवचन वच (वेदवचनाप्रमाणें पूज्य सत्य असें वचन, जें न मानिल्यास मोठा दोष आहे असें वेदोक्तिसमान सन्मान्य वचन) न मानी (मानीत नाहीं, आदरीत नाहीं, वचनाचा मान राखीत नाहीं)

करितां [1]आज्ञा, त्याच्या स्पर्शेन शिरा, [2]सुरापगे! हातें, ।
त्यजिल मदाशी [3]साध्वी नाहीं तरि त्या [4]सुरापगेहातें. ॥ ९५
रक्षावाचि सुत असें [5]त्वच्चित्तीं जरि असे [6]महाभागे! ।
गंगे! जा [7]वाटेवरि [8]आण, अभय द्यावया न [9]हा [10]भंगे.' ॥ ९६
पुनरपि माय मज म्हणे, न विलंबावें धरूनि [11]हठ [12]नातें, ।
[13]गुरु हरि हर बहु रतले गुरुचरिताच्या करूनि पठनातें.' ॥ ९७

---

तो हा मानी (अभिमानी, दुरभिमानी, अहंकारी, मगरूर भीष्म) तुज मानुनि (तूं प्रत्यक्ष माता आहेस अतएव पूजार्ह आहेस असा विचार करून, तुला वंदनार्ह समजून, जरी तूं शासन करणार नाहींस तरी तूं सन्माननीय आहेस एवढ्याच आधारावरून) तुझें वचन कसें मानील? (तुझी आज्ञा कशी पाळील? अर्थात् तुझें वचन तो भीष्म पाळावयाचा नाहीं, कारण तो माझ्यासारख्या शापानें अथवा शरानें दग्ध करण्यास समर्थ अशा गुरूचेंही वचन मानीत नाहीं. अंबेचें पाणिग्रहण कर असें जामदग्न्याचें वचन भीष्मानें स्वप्रतिज्ञाभंगभयानें पाळिलें नाहीं ही कथा मागें गेलीच आहे.) येथें शिष्याच्या मातेला मित्रत्वास्तव व बरोबरीच्या नात्यानें 'सखे' अशी संबुद्धि केली आहे.

१. [हे] सुरापगे! (हे गंगे! हे सुरांच्या (देवांच्या) आपगे! (नदी!) आज्ञा करितां (भीष्मानें माझी आज्ञा मान्य केली असतां, माझ्या आज्ञेप्रमाणें त्यानें अंबेचें पाणिग्रहण केलें असतां) त्याच्या शिरा हातें स्पर्शेन (त्याच्या मस्तकावर कृपापूर्वक वरदहस्त ठेवीन, त्याजवर कृपा करीन, त्याच्या मस्तकाला हातानें स्पर्श करून त्याला आशीर्वाद देईन). नाहीं तरी (तो माझी आज्ञा मान्य न करील तर) त्या सुरापगेहातें (सुरा+प+गेहातें=मद्य+पिणारा+गृहातें=त्या भीष्मरूप मद्यपसदनातें) मदासी (माझी आशी हीच) साध्वी (सती स्त्री) त्यजील (त्याला माझा आशीर्वाद मिळणार नाहीं, माझा आशीर्वाद त्याचा त्याग करील, त्यास फलदायक होणार नाहीं). २. सुर+आपगे=हे भागीरथि. ३. साध्वी=पृ० १५९ टीप ८ पहा. ४. मद्यप्याच्या गृहातें. ५. तुझ्या मनांत. ६. महत्+भाग्य=मोठें+दैव=हे भाग्यशालिनि गंगे! ७. मार्गावर आण. ८. वाटेवर आणणें=मार्गावर आणणें, सुधारणें. ९. मी राम. १०. न भागे=सिद्ध आहे. पंतांनीं मूळापेक्षां येथें वर्णनविस्तार फार केला आहे असें मूळ व गीति ५३-५६ या ताडून पाहिल्यावर समजणार आहे. पंतांनीं वर्णनाचा संकोच जेथें तेथें केला आहे असें प्रायः आढळतें, तथापि कोठें कोठें प्रसंगाकडे दृष्टि देऊन वर्णनविस्तारही केला आहे. ११. हट धरूनि=आग्रह धरून. १२. शिष्यगुरुसंबंध. १३. गुरु हा हरिहरच होय (गुरु हा विष्णु, महादेवच होय) ['गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः । गुरुः साक्षात्परब्रह्म तस्मात्श्रीगुरवे नमः ॥' असें गुरुस्तवन आहे.] [यास्तव] गुरुचरिताच्या पठनातें करूनि (गुरुचें चरित्र गाऊन) बहु (पुष्कळ जन) रतले (गुरुचरित्रपठनाच्या ठिकाणीं रममाण झाले, पूर्ण सुखसंपन्न झाले.) उत्तरार्धाचा अर्थ अन्य रीतीनेंही सरस असा करतां येतो. गुरु (बृहस्पति), हरि (विष्णु), [आणि]

'[1]शतदा [2]उपदेशौषध हा संरक्षावया स्वसुत [3]पाजी, ।
ती कां विटेल? वेंची नित्य [4]पतितशतहिता [5]स्वसुतपा जी? ॥ ५८
[6]अत्याज्य [7]सुप्रतिज्ञाग्रह निजकुलधर्म [8]सन्नय नरा हे, ।
तैसें कसें करावें जेणें एकहि न सन्नयन राहे?' ॥ ५९
[9]सिंधु म्हणे, 'कोण [10]अंसी माता जोडील [11]हात पोराशी? ।
शिष्य [12]अंसा, मग आग्रह कैसा सोडील [13]हा तपोराशी?' ॥ ६०
जों माय म्हणे, 'देइल हा [14]हरि तुज [15]मुग्धसिंधुरा मरणा' ।
मजवरि येता झाला, तोंचि [16]यशोदुग्धसिंधु राम रणा. ॥ ६१
'[17]बैसा रथीं कवच घ्या' ऐसें म्हणतां म्हणे, '[18]उणें काय? ।

---

हर (हे एवढे मोठे असूनही) गुरुचरिताच्या पठनातें करून (आपआपल्या गुरूचे ठायीं) रतले. गुरु, हरि आणि हर हे गुरूचें माहात्म्य व तत्संबंधीं आपलें कर्तव्य ओळखून निरभिमानतया त्यांचे चरणीं लीन झाले व हट्ट न धरितां गुरुमर्यादा पाळिते झाले, त्याप्रमाणें त्वांही करावें–असा भावार्थ.

१. ही भीष्मोक्ति प्रत्युत्तरादाखल आहे. २. उपदेशरूप औषध. ३. पूर्वार्धात **रूपक** आहे. ४. शेंकडों पातक्यांच्या हिताला. ५. आपल्या उत्तम तपाला खर्च करित्ये. गंगेची पापनाशक शक्ति मोठी आहे व ती पतिताला एक दिव्य औषधच आहे असें वर्णन **गंगालहरीं**त आहे. (श्लो० १३-१५ पहा.) या उत्तरार्धात **प्रश्न** अलंकार आहे. ६. त्यागाला अयोग्य. ७. दृढ प्रतिज्ञेचा आग्रह. ८. सुप्रतिज्ञाग्रह (उत्तम प्रतिज्ञेविषयीं आग्रह, उत्तम प्रतिज्ञेला दृढ धरून असणें, प्रतिज्ञा कायम ठेवण्याचा दृढ निश्चय, निजकुलधर्म (स्वकुलाचार) [आणि] सन्नय (उत्तम न्यायाचरण, खरा न्याय, न्यायी वर्तन) हे (ह्या तीन गोष्टी) नरा (मनुष्याला) अत्याज्य (त्याग करण्यास अयोग्य होत, मनुष्यानें स्वप्रतिज्ञा स्वकुलाचार आणि नीतिवर्तन यांचा त्याग करणें अनुचित होय) जेणें (ज्या कृतीनें, ज्या योगानें, जेणेंकरून) एकहि सन्नयन (उत्तम नेत्र) न राहे तैसें कसें करावें? एकही उत्तम डोळा राहणार नाहीं असें वर्तन कसें करावें? मनुष्यास नेत्रांचें संरक्षण करणें भाग आहे, तेव्हां एकही नेत्र उत्तम राहूं नये असें आचरण त्यानें कसें करावें? अर्थात् करतां कामा नये–हें उत्तर.) भीष्मानें परशुरामाची आज्ञा मान्य केली असती तर वरील तिन्ही गोष्टींस बाध आला असता. ९. नदी (भागीरथी). १०. माझ्यासारखी आई. ११. विनवणी करील. भीष्माची उक्ति व गंगेची प्रत्युक्ति ह्यांस मूळांत फारसा आधार नाहीं. पंतांनीं येथें बराच वर्णनविस्तार केला आहे. १२. तुज (भीष्मा)-सारखा दुराग्रही, अविनेय, प्रतिनिविष्ट. १३. हा तपोनिधि (जामदग्न्य). १४. परशुरामरूप सिंह. १५. बालिशगजाला. १६. यशोरूप क्षीरसागर. १७. रामापाशीं रथ व कवच नसल्यामुळें भीष्मानें तीं घेण्यास सांगितलें तेव्हां तो म्हणाला. [अध्याय १७९ श्लोक २-४.] १८. मला कमी काय आहे? सर्व कांहीं परिपूर्ण आहे.

पूर्ण असे हा माझा [1]चिंतामणिकोटिगुरु गुणें [2]काय. ॥ ६२
रथ भूमि, वेद [3]वाजी, [4]गायत्री कवच, [5]सारथी वात, ।
या साहित्यें आम्हां [6]**काळा**धिक कोण जोडिना हात?' ॥ ६३
ऐसें [7]वदतांचि, दिसे [8]दिव्य रथीं दिव्य[9]कवच तो [10]हरसा, ।
मोहे देवांचीही मति, केवळ पावली न मोह [11]रसा. ॥ ६४
[12]ठेवुनि चाप करींचें, उतरूनि रथावरूनि, पद नमुनी, ।
'[13]**मम जयमाशास्व**' असें प्रार्थियला [14]कीर्तिकेलिसदन मुनी. ॥ ६५
मज **राम** म्हणे, '[15]नमन न करितां, करिताचि हानि [16]शापानें, ।
वंदावा गुरु [17]हर्षद [18]अमलद्विजराज [19]हा [20]निशापानें. ॥ ६६
**भीष्मा!** मजला म्हणसी जरि '[21]**जयमाशास्व मे विभो! राम!**' ।
तरि संप्रति जैसा तूं [22]जयकाम तसाचि [23]हाहि जयकाम. ॥ ६७
झालों प्रसन्न मी या त्वच्चरितें, तूंचि शुद्ध [24]समयज्ञ, ।

---

१. कोटिशः चिंतामणि नामक रत्नांचा गुरु (चिंतित इच्छा परिपूर्ण करणाऱ्या कोटिशः मणींचा गुरु असा हा माझा देह गुणें (गुणांनीं) पूर्ण (आहे). २. देह. ३. अश्व. वेद हेच अश्व होत. ४. गायत्री, सावित्री, सरस्वती ह्या वेदमाता कवच. ५. माझा सूत मातरिश्वा (वायु) आहे. [अकृतव्रण रामाचें सारथ्य करीत होता असें वर्णन आहे. अ० १७९ श्लो० ९.] पूर्वार्धात **रूपक** आहे. ६. कालाहून प्रबलतर असाही वीर आमच्यापुढें हात जोडून उभा राहणार. यांत **प्रश्न** अलंकार झाला आहे. ७. राम वदतांचि—असा अन्वय. ८. सर्वायुधवर आणि अद्भुतोपमदर्शन अशा रथांत. [अ० १७९ श्लो० ६-८.] ९. चंद्र व सूर्य यांनीं चिन्हित असें कवच. १०. महादेवासारखा. ११. पृथ्वी. केवळ पृथ्वीलाच मोह उत्पन्न झाला असें नाहीं, तर देवांच्याही मतीला मोहानें ग्रासून टाकिलें. १२. 'सत्वर युद्धास ये' असें रामानें आव्हान केलें तेव्हां. [अ० १७९ श्लो० १३.] १३. मम+जयं+आशास्व=माझ्या जयाची आशा कर. [अ० १७९ श्लो० १४.] 'जयमाशास्व मे विभो!' असें मूळांत आहे. १४. यशःक्रीडेचें मंदिर. १५. त्वां प्रणाम न केला असता तर. १६. शाप देऊन हा राम हानि (नाश) करिताचि. [अ० १७९ श्लो० १६.] १७. हा हर्षद (आनंददायी) गुरु (राम) वंदावा (वंदिला पाहिजे). १८. स्वच्छ, ब्राह्मणश्रेष्ठ. १९. हा निष्कलंक ब्राह्मणवर्य चंद्रानें सुद्धां वंदन करण्यास योग्य आहे. २०. चंद्रानें, निशापतीनें. २१. हे विभो! राम! मे जयमाशास्व=हे प्रभो रामा! माझ्या जयाची इच्छा कर. २२. जयेच्छु, जयाभिलाषी. २३. राम. [तुला जय मिळावा अशी मी इच्छा करीत नाहीं, मी तुला जिंकण्यासाठीं येथें स्थित आहें. तूं आतां विजयाविषयीं प्रार्थना करूं नको—असें मूळांत आहे. [अ० १७९ श्लो० १७ टीका पहा.] २४. स्वधर्मज्ञ.

हूं, बैस रथीं घे धनु, [1]सत्फलद न अन्य युद्धसम य[2]ज्ञ.' ॥ ६८
नमुनि रथीं बैसुनि, मी वदलों, 'गुरुजी! न हार [3]नत पाहो, ।
[4]तुमच्या न ब्राह्मण्या न श्रुतिवृंदा प्रहार न तपा हो. ॥ ६९
स्वीकारिला [5]तुम्हीं जो [6]असमुचित क्षत्रधर्म साधूंनीं, ।
[7]खंडीन त्यासि, होइन [8]सन्मत, हें साधुकर्म [9]साधूनी. ॥ ७०
करिता झाला मजसीं माझा गुरु **राम** [10]संगरारंभा, ।
पाहों ये योगिचमू जसि सोडुनि कामसंगरा [11]रंभा. ॥ ७१
प्रथमचि सोडी मजवरि [12]सद्गुरु शरवर्ष [13]कायहानिकर, ।
तैसेंचि हाहि शिष्य, [14]प्रेक्षक जन म्हणति '[15]काय हा निकर?' ॥ ७२
झांकिति समरीं शतदा आम्हां देवर्षि [16]सत्प्रसूनगणीं, ।
[17]निजवीरसूत्व [18]निरुपम [19]सुकृतफळ, परंतु [20]मत्प्रसू न गणी. ॥ ७३

---

१. उत्तम फळ देणारा, मुक्ति देणारा असा. २. युद्धाला 'रणयज्ञ' समजण्याचा परिपाठ आहे. '**वेणीसंहार**'नाटकांतील या भीमोक्तींत अशा रणयज्ञाचें वर्णन आहे:–'चत्वारो वयमृत्विजः स भगवान् कर्मोपदेष्टा हरिः संग्रामाध्वरदीक्षितो नरपतिः पत्नी गृहीतव्रता । कौरव्याः पशवः प्रियापरिभवक्लेशोपशांतिः फलं राजन्योपनिमंत्रणाय रसति स्फीतं हतो दुंदुभिः ॥' [वेणीसंहार–अंक १ श्लोक २५.] ३. नत (नम्र भीष्म) हार (पराजय) न पाहो. ४. तुमच्या शरीरस्थ ब्राह्मणत्वाला, वेदाला व तपाला मी प्रहार करीत नाहीं. [अ० १७९ श्लो० २४.] ५. तुम्ही ब्राह्मणांनीं, तुम्ही विप्र असूनही. ६. अयोग्य. ७. त्या तुमच्या क्षत्रियधर्माची हानि करीन, तुमचें क्षत्रियत्व नष्ट करीन. ८. साधुजनांस मान्य. ९. संपादून. १०. संगर+आरंभा=युद्ध+प्रारंभा. ११. जशी रंभा कामसंगर सोडून युद्ध पाहण्यास आली तशीच योगिचमू (अनेक योग्यांची पंक्तिसेना) योग टाकून युद्ध पाहण्यास आली. कामसंगरा सोडुनि [रामभीष्मसंगर] पाहों जसि रंभा ये [तशी] योगिचमू [ही] [आली]. रामभीष्मांमधील अत्यद्भुत संगर पाहण्याकरितां आपआपलीं निकडीचीं व अत्यंत प्रिय कामें सोडून मंडळी आली. योगिचमू आपलें परमेश्वरध्यानाचें महत्कृत्य सोडून कौतुकानें संगर पाहण्यास आली. रंभाही अत्यंत प्रिय कामसंगर सोडून कौतुकवश होत्साती आपल्या परिवारासह रामभीष्मसंगर पाहण्यास आली. येथें रंभा=नलकूवरस्त्री, किंवा रंभापदानें सर्व अप्सरोगण घ्यावा. (मराठींत रंभा म्हणजे कोणतीही सुंदर स्त्री असा अर्थ होतो.) १२. माझा गुरु. १३. काय+हानि+कर=देह+नाश+करणारा=मृत्युप्रद, शरीराची हानि करणारा. १४. पहाणारे. १५. काय हो हा कहर उसळला आहे. १६. उत्तम पुष्पवृष्टीनें. [प्रसून=पुष्प.] १७. आपलें वीरमातृत्व. आपण वीरप्रसविनी स्त्री आहों हा भाव, स्ववीरजननीत्व. १८. अत्युत्तम, उपमारहित. १९. पुण्याचें फळ. २०. माझी माता. [प्रसू=माता.]

बाणांहीं मी गुरुच्या, गुरु माझ्याही, [1]करी रथा पिहित[2], ।
[3]शस्त्रप्रहार यद्यपि [4]अहितचि, गमले मना तथापि हित. ॥ ७४
[5]प्रथमदिनीं म्यां गुरुच्या धनुची, [6]पण करुनि, तोडिली [7]कोटी, ।
मजवरि तीक्ष्णशरांची गुरुनें कोपोनि सोडिली कोटी. ॥ ७५
पळमात्र पावली शर मर्मीं शिरतां मदीय तनु कंपा, ।
नाहीं गडबडलों, [8]कीं मजवरि गुरुचीच पूर्ण [9]अनुकंपा. ॥ ७६
मग मी झालों गुरुच्या मर्मीं [10]शतसंख्य [11]बाण शिरकविता, ।
[12]संधानशक्ति माझी कांपवि तद्धृदय, जेंवि शिर [13]कविता. ॥ ७७

---

१. 'करी रथा पिहित' याचा 'गुरुच्या' आणि 'माझ्या'ही या उभय पदांशीं अन्वय आहे. २. आच्छादित. ३. शस्त्राघात. ४. अकल्याणप्रद, हानिप्रद, मृत्युकारक. ५. युद्धाच्या पहिल्या दिवशीं. ६. प्रतिज्ञा करून. ७. धनुष्याचें अग्र. [अ० १७९ श्लो० २७.] ८. कारण. ९. कृपा. १०. शंभर (शत) आहे संख्या ज्यांची असे (बाण). ११. नतपर्व, कंकपत्र असे बाण (पृषत्क). १२. बाणाचा नेम धरून प्रत्यंचेवर जोडण्याची शक्ति. १३. असाच अभिप्राय संस्कृत सुभाषितांत आढळतोः—(१) किं कवेस्तस्य काव्येन किं कांडेन धनुष्मतः । परस्य हृदये लग्नं न घूर्णयति यच्छिरः.॥ (२) कृतमंदपदन्यासा विकचश्रीश्चारुशब्दभंगवती । कस्य न कंपयते कं जरेव जीर्णस्य सत्कवेर्वाणी. ॥ 'जेंवि शिर कविता' ह्या लहानशा वाक्यावरून पंतांची रसिकता आणि मार्मिकता स्पष्टपणें व्यक्त होत आहे. "पंत हे चांगले रसिक होते असें म्हणण्यास त्यांच्या काव्यांत पुष्कळ आधार सांपडणारा आहे. पंतांस सारींच काव्यें सारखींच भासत होतीं असें त्यांच्या काव्यांवरून दिसत नाहीं. काव्यांचा न्यूनाधिकभाव त्यांस वाटत असे, व रसदृष्ट्या जें काव्य चांगलें तेंच रसिकांना पसंत होईल अशा आशयाच्या आर्या त्यांच्या अनेक आहेत. त्याजवरून मोरोपंत हे रसज्ञ व काव्यमर्मज्ञ होते असा निर्णय करण्यास पुष्कळ आधार सांपडतो. अशा आर्यांचीं कांहीं उदाहरणें येथें देतोंः—रस न समजती म्हणविति रसिक म्हणुनि चित्त वहुत हळहळतें । जें तन्निंदक भाषण होतें कर्णांत तप्त हळहळ तें ॥ थोरांहीं स्तविले कवि तन्निंदा तिळहि सोसवत नाहीं । मज सुरस ग्रंथांहीं वृत्तिपरा जेंवि सोसवत नाहीं॥ [श्रीरामरीति], देतो सत्संग जना अमृतकराहून शुद्ध सद्यश तें। जें गावें सत्कविंनीं रसिकसभेमाजि गद्यपद्यशतें ॥ [सत्संगस्तव], सार्थक पार्थ करी ती कैरविणी तो सुधांशु गौरविता। सविता बिसनीसि वरी कीं भेटे तो गुणज्ञ ती कविता ॥ [बृहद्दशम], शक्तीतें भीमाच्या व्रजासमोरीहि होय शिरकविता। ती त्याचें कांपवि जसि आणुनि नेत्रांसि तोय शिर कविता॥ [द्रोणपर्व], करिल सुरंगपथ तुम्हां जाया माझा सखा सुखनक वनीं। अवनीं तुमच्या मज जें रसिकांच्याहि रसिकासुख न कवनीं॥ [आदिपर्व—अ० २६], बहु पुण्यवंत रमतो जैसा सानंद देव लोक वनीं । स्त्रीरत्नीं बहु रमला नृपसरसीं रसिक काय तो कवनीं ॥ [आदिपर्व—अ० ९], व्यूहीं सात्यकि शिरला सहसा जैसा दवाग्नि शुष्कवनीं । खंडन करी प्रति-

क्षण मूढसाचि झाला क्षतजें प्रभु न्हाणिलाचि भल्लांनीं, ।
भल्लां निष्क्रिय केलें जाणों कवळुनि अनेक मल्लांनीं. ॥ ७८
'हा रे! भीष्मा! मंदा! जपला गुरुवत्सल व्रता कुरु ज्या, ।

---

पदीं कटकीं दोषज्ञ जेंवि दुष्कवनीं ॥ [द्रोणपर्व–अ० ११], म्हणोनि कवितासुता तुज समर्पितों साजरी । नसे बहु तशी गुणी कनकपीतवासा जरी ॥ [केकावली], हर्षें दशार्णपति बहु वर्षे प्रेमाश्रु रसिक सत्कृतितें । तेंवि दृढ धरी हृदयीं महिषीतें करि यथार्थ सत्कृतितें ॥ [ब्रह्मोत्तरखंड]. या पद्यांशिवाय पंतांवर कोणी आर्या केली आहे, त्याजवरून ते रसिक होते असें स्पष्ट होतें. त्या आर्या येणेंप्रमाणें आहेत:—श्रीमन्मयूरकविची देते संतोष मानवा कविता । असता जरि भूमीवरि सुरगुरु तरि तोहि मान वांकविता ॥ आर्याछंदें जोडुनि रामायण भारतादि आयकवी । नायकवीर कवींचा ऐसा होईल अन्य काय कवी ॥ [विविधज्ञानविस्तार–पुस्तक १२ अंक १०-१२ पृ० २६७-२६८.]

१. क्षणभर मूर्च्छित असा. २. रक्तानें. ३. रुधिरानें उक्षित आहे अंग ज्याचें असा, रक्तानें न्हालेला. ४. लोहमय बाणांनीं. ५. बाहुयुद्ध करणाऱ्याला, बाहुयोधाला. ६. कर्मरहित, व्यापारशून्य, क्रियाहीन. ७. ही उत्प्रेक्षा आहे. येथें प्रभु परशुरामाच्या ठायीं मल्लाची आणि भल्लांच्या ठायीं अनेक मल्लांची संभावना केली आहे म्हणून हा उत्प्रेक्षालंकार होय. पंतांच्या काव्यांत ह्या उत्प्रेक्षेचीं सुंदर उदाहरणें अनेक आहेत. (१) ऐसें कंज भवात्मज वदतां तो मारुती महाकाय । वाटे महेंद्रशिखरीं, वामन बलिराज्यकाम हा काय? ॥ १४० ॥ (मोरोपंत–मंत्ररामायण–किष्किंधाकांड), (२) तव हृदय श्रीकंठीं, 'शिवशिव' म्हणशी सदैव तूं वदनें, । म्हणुनि जणों तुज वधिलें, शिवदग्धें अन्यदुःसहें मदनें. ॥ ७१६ ॥ (मोरोपंत–मंत्ररामायण–युद्धकांड), (३) सुरतरसांत बुडाला, जाणों स्त्रीरत्न शीतनवसर, तो । तप्त मतंगज रतला; शक्र म्हणे, बहु करोनि नवस, 'रतो.' ॥ ३१ ॥ (महाभारत–आदिपर्व–अध्याय १२), (४) शोभे स्थळस्थळीं तें राशीकृतरत्नकनक नगर मला । वाटे, गमलें लोकां कीं, येथें रत्नकनकनग रमला. ॥३४॥ (महाभारत–आदिपर्व–अ० १६), (५) जेंवी भीष्म, 'बका! ये' ऐसी मारूनि हाक उग्रास, । शिरले काय सदुदरीं सदोदनाचे भिओनि सुग्रास. ॥ ५९ ॥ (महाभारत–आदिपर्व–अ० ३०), (६) ठेवी नगरद्वारीं परमभयानक अशुद्धिमत् कुणप । जाणो मातेनें तो वधिला शिशुरक्तपोग्र मत्कुणप. ॥ ६५ ॥ (महाभारत–आदिपर्व–अ० ३०). ८. ही स्वमुखानें केलेली स्वनिंदापर स्वगतोक्ति आहे. रामाचें शरीर शरव्याप्त झालेलें पाहून भीष्मास दया आली. 'अरे या क्षत्रियधर्मास धिक्कार असो! अहो! मी केवढा पापी! मीं आपल्या गुरूला शरांनीं विद्ध केलें' इत्यादि स्वनिर्भर्त्सना भीष्मानें केली आहे. [अ० १७९ श्लो० ३५-३९.] ९. गुरूविषयीं ममताळु, गुरुवात्सल्यव्रतधारी. १०. सुप्रसिद्ध कुरुराजा संवरणाचा पुत्र.

तें बुडविलें तुवां कीं, हा! न कुसंतति भली भली कुरुजा[1]. ॥ ७९
गुरु[2] हरिहर कीं, धिक्[3] त्वां, करिसि न करवेल लांडग्याला जें, ।
दे[4] जीव, जा[5] भल्याला दावाया तोंड दांडग्या! लाजें.' ॥ ८०
असि आपलीच आपण केली निंदा बहु प्रथम दिवसीं, ।
कीं[6] विप्र पुरोडाश[7], क्षत्रकुळें त्यांपुढें जसीं दिवसीं[8]. ॥ ८१
दुसरे दिवसीं मजवरि शस्त्रें अस्त्रें हितें[9] गुजें योजी[10], ।
तेव्हां वदलों 'स्वामी! हें केलें भग्न म्यां दुजें[11] यो[12] जी! ॥ ८२
मज डावलूनि[13] मद्गुरु भेदी भल्लेंकरून हें उर, तें ।

---

१. कुत्सित रोग, वाईट रोग. कुरोग बरा पण कुपुत्र बरा नाहीं–असा भाव. यांत **व्यतिरेकालंकार** आहे. २. गुरु हा प्रत्यक्ष हरि (विष्णु) अथवा हर (शंकर) च होय, गुरु हा विष्णु आणि शंकर यांसारखा वंद्य आहे. (गीति ५७ तृतीय चरण). लांडग्याला जें (दुष्ट कर्म) न करवेल [तें] [तूं] करिसि! त्या तुला धिक्कार असो. ३. त्वाम्+धिक्=तुला धिक्कार असो. ४. मर, प्राण दे. ५. जा=चालता हो, तोंड दाखवूं नकोस, मर जा, हो चालता, निघ येथून–हा गालिदानाचाच प्रकार होय. ६. (निंदा करण्याचें कारण असें कीं) विप्र पुरोडाश (हवनीय द्रव्याचे शेष, पुरोडाशासारखे श्रेष्ठ) [होत] त्यांपुढें (त्या विप्रांपुढें) क्षत्रकुळें (क्षत्रियकुळें हीं) जशीं दिवशीं (क्षुद्र पक्वान्नें) [होत] [विप्र आणि क्षत्रिय यांची तुलना केली असतां, विप्र हे पुरोडाशासारखें सन्मान्य खाद्य आणि क्षत्रिय दिवशीं पक्वान्नाप्रमाणें तुच्छ खाद्य होत. पुरोडाश=हवनीय द्रव्याचें जें शेष तो. भक्षणीय पदार्थांत याची योग्यता मोठी आहे. हा अवश्यमेव भक्षण केला पाहिजे असें याचें महत्त्व आहे. दिवशीं=पिठाची उकड काढून केलेला पदार्थ. हा पदार्थ घीवर, मांडे, जिलबी यांसारखा मोठ्या योग्यतेचा नाहीं]. पहिल्या दिवशीं इतकें झालें, नंतर सहस्ररश्मि सूर्य अस्ताचलास गेला तेव्हां युद्ध बंद पडलें. ७. हुतशेष. ८. पक्वान्नविशेष. ९. हितें=हित-कवच, गुजें=गुप्त हितगुज=कारस्थान, मसलत, अंतस्थ विचार. हितें गुजें=कारस्थानें, मसलती. दुसरे दिवशीं मजवर शस्त्रें योजिलीं, अस्त्रें योजिलीं आणि हिताच्या गुजाच्या (समजुतीच्या) गोष्टीही योजिल्या (सांगितल्या), तेव्हां मीं म्हटलें गुरुजो! हें सर्व मी खंडित (निष्फळ) केलें, याउपर कांहीं असेल तर येऊं द्या. ['हितगुजा'वरून 'हितें गुजें' हे शब्द निरनिराळे लिहिले आहेत. हितगुज=हितकर गुज, हितकर कानांत गुजगुजणें म्हणजे हिताच्या गोष्टी. १०. अध्याय १८० श्लो० ९ पहा. ११. दुसरें शस्त्र. १२. येवो. येओ किंवा येवो याबद्दल कवितेमध्यें 'यो' असें रूप आढळतें:–श्रीरामाला दशरथ द्यावें युवराजपद असें योजी । गुरु सचिव म्हणति इच्छित होतो कीं हेंचि तव मना **यो** जी! [मोरोपंत–वनपर्व–अध्याय १० गीति ५६ पृ० १४५.] मागें गीति १९ पहा. १३. डावा घालून. [अ० १८० श्लो० १४.]

सांगों काय तुज नृपा[1]! नसती श्रीगुरुकृपा न हें[2] उरतें. ॥ ८३
मत्सूत[3] मला मागें मूर्च्छा[4] येतांचि तत्क्षणीं काढी, ।
बा! ढीग[5] वेदना अनुभविल्या समरीं, परंतु ही गाढी[6]. ॥ ८४
मागें हळूच मद्रथ सारथि ने, जरि हरींस[7] न पिटाळी, ।
मेला खळ[8] म्हणुनि पिटिति मुनि[9], रामजयीं[10] जसेचि कपि[11], टाळी.॥८५
[12]अंबेचा तर्क किती? पिटिति अकृतव्रणादि कवि टाळी, ।
'हा! हा!' देवहि म्हणती, गुरुचि निजगंभीरतेसि[13] न विटाळी. ॥ ८६
रामाश्रितसाधूंची[14] दूरें[15] करी गर्जनाचि मन्मोहा[16], ।
माय म्हणे, 'रडवाया न परसतीच्या[17] कुशींत जन्मो हा[18].' ॥ ८७
म्यां सावधान[19] होउनि, रथ फिरवुनि, बाण सोडिले बहुत, ।
रामप्रतापदहनीं[20] झालेचि, न लागतां विलंब, हुत[21]. ॥ ८८

---

१. हे सुयोधना! २. हें उर टिकलें नसतें, भिन्न होऊन पडलें असतें. ३. माझा सारथी. ४. रामबाणप्रपीडित अशा मला मूर्च्छा आली तेव्हां माझ्या सारथ्यानें मला त्वरित दूर नेलें. ५. पुष्कळ. ६. प्रबळ, जबरदस्त. ७. घोड्यांस. ८. दुष्ट रावण, (पक्षीं) दुष्ट भीष्म. ९. परशुरामाचे स्नेही व सहचर मुनि. १०. रामानें रावणाला मारून जय मिळविला त्या प्रसंगीं. ११. वानर. १२. भीष्म मेला असें अंबेला वाटलें यांत आश्चर्य नाहीं, भीष्माला मारणें दुस्तर व अशक्य असा तर्क तिला झाला नाहीं, तिचा तो तर्क किती? अकृतव्रणादिक शहाणे देखील माझा पराभव झाला म्हणून टाळ्या पिटूं लागले. देव सुद्धां हा! हा! म्हणूं लागले, मग अंबेचा तर्क कितीसा चालणार! परशुरामानें मात्र आपली गंभीरता सोडिली नाहीं. माझ्या मूर्च्छेनें सर्व विस्मित झाले, एक माझा गुरु मात्र गंभीर राहिला. 'रामस्यानुचरा हृष्टाः सर्वे दृष्ट्वा विचुक्रुशुः । अकृतव्रणप्रभृतयः काशिकन्या च भारत. ॥ [अ० १८० श्लो० १७]. १३. भार्गवरामानें आपल्या गांभीर्याला मूर्खपणाचा कमसमजुतीचा विटाळ होऊं दिला नाहीं; भीष्मास आपण मारलें, आपण युद्धांत जय मिळविला अशी परशुरामानें आपली वृत्ति होऊं दिली नाहीं. १४. परशुरामाच्या आश्रित मुनिजनांची. १५. नाशी. १६. माझ्या मूर्च्छेला. (मी शुद्धीवर आलों, मी लब्धसंज्ञ झालों अ० १८० श्लो० १७.) १७. दुसऱ्या सतीच्या. १८. हा भीष्म. अंबेचा, इतर लोकांचा व देवांचा असा समज झाला होता कीं भीष्म रामाच्या बाणानें मेला, तसाच समज गंगेचा झाला होता म्हणून मी म्हणतें कीं हा भीष्म आतां मेलाच, पण माझ्या कुशींत जन्म घेऊन या वेळीं हा मला रडवायास जसा कारण झाला आहे, तसा अन्य सतीच्या कुशींत जन्म घेऊन तीस रडवायास कारण न होवो. म्हणजे जिच्या पोटीं हा यापुढें जन्म घेईल तिला तरी मजसारखें दुःख न होवो. १९. स+अवधान=लब्धसंज्ञ. २०. रामाच्या प्रतापरूप अग्नींत. २१. भस्म, दग्ध.

मग म्यां [1]मूर्छित केला [2]कालोग्रशरव्रजें [3]उरोनिहितें, ।
गमलें यावरि न करिल [4]गुरु शिष्यांचीं, [5]जगीं उरोनि, [6]हितें. ॥ ८९
मागूनि घेतलें गुरुदेवा म्यां, आंग कांपत नमुनि, तें ।
बसला [8]अशनिसम उरीं शर, मग व्हावें न कां पतन [9]मुनितें? ॥ ९०
कल्पांतीं [10]भानु [11]तसा राम पडे भूवरी रथावरुनी, ।
घालूनि उडी अकृतव्रण [12]सूत धरी शरीर [13]थांवरुनी. ॥ ९१
जल वायु घालिती [14]किति? किति जपती [15]शांतिसूक्त तापस रे! ।

---

१. निश्चेष्ट करून भूमीवर पाडिला. २. कालाप्रमाणें उग्र अशा शरसमुदायानें. (अ० १८० श्लो० २३-२४.) ३. उरस्+निहितें=उरांत+ठेवलेल्या=वक्षस्थलीं मारलेल्या, (शरव्रजें). ४. परशुराम. ५. जीवंत राहून. ६. कल्याणें. [माझ्या बाणाच्या तडाक्यांतून वांचून आपल्या शिष्याचें कल्याण करण्यासाठीं परशुराम आतां जगेल असें मला वाटलें नाहीं.] ७. रामाला पतन कां घडलें ह्याची उपपत्ति भीष्म करीत आहे. गुरुदेवा आंग कांपत [असतां] नमुनि तें [गुरुपतन] म्यां (भीष्में) मागूनि घेतलें=[माझा बाण लागल्याबरोबर परशुरामाला पतन व्हावें हें इष्ट कार्य] मीं आंग कांपत (भयानें माझें आंग कांपत असतांही, या प्रसंगांतून कसा पार पडतों अशी भीति प्राप्त झाल्यामुळें माझें आंग लटलट कांपत असतांही) गुरुदेवा नमुनि (गुरुरूप देवाला नमस्कार घालून) [गुरुदेवापाशीं] मागून घेतलें (नम्रतेनें प्रार्थना करून इष्ट कार्य—गुरुपतनरूप इष्ट कार्य तडीस जावें असें मागून घेतलें.) [माझा शर परशुरामाच्या उरीं बसावा, तो वज्रासारखा तीव्र भासावा आणि त्याच्या योगें त्याला पतन व्हावें—हें कार्य मोठें दुष्कर व असामान्य होय, तें सिद्धीस गेलें हें माझ्या पराक्रमाचें फळ नव्हे, तर तें गुरुपरशुरामदेवाच्या कृपेचें फळ होय. माझें हें कार्य तडीस जावें असें मीं त्याजपाशीं मागून घेतलें होतें व त्याच्याच कृपेनें पार पडलें. गुरूची मजवर पूर्ण कृपा होती तेव्हां तें घडून आलें यांत कांहीं विशेष नाहीं.] ८. अशनि+सम=वज्र+समान=वज्रासारखा प्रबल आणि प्रखर. ९. रामातें. १०. सूर्य. ११. ही सुंदर **उपमा** आहे. १२. सारथी. १३. सांवरून. १४. किती तरी लोक बेशुद्ध झालेल्या रामाला पाणी आणि वारा घालून सावध करण्याचा यत्न करीत होते. [अ० १८० श्लो० २५-२७.] १५. 'शांतिसूक्त' नामक वेदोक्त मंत्र. अनेक मुनि शांतिसूक्ताचा जप करीत होते. **शांतिसूक्त**—ऋग्वेद—अष्टक १ अध्याय ६ वर्ग १५।१६ (सूक्त ८९) ह्यास 'शांतिसूक्त' म्हणण्याचा परिपाठ आहे. [आनो भद्राः क्रतवो···अदितिर्द्यौरदितिरंतरिक्षम्' ह्या १० ऋचा ह्या सूक्तांत आहेत] ह्या दहा ऋचांचा स्थूल मानानें सर्व विश्वेदेव आमचें कल्याण करोत असा अर्थ आहे. ह्या सूक्ताचा प्राचीनकालीं विनियोग विश्वेदेवस्तुतिपर होता, परंतु आधुनिक कालीं याचा 'शांतिसूक्त' 'शांतिपाठ' इत्यादि नांवानें निरनिराळ्या शांतिप्रकरणीं विनि

यत्नशतें चिरकाळें हळुहळु **भृगुराम**मोहताप [1]सरे. ॥ ९२
उघडुनि दृष्टि, गुरु म्हणे, ‘**भी**ष्मा! माझ्यासमोरचि रहा रे! ।
[2]उग्राही [3]भुजगासीं करितां [4]संगर न मोर चिर [5]हारे.’ ॥ ९३
[6]मत्पार्श्वीं मज हाणी, ‘[7]मेलासि’ असें म्हणोनि [8]रोपानें, ।
कोपानें [9]क्षत्रक्षतजांचीं आला करीत [10]जो [11]पानें. ॥ ९४
[12]चुकलें दैवें, देह न त्या [13]आघातीं रणीं रहावा, तें, ।
झालों सकंप पळभरि, होय [14]महातरु जसा महावातें. ॥ ९५
कांपविले शर मर्मीं हाणुनि माझे [15]**भृ**गूद्वहें [16]घोडे. ।
मोडे धैर्य न [17]त्यांचें, तेजस्वी शोधितां तसे थोडे. ॥ ९६
गुरु [18]खवळलाचि होता, मीहि बहु तसा कधींच न खवळलों, ।
एकामेकांवरि मग साक्षात् [19]कल्पांतमेघसख वळलों. ॥ ९७
वातास कीं शिराया न दिली [20]पदवी रविप्रकाशाला, ।

---

योग करीत असतात. याविषयीं विशेष खुलासा व सर्व सूक्ताचा अर्थ पाहणें असल्यास **वेदार्थयत्न**–भाग २ रा–पृष्ठें ३८६-४०८ पहावीं.

१. सरला, उतरला, राम सावध झाला. २. भयंकर. ३. सर्पासीं. ४. युद्ध. [संगर=‘अथ प्रतिज्ञाजिसंविदापत्सु संगरः’ इत्यमरः । ‘संगरो युधि चापदि’ इति मेदिनी.] ५. हार पावे, पराजय पावे. [भुजंगमयूरांचें स्वाभाविक वैर आहे हें सुप्रसिद्ध आहे. मयूर हे भुजंगभुक् आहेत. यांत **प्रतिवस्तूपमा** अलंकार आहे.] ६. अध्याय १८० श्लोक २९ पहा. ७. ‘हतोऽसीति.’ (श्लो० २८.) ८. बाणानें. [रोप=बाण. ‘कलंब-मार्गणशराः पत्री रोप इषुर्द्वयोः’ इत्यमरः । ‘रोपो रोपणबाणयोः’ इति विश्वः.] ९. क्षत्र+क्षत+ज=क्षत्रिय+जखम, घाव+उत्पन्न झालेलें=क्षत्रियांच्या रक्ताचीं. (क्षतज, रक्त.) १०. जो क्षत्रियांतक परशुराम. यांत सुरेख **पर्यायोक्त** आहे. ११. प्राशनें. १२. सुदैवानें माझ्यावरील मोठें अरिष्ट टळलें. १३. शस्त्रें, अस्त्रें, बाण यांच्या प्रहारांत. १४. मोठा वृक्ष (वाऱ्यानें वृक्ष जसा व्याघूर्णित होतो तसा क्षणभर झालों.) हा दाखला मूळांत आहे. १५. भृगु+उद्वहें=भृगु+पुत्रें=जामदग्न्यानें, भृगुनायकानें. १६. घोडा=घोट, घोटक याचें रूप घोडा आहे असें समजतात. १७. त्या अश्वांचें. १८. क्षुब्ध झाला. खवळणें=खवंदळणें, आवेशणें, चेताळणें, आणीबाणीवर येणें, क्षोभणें. १९. प्रलयकाळींच्या मेघाचे मित्र असें अत्यंत उग्र स्वरूप धारण करून शस्त्रास्त्रांची वृष्टि परस्परावर करूं लागलों. २०. मार्ग. वायु मेघरुद्ध झाला होता आणि सूर्य शरजालसमावृत होता, म्हणून वायूला संचार करण्यास आणि सूर्याला प्रकाश पाडण्यास मार्गच राहिला नव्हता. [‘शिराया न दिली पदवी’ हा वाक्यांश ‘वातास’ आणि ‘रविप्रकाशाला’ या दोन पदांशीं अन्वित आहे व ही योजना देहलीदीपन्यायानें केली आहे. हें ‘**दीपका**’चें उदाहरण होय.]

इतरां[1] मीच न, होइल मग तापद वीर विप्र काशाला[2]? ॥ ९८
शर कोंदले नभीं[3], वळ त्यांचें अन्योन्यखंडनीं[4] न चले, ।
नच लेश[5] उरे, स्वोत्थज्वलनें[6] होऊनि दग्ध[7] ते खचले. ॥ ९९
उतरी संध्याकाळीं[8] नित्य स्वधनुर्गुणासि[9] कवि **राम**, ।
मूर्छेविना न आम्हांमध्यें, प्रेक्षकजनींहि न, विराम[10]. ॥ १००
म्यां त्या समरमखाच्या[11] प्रारंभीं, स्वगुरुचे सदा चरण ।
अवसानींहि[12] नमावे[13], कीं मज हें बहु रुचे सदाचरण[14]. ॥ १०१
तिसरे दिवशीं[15] केला जो दिव्यास्त्रप्रयोग तच्छमना[16], ।
करिता झालों, राया[17]! कीं मी गुरुदेवभक्त अच्छमना[18]. ॥ १०२
गुरुनें जी पाठविली मग कृत्यासीच[19] शक्ति बा! राजा! ।
ती त्याहि खंडिल्या म्यां आल्या अत्युग्रशक्ति बारा[20] ज्या. ॥ १०३

---

१. मीच (मी भीष्म स्वतः) इतरां (इतर प्रेक्षकांला, इतर पदार्थांला) [ताप देणारा झालों, बाणांची वृष्टि इतकी केली कीं तिजपासून इतर जनांस ताप झाला] मग वीर (शूर) विप्र (ब्राह्मण—माझा गुरु परशुराम) काशाला तापद न होईल? अतिशयेंकरून सर्वांला बाणवृष्टीनें ताप देणारा झाला—असा भाव. आम्ही दोघांनीं इतकी शरवृष्टि केली कीं सूर्याला बाणांनीं आच्छादित करून त्याचे प्रकाशाचा मार्ग बंद केला व एकट्या सूर्याऐवजीं आम्ही दोघे लोकांस तापद झालों. या गीतीचा अर्थ अन्यप्रकारेंही करतां येतोः—वाताला व रविप्रकाशाला मध्यें शिरूं दिलें नाहीं, इतकेंच नव्हे, तर इतर योधालाही मध्यें शिरूं देऊन त्रास होऊं दिला नाहीं. आम्हीं दोघेच कायते लढत राहिलों. मध्यें कोणालाही येऊं दिलें नाहीं. [माझा पक्ष मानानें कमी असून] मीच [जेव्हां] इतरांस तापद झालों नाहीं [तेव्हां] [मानानें व योग्यतेनें मोठा] व वीर विप्र (राम) काशाला [वरें] तापद होईल? म्हणजे मध्यें पडून लढण्याचा इतर योधांला त्रास न देतां आम्हीं दोघेच लढत राहिलों. २. कवितेंत 'कशाला' याच्या ऐवजीं 'काशाला' असें पद योजितात. 'ना दे चित्ता शांति ऐशी विद्या काशाला' [हरिकवि]. ३. नभ=आकाश. ४. परस्परांचा छेद करण्याच्या कामीं. ५. त्या बाणांचा कांहीं एक अंश उरला नाहीं. ६. स्व+उत्थ+ज्वलनें=आपणापासून उत्पन्न झालेल्या अग्नीनें. [अ० १८० श्लो० ३४-३५.] ७. भस्मभूत. बाणाच्या परस्पर अभिघातानें अग्नि उत्पन्न होऊन त्यांचें भस्म झालें व ते खालीं जमिनीवर पडले. ८. संध्याकाळीं युद्ध बंद होत असे. ९. स्व+धनुस्+गुणासि=निज+धनुष्य+दोरीला, प्रत्यंचेला. १०. विश्रांति, खळ. ११. युद्धयज्ञाच्या. १२. अवसान=अंत, अखेर. १३. नमस्कारावे. १४. गुरुचरणप्रणामरूप सदाचार. १५. अध्याय १८० श्लोक ३-४ पहा. १६. तत्+शमना=त्याच्या शांतीकरितां. १७. हे दुर्योधना! १८. स्वच्छ आहे अंतःकरण ज्याचें असा. १९. कृत्या=असुरी देवता, जरीमरी, महामारी. २०. अध्याय १८१ श्लो०५- १० पहा.

पुनरपि सोडुनि शक्ति प्रकटी दिव्यास्त्र तें न कथवे गा ! ।
मद्रथवेग [1]गुरुपुढें किति? करिता रुद्ध [2]भानुरथवेगा. ॥ १०४
खरतर शर प्रकटले जिकडे तिकडे [3]अनंत राजा ! रे ! ।
खंडाव्या किति तरि त्या [4]शक्तिशरतती [5]अनंतरा ज्या रे ! ॥ १०५
[6]सतुरगसारथिरथ मी झालों शुक, [7]गुरुशरौघ पंजरसा, ।
शर शिरकले शरीरीं [8]कंजीं [9]अलि शिरति जेंवि [10]कंजरसा. ॥ १०६
[11]मद्रथरत्नीं शिरले बहुत [12]शिलीमुख जसे [13]कुशलभ [14]वनीं, ।
[15]कीं [16]सर्वस्व हराया [17]तस्कर, बहु ज्या वसे [18]कुशल [19]भवनीं. ॥ १०७
[20]सुरहि [21]मुरडिती 'चुकलों' म्हणउनि, मग कां न कान नर हातें? ।
रे ! काय [22]दवाग्निपुढें पसरूनि [23]दुकान [24]काननन रहातें? ॥ १०८

---

१. परशुरामापुढें माझ्या रथाच्या वेगाची काय कथा? त्याचा बापडा काय टिकाव लागणार? २. [माझा गुरु] भानुरथवेगा (सूर्याच्या रथाच्या वेगालासुद्धां) रुद्ध (बंद, अटकाव) करिता [असा प्रबल आणि प्रतापवान् तो होय]. ३. अगणित, असंख्य. ४. शक्तींचा आणि बाणांचा समुदाय. ५. अंतररहित, दाट, अविरल, निबिड. ६. या गीतींतील वर्णन अतिसुरस आणि मनोहर आहे. ७. गुरूचा शरसमुदाय हा एक पंजर (पिंजराच) झाला, व त्या पंजरांत मी भीष्म तुरगसारथिरथयुक्त असा शुक (पोपटच) झालों. ८. कमळीं. ९. भ्रमर. १०. कंज+रसा=कमल+रसासाठीं=मकरंदा. ११. माझ्या उत्तम रथामध्यें. १२. शिलीमुख=बाण भ्रमर. ['अलिबाणौ शिलीमुखौ' इत्यमरः । शिली शल्यं मुखे यस्य. 'मधुव्रते खगे बाणे शिलीमुखः' इति लिंगाभट्टः.] १३. दुष्ट टोळ. १४. अध्याय १८१ श्लो० १३-१५. १५. किंवा. १६. सकल धन. १७. चोर. १८. कल्याण. १९. गृहांत. २०. सुरहि (देवही) [युद्धकौतुक पाहण्याची इच्छा धरून आपण आलों हें गैर केलें अशा बुद्धीनें] चुकलों (आपण चूक केली) [असें] म्हणउनि [आपला] कान हातें (हातानें) मुरडिती, मग नर (मनुष्य) चुकलों [असें] म्हणउनि कान कां न मुरडिती? अर्थात् मुरडतीलच. हातें कान मुरडणें, चूक कबूल करणें, गैरवर्तन झालें असें समजून स्वतःस शासन लावणें. २१. कान उपटून घेती. २२. वणव्यापुढें. २३. पसारा मांडून ठेवून, सर्व वस्तु उघड्या ठेवून. २४. अरण्य, वन. [दवाग्नीपुढें अरण्याचा नाश व्हावयाचाच.] बाण इतके सुटले व ते आसमंताद्भागीं असे पसरले कीं तें युद्धकौतुक पाहण्यास आलेले देव यांनाही ते बाण लागूं लागले. तेव्हां त्यांना असें झालें कीं, बोलतां सोय नाहीं. त्यांची पांचांवर धारण बसली. ते आपले कान धरून म्हणाले:—केवढा वेडेपणा हा कीं हें युद्ध पाहायाला आलों. आपण मोठीच चुकी केली, असें त्यास झालें. अशी स्थिति जर देवांची झाली, तर मनुष्यांनीं आपले कान कां पिरगाळून घेऊं नयेत? येथें बाण फार सुटले ही गोष्ट सरळ रीतीनें न वर्णितां, पर्यायानें वळसा घेऊन वर्णिली आहे म्हणून

तेंव्हां जें केलें तें कथितों, सादर [1]कथेंत मन घाला, ।
विव्हळ करिता झालों मी मजहुनि फार त्याहि [2]अनघाला. ॥ १०९
उरलों [3]विकळहि होउनि; तिसरा तो वेंचलाचि [4]अस्ता गा! ।
राहे रण; प्रकाशा आटोपुनि [5]मित्रें जाय [6]अस्तागा. ॥ ११०
चवथे दिवशीं [7]संगर [8]संगरहितबुद्धि तो करी, राया! ।
मारुनि [9]मत्सूतातें डसवी [10]शरसर्प शत [11]शरीरा या. ॥ १११
[12]अतितेजस्वीषुवरें मद्धृदया होय तो [13]विदारविता ।
तत्काळ मला आली [14]शशिता त्या [15]युद्धकोविदा [16]रविता. ॥ ११२
स्वरथावरूनि बाणाघातें उसळोनि पावतां पतन, ।
वरिचेवरि [17]भव्यपुरुष आठ करिति सांवरूनि मज जतन. ॥ ११३

---

**पर्यायोक्त** झालें आहे. 'कान मुरडणें' आणि 'चुकलों म्हणणें' हा लोकप्रवादाचा अनुकार आहे म्हणून **लोकोक्ति** अलंकार आहे. 'मग नर कां न कान मुरडिती?' यांत '**काव्यार्थापत्ति**' अलंकार आहे. 'दुकान पसरणें' यांत **लोकोक्ति** आहे. 'दवाग्निपुढें कानन राहतें?' यांत **प्रश्न** अलंकार आहे. उत्तरार्धांत सप्रश्न **दृष्टांत** आहे. ही गीति एकंदरींत सरस व मजेदार उतरली आहे.

१. 'मनामध्यें कथा ठेवा' असें असतां 'कथेंत मन घाला' असें उलट म्हणण्याचा प्रघात आहे व त्याचाच येथें स्वीकार केला आहे म्हणून हा **लोकोक्ति** नामक अलंकार समजावा. २. अघ नाहीं ज्यास=निष्पाप्याला. (परशुरामाला.) ३. गाढविद्ध. [अ० १८० श्लो० १६.] ४. तिसरा दिवस संपला असतां, रण बंद झालें. ५. सूर्य. ६. अस्त+अगा=अस्ताचलास. ७. युद्ध (चवथ्या दिवशीं भार्गवभीष्माचें घनघोर युद्ध पुन: सुरू झालें. अ० १८२ श्लो० १.) ८. युद्धांतच हित आहे ही बुद्धि ज्यास. संगर (युद्ध) हित (कल्याणकारक) आहे अशी बुद्धि ज्याची तो. ९. माझ्या सारथ्यातें. १०. शररूप साप. ११. या माझ्या (भीष्माच्या) देहाला. [शराघातानें माझा सूत मूर्च्छा येऊन खालीं भूमीवर पडला. तो रामबाणप्रपीडित होत्साता थोड्या वेळानें मरण पावला. अध्याय १८२ श्लो० ३-५.] १२. अतितेजस्वी+इषु+वरें=अतिदेदीप्यमान+बाण+श्रेष्ठें=अतितेजस्वी जो बाणश्रेष्ठ त्यानें. १३. विदारण करविणारा. १४. चंद्रता, चंद्रासारखी अतेजस्विता, मंदप्रभा. १५. युद्धाविषयीं निपुणा. १६. सूर्यता. सूर्यासारखी तेजस्विता, तो सूर्यासारखा तेजस्वी दिसला आणि मी चंद्रासारखा हीनतेज दिसलों. १७. महातेजस्वी पुरुष, सूर्यहुताशनप्रभ ब्राह्मणरूपधारी आठ वसु. [अध्याय १८२ श्लोक ११-१४.] भीष्म हा आठ वसूंतील द्युसंज्ञक वसूचा अवतार होय. 'राहेल द्युनामा नरलोकीं बहुत काळ; परि हार । होईल सज्जनांचा; प्रणतार्तीचा करील परिहार. ॥ ५५ ॥ शास्त्रनिपुण, धर्मात्मा, पितृभक्त, ब्रह्मचर्यपर, महित । होइल लोकीं, जोडुनि कीर्ति; कुळाचें करील परम हित ॥ ५६ ॥ याप्रमाणें भीष्माचें वर्णन पंतांनीं अन्यत्र केलें आहे. [आदिपर्व—पृ० ८५.]

ते एकदांचि वदले 'मा भैः स्वस्त्यस्तु ते' असें हित रे! ।
झालों स्वस्थ, सदुक्तें सर्वहि संकट असो कसेंहि तरे. ॥ ११४
त्या विप्रांसि नमुनि म्यां पुशिलें कीं, 'रण पुन्हा करूं निकरें?' ।
बसतों तों माय रथीं आहे मत्तुरगगुण धरूनि करें. ॥ ११५
गंगेसि नमुनि वदलों, 'मत्सारथि तवकृपाकटाक्ष महा, ।
यांचिबळें दिग्गिभांच्या आहे भेदावया कटा क्षम हा. ॥ ११६
आशी तुजी समर्था, स्वन्यूना त्वां इला न लेखावें, ।
देखावें कुतुक, परें देवीसिंहासि काय गे! खावें? ॥ ११७
देवसतींत विमानीं बैसोनि सुखें दुरूनि समर पहा, ।
गुरुवर सारथि ज्याचा त्यासीं भांडुनि म्हणेल अमरप 'हा!' ॥ ११८
वरितील मजचि सुयशें केलीं हरिपादनखसुते! जितकीं, ।
बहु मच्छिरोनिषंगीं गुर्वाशीर्वादशर सुतेजित कीं.' ॥ ११९
'तरसील द्विभुज कसा? यांसिं न समरीं सहस्त्रबाहु तरे, ।

---

१. 'मा भैरिति समं सर्वे स्वस्ति तेऽस्त्विति चासकृत्.' [अ० १८२ श्लो० १५.] २. भिऊं नको, तुझें कल्याण असो. ३. यांत **अर्थांतरन्यास** अलंकार झाला आहे. ४. सरिता, गंगा. ५. मत्+तुरग+गुण=माझे+घोडे+दोऱ्या=माझ्या घोड्यांच्या दोऱ्या. ६. मातेनें तुरगगुण धरण्याचें कारण भीष्माचा सारथी मरण पावला होता. (गीति १११ पहा.) ७. या तुझ्या कृपाकटाक्षाच्या. ८. दिग्गजांच्या. [इभ=गज. 'इभः स्तंबेरमः पद्मी' इत्यमरः.] ९. गंडस्थळा. (कट=गंड). १०. समर्थ. ११. आपणापेक्षां कमी नको मानू. १२. गणावें. १३. इतर सिंहानें. या उत्तरार्धांत **अप्रस्तुतप्रशंसा** आहे. १४. देवांच्या पतिव्रतांमध्यें. १५. गुरुवर=गुरूचा वर म्हणजे आशीर्वाद 'गुरुवर' शब्दाचा प्रयोग कोणतीही विशेष व्यक्ति दाखविण्यासाठीं नसून गुरूचा आशीर्वाद या अर्थीं आहे. सारथि=साहाय्यकर्ता. अर्थः—ज्या पुरुषाला गुरूचा (देशिकाचा) वर (आशीर्वाद) सारथि (साहाय्यकारी आहे) अशाशीं जर अमरप (अमरपति, देवाधिप इंद्रही) भांडेल तर त्याला 'हा!' (हाय हाय) म्हणावें लागेल. यांत **अतिशयोक्ति** नामक अलंकार आहे. १६. इंद्र. १७. 'हाय हाय' असे दुःखोद्गार काढील. १८. हे हरिचरणनखकन्ये. गंगे. १९. जितकीं केलीं आहेत तितकीं सुयशें. २०. माझें शिर हाच निषंग (भाता) यांत. २१. निषंग=भाता. [निषंग='तूणोपासंगतूणीरनिषंगा इषुधिर्द्वयोः' इत्यमरः.] येथें **रूपक** अलंकार झाला आहे. २२. गुरूचे आशीर्वाद हेच शर. २३. अत्यंत तीक्ष्ण, चांगले पाजळलेले, परम तीक्ष्णीकृत. २४. या परशुरामाला. २५. सहस्रार्जुन. कार्तवीर्य याचा पराभव परशुरामानें केला म्हणून परशुरामाला 'हैहयेशप्रमाथी' असें विशेषण लावतात.

बहु झाले या मूर्तप्रलयज्वलनीं पडोनि बा! हुत रे!' ॥ १२०
ऐसें वदे रडे, तनुजप्रेमाचा न आवरे उत, रे! ।
मज आलिंगुनि, हुंगुनि माथां, माता रथावरुनि उतरे. ॥ १२१
सारथ्ययुद्धतांडव शस्त्रास्त्रपयोधरा गुरुसमोर ।
करिता झालों मीच न, केलें म्या स्वर्गगा कुरुस मोर. ॥ १२२
जोडुनि कर, सोडुनि परसर्पप्राणांतका शरा मोरा, ।
झालों विदारिता मी केवळ यमसन्निकाश रामोरा. ॥ १२३
क्षितिसह गुरुतनु कांपे, पावे उल्कांसमेत पतनातें, ।

---

१. मूर्तिमान् प्रलयकाळच्या अग्नींत (परशुरामावर). [येथें जें गंगाभीष्म यांचें संभाषण वर्णिलें आहे त्यास मूळांत फारसा आधार नाहीं. पंतांनीं तें आपल्या चातुर्यानें योजून आपली मनोहर कल्पकता व्यक्त केली आहे. वर्णनविस्तार पंतांनीं या स्थळीं केला आहे हेंही त्यांच्या रसिकतेचें आणि योजनाचातुर्याचें दर्शक होय. २. दग्ध. परशुरामानें एकवीस वेळां क्षत्रियांचा निःपात केला व त्यांत क्षत्रियांचा संहार झाला ही पुराणकथा सुप्रसिद्ध आहे. ३. पुत्रप्रेमाचा. ४. मस्तकाला स्पर्शणें अथवा हुंगणें हें ममतेचें दर्शक आहे. [शिरस्याघ्राणं गुरुजनस्यापत्येषु वात्सल्यद्योतकम्–त्रिपुरारिप्रणीत भावप्रदीपिका-नामक मालतीमाधवटीका–अंक ४ पृ० १०४.] ५. 'माथां' यांतील 'आं' सप्तमीप्रत्यय कवितेंत प्रायः आढळतो; 'त्याचे माथां जटा असो नसो' (तुकाराम.) ६. अध्याय १८२ श्लो० १७ पहा. ७. सारथ्यरूप व युद्धरूप नृत्य. ८. शस्त्रें व अस्त्रें यांचा पयोधर (मेघ) अशा गुरूसमोर (परशुरामासमोर) सारथ्यरूप आणि युद्धरूप तांडव (नर्तन) मीच करितां झालों न (मीच केवळ केलें अशी गोष्ट नाहीं) [तर] स्वर्गगा (स्वर्गांत असणाऱ्या) कुरूस (आमचा पूर्वज जो कुरु नामक सुप्रसिद्ध नृप त्यालाही) म्यां (भीष्में) मोर केलें (मोराप्रमाणें नाचावयास लाविलें, तोही माझें समरकौशल्य पाहून आनंद पावून वीरश्रीनें नाचूं लागला–असें तात्पर्य.! परशुरामाचे शस्त्रास्त्रप्रयोग इतके कांहीं विपुल, चमत्कृतिवह आणि उत्कृष्ट होते कीं त्यांमुळें मलाच नुसती लढण्याची वीरश्री आली असें नव्हे, परंतु माझे वीर कुलपुरुषांस देखील वीरश्री चढली असेल. यांत **उपमागर्भ रूपक** आहे. ९. स्वर्गीं गेलेल्या. १०. शत्रुरूप सर्पांचा प्राणघातक काळ जो बाणरूप मोर त्याला. ११. मोर हा सर्पभक्षक (भुजंगभुक्) आहे. येथें शर आणि मोर यांचा व सर्प आणि प्राण यांचा अभेद वर्णिला आहे म्हणून हें **रूपक** झालें. १२. यमसदृश. १३. रामाच्या उराला. १४. पृथ्वीसहित. १५. गुरूची तनु (शरीर–रामाचा देह). १६. ज्वाला आणि विद्युत्पातादि यांसहित. १७. अध्याय १८२ श्लोक २०-२२ पहा.

रक्षिति[1] सर्वस्वें मुनि सर्व जैसे[2] वृत्तिमंत[3] वैतनातें[4]. ॥ १२४
जलधींत[5] बुडे कीं त्या शकला न सख्यासि अर्क राखाया, ।
मित्रत्व हेंचि, द्याया कीं लागे अन्य शर्करा खाया. ॥ १२५
ऐसें तेवीस[6] दिवस झालें युद्ध त्रिलोकमोहन[7] हो! ।
म्हणतचि होतों 'देवा! समयीं समरक्रतूंत[8] मोह न हो'. ॥ १२६
चिंताकुळ मी निजलों प्रार्थुनि[9] पितृविप्रदेवता, राया! ।
ते पूर्वदृष्ट[10] आले स्वप्नीं मज विप्र[11] देव ताराया. ॥ १२७
वदले[12], 'भिऊं नको गा! भीष्मा! भ्यालासि कां महाबाहो! ।
स्मरसील प्रस्वापन[13], त्या अस्त्रें सिद्ध काम[14] हा बा! हो. ॥ १२८

---

१. मुनि सर्वस्वें (सर्व प्रकारांनीं) [जामदग्न्याला कंप सुटून पतन प्राप्त झालें तेव्हां) रक्षिति (सांभाळूं लागले). परशुरामाला मूर्च्छा आली तेव्हां मुनिजनांनीं त्याचा सांभाळ केला. २. ही **उपमा** आहे. ३. वृत्तिमत्=उपजीविकेस साधनभूत जी जोशीपण, उपाध्येपण इत्यादि नियतवृत्ति ज्याला आहे तो; उदरनिर्वाहाचें साधन ज्याला आहे तो वतनदार. ४. पूर्वार्जित जमीनजुमला इत्यादि. 'वतन' हा फारशी शब्द **पंतांच्या** काव्यांत फार आढळतो. ५. अर्क (सूर्य, मित्र) जलधींत कीं (कारण कीं) त्या सख्यासि राखाया न शकला; द्याया (लागे) हेंचि मित्रत्व, कीं शर्करा बुडे, खाया लागे [तें] अन्य—असा अन्वय. आपल्या सख्याला (परशुरामाला) राखावयास समर्थ झाला नाहीं म्हणून अर्क (मित्र) (सूर्य) पश्चिम सागरांत बुडाला. कांहीं द्याया लागे (दिलें पाहिजे) हेंच मित्रत्वाचें लक्षण होय, एकानें दुसऱ्यास कांहीं दिलें तर तें मित्रत्वाचें लक्षण होय. खाया शर्करा लागे (साखर खावयास लागते) हें अन्य (मित्रेतरत्वाचें—शत्रुत्वाचें) लक्षण होय. साहाय्य देणें होत नाहीं म्हणून दुःखी होऊन सागरांत बुडणारा सूर्य खरा मित्र होय, बाकी जंवर शितें असतात तंवर भूतें हीं शत्रु होत. पूर्वार्धांत **उत्प्रेक्षा** व उत्तरार्धांत **सविरोधार्थांतरन्यास** अलंकार आहे. ६. अध्याय १८२ श्लो० ३० पहा. ७. तीन लोकांस मोह उत्पन्न करणारें. ८. युद्धयज्ञांत. ९. पितर, ब्राह्मण आणि देवता यांना नमस्कार करून. १०. पूर्वीं पाहिलेले. ११. आठ ब्राह्मण. (गीति ११३.) १२. 'उत्तिष्ठ मा भैर्गांगेय! न भयं तेऽस्ति किंचन । रक्षामहे त्वां कौरव्य! स्वशरीरं हि नो भवान् ॥' [अध्याय १८३ श्लोक ९.] १३. झोंप आणणारें अस्त्र. १४. परशुरामाचा पराभव [हे भीष्मा! प्रजापतीपासून प्राप्त झालेलें प्रस्वाप नामक अस्त्र तुला विदित आहे, हें राजाला किंवा अन्य पुरुषाला विदित नाहीं, यास्तव त्याचें स्मरण कर आणि तें परशुरामावर टाक म्हणजे रामाचा पराजय होईल; याच्या योगानें तूं मोठमोठ्या वीरांचें शासन करशील, साक्षात् मृत्यु रामाला कदापि यावयाचा नाहीं, पण रणांत मरण आणि स्वप्न हीं सारखींच होत, यास्तव रणांत निद्रित पडणें हेंच मरण होय—असें वर्णन मूळांत आहे.]

निजला तो मेलाचि, प्रस्वापास्त्रें गुरूसि[1] मार कसा, ।
तारक साचा गमसिल अस्त्रें संबोधनें,[2] न मारकसा.[3]' ॥ १२९
वर्णावा संदनुग्रह[4] किति? झाला फार तो विसावा हो! ।
जागा झालों, आला युद्धाचा दिवस चोविसावा, हो! ॥ १३०
मग तुमुल लोमहर्षण[5] अद्भुत युद्ध प्रवर्तलें बा! गा! ।
झाला असेल कंप क्षितिकंपें क्षितिधरा[6] महानागा.[7] ॥ १३१
पूर्वदिवसप्रहारक्रोधें तो क्षत्रकुलमहाशत्रु[8] ।
बहुशक्ति[9] शक्ति[10] सोडुनि फोडुनि टाकी मदीय हें जत्रु.[11] ॥ १३२
त्रिमलातुलबलसागर[12] घागरभर रक्त ओकवी, राया[13]! ।
तेव्हां मेलाचि असें मानिति जन सर्व लोक वीरा ज्या,[14] ॥ १३३
म्यां रोविला ललाटीं[15] शृंगापरि शर, धरूनि आवांका,[16] ।
कोपें मनांत वदलों, 'गुरुजी! आतां करूनि आ[17] वांका.' ॥ १३४
हाणी[18] गुरु शर कठिनहि,[19] माझें त्या सुकठिना[20] न वक्ष[21] तरे, ।
पडलों क्षितिवरि, जाणों झालें बाळासि तें नव क्षत[22] रे! ॥ १३५

---

१. जामदग्न्याला. २. [प्रस्वाप अस्त्राचा प्रयोग केल्यावर रामाला निद्रा येईल, व जो निजला तो मेलाच असें जरी आहे तरी] संबोधनें अस्त्रें (जागृत करणाऱ्या अस्त्रानें, जागृति उत्पन्न करणाऱ्या अस्त्राचा प्रयोग केल्यानें) तारक साचा गमसिल (तूं खरोखर तारक आहेस असें लोकांला मान्य होईल, खरोखर तारणारा आहेस असें दिसून येईल) न मारकसा [गमसिल]=जीव घेणारा असा कोणासही वाटणार नाहींस. 'ततो जित्वा त्वमेवैनं पुनरुत्थापयिष्यसि । अस्त्रेण दयितेनाजौ भीष्म! संबोधनेन वै ॥' अध्याय १८३ श्लोक १६ असें मूळांत वर्णन आहे तें प्रस्तुत गीत्यर्थास अनुरूप आहे. ३. इतकें (गीति १२८-१२९) भाषण करून ते सदृशरूप आठ द्विजोत्तम अंतर्धान पावले. [अध्याय १८३ श्लोक १९.] ४. संतांचा (विप्रांचा) अनुग्रह (कृपा, दर्शनरूप अनुग्रह). ५. रोमांच उभारणारें, आंगावर कांटा उत्पन्न करणारें, घनघोर. ६. पर्वताला. ७. मोठ्या सापाला, शेषाला. ८. क्षत्रियसमुदायाचा मोठा वैरी जामदग्न्य राम. ९. बहु (मोठी) आहे शक्ति (सामर्थ्य) जिचें (अशी). १०. आयुध. ११. कंठदेश. कंठ आणि भुजा यांतील प्रदेश (जत्रुदेशे=कंठकक्षयोरंतराले—अध्याय १८४ श्लोक ६ टीका.) १२. निरुपम बळाचा सागररूप राम. १३. हे दुर्योधना! १४. ज्याला. असा त्या शक्तीचा प्रभाव होता. १५. ललाटावर शृंग असतें तसा शर. [अध्याय १८४ श्लोक ८-१०.] १६. धैर्य. १७. तोंड पसरून लवा, नम्र व्हा, खालीं मान घाला. १८. मारी. १९. उग्र, घोर, कालांतकोपम. २०. अत्यंत कठिण अशा शराला. २१. उर. त्या घोर बाणानें माझें वक्ष विदीर्ण झालें. २२. जखम. येथें उत्प्रेक्षालंकार झाला आहे.

आली संज्ञा[1], बैसलों स्वरथीं[2], झाल्या विभीत[3] शक्तिमती, ।
मग शक्ति हाणिली म्यां श्रीरामभुजांतरांत शक्तिमती[5]. ॥ १३६
स्वरथावरूनि मूर्च्छित होउनि मुनिवीरमुकुटमणि[6] खचला, ।
उठवुनि सूत म्हणे, 'यश गेलें, कीं खलवधार्थ अणिख[8] चला.'॥ १३७
मोह हरुनि, देउनि कर[9], अकृतव्रण सारथी रथीं चढवी, ।
कढवी क्रोध मनीं बहु, 'योजावें ब्राह्मअस्त्र' हें पढवी. ॥ १३८
ब्रह्मास्त्र योजिलें मग मज भस्म करावया शुचिकथानें[10] ।
जन म्हणति, 'बळें शिशुला पाजावा काय हो! रुचिक[11] थानें?॥ १३९
अनघा बरवा न असा[12] अत्युग्राचार, अननघा बरवा, ।
त्यजिलें अकृपपण पुन्हा स्वीकारुनि, साधुमन न घाबरवा.' ॥ १४०

---

१. शुद्धि. २. भूमीवरून उठून रथारूढ झालों. ३. भयरहित. ४. अध्याय १८४ श्लो० १२-१३ पहा. ५. बलवत्तरा. ६. जामदग्न्य राम. ७. अकृतव्रण. ८. आणखी. ९. कर देउनि=हात देऊन, साहाय्य देऊन. हा **लोकोक्ति** अलंकार होय. १०. शुचि (पवित्र) आहेत कथा ज्याच्या अशा परशुरामानें. ११. रुईचा चीक. जन म्हणति (म्हणतात):—शिशुला (पोराला) बळें (बळजबरी करून) थानें (स्तनानें, स्तनद्वारा) रुचिक (रुईचा चीक) पाजावा काय हो!' पाजणें उचित आहे काय?) येथें अर्थांतरन्यासगर्भित काकु आहे. 'रुचिक' हा सामासिक शब्द शुद्ध मराठी शब्दांचा झालेला असल्यामुळें व्याकरणदृष्ट्या अप्रशस्त नाहीं. १२. असा अत्युग्राचार अनघा बरवा न, अननघा बरवा [होय]. [अहो राम!] त्यजिलें अकृपपण पुन्हा स्वीकारुनि साधुमन न घाबरवा—असा अन्वय. असा अत्युग्राचार (अशा प्रकारचा क्रूरपणा) अनघा (निष्पापजनाला, पुण्यवंताला, अपापाला) बरवा न (उचित नाहीं, योग्य नाहीं). अननघा (पापीजनाला, जो अनघ नाहीं त्याला, अन्+अन्+अघा=न+न+पापा=अघयुक्ताला) बरवा (उचित आहे, जो पापी आहे त्यालाच असें परम भयंकर आचरण उचित होय). [अहो जामदग्न्य!] त्यजिलें (टाकलेलें, क्षत्रियसंहार केल्यानंतर सोडून दिलेलें, क्षत्रियांचा निर्दयपणें विध्वंस केल्यावर टाकलेलें) अकृपपण (निष्कृपत्व, निर्दयत्व, कृपाहीनत्व) पुन्हा स्वीकारुनि (त्याचा आतां पुनः अंगीकार करून) साधुमन (सज्जनाचें हृदय) न घाबरवा (घाबरें करूं नका, व्यथित करूं नका, आपल्या क्रोधाचा आपणांस विसर पडला नाहीं असें दाखवूं नका). या वर्णनांत पूर्वस्वीकृत अकृपपणाची आठवण देऊन कवीनें भयानकरसाचा उत्कर्ष केला आहे म्हणून हा **रसवत्** अलंकार जाणावा. जेथें एखादा रस अन्य अर्थांचें पोषण अथवा पुष्टीकरण अंगभूत होऊन करतो त्या अलंकारास **रसवत्** असें म्हणतात. 'रसो यत्र परस्यांगं स्यात्तत्र रसवान्मतः' [मंदारमरंदचंपू–पृष्ठ १५०.]

गुरुकर्म गुरुप्रिय [1]मी करिता झालों तसा न होत्सा हें।
ब्रह्मास्त्रावरि म्यांहि ब्रह्मास्त्रचि योजिलें म[2]होत्साहें. ॥ १४१
ब्रह्मास्त्रद्वयतेज व्योमीं [3]व्योमगजनां न [4]फटकों दे,।
सर्वत्र तें [5]तृणीकृतकल्पांतरुषितसहस्त्रफ[6]टें कोंदे. ॥ १४२
देवर्षि ब्रह्मर्षि क्षत्र[7]र्षि [8]व्योमभूमिचर सारे।
झाले सुतप्त, गमला हा [9]गुरुहि क्रुद्ध शुद्ध [10]हरसा रे! ॥ १४३
म्हणति [11]नभश्चर, 'आम्हीं सोडुनि कोणीकडे नभा जावें?।
बापा! ब्रह्मास्त्रानें आम्हां शरणागतां न भाजावें.' ॥ १४४
मज पतनीं रक्षाया करिती जे विप्र आठ वेगातें,।
त्यांहीं कथिलें होतें जें [12]प्रस्वापास्त्र आठवे गा! तें. ॥ १४५
'अस्त्र स्मरसील' असा देती ते विप्र आठ वर हा [13]यां,।
तो हेतु होय समयीं [14]यांच्या चित्तास [15]आठव रहाया. ॥ १४६

---

१. मी (भीष्म) गुरुप्रिय (रामाचा आवडता शिष्य) [पण] तसा न होत्सा (पण तसा न होत्साता, गुरूसारखा अत्युग्राचारी न होत्साता) हें (उत्तरार्धांत वर्णिलेलें) गुरुकर्म (मोठें कर्म, भयंकर कर्म साहसी कृत्य) करिता झालों (केलें, गुरूसारखा अत्युग्राचारी न होत्साता ब्रह्मास्त्राच्या नाशासाठीं उलट ब्रह्मास्त्र सोडिलें, गुरुनाशार्थ सोडिलें नाहीं.) [गुरुकर्म करिता झालों=गुरूनें केलेलें कर्म—ब्रह्मास्त्रप्रक्षेपण मीही केलें—असाही अर्थ करतां येतो.] मी गुरुप्रिय [पण] तसा न होत्सा (गुरुप्रिय नव्हे असा, गुरु आहे अप्रिय ज्यास अशा रीतीचा होत्साता, गुरुघ्नाला शोभणारें असें कर्म करणाराचसा) हें गुरुकर्म करिता झालों—असाही अर्थ केला तरी चालेल. २. मोठ्या उत्साहें=मोठ्या नेटानें. [परशुरामानें सोडलेल्या ब्रह्मास्त्राच्या प्रतिघातार्थ भीष्मानेंही उलट ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. अ० १८४ श्लो० १५-१७.] या अर्थांत 'होत्सा' हें रूप चिंतनीय व स्मरणीय आहे. ३. आकाशगामीजनाला. ४. व्योमगजनांचा बाहेर फिरण्याचा व्यापार बंद पडला. ५. तृणीकृत (तुच्छ केला)+कल्पांत (प्रलयकाळचा) रुषित (रुष्ट झालेला) सहस्रफट (हजार फणांचा शेष) ज्यानें असें (तेज)=तृणवत् तुच्छकृत आहे कल्पांतींचा क्रुद्ध सहस्रफण शेष ज्यानें असें. ६. प्रलयकालीं शेषाच्या मुखांतून अग्निज्वाला उत्पन्न होऊन अतलादि एकादश भुवनांचें भस्म होतें—असें वर्णन आहे. प्रलयकालच्या शेषाला ज्यानें तृणतुल्य केलें आहे असें (तेज). [या तेजानें सकल प्राणिमात्रास पीडा झाली, पृथ्वी पर्वतांसह कांपली, आकाश पेटूं लागलें, दशदिशा धूमव्याप्त झाल्या, आकाशगामीजनास अंतरिक्षांत राहण्याचें सामर्थ्य राहिलें नाहीं, सर्वत्र हाहाकार झाला. अ० १८४ श्लो० १८-२२.] ७. राजर्षि. ८. आकाशांत व भूमीवर चालणारे. ९. जामदग्न्य रामसुद्धां. १०. शंकरसा. ११. आकाशगामी जन. १२. प्रस्वापसंज्ञक अस्त्र (जें सोडिलें असतां सर्व वीरांस निद्रा यावी) तें. (गीति १२८ पहा.) १३. या भीष्माला. १४. या भीष्माच्या. १५. स्मरण, आठवण.

प्रस्वापनप्रयोगीं रामाचे बाण ते जन पहाते ।
जे व्योमगत महीगत म्हणति सकळ जाणते जनप[1] 'हा[2]!' ते. ॥ १४७
प्रस्वापनप्रयोगोपक्रम[3] करितांचि साधु[4] सुर[5] सारे ।
मज म्हणति, 'पारिजातेंहि[6] न लंघावें कदापि सुरसा[7] रे!' ॥ १४८
नारद[8] म्हणे, 'करावा न प्रस्वापप्रयोग, शांतनवा[9]! ।
कां क्षोभलासि बहु तूं? जन्माचा शांत कीं न शांत नवा[10]? ॥ १४९
कैसाहि असो गुरु, बहु मान्यचि, चित्तेंहि लंघ्य न भल्याला[11], ।
पूज्यचि दक्षमखांतक[12] जन्हि अस्थि[13] भुजंग भस्म नभ[14] त्याला. ॥ १५०

---

१. जनाचें पालन करणारे राजे (लोकपाल). २. हाय हाय. ३. आरंभ. ४. सज्जन. ५. देव. ६. पारिजातकानें, पारिजातक नामक देववृक्षानें सुद्धां. [पारिजात=पारिणोऽब्धेर्जातः=पारिजातः, ततः स्वार्थे कन् । पारिजातः समुद्रः तत्रभवः पारिजातकः । पारि पारं मतं जातं जन्मास्य । पारिणः समुद्राज्जातो वा । स्वार्थे कन्.] पारिजातक नांवाच्या कल्पवृक्षानें सुद्धां) सुरसा (रास्ना नामक लता, मुंगुसवेल) लंघावें न (तिचें उल्लंघन करूं नये) सर्व वृक्षांत पारिजात श्रेष्ठ व इतर वनस्पती त्यापुढें तुच्छ होत, तथापि पारिजातानें तिचा अपमान करूं नये. ७. सुरस=मुंगुसवेल. प्रस्वापनप्रयोगोपक्रम करितांचि मज सारे साधु [व] सुर म्हणतिः—'रे! पारिजातें कदापि सुरसा न लंघावें–असा अन्वय. परशुरामावर भीष्मानें प्रस्वापन (गाढ झोंप आणणारें) अस्त्र सोडलें, तेव्हां सर्व चांगले लोक व देव मला भीष्माला म्हणालेः—रे! पारिजातानें देखील सुरसाचा (मुंगुसवेलीचा) अपमान कधींही करूं नये. 'सुरस' या पुल्लिंगी शब्दाच्या द्वितीयेचें 'सुरसा' हें सामान्यरूप समजावें. 'सुरस' हा शब्द पुल्लिंगी व स्त्रीलिंगी असा उभयलिंगी कोषांत आढळतो. पारिजाताला नाजुक व मधुर सुगंध आहे व 'रास्ना=सुरस' वनस्पतीलाही एक प्रकारचा सुगंध आहे. तेव्हां पारिजात व सुरस या शब्दयोजनेनें भीष्म व परशुराम या दोघां वीरांचा निर्देश करण्याचें पंतांनीं मनांत योजिलें असावें. परशुराम (सुरस) हा भीष्म (पारिजात) याहून एका दृष्टीनें श्रेष्ठ असल्यामुळें त्याजवर भीष्मानें प्रस्वापनप्रयोग करावयाचा नव्हता. जसें पारिजात व सुरस यांजमध्यें गंधसाधर्म्य आहे तसेंच भीष्म व परशुराम यांमध्यें वीर्यसाधर्म्य आहे हें सुचविण्यासाठीं येथें **प्रतिवस्तूपमे**चा उपयोग केला आहे. उत्तरार्धांत 'लंघावी' असा पाठ सर्वसंग्रहकारांनीं धरला आहे, पण जुनाट हस्तलिखित प्रतींत 'लंघावें' असा पाठ आहे व तोच येथें घेतला आहे. हा पाठ उपमानोपमेयादि समानलिंगक व समानविभक्तिक असावींत असा जो साहित्यशास्त्रकारांचा नियम आहे त्यास अनुरूप आहे. ८. अध्याय १८५ श्लो० २-३ पहा. ९. हे भीष्मा! हे शांतनुपुत्रा! १०. तूं जन्मतःच शांतिप्रिय आहेस, तूं आतां नूतन शांतिसंपन्न आहेस असें नाहीं. ११. भल्यानें मनानें देखील गुरुलंघन करूं नये. १२. सदाशिव. १३. अस्थि (हाडें) भुजंग (साप) भस्म (राख) नभ (आकाश) याचें परिधान केलें तरी तो दक्षमखांतक (दक्षाच्या

अवमान[1] स्वगुरूचा त्वां न करावाचि, हा असामान्य[2] ।
ब्रह्मण्य[3] ब्राह्मण हा लोकीं तापस[4] नसे असा मान्य. ॥ १९१
गुरुचरणावरुनि सदा वोवाळुनि सांडिती असु[5] ज्ञाते, ।
सुज्ञा[6] हरिहरसे[7] जे गुरुचरण न मानती[8] असुज्ञा ते[9].' ॥ १९२
ते गगनग[10] अष्ट पुरुष वदले[11], 'देवर्षिवच[12] न मोडावें, ।
जोडावें यश, भीष्मा! त्वां न प्रस्वापनास्त्र सोडावें.' ॥ १९३
तें ऐकुनि म्यां केलें ब्रह्मास्त्राचें पुनःप्रदीपन[13], गा! ।
रामास भासलों मी कल्पांतींचा[14] जसा[15] नदीप[16] नगा[17]. ॥ १९४
राम दिसे विप्रभ[18], तें अद्भुतचि, जसा रवि प्रभा वमला[19], ।
निंदूनि म्हणे[20], 'कळला आतांचि असार[21] विप्रभाव[22] मला.' ॥ १९५

---

यज्ञाचा अंत करणारा शंकर) पूज्यचि (वंदनीयच) होय. [शंकरानें आपला श्वशुर दक्ष-प्रजापति याच्या यज्ञाचा विध्वंस केला—अशी कथा सुप्रसिद्ध आहे. शंकर नग्न असतो, हाडांचें आणि सापाचे वेंटाळें गळ्यांत लटकवितो व आंगाला भस्म लावतो—अशी प्रसिद्धि आहे.] १४. नभोरूप अंबर—वस्त्र (नग्न).

१. अध्याय १८५ श्लो० ४ पहा. २. लोकोत्तर, अद्वितीय. ३. ब्राह्मणभक्त. ४. मुनि. ५. प्राण. ६. जे गुरुचरण (गुरुपाद, आचार्यपाद) हरिहरसे (हरि व हर यांसारखे) सुज्ञा (सुज्ञ पुरुषाला वंदनीय व मान्य वाटतात) ते (गुरुचरण) असुज्ञा (मूर्खाला) न मानती (मान्य वाटत नाहींत) पूर्वार्धांत 'वरून असु वोवाळून सांडणें' या लोकप्रवादाचा अनुकार केला आहे म्हणून ही **लोकोक्ति** होय. गीति १४९-१५२ यांत नारदोक्ति आहे. ७. हरि=कामतात, हर=कामारि. 'यौ तौ शंखकपालभूषितकरौ मालास्थिमालाधरौ देवौ द्वारवतीस्मशाननिलयौ नागारिगोवाहनौ। द्वित्र्यक्षौ बलिदक्षयज्ञमथनौ श्रीशैलजावल्लभौ पापं वो हरतां सदा हरिहरौ श्रीवत्सगंगाधरौ ॥' [सुभाषितरत्नभांडागार—पृ० २०श्लो० ६ पहा.] [गुरुचरण हे हरिहर यांच्या समान होत असें वर्णन पूर्वींही आलें आहे. गीति ८० व गीति ५७ पहा.] ८. न मान्य होती. ९. ते गुरुचरण. १०. गगन+ग=आकाश+गामी=आकाशगामी. ११. 'यथाह भरतश्रेष्ठ नारदस्तत्तथा कुरु । एतद्धि परमं श्रेयो लोकानां भरतर्षभ! ॥' [अध्याय १८५ श्लोक ६.] १२. नारदाचें वचन. १३. पुनः पेटवून प्रतिसंहार केला. १४. प्रलयकालचा. १५. ही **उपमा** आहे. कल्पांतींचा नदीप (नदीपति—समुद्र) जसा नगा (पर्वताला) [भासला] तसा मी भासलों—असा अन्वय. १६. सागर. १७. पर्वतास. १८. निस्तेज. १९. ज्याप्रमाणें सूर्यानें आपली प्रभा टाकून द्यावी त्याप्रमाणें परशुराम हीनप्रभ दिसला. प्रभा वमणें=कांति टाकणें, तेज सोडून देणें. २०. 'जितोऽस्मीति भीष्मेण सुमंदबुद्धिरित्येव वाक्यं सहसा व्यमुंचत्' [अ० १८५ श्लो० ८.] भीष्मानें या सुमंदबुद्धि अशा माझा पराजय केला असें राम म्हणाला. २१. निःसत्व, व्यर्थ. २२. ब्राह्मणत्व.

जमदग्निप्रमुखपितर रामातें म्हणति, 'काय हा निकर[१]? ।
वत्सा! तुज अनुचित हा पर[२]धर्म स्व[३]परकायहानिकर. ॥ १५६

दि[४]सतोसि [५]शीतकरसा, हा [६]समरग्रीष्म, भीष्म हा तपन, ।
हा तपनसा तसा तूं, परि म्हणवी सेविल्यासि हा '[७]तप न.' ॥ १५७

हा देव कीं [८]सुरनदीनंदन आठां वसूंत [९]अन्यतम, ।
[१०]तुज जिंकुनि भीष्म जसा वांचुनि झालासि तूंहि [११]धन्यतम! ॥ १५८

[१२]यांचा मृत्यु [१३]विधिविहित, [१४]शक्रसुत [१५]नरावतार जो [१६]भावी, ।
[१७]परशक्ति यापुढें, जसि न रविपुढें [१८]दीपदीप्ति शोभावी. ॥ १५९

[१९]सिंधूंसि जेंवि मानव बाहुबळें तेंवि [२०]यांसि न [२१]परें तरे, ।
येथुनि [२२]परत, मग करुनि हठ, मठ सांडुनि, कदापि न परत, रे!'॥ १६०

---

१. लढाईची धुमश्चक्री, साहस. २. क्षत्रियधर्म. ३. आपले व दुसऱ्याचे शरीराचा नाश करणारा. ४. [हे परशुरामा! तूं] शीतकरसा (चंद्रासारखा निस्तेज) दिसतोस, [आणि] हा समर (संग्राम) ग्रीष्म (ग्रीष्मऋतु होय) भीष्म हा तपन (सूर्य) [होय]; हा (भीष्म) तपनसा (सूर्यासारखा अत्युग्र) तसा (त्याप्रमाणें हे रामा!) तूं (तूंही आहेस) परि (परंतु तुझ्या व त्याच्यामध्यें भेद आहे, तो असा) हा (भीष्म) सेविल्यासि (त्याचें सेवन करणाऱ्याला, त्याच्या सेवकास त्याच्या आश्रितास) 'तप न' (तापूं नको, संतप्त होऊं नको) [असें] म्हणवी. [परशुराम निस्तेज असून सेविल्याला ताप उत्पन्न करणारा आणि भीष्म तेजःपुंज असून सेविल्याला तापूं नकोस असें म्हणणारा–असें तात्पर्य.] ५. चंद्रसा. ६. समर हाच ग्रीष्मर्तु त्यांत भीष्म हा सूर्य. ७. तापूं नको. ८. गंगासुत. ९. अष्टौ वसूंमध्यें कोणताही एक हा आहे. १०. तुज (तुला रामाला) जिंकुनि (पराजित करून) जसा भीष्म (गांगेय) धन्यतम झाला. तसा तूंहि वांचुनि (जीवंत राहून) धन्यतम झालासि– असा अन्वय. ज्याप्रमाणें भीष्म हा तुला जिंकिल्यामुळें धन्यतम झाला त्याप्रमाणें तूं देखील त्याच्या तडाक्यांतून वांचून जीवंत राहिलास म्हणून धन्यतम. हा उपहासाचा चांगला मासला आहे. ११. धन्यतम=यांत 'तम' हा प्रत्यय गुणाधिक्यदर्शक आहे. बहुत पदार्थांमध्यें एकाच्या अंगीं विशेषणप्रदर्शित गुण अधिक आहे असें 'तम' या प्रत्ययानें समजतें; जसें:–कृष्णतम (सर्वांत काळा), युवतम (सर्वांत तरुण). [गोडबोलेकृत–मराठी भाषेचें नवीन व्याकरण–कलम १५४ पृ० ५६.] १२. भीष्माचा. १३. ब्रह्मदेवानें नियमित. [अध्याय १८५ श्लोक १९-२०.] १४. इंद्रपुत्र. १५. नराचा अवतार (नर, पुरंदरसुत=अर्जुन). १६. होणारा. १७. दुसऱ्याची शक्ति (बल). १८. दिव्याची कांति. १९. सागराला. २०. भीष्माला. २१. शत्रु. २२. माघारा फीर. रे (परशुरामा!) येथुनि (या समरांगणांतून) परत (माघारा जा), मग हठ (हठयोगसाधन) करुनि, मठ सांडुनि (आश्रमाचा त्याग करून) कदापि (कधींही) न परत. परशुरामानें समर करावयाचें सोडून देऊन, हठयो

राम निवृत्त[1] न होतां, मत्पितर[2] म्हणति मला, 'अगा[3] साधो!' ।
तुज निजधर्मौदार्यें यश, हें न स्वर्गगा[4] अगा[5] साधो[6]. ॥ १६१
राम तुजा गुरु, याचा रक्षावा मान, मानदा[7]! मानीं, ।
बांधीं बाहुगुणांनीं[8] दक्षा[9] वामा[10] न मान दामांनीं[11].' ॥ १६२
वदलों, 'क्षत्रिय मी कां परतेन[12] प्रथम, धर्म सोडूनी?' ।
राम म्हणे, 'ध्यावी[13] म्यां कीं शिष्यें हार हात जोडूनी?' ॥ १६३
न मना ये जें[14] असकृत् कथिति पितर इतर नारदादिहि तें, ।

---

गसाधन करावें व एकदां मठ करून बसल्यावर तेथून पुनः क्षात्रव्यवसायाकडे वळूं नये–असें तात्पर्य. गीति १५६-१६० यांत जमदग्निप्रमुख पितरांचा परशुरामास उपदेश आहे.

१. युद्धापासून मी कधींही परत जाणारा नाहीं असें रामानें उत्तर दिलें तेव्हां. [अध्याय १८५ श्लोक २३.] २. माझे पितर (ऋचीकप्रमुख मुनि). ३. हे साधो! ४. स्वर्गांतील, स्वर्गस्थ. ५. कल्पवृक्षाला. ६. प्राप्त होवो, लाभो, मिळो. ७. [हे] मानदा! (मान राखणाऱ्या भीष्मा!) राम तुजा (तुझा) गुरु [आहे], याचा मान रक्षावा. [एवढें बोलणें] मानीं (मान्य कर). दक्षा (चतुर, कुशल) वामा (स्त्री) [पतीची आपल्या प्रियाची] मान (कंठ) बाहुगुणांनीं (भुजरूप दोऱ्यांनीं बाहुपाशांनीं) बांधी (बांधते) न दामांनीं (दाव्यांनीं, दोऱ्यांनीं बांधीत नाहीं) [हे भीष्मा! राम हा तुझा गुरु आहे याचा अपमान करूं नको, एवढें आमचें मागणें मान्य कर. वल्लभानुनयपटु स्त्री आपल्या पतीची मान हस्तरूप गुणांनीं बांधते, खरोखरीच्या दोऱ्यांनीं बांधीत नाहीं.] यांत उपमागर्भ **अर्थांतरन्यास** आहे. ८. बाहुरूप रज्जूंनीं. ९. चतुर स्त्री. १०. वामा=वनिता, महिला. [वमति स्नेहमिति वामा । यद्वा वामः कामोऽस्त्यस्याः सा वामा । 'वामं धने हरे पुंसि कामदेवे पयोधरे । वल्गुप्रतीपसव्येषु त्रिषु नार्यां स्त्रियाम् ॥' इति मेदिनी.] ११. दाव्यांनीं. १२. युद्धविमुख होईन. [लोभानें, कार्पण्यानें, भयानें अथवा अर्थकारणानें मीं कदापि युद्धापासून परत जाणार नाहीं, आपला शाश्वत धर्म सोडणार नाहीं. अध्याय १८५ श्लोक २५-२७.] १३. म्यां (रामें) [हात जोडूनी हार] ध्यावी कीं (किंवा) शिष्यें (शिष्यानें–भीष्मानें) हात जोडूनी (नमस्कार करून) हार ध्यावी. हार घेणें=पराजय पत्करणें, मी जित झालों असें म्हणणें. १४. जें पितर [आणि] नारदादि इतरहि असकृत् (वारंवार) कथिती (उपदेशिती) तें मना न ये (मनाला रुचलें नाहीं) क्रोधिहृदय गुर्वक्षर मोडी कीं लाडिकें लिहितें मूल [गुर्वक्षर मोडी]–असा अन्वय. पितर (आठ वसुविप्र) आणि नारदप्रमुख तापस यांनीं जो बोध वारंवार केला तो मनाला आवडला नाहीं. (युद्धविमुख होण्याचा अथवा क्षत्रियधर्मास अनुचित असें आचरण करण्याचा बोध मनास आला नाहीं) क्रोधिहृदय (ज्याचें हृदय क्रुद्ध झालें आहे असा पुरुष (येथें भीष्म) अथवा शिष्य) गुर्वक्षर (गुरु+अक्षर=आचार्य+शब्द=गुरूचें म्हणणें, गुरुवचन, गुरुशब्द) मोडी (मोडित, मानीत नाहीं) कीं (किंवा) लाडिकें (आवडतें, प्रिय, प्रेमपात्र झालेलें) लि-

क्रोधिहृदय गुर्वक्षर मोडी कीं मूल लाडिकें लिहितें? ॥ १६४
झालों रणविमुख न मी, विनविति जन्हि मुनि, धरूनि[1] मद्धनुतें[2], ।

हितें (लिहिणारें, लिहावयास शिकणारें) मूल (लहान अर्भक) गुर्वक्षर (गुरूनें पाटीवर लिहून दिलेलें अक्षर) मोडी (मोडितें) [गुरूनें मुलाला शिकवितांना पाटीवर अक्षरें लिहावीं आणि लाडक्या शिकणाऱ्या मुलानें तीं अक्षरें पुसून टाकावीं, गुरून पुनः मूळाक्षेर लिहून द्यावीं आणि मुलानें रागानें पुनः पुसून टाकावीं—असा पंतोजीचा आणि मुलाचा क्रम चालला असतो त्यास अनलक्षून हें वर्णन आहे. नारदादिक तापसांनीं पुनः पुनः उपदेश करावा आणि भीष्मानें त्याप्रमाणें वागूं नये असा प्रकार चालला होता.] ज्याचें हृदय संतप्त झालें आहे तो गुर्वक्षराचा (गुरुशब्दाचा) अव्हेर करतो अथवा लाडकें लिहिणारें मूल गुरूनें लिहून दिलेलें अक्षर मोडून टाकतें. [पितरांचें व नारदादिक तापसांचें म्हणणें मनास आलें नाहीं असें पूर्वार्धांत भीष्म म्हणतो. ज्याचें हृदय क्रोधानें व्यापिलें आहे अथवा जो क्रोधाविष्ट झाला आहे तो गुर्वक्षराचा (गुरुवचनाचा) मान राखीत नाहीं किंवा जो लाडका मुलगा आहे तो गुर्वक्षराची पर्वा न करतां तें (गुरुलिखित मूळाक्षर) मोडून टाकितो—असे दोन सामान्य सिद्धांत उत्तरार्धांत योजिले आहेत. येथें पूर्वार्धघटित अर्थाची सिद्धि उत्तरार्धांतील सामान्य सिद्धांतानें केली आहे म्हणजे सामान्य अर्थानें विशेष अर्थाचें समर्थन केलें आहे म्हणून हा **अर्थांतरन्यास** नामक अलंकार होय. भीष्म म्हणतोः—माझें मन क्रोधाविष्ट होतें म्हणून गुर्वक्षराचा त्याग केला. पण हें म्हणणें भीष्माला उचित नाहीं, कारण येणें-करून तो अविचारी, दांडगा होता असें निष्पन्न होईल. हें हानिकारक सामान्य वर्णन टाळण्यासाठीं पंत लगेच दुसरें सरस सामान्य वर्णन करतात. रागावलेल्या भीष्मानें गुर्व-क्षराचा अनादर केला असें म्हणण्यांत उदात्तधी व विमलचरित भीष्माकडे कमीपणा येतो तो टाळावा म्हणून पंत म्हणतातः—लाडका शिष्य जो भीष्म त्यानें गुर्वक्षराचा अनादर केला, लाडक्या शिष्यानें गुरुलंघन केलें तरी तो प्रकार क्षम्य आहे, कारण तो लाडकाच पडला म्हणून शासनास अथवा दोषास पात्र नाहीं. येथें पंतांनीं दोन दृष्टांत देऊन अर्थ व्यक्त करण्याचा यत्न केला आहे. एकादी उपमा अथवा दृष्टांत सरस आणि समर्पक नाहीं तर त्याच्या ठिकाणीं दुसरी तिसरी उपमा देऊन अर्थव्यक्ति करण्याची पंतांची हातोटी सुप्र-सिद्ध आहे. याच विधानाचें प्रस्तुत पद्य हें उदाहरण होय. याचें अन्य उदाहरणः—सौभद्र म्हणे, 'शिरतों व्यूहीं डोहीं जसा मतंगज वा। हरिपोत दंतियूथीं कीं दहनीं करुनियां पतंग जवा. ॥' या पद्यावरून व इतर कांहीं पद्यांवरून पंत हे अतिशयित त्वरित पद्यरचना करीत असावे अस वाटतें. तसेंच त्यांच्या मनांत आलेला विचार हा पद्यरूपानेंच बाहेर निघत असावा, नाहीं तर दुसरी सरस वाटणारी उपमा राखून नीरस वाटणारी पहिली उपमा त्यांनीं आपल्या काव्यांत ठेविली नसती, तिला फांटा दिला असता.]

**१. माझ्या हनुतें धरूनि=आर्जव करून, प्रार्थना करून. २. मत्+हनुतें=माझ्या हनुवटीतें.**

गुरुकरवीं विज्य[1] बळें करविति अनिवर्तिकीर्तिमद्धनु[2] तें. ॥ १६५
म्हणति, 'प्रणति गुरुप्रति कर' मज ते मूर्त आठ वेदेशै[3], ।
रामें प्रथम स्वधनु त्यजिलें तो नित्य[4] आठवे देशीं[5]. ॥ १६६
मन्माताहि म्हणे, 'रे! हो[6] न यशोहानि वाँसरा[7]! मन मी ।
किति तरि समजावूं? निर्जभव्याचा[8] हा निवास राम नमीं.' ॥ १६७
पहिल्यापासुनि गुरुवाग्ग्रहणीं सादर मंदीय[9] कान मन, ।
मग धर्मयशस्कर[10] गुरुचरणासि करीन मी न कां नमन? ॥ १६८
धांवूनि पाय धरितां[11], आशीसूक्तें सुखें वेदे[12], हातें ।

---

१. वि+ज्या=विगत+चापगुण—ज्याची दोरी सुटली आहे असें (धनु) दोरीनें रहित असें. [ज्या=धनुष्याची दोरी. 'मौर्वी ज्या शिंजिनी गुणः' इत्यमरः. 'ज्या मौर्वी ज्या वसुंधरा' इति शाश्वतः.] २. अनिवर्ति+कीर्तिमत्+धनु=अचल+यशस्वी+चाप=ज्याची कीर्ति अचल आहे असें धनुष्य. [भीष्म हा तुला अवध्य आहे व तूंही भीष्मास अवध्य आहेस असें बोलून रामाच्या पितरांनीं ऋचीकप्रमुख मुनींनीं रामाकडून रणाजिरामध्यें शस्त्र ठेवविलें—असें वर्णन आहे. अध्याय १८५ श्लोक २३-२१.] मज (मला भीष्माला) मूर्त (मूर्तिमान्) वेदेश (विप्र) म्हणति (म्हणाले) [हे भीष्मा!] गुरुप्रति (परशुरामाला) प्रणति (नमस्कार, प्रणाम) कर. ३. वेद+ईश=वेद+स्वामी=आठ ब्रह्माणादी वसुदेव, वेदपुरुष. ४. यांत **भाविक** अलंकार झाला आहे. जेथें भूतार्थाच्या किंवा भाव्यर्थाच्या साक्षात्काराचें वर्णन केलें असतें तेथें **भाविक** अलंकार होतो. याचें लक्षणः—(१) भाविकं भूतभाव्यर्थसाक्षात्कारस्य वर्णनम् । अहं विलोकयेऽद्यापि युध्यन्तेऽत्र सुरासुराः ॥ [कुवलयानंद], (२) प्रत्यक्षत्वेन कथनमतीतार्थस्य भाविकम् ॥ अद्यापि तन्मम दृशोर्धुरि वर्तते यद्रात्रौ मयि क्षुतवति क्षितिपालपुत्र्या । जीवेति मङ्गलवचः परिहृत्य वेगात्कर्णेऽपि तं कनकपत्रमनालपन्त्या ॥ १८८ ॥ द्वितीयं भाविकं भूतं मानसत्वेन वर्ण्यते । हृद्यद्यापि वरीवर्ति राधा यदकरोद्रते । [मंदारमरंदचंपू—व्यंग्यबिंदु १० पृ० १४६.] (३) प्रत्यक्षा इव यद्भावाः क्रियंते भूतभाविनः । तद्भाविकम्. [काव्यप्रकाश], (४) अतीतानागतयोः प्रत्यक्षायमाणत्वं भाविकम्. [अलंकारसर्वस्व—पृष्ठ १७८.] या अलंकाराचें अन्य उदाहरणः—स्मरतें कीं तें जें श्रीगुरुदाराहींच इंधनानयना? । पाठविलें विपिनाला, माझ्या दिसतें तपोधना नयना. ॥ ५७ ॥ [काव्यसंग्रहग्रंथमाला—कृष्णविजय—उत्तरार्ध—अध्याय ८० पृष्ठ २२५]. प्रकृत आर्येत झालेल्या गोष्टींचा साक्षात्कार सांप्रतही होत आहे असें 'नित्य आठवे' या वर्णनावरून होते म्हणून **'भाविक'** अलंकार झाला आहे. ५. ठिकाण. ६. व्हावी. ७. हे वत्सा! ८. आत्महिताचा. ९. माझे. १०. धर्म आणि यश यांतें करणारे, पुण्यकीर्तिप्रद असे (चरण). ११. पाय धरणें=हातांनीं पाय धरणें=शरण जाणें, नमस्कार करणें. १२. येथें 'वदे' 'स्पर्शे' आणि 'दे' या तीन क्रियांचा अन्वय 'मद्गुरु' कर्तृपदाशीं आहे म्हणून हा **'कारकदीपक'** अलंकार समजावा.

स्पर्शे माथा, मद्गुरु निववाया दे [1]सुखेंव देहातें. ॥ १६९
प्रेमें असें [2]म्हणे, 'या लोकीं या भार्गवीं [3]रविप्रतिमीं ।
त्वां तेज मिरविलें बहु, तेजस्वी न वदलों रविप्रति मी.' ॥ १७०
झाली व्हावी [4]प्रीती [5]श्रीदाच्याही न जी [6]वितरणांत, ।
करिती उदारजीवित ऐसेंचि, न हीनजीवित, रणांत. ॥ १७१
मृत्युपरीस परिभवापासुनि बहुतचि भिती, परि [7]भवातें ।
प्रार्थुनि मागति [8]पुत्रच्छात्रापासुनि भले परिभवातें. ॥ १७२
वे माझ्या [9]आशी [10]यां [11]सर्वाहितहरिणवागुरा, बाजा ।

---

१. क्षेमालिंगन. २. [राम मला भीष्माला] प्रेमें असें म्हणे:–[हे भीष्मा!] या लोकीं या रविप्रतिमीं भार्गवीं त्वां बहु तेज मिरविलें; मी (राम) रविप्रति तेजस्वी न वदलों–असा अन्वय. अर्थ—जामदग्न्य राम प्रेमानें मला असें म्हणाला:–हे भीष्मा! या लोकांत सूर्यतुल्य असा जो मी भार्गव त्या माझ्या तेजापेक्षां तुझें तेज अधिक असें तूं भासविलेंस; मी सूर्याला तेजस्वी असें कधींही मानिलें नाहीं, परंतु तूं तेजस्वी आहेस असें मानणें भाग आहे, या लोकांत तूं मजपेक्षां मोठा पराक्रम गाजविलास–असें तात्पर्य. मूलांत असें आहे:–'त्वत्समो नास्ति लोकेऽस्मिन् क्षत्रियः पृथिवीचरः । गम्यतां भीष्म! युद्धेऽस्मिंस्तोषितोऽहं भृशं त्वया' ॥ [अध्याय १८५ श्लोक ३६.] ३. सूर्यसदृशीं. ४. माझ्या व रामाच्या मध्यें प्रीति पुनः उत्पन्न झाली. ५. श्री देणाऱ्या कुबेराच्याही. ६. दानांत. जी प्रीति श्रीदाच्याही वितरणांत न व्हावी [ती] झाली=जी प्रीति कुबेराच्या धनौदार्यानें उत्पन्न होऊं नये ती प्रीति आम्हा उभयतांमध्यें उत्पन्न झाली. उदारजीवित (उदारचरित पुरुष) ऐसेंचि रणांत (ह्या प्रकारचेंच प्रशंसनीय वर्तन रणामध्यें) करिती (करून दाखवितात) हीनजीवित (पुरुष) न [करिती]. येथें परस्परविरुद्धस्वभाव अशा दोन प्रकारच्या पुरुषांचें वर्तन कसें असतें हें वाचकांस कळविलें आहे. ७. शंकरातें. ८. पुत्र व शिष्य यांजपासून परिभव व्हावा असें भले जन शंकराला प्रार्थून मागून घेतात. [छात्र शिष्य । 'छात्रांतेवासिनौ शिष्ये' इत्यमरः । गुरु दोषाच्छादनं छत्रम्, तच्छीलमस्य स छात्रः] 'सर्वत्र जयमन्विच्छेत्पुत्रादिच्छेत्पराभवम्' असें एक सुभाषितार्ध सुप्रसिद्ध आहे. ९. आशीर्वाद. १०. या (आशी) सर्वाहितहरिणवागुरा (सर्व+अहित+हरिण+वागुरा=सकल+शत्रु+मृग+मृगबंधिनी, मृगांला अडकाविण्याच्या दोऱ्या) [आहेत]. [या आशी] स्वर्वल्लिमंडपींच्या (स्वर्+वल्लि+मंडपींच्या=स्वर्ग+लता+मंडपाखालच्या) बाजा (शय्यामंचक) [होत]. ज्या [आशी] वा! (भीष्मा!) भवसिंधूंतील गुराबा (संसारसागरांतून तरून जाण्याच्या नौका) [होत]. या गीतींत आशी व वागुरा, बाजा, गुराबा ह्यांचा अभेद वर्णिला आहे. हा **रूपक** अलंकार होय. पहिल्या **रूपकालंकारानें** सर्व शत्रूंस मृगांप्रमाणें पाशबद्ध करून जिंकशील असा आशीर्वाद दिला, दुसऱ्या **रूपकानें** कल्पलतेप्रमाणें सर्वमनःकामना सफल करशील आणि तिसऱ्या **रूपकपदानें** मोक्षपदास जाशील असे हे आशीर्वाद दिले

स्वर्वल्लिमंडपींच्या, भवसिंधूंतील बा! गुराबा ज्या. ॥ १७३
नमन पुरे, संकोचासह अंजलि वसवसाहि सोडावा; ।
ऐसाचि विजय समरीं अमरींला गावयासि जोडावा. ॥ १७४
ऐसा प्रसाद मजवरि करुनि म्हणे **राम**, '**का**शिपतितनये! ।
हळहळुनि जसें म्हणतो **शिव**, 'कां गे! देवि! **काशि**! पतित नये?' १७५
तैसेंचि म्हणत होतों, 'शरणार्थी कां न येति चापलते! ।

---

आहेत. हें आशीर्वादत्रय पर्यायानें द्योतित केलें आहे म्हणून हा **पर्यायोक्त** अलंकार मानल्यास चालेल. ११. शत्रुहरिणाचें जाळें. [वागुरा=मृगबंधिनी.]

१. स्वर्गातील वेलींच्या मंडपामधील बाजा. २. मोठ्या नौका. ३. आशी. ४. [परशुराम भीष्माला म्हणतो] नमन पुरे (नमस्कार पुरे झाला, आतां वर ऊठ, नमन आतां पुरें कर) संकोचासह अंजलि सोडावा (संकोचवृत्ति आणि अंजली सोड, भिडस्थपणा टाक, भय सोड आणि प्रार्थनेसाठीं—नमस्कारासाठीं जोडलेले हात सोड) वसवसाहि सोडावा (आपण गुरूशीं युद्ध केलें ही वाईट गोष्ट केली अशी मनास वाटणारी मळमळ टाकून दे) अमरींला गावयास (देवस्त्रियांला—अप्सरांला गायनाला विषय व्हावा यासाठीं) ऐसाचि विजय (आतां मिळविलेल्या जयासारखा जय) समरीं जोडावा (त्वां मिळवावा, त्वां युद्धामध्यें संपादावा.) पूर्वार्धांत 'सह' शब्दाचा प्रयोग सहृदयाल्हादक आहे म्हणून **सहोक्ति** अलंकार जाणावा. 'सोडावा' हें पद 'अंजलि' आणि 'वसवसा' या दोन कर्मांस दीपाप्रमाणें प्रकाशित करतें म्हणून हा '**क्रियादीपक**' अलंकार समजावा. ५. धाक. ६. देवांगनाला. ७. हें परशुरामाचें भाषण भीष्म दुर्योधनराजाला निवेदन करीत आहे. ८. मज भीष्मावर. ९. हे काशिराजकन्ये! हे अंबे! [अध्याय १८६ श्लोक १-५ पहा.] १०. शिव. जसें हळहळुनि 'गे! देवि! काशि! पतित कां नये?' [असें] म्हणतो तैसेंचि [मी परशुराम] म्हणत होतों, '[हे] चापलते! शरणार्थी कां न येति?' हे देवि काशि! पतितांला (पापीजनाला) उद्धरण्यास मी समर्थ आणि कृपाळु असतां पापीजन कां येत नाहींत?' हें जसें शंकरानें हळहळ वाटून काशीला सांगावें तसें मी परशुराम आपल्या चापलतेला म्हणत होतों कीं, हे चापलते! मजपाशीं शरणार्थी जन कां येत नाहींत?' [जगतांतील सर्व पापीजन पापमुक्त केले, तेव्हां पातकी पुरुष काशीस येईनात म्हणून शंकरास हळहळ वाटली व तो काशीला म्हणालाः—हे काशी देवि! आतां पतित (पापीजन) कां बरें येथें पावन होण्यासाठीं येत नाहींत? ते आले असते, तर त्यांचा उद्धार मीं खचित केला असता व तो करण्यास मी समर्थ आहें, पण कोणी येतच नाहीं त्यास काय करावें! ११. तैसेंचि (शंकरानें काशी देवीला म्हटल्याप्रमाणें, १७५ व्या आर्येच्या उत्तरार्धांत वर्णिल्याप्रमाणें,) [मी परशुराम] म्हणत होतोंः—[हे] चापलते! (धनुर्वल्लि!) शरणार्थी कां न येति? (मजकडे शरणेच्छु जन कां येत नाहींत? मजपाशीं अर्थी जन शरण कां येत नाहींत?) जे जे (शरणार्थी जन) स्वशत्रुचापल (आपल्या शत्रूचा चपलपणा, पराक्रम, वर-

तारूंचि निश्चयें जे जे कळवितिल स्वशत्रुचापल तें. ॥ १७६
परि परम प्रबळ प्रतिबंधक विधिसाचि आपगेय महा, ।
नयवर्तित्वें बाई! दंडुनि गुरुसहि विपाप गे! यम हा. ॥ १७७
मज जिंकिलें नदीजें, न चले बळ यापुढें तिळहि माझें; ।

---

चढपणा) [मला] कळवितील ते [ते जन] निश्चयें (खात्रीपूर्वक) तारूंचि (शत्रुभयमुक्त करूं, शत्रुसागरांतून पलीकडे खचित नेऊं, त्यांस शत्रूच्या उपद्रवापासून खास मुक्त करूं) (राम आपल्या चापलतेला म्हणतोः–शरणाची इच्छा करणारे मजकडे कां बरें येत नाहींत? शंकराला पातकी जनांचा उद्धार करण्याविषयीं जसें औत्सुक्य आहे तसेंच मलाही शरणार्थी जनांचें दुःख दूर करण्याविषयीं मोठें औत्सुक्य आहे, पण शरणार्थींच कोणी येत नाहीं! जे कोणी दुर्वृत्त होते त्यांचें मीं उन्मूलन केलें आहे, तेव्हां त्रस्त असा कोणी राहिलाच नाहीं. हे अंबे! तूं मला शरण आलीस म्हणून माझी इच्छा फार दिवसांनीं पूर्ण झाली. पण भीष्म महाप्रबळ पडला, तेव्हां माझा निरुपाय आहे.] १२. धनुष्यवल्लीला. चापाला लतेची उपमा दिली आहे. [चापलता–लता हा शब्द भुज, भ्रू, विद्युत् या अर्थांच्या शब्दांच्या अंतीं समासांत वारंवार आढळतो व तो सौंदर्य, कोमलता, कारुण्य, मार्दव, व सूक्ष्मता यांचा दर्शक असतो. जसें–भुजलता, बाहुलता, भ्रूलता, विद्युल्लता, अंगलता, खड्गलता इत्यादि.]

१. आपल्या शत्रूंचें चापल (चपलपणा, हालचाल). २. अडथळा करणारा, विघ्न करणारा, विरोधी. ३. दैवसाचि. ४. भीष्म. [आपगा+एय=गंगा+पुत्रार्थक प्रत्यय=गांगेय. रोहिणी–रौहिणेय, पांडु–पांडवेय, विनता–वैनतेय इत्यादि.] ५. न्यायमार्गानें वागण्यानें. ६. पापरहित. ७. 'नयवर्तिलें बाई दंडुनि गुरुसहि विपाप गे! यम हा'=ज्याप्रमाणें यमानें आपल्या बापाला (सूर्याला) दंडिलें (शासन केलें) परंतु त्याचें तें शासनप्रसंगींचें वर्तन नीत्यनुरूप असल्यामुळें तो (यम) पितृदंडनजन्य पापापासून मुक्त झाला, त्याप्रमाणें हा भीष्म गुरु परशुरामाचा पराजय करूनही अपाप (निर्दोष) आहे. **उपमागर्भरूपकाचें** हें उदाहरण होय. यमानें गुरुशासन केल्याची आख्यायिका पुराणांतून अशी आढळते कीं सूर्याला दोन बायका होत्या. एकीचें नांव **संज्ञा** व दुसरीचें **छाया**. **संज्ञे**चा मुलगा यम. **संज्ञे**ला पतितेज सहन होईना म्हणून ती आपल्या नवऱ्याच्या परवानगीनें माहेरीं जाऊन राहिली. जाते वेळीं **संज्ञेनें** आपलीं यमादि अपत्यें छायेच्या स्वाधीन केलीं. पुढें सावत्र आई छाया इनें यमास बराच जाच केला. एकेप्रसंगीं हा जाच दुःसह होऊन यमानें आपल्या आईवर पाय उगारला. त्यावरून तिनें 'तुझा पाय गळून पडेल' असा यमास शाप दिला. तेव्हां यम सूर्याकडे गाऱ्हाणें घेऊन गेला. सूर्यानें आपल्या बायकोचा पक्ष घेतला. तेव्हां यमाला सूर्याबरोबर युद्ध करावें लागलें. युद्धांत सूर्याचा पराभव झाला. हा बापाचा पराभव लेंकानें केला म्हणून लेंकास कोणतेंही पातक लागलें नाहीं पण उलटें यमास उच्छाप देणें सूर्याला भाग पडलें. तसाच प्रकार भीष्मपरशुरामयुद्धप्रसंगीं आहे हें दाखविण्याचा प्रस्तुत गीतीचा उद्देश आहे. ८. भीष्में. ९. भीष्मापुढें. १०. माझें.

हिमजित[1] होय रविमहहि[2] वरवि तमापरि[3] भयें बिळ हिमा जें. ॥ १७८

भीष्मपराभव न घडे, शाल्व तुला[4] शरण आणुं? सांग मला, ।

कीं काळा[5] जिंकूं, जो हरिणा हरिसाचि माणुसां गमला. ॥ १७९

अन्या धन्या गति[6] तुज नाहीं, जा जान्हवीसुता[7] शरण, ।

अक्षम[8] करावया या वीरांसी[9] सूर्य[10] शशि हुताश[11] रण.' ॥ १८०

अंबा म्हणे[12], 'शरण मी जाईन वना[13], न या भरतपातें[14], ।

करिन सहाय वधाया याला घालुनियां भर तपातें[15].' ॥ १८१

यापरि वदोनि गेली मन्मथनाथें स्वयें तप कराया, ।

---

१. शीतानें जिंकिलेलें. २. सूर्याचें तेजही. ३. जें (रविमह) तमापरि हिमा भयें बिळ वरवि [तें] रविमह हि हिमजित होय–असा अन्वय. तमापरि (अंधकाराला जसें तसें, अंधकाराप्रमाणें) हिमा (थंडीला, दंवाला, धुक्याला, शीताला) भयें (भीतीनें, प्रखरतेच्या भयानें) जें (रवितेज–सूर्यकिरणांचें प्रखरत्व) बिळ वरवि (गुहा पहायास लावी, गुहेचा आश्रय करावयास लावी, जें रवितेज आपल्या प्रकाशानें अंधकाराप्रमाणें थंडीला दंवाला व धुक्याला दूर पळवून गुहेचा आश्रय करण्यास भाग पाडी) तें रविमहहि (तें सूर्याचें तेज सुद्धां) हिमजित होय (हिमानें जिंकिलें जातें) अंधकाराचा जसा तसाच हिमाचाही सूर्य आपल्या तेजानें पराजय करतो, परंतु तोच सूर्य हिमानें (धुक्यानें) जिंकिला जातो; ग्रीष्म ऋतूंत सूर्याचें तेज जसें प्रखर असतें तसें हेमंतऋतूंत नसतें ही गोष्ट सुप्रसिद्ध व अनुभवसिद्ध आहे. जे सूर्यकिरण दंवाला व धुक्याला भयाभीत करून अंधाराप्रमाणें बिळ स्वीकारावयास लावतात, ते सूर्यकिरण देखील कालपरत्वें धुक्यामुळें निस्तेज व दिसेनासे होतात. यांत **सविरोधोपमागर्भार्थांतरन्यास** नामक अलंकार झाला आहे. [वरवि=स्वीकार करवी, अंगीकार करवी.] अंधकार सूर्यतेजाला भिऊन गुहेंत लपून राहतो असें वर्णन **कालिदासाच्या कुमारसंभवांत** आहेः–'दिवाकराद्रक्षति यो गुहासु लीनं दिवाभितमिवान्धकारम्' [कुमारसंभव–सर्ग १ श्लोक १२ पहा.] ४. अंबेला. ५. कीं (किंवा) काळा (प्रत्यक्ष यमधर्माला) जिंकूं? (जिंकून आणूं काय?) जो [काळ] माणुसां हरिणा हरिसाचि गमला=जसा हरिणास सिंह भयंकर वाटतो त्याप्रमाणें मनुष्यास काळ भयंकर वाटतो अशा उग्र काळाला जिंकून आणूं काय? ६. उपाय, मार्ग, आश्रयस्थान. ७. गंगापुत्राला. [अ० १८६ श्लो० ४.] ८. असमर्थ. ९. भीष्माशीं. १०. सूर्य चंद्र आणि अग्नि हे या भीष्मापाशीं युद्ध करण्यास असमर्थ आहेत, याप्रमाणें या वीराचें तेज आहे. ११. अग्नि. १२. अध्याय १८६ श्लो० ६-९ पहा. १३. वनाला शरण जाणें=वनाचा आश्रय करून तपश्चर्या करणें. वन आश्रयस्थान करणें. १४. भीष्मातें. १५. तपातें भर घालुनियां याला वधाया सहाय करिन=वनामध्यें तपश्चर्या करून त्या तपस्येच्या योगानें या भीष्माला मारण्याची सामग्री भरपूर सज्ज करीन.

उपशम परम मधुर, परि लागे केवळ तिला सॅपक, राया ! ॥ १८२
रामहि मला पुसोनि, प्रेमें मजवरुनि हात फिरवूनी, ।
जाय महेंद्रगिरिप्रति, विश्रांत गुरुप्रसाद मिरवूनी. ॥ १८३
येतां स्वपुरा करिती बहु बंदी पौरें कवि मम स्तवन, ।
गाजविति मयूर जसे गर्जुनि मेघोदयीं समस्त वन. ॥ १८४
क्षतशत पाहुनि, पावे सत्यवतीचीहि फार तनु कंपा, ।
किंबहुना गंगेची मजवरि तितुकी नसेल अनुकंपा. ॥ १८५
मद्वधकामें अंबा करिती झाली वनीं बहु तपाला, ।
जी स्वल्प पवन सेवी, सेविल ती काय हो बहुत पाला ? ॥ १८६

---

१. शांति, इंद्रियजय. २. अरुचिक. ३. हे दुर्योधना! ४. प्रेमानें कुरवाळून, प्रेमानें थापटून. ५. अध्याय १८६ श्लोक १० पहा. महेंद्रगिरि, ज्याला हल्लीं Eastern Ghauts अशी संज्ञा आहे त्या पर्वतश्रेणींचें प्राचीन नांव महेंद्रगिरि. हिंदुस्थानांतील पश्चिम बाजूस जशी सह्य नांवाची पर्वतश्रेणि आहे तशीच पूर्व बाजूसही एक दक्षिणोत्तरगामिनी पर्वतश्रेणि आहे तिचें नांव महेंद्रगिरि. ६. 'विश्रांत गुरुप्रसाद मिरवूनी'=रामा (परशुरामा)-नें महेंद्रगिरिकडे जाते वेळीं भीष्माचा प्रेमानें निरोप घेऊन त्याचे अंगावरून हात फिरविला. या योगानें सर्व जगामध्यें गुरुप्रसादाला मिरवावयास लाविलें. यद्यपि परशुरामाचा भीष्मानें पराभव केला होता तथापि परशुरामाचें भीष्मावरील प्रेम कमी झालें नव्हतें आणि म्हणूनच त्यानें तपश्चर्येस जाते वेळीं जी कृति केली तिनें गुरुप्रसादाची महती सर्व जगास राजरोष केली. ७. भाट. ८. पुरवासीजन, नागरिकजन. ९. बुध, शहाणे लोक. १०. मेघागमीं. यांतील **उपमा** फार हृदयंगम असून **पंता**च्या काव्यांत वारंवार आढळणारी आहे. ११. क्षतांचें (जखमांचें) शत (शंभर) शंभर जखमा. १२. सत्यवती=भीष्माचि सापत्नमाता, शंतनुराजाची स्त्री. १३. सत्यवतीच्या इतकी अनुकंपा (कृपा). १४. कृपा. १५. माझा (भीष्माचा) वध करावा या इच्छेनें. १६. ती अंबा अल्प वायूचें मात्र सेवन करीत असे, असें उग्र तप करीत होती. [ती अंबा यमुनातीराचा आश्रय धरून अतिमानुष तप करीत होती. ती निराहारा, कृशा, जटिला, मलपंकिनी अशी सहा महिनेपर्यंत वायुभक्षण करून काष्ठासारखी अचल होती. यमुनाजलामध्यें एक संवत्सरपर्यंत उदक प्राशन करून होती. पादांगुष्ठाग्रावर उभी राहून एक वर्ष जीर्ण पानें खाऊन होती. याप्रमाणें तिनें बारा वर्षें उग्र तपश्चर्या केली. [अध्याय १८६ श्लोक १९-२३.] १७. अर्थात् ती पुष्कळ पाला कधींही भक्षणार नाहीं—असें उत्तर. जी वायूचें देखील सेवन थोडेंच करीत होती ती पुष्कळसा पाला कोठून खाणार? पाल्याची गोष्ट तर राहूंद्याच, ती वायु देखील फारसा सेवीत नसे. येथें **काव्यार्थापत्तिध्वनि** अलंकार जाणावा. योगी वायुभक्षण करून शरीरपोषण करतात, पण अंबा वायु सुद्धां पोटभर भक्षण करीत नसे.

'वर माग,[1] भागलिस बहु, देतों मी वर नेतासि[2] अंबे! शें,[3]' ।
यापरि वदोन केली धन्या संन्यासियांत[4] अंबेशें.[5] ॥ १८७
असती विवेकमति तरि, मिळतिल परमा गती,[6] परि भवातें[7] ।
माझ्या अंबा झाली जोडुनि कर मागती परिभवातें.[8] ॥ १८८
ईश्वर म्हणे, 'दिलें, जा,' ऐक नृपा![9] ती प्रभूसि[10] जें वदली, ।
'काय[11] शुका मदिराक्षी,[12] खदिरा क्षीणत्व दे रणीं कदली?' ॥ १८९
देव म्हणे, 'द्रुपदसुता[13] आधीं होसील, पुरुष[14] मग, जा, गे!' ।
निजबिरुदरक्षणीं हा प्रभु जेंवि न तेंवि अमरनग[15] जागे.[16] ॥ १९०

---

१. हें शंकराचें भाषण आहे. [अध्याय १८७ श्लोक ७-१५.] २. शरणागताला. ३. शेंकडों. ४. तापसजनांत. ५. अंबा+ईशें=पार्वतीरमणें शिवें. ६. उत्तम मुक्ति. 'परागति,' 'पराकाष्ठा' व 'परमागति' या तिन्ही शब्दांचा अर्थ एकच आहे व निरनिराळ्या प्रसंगीं यांचा उपयोग करितात. 'इंद्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यस्तु परं मनः । मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः ॥ महतः परमव्यक्तमव्यक्तात्पुरुषः परः । पुरुषान्न परं किंचित्सा काष्ठा सा परागतिः । [आनंदाश्रमग्रंथमाला—ग्रंथांक २९, पृ० २१२ भाष्य.] ७. शंकरातें. ८. पराजयातें. ९. हे दुर्योधना! १०. शंकराला. ११. मदिराक्षी रंभा शुकाचार्यांचा पराभव करूं शकली नाहीं या गोष्टीवर कटाक्ष ठेवून अंबा शंकराला म्हणतेः—मदिराक्षी शुका, कदली रणीं खदिरा, क्षीणत्व दे काय? मदिराक्षी शुका रणीं क्षीणत्व दे काय? कदली रणीं खदिरा क्षीणत्व दे काय?—असा अन्वय. शस्त्रधारण न करणाऱ्याही शुकाचा पराभव करण्यास मदिराक्षी रंभा समर्थ झाली नाहीं, मग शस्त्र धरणाऱ्या शूर भीष्माचा पराभव मी स्त्री कसा करूं शकेन? खैराच्या झाडापुढें केळीच्या झाडाचा टिकाव लागेल काय? केळ युद्धामध्यें खैराच्या झाडाला क्षीणत्व देईल काय—पराभवील काय? अर्थात् 'नाहीं' हें उत्तर. येथें प्रश्नालंकार समजावा. १२. मदिराक्षी=मदिरा दृष्टिविशेषस्तद्युक्ते ईक्षणे यस्याः सा. 'आघूर्णमानमध्या या क्षामा चांचितलोचना । दृष्टिर्विकासितापांगा मदिरा तरुणे मदे ॥' इति 'हरविजय'टीकायामलकराजानकः; तथा संगीतकलिकायाम्—'स्निग्धार्धमुकुलीकांता लंभिता मदिरा तथा । पंचैवात्र परिज्ञाताः शौर्यादित्वेन दृष्टयः ॥ सौष्ठवेनापरित्यक्ता स्मेरापांगमनोहरा । वेपमानांतरा दृष्टिर्मदिरा परिकीर्तिता ॥' इति (१८७९ मितखिस्तसंवत्सरमुद्रित-विक्रमोर्वशीय-टिप्पणे ५२ पृष्ठे) शंकर-पांडुरंग-पंडितः. [लघुकाव्यमाला—द्वितीय गुच्छक पृ० ७६.] 'मदिराक्षी' या शब्दाचा सविग्रह अर्थ मल्लिनाथानें रघुवंशांत (सर्ग ८ श्लो० ६८) दिला आहे तो ठीक नसावा असें भासतें. मदिरेक्षणा, मदिरनयना, मदिरलोचना, असे शब्द संस्कृत काव्यग्रंथांत वारंवार आढळतात. [माद्यंति आभ्यां इति मदिरे ईक्षणे यस्याः सा! मदिराभिधं, ईक्षणं दृष्टिर्यस्याः असे या शब्दाचें सार्थ विग्रह आढळतात.] १३. शिखंडिनी. १४. शिखंडी. १५. कल्पवृक्ष. १६. दक्ष असे.

हा [1]वरदवरसमर्पित मज हितकर [2]चरमुखें कळे वर हो! ।
देव विनविला म्यां कीं, 'पात्र अपयशा न हें [3]कलेवर [4]हो.' ॥ १९१
होतां [5]अंतर्हित तो वरदेश्वर [6]सर्वभक्तहितरचिता, ।
[7]स्वचिता रची स्वयें ती उग्रमति, रचील कोण इतर चिता? ॥ १९२
यमुनातटीं चितेला [8]पावक ती आपुल्याचि दे [9]हातें, ।
[10]मद्वधसंकल्प करुनि [11]होमी हो! मीन[12]दृष्टि देहातें. ॥ १९३
[13]मद्वधकाम द्रुपदहि उग्रतपें [14]ईश्वरासि आराधी, ।
त्यालाहि भक्तवत्सल भेटे, नसतांहि [15]शांतिसारा धी. ॥ १९४
'स्त्रीपूर्वपुत्र दिधला' ऐसें वर मागतां वदे [16]वरद, ।
न करी वि[17]चार धाया, वि[18]चकूं दे याचका न देव [19]रदें. ॥ १९५
द्रुपदपुरीं [20]पुत्रोत्सव परिपूर्ण घरोघरीं भला माजे, ।
'पुत्री' म्हणोनि नारद मुनि कळविति, तेंचि [21]चर मला [22]माजे. ॥ १९६
ठेवी नाम शिखंडी, हें वर्णूं काय बा! [23]रसें गा! तें? ।
अद्यापि बंदिमागधसूतांचें [24]वृंदें [25]बारसें गातें. ॥ १९७
लेवविल्या बहु भूषा उचिता पुत्राचिया शरीरा ज्या, ।

---

१. वर देणाऱ्यांमध्यें श्रेष्ठ जो शंकर त्यानें दिलेला (वर). २. दूतमुखानें. ३. शरीर हें माझें भीष्माचें शरीर. ४. होवो. ५. गुप्त. ६. सकल भक्तांचें कल्याण करणारा. ७. आपली चिता (सरण). अध्याय १८७ श्लोक १८ पहा. ८. अग्नि. ९. अग्निकाष्ठें गोळा करून अग्नि पेटविला. १०. माझ्या वधाचा संकल्प. (अ० १८७ श्लो० १९.) ११. देहातें होमी=देहाला अग्नींत टाकून देई. १२. मत्स्यासारिखी चंचल दृष्टि जिची अशी. (अंबेचें विशेषण.) १३. माझा वध हा काम (इच्छा) आहे ज्याचा तो. १४. शंकराला. [अध्याय १८८ श्लो० ३-६.] १५. शांतिसर्वस्वसंपन्न अशी त्या द्रुपदाची बुद्धि नसतांही त्याला भक्तवत्सल (शंकर) भेटे. १६. वर देणारा (शंकर). [भीष्माचा प्रतीकार करील असा पुत्र मला असावा असा वर द्रुपदानें मागितला. अ० १८८ श्लो० ५.] १७. मागितलेला वर देण्यास मागें पुढें केलें नाहीं. १८. रद विचकणें=दांत विचकणें, बत्तिशी विचकणें=दांत दाखवणें, दांत दाखवून हांसणें, बत्तिशी बाहेर दाखविणें. येथें रद विचकणें हें तोंड विचकणें या अर्थी समजावें. तोंड विचकणें=करुणा भाकणें, रडगाणें गाणें, गायावायां विनवणें, गयांवयां करणें. १९. दंत. २०. राजाला पुत्र झाला म्हणून नगरांत सर्वांच्या घरीं पुत्रोत्सव झाला, परंतु उत्पन्न झालेलें बालक कन्या आहे असें द्रुपदाशिवाय कोणाला माहीत नव्हतें. २१. माझे चार सेवक 'मुलगी' असेंच मला कळविति. २२. माझे चार (दूत) कळविती. २३. प्रीतीनें. २४. गण, समुदाय. २५. बाराव्या दिवशींचा उत्सव.

किंबहुना[1] द्रुपदमतें राजसुतेलाहि ती वरी, राजा ! ॥ १९८
वरिली या द्रोणाची चापश्रुति[2], मग दशार्णपतिकन्या[3], ।
ती शयनीं समजे कीं प्रकृतिस्वसमा[4] असे, नसे अन्या[5]. ॥ १९९
धात्रीस[6] ती म्हणे, 'हितँ[7] होतें, जरि तात[8] कापिता मान, ।
मानस म्हणतें मज कीं—न अशा या घातका पिता मान[9].—' ॥ २००
कळतां हिरण्यबाहु[10] क्षितिपाळ म्हणे, 'सुता असाव्या ही ।
इच्छा[11] अरिसहि न शिवो, न मिळाला मदितरा[12] असा[13] व्याही.' ॥ २०१
द्रुपदाच्या मथनार्थ स्वचमूची[14] शीघ्र सिद्धता करवी[15], ।
ती सज्य होय, दधिचें[16] जेंवि करायासि सिद्ध ताक रवी[17]. ॥ २०२
भ्याला[18] पांचाळ म्हणे, 'देवा[19] ! पसरिति सुरद्रु[20] पदरा[21] ज्या[22] ।
त्या तेवें[23] वरें करावें यापरि चिंतातुर द्रुपदराजा !' ॥ २०३
स्त्रीस म्हणे[24], "वदलीस प्राप्तवराचा[25] धरूनि विश्वास[26], ।

---

१. फार काय सांगूं? हे दुर्योधनराजा! द्रुपदाच्या अनुमतानें तिचा (त्या शिखंडिनी कन्येचा) एका राजकन्येशीं विवाहही झाला. २. धनुर्वेदविद्या. (शिखंडिनी ही द्रोणाची शिष्य झाली. अ० १८९ श्लो० २.) ३. दशार्णदेशाच्या राजाची कन्या (अ० १८९ श्लो० ८) हिच्याशीं विवाह केला. ४. जातीनें आपल्यासारिखी. ५. दुसऱ्या जातीची. पुंस्त्व नाहीं. ६. धात्री=पितृगृहापासून बरोबर आलेली सखी. [अ० १८९ श्लो० १४ टीका पहा.] ७. चांगलें झालें असतें. ८. हिरण्यवर्मा. [अ० १८९ श्लो० १६-१८.] ९. समज. १०. हाच दशार्णाधिप हिरण्यवर्मा होय. ११. आपल्या पोटीं मुली जन्मास याव्या ही इच्छा. [कन्येच्या संबंधानें आपल्या कवींची बरीच करडी नजर दिसून येते. या संबंधानें पुढील श्लोक पहाः—'संभवे स्वजनदुःखकारिका संप्रदानसमयेऽर्थहारिका । यौवनेऽपि बहुदोषकारिका दारिका हृदयदारिका पितुः ॥' 'जातेति कन्या महती हि चिंता कस्मै प्रदेयेति महान्वितर्कः । दत्ता सुखं यास्यति वा न वेति कन्यापितृत्वं खलु नाम कष्टम् ॥.' चांगला वर कसा मिळेल, ही चिंता ज्यांना मुली आहेत त्यांना आहेच आहे. १२. मजहून दुसऱ्याला. १३. या द्रुपदासारखा. १४. आपल्या सेनेची. १५. हिरण्यवर्मा राजा युद्धाची तयारी करवी. १६. दह्याचें. १७. मंथनदंड. १८. 'भ्याला' असा पाठ एका हस्तलिखित पोथींत आढळला तो येथें स्वीकृत केला आहे. छापील प्रतींत 'त्याला' असा पाठ होता. द्रुपदराजा भयग्रस्त झाला होता असें वर्णन मूलग्रंथांतही आहे. [अ० १९० श्लो० ११.] तसेंच उत्तरार्धांतील 'करें' या छापील पुस्तकांतील पाठाच्या ठिकाणीं 'वरें' असा पोथींतील पाठ येथें घेतला आहे. १९. हे शंकरा! २०. कल्पवृक्ष. २१. पदरा पसरिति= विनंति करतात. 'पदर पसरणें' या लोकोक्तीची अनुकृति केली आहे, म्हणून हा **लोकोक्ति** अलंकार होय. २२. ज्या द्रुपद राजाला. २३. तुझ्या वरानें. २४. अध्याय १९० श्लो० १३-२१ पहा. २५. शंकरापासून मिळालेल्या वराचा. (गीति १९५.) २६. निश्चय, खात्री.

'लग्न कराचि प्रभुवर! यश विदित असे अतर्क्य [1]विश्वास.' ॥ २०४
ठावें असोनि सर्वहि 'पतिच्या खोलींत कोंडवा सून,' ।
ऐसें स्वसख्यांपाशीं कां गे! वदलीस तोंड [2]वासून? ॥ २०५
[3]सद्यः स्वदुर्दशा हे, जरि नाइकतों [4]त्वदुक्ति, कां [5]होती? ।
यापरि विटंबिली [6]जी न करील [7]महत्वहानि कां हो! ती? ॥ २०६
स्वस्थ रहा [8]मुलि! देऊं प्राण, परि न [9]तुज [10]दशार्णवसुधापा, ।
तारिल [11]दशाब्धिविषपा ईश्वर, मारिल [12]दशार्णवसुधापा." ॥ २०७
स्वनिमित्त प्राप्त असा होतां सर्वस्वनाश [13]जनकास, ।
घाली **शिखंडिनी** तनु टाकाया, दृढ करूनि मन, [14]कास. ॥ २०८
ती जाउनि [15]विजनवनीं निज [16]नवनीतातिमृदुलवपु [17]सुकवी, ।
कीं 'तप संकट चुकवी' ऐसें सर्वत्र सांगती [18]सुकवी. ॥ २०९
पाहे **स्थूणाकर्ण** [19]त्र्यक्षसखानुचरवर तिला स्वमनीं ।
आग्रह करुनि पुसे, 'कां दिससी विटलीससी [20]निजासुवनीं?' ॥ २१०
ऐकुनि दुःख [21]म्हणे, 'तुज उचित नव्हे या [22]स्वजीवितीं रुसणें, ।

---

१. जगताला. २. तोंड वासणें=तोंड पसरणें, तोंड वेंगडणें=To make a long face. ३. आतांच, वर्तमान काळीं. ४. पुत्र झाला अशी तुझी उक्ति. ५. झाली असती. ६. हिरण्यबाहूची कन्या. ७. आमच्या मोठेपणाचा नाश. ८. हे शिखंडिनि कन्ये! ९. तुला दशार्णवसुधाधिप जो हिरण्यबाहु त्याच्या स्वाधीन करणार नाहीं. १०. दशार्ण+वसुधा+पा=दशार्णपृथ्वीपतिला. ११. दश+अब्धि+विष+पा=दहा विषसमुद्र पिणारास. १२. दश+अर्णव+सुधा+पा=दहा+सागर+अमृत+पान करणाऱ्यास. [ईश्वर आमचा साहाय्यकारी आहे, तुला भिण्याचें कारण नाहीं असें प्रतिपादीत द्रुपद मुलीला म्हणतो.] ईश्वर दहा सागरांइतकें विष पिणाराला तारील आणि दहा सागरांइतकें अमृत पिणारालाही मारील असा सर्वसमर्थ आहे. १३. पित्याला, द्रुपदाला. १४. तनु (देह) टाकाया कास घाली (तयारी करी). शिखंडिनी देह विसर्जन करण्यास सिद्ध झाली. कास घालणें ही लोकप्रवादाची अनुकृति आहे म्हणून हा **लोकोक्ति** अलंकार होय. [अध्याय १९१ श्लोक १८.] १५. निर्जन अरण्यांत. १६. नवनीत+अतिमृदुल+वपु=लोणी+फार कोमळ+शरीर=लोण्यापेक्षां अतिमृदु असें स्वशरीर. १७. शुष्क करी. [स्थूणाकर्ण नामक यक्षानें आश्रमीं तप करून आपलें शरीर शुष्क केलें. अ० १९१ श्लो० २२.] १८. ज्ञानी. १९. त्रि+अक्ष+सखा+अनुचर+वर=त्र्यंबकसखा जो कुबेर त्याचा सेवकश्रेष्ठ. २०. निज+असु+अवनीं=स्वीय+प्राण+रक्षणीं=निजप्राणरक्षणीं. २१. स्थूणाकर्ण शिखंडिनीला म्हणाला. २२. स्वप्राणावर रागावून त्यांचा त्याग करण्यास तयार होणें. ज्यावर आपण रुसतों त्याला टाकून देतों, त्याजविषयीं बेफिकिर असतों.

स्वस्त्रीत्व हें मला दे, माझें पुरुषत्व सर्व घे उसणें.' ॥ २११
अतिदुर्लभ जें मिळतां कां हो! न करील मान्य सांगा तें? ।
आंगातें त्याच्या ये योषात्व तिच्याहि पुंस्त्व सांगातें. ॥ २१२
जायाचें भूषणसें घेउनियां पुरुषचिन्ह, मिरवाया ।
परतोन ये पित्याचा आधिगिरि सुखार्णवांत विरवाया. ॥ २१३
द्रुपदनृपतिहृदयींच्या दुःसहचितास्वरूप सांगेतें ।
होय अयश्शुंबक जें यक्षवराप्त स्वपुंस्त्व सांगे तें. ॥ २१४
दूतमुखें द्रुपद म्हणे, 'बालिश हो! नीट पारखा याला, ।
'अंगारभुक्चकोरें पण न करावाचि पार खायाला.' ॥ २१५
कुपितें त्या हेमभुजें पुरुषपरीक्षास्मृती न आठविल्या, ।
पोरी नव्या नव्या नरपतिसुतवेत्रें सजूनि पाठविल्या. ॥ २१६
पडल्या एके शिंग्यावरि बहु शिंग्या करूनि हातेणें, ।
जो मंदुरेंत होतो गोंधळ, केला प्रकार हा तेणें. ॥ २१७

---

१. अध्याय १९२ श्लोक २-५ पहा. २. स्त्रीत्व. [योषा=स्त्री. 'स्त्री योषिदवला योषा नारी सीमंतिनी वधूः' इत्यमरः. 'योषा' याचें 'जोषा' असें चवर्गपठित अन्य रूप आढळतें.] ३. पुरुषत्व. ४. मागणीचें. दुसऱ्याचें मागून आणलेलें व जें पुनः परत जावयाचें असें. ५. चितारूप पर्वत. ६. सुखसागरांत. ७. विरघळण्यासाठीं. ८. सांग (स्त्री) वरची, सैती, शलाका, शस्त्रविशेषातें. ९. [द्रुपदराजाच्या हृदयांतील अत्यंत असह्य अशा] सांगेतें (शस्त्रातें) जें अयश्शुंबक (लोहचुंबकाप्रमाणें) होय (हरण करणारें झालें) तें यक्षवराप्त पुंस्त्व सांगे (कथी, निवेदी). [अयस्=लोखंड.] १०. यक्ष+वर+आप्त=यक्ष+श्रेष्ठ+प्राप्त= यक्षश्रेष्ठापासून मिळालेलें (पुरुषत्व). ११. अध्याय १९२ श्लो० ११-२८ पहा. १२. परीक्षा= पारख, परीक्षा करा. १३. या माझ्या पुत्राला (शिखंडीला). १४. अंगार भक्षण करणाऱ्या चकोरपक्ष्यानें. १५. पारा. १६. हिरण्यबाहूनें. १७. पुरुष आहे किंवा नाहीं अशी परीक्षा करण्याविषयीं स्मृतिकारांच्या उक्ति. स्मृतिकारांच्या उक्ति आठवून त्याप्रमाणें पुरुषपरीक्षा करण्याची खटपट केली नाहीं, तर याहीपेक्षां ज्यास्त प्रत्ययावह असा पुरुषपरीक्षेचा उपाय योजिला. १८. शिंगा (पु०) शिंगरूं (नर). १९. शिंगी (स्त्री०) शिंगरूं (मांदी.) २०. कामयुक्तता. हातेण=कामवासना (घोड्यांची अथवा गाढवींची). २१. अश्वशाळेंत. हातेणें=हें 'हातेण' या अकारान्त नपुंसकलिंगी शब्दाचें तृतीयेचें एकवचन आहे. याचा अर्थ घोड्यांचा किंवा गाढवांचा माज. 'हातेणें करूनि'=माजामुळें. 'नेत्रें करूनि' 'मुखें करूनि' इत्यादि प्रयोगांप्रमाणें 'हातेणें करूनि' हा प्रयोग समजावा. शिंगा=घोड्याचा तयार व वयांत आलेला बच्चा. शिंगी=घोड्याची वयांत आलेली वची. मंदुरा=घोडपागा, अश्वशाला. ('वाजिशाला तु मंदुरा' इत्यमरः.) तेणें=त्या शिखंडीनें. या गीतींत अश्लील प्र-

भेटे दशार्णभूपति, परि न द्रुपदाननाकडे[1] पाहे, ।

कार वर्णिला आहे व तोही भीष्माच्या तोंडून वदविला आहे म्हणून कांहीं दुराराध्य अशा दोषैकदृक् लोकांचा या गीतीवर आक्षेप येण्याचा संभव आहे. परंतु असा आक्षेप जर कोणी घेईल तर त्या आक्षेपकारांनीं प्रसंगौचित्यविचार केला नाहीं असें म्हणावें लागेल. आतां या सोंवळ्या चोखंदळ आक्षेपकांचेही दोन वर्ग करितां येतात. एक सदा सोंवळे व एक वेळप्रसंग पाहून सोंवळें कमी करणारे. सदा सोंवळ्या आक्षेपकांना उत्तर कांहीं देतां येतच नाहीं. कारण ते आपल्या भाषेचा सोंवळेपणा राखण्याकरितां भाषेची कितीही हानी झाली तरी पत्करण्यास तयार असतात. परंतु दुसऱ्या वर्गांतील सोंवळ्या आक्षेपकारांची गोष्ट निराळी आहे, त्यांस उत्तर देणें फारसें जड नाहीं. पहिल्या प्रकारचे लोकांस शांतरस म्हणजे आद्यरस, व इतर रसांचा विशेषतः श्रृंगाररसाचा अत्यंत तिटकारा. त्यांना उपनिषदें, गीतात्रय, पंचदशी, भागवत (एकादश स्कंध) वगैरे सोंवळ्या ग्रंथांची रुचि असते. तेव्हां तशा प्रकारच्या लोकांना श्रृंगाररसोद्बोधक अल्पसा शब्दही दुःसह होणें साहजिक आहे. परंतु प्रसंगपरत्वें नऊही रस ज्यांस रुचतात म्हणजे काव्यें रुचतात, कारण 'रसात्मकं काव्यम्' म्हणजे काव्याचा जीव हे रस होत, त्यांस प्रस्तुत गीति दुःसह होऊं नये. कारण या गीतींत भीष्मानें किंवा पंतानें जो प्रसंग वर्णिला आहे तो बुद्धिपुरःसर आणला नसून कथौघानें आपाततः आला आहे. व तो टाळतां येण्याजोगाही नाहीं. समयप्राप्त गोष्ट, मग ती अश्लील असो किंवा उदात्त असो, ती अवश्य सांगितलीच पाहिजे. 'असमयमौनें तुमच्या सुज्ञत्वाच्या न हानि मोला हो' [सभापर्व–अ० ५ गी० ४६] असें पंतांनीं अन्यत्र म्हटलेलें वाचकांस अवगत असेलच. तसेंच 'अवसरपठिता वाणी गुणगणरहितापि शोभते पुंसाम्' इत्यादि सुभाषित सर्वप्रसिद्धच आहे. तेव्हां शिखंडीचा पूर्ववृत्तांत सांगत असतां व तोही दुर्योधनाच्या आग्रहावरून, (मागें अध्याय १२ गीति ९६) भीष्माला शिखंडिनीचें शिखंडी असें रूपांतर कसें झालें व दरम्यान काय काय चमत्कार झाले, हें सांगणें अवसरप्राप्त व आवश्यक होतें असें कोण नाहीं म्हणणार? तेव्हां भीष्म जरी आमरण ब्रह्मचारी होता व त्याच्या एकंदर चरित्रावरून या आमच्या सोंवळ्या कोटींतील अग्रणी होता, तरी अवसरप्राप्त म्हणून हा अश्लील असा भासमान होणारा प्रकार पंतांनीं त्याचे तोंडून वदविला आहे. तेव्हां प्रस्तुत गीति कोणत्याही प्रकारें भीष्माला वैगुण्य आणीत नाहीं, परंतु उलट शोभा विशेष देते, कारण थोड्यांत व फार खुबीदार रीतीनें आडपडद्यानें हा प्रकार भीष्मानें वर्णिला आहे. आमचे पंतही दुसऱ्या कोटींतील सोंवळे असल्या कारणानें त्यांनीं हा प्रसंग 'वेलालाही दुःख नको व वाळकालाही दुःख नको' अशा खमंग तऱ्हेनें मोठ्या लपेटीनें व बहादरीनें एका उपमेनें परंतु स्पष्ट उच्चार न करितां फारच नामी वर्णिला आहे. तात्पर्य ही गीति भीष्माच्या किंवा पंतांच्या सोंवळ्यास अल्पही वैगुण्य आणीत नाहीं, पण उलटें सोंवळेपणास विशेषच खुलवितें.

१. द्रुपद+आननाकडे=द्रुपदाच्या मुखाकडे.

बा ! हे कन्यासी श्री, बाहें[1] क्षमिकोटिकीर्तिला[2], वाहें. ॥ २१८
सासूसि[3] सासऱ्यासहि सुतशतसत्कार्य होय जामाता, ।
विहिणीव्याह्यांकरवीं धुववविति निजपाद[4]तोयजा माता. ॥ २१९
ऐसा अवगत आहे वरदा[5] मज ईश्वरा समाचार, ।
सर्वहि कळवित होते वरदा मज ईश्वरासमा चार[6]. ॥ २२०
त्या[7] यक्षाच्या आला, प्रिय सेवक म्हणुनि, धनद[8] सदनातें, ।

---

१. बोलावी, हांक मारी. २. क्षमि+कोटि+कीर्तिला=शांतिसंपन्न, क्षमाशील+अ-संख्य+यशाला=असंख्य क्षमाशीलजनांची कीर्ति ज्याची आहे असा अत्यंत क्षमाशील शिखंडी त्याला. [राजा हिरण्यबाहु अत्यंत क्षमासंपन्न अशा शिखंडीला बाहे (बोलावी) आणि कन्येप्रमाणेंच श्री (लक्ष्मी) वाहे (देता झाला). पूर्वीं ज्याप्रमाणें कन्या दिली त्याप्रमाणें आतां संपत्ति शिखंडीला हांक मारून देता झाला). शिखंडीनें दशार्णभूपतीच्या अपराधाची क्षमा केली म्हणून त्याला 'क्षमिकोटिकीर्ति' असें विशेषण लाविलें आहे. याचा अर्थ व पाठ पुढें लिहिल्याप्रमाणें असावा:—'बा ! हे कन्यासी श्री बाहें, क्षमिकोटिकीर्तिला वाहें.' या उत्तरार्धांत हेमबाहूची द्रुपदास उक्ति आहे. तो म्हणतो:—बा ! द्रुपदा ! हे (ही) श्री (हेमबाहूची—माझी—मुलगी) [आपली] कन्या अशी [समजून] [तिला] बाहें (हांक मार) व [तसें करण्यानें] क्षमिकोटिकीर्तिला (क्षमा करणाऱ्या ज्या अनेक लोकांतील जो अग्रणी त्याच्या कीर्तिला म्हणजे नांवालौकिकास) वाहें (धारण कर). हिरण्यबाहु द्रुपदास 'माझी मुलगी तूं आपली आहे असें समज व माझ्या पूर्व कृतीला विसरून मला क्षमा केल्याचें श्रेय पदरीं घे' असें म्हणतो. 'बाहें' व 'वाहें' हीं आज्ञार्थीं द्वितीय पुरुषाची एकवचनाचीं रूपें आहेत. ३. सासूसि सासऱ्यासहि (मुलीच्या आईबापांस) जामाता (जांवई) सुतशतसत्कार्य (मुलाच्या शंभरपटीनें सत्कार करण्यास योग्य, मुलाच्या शंभरपट प्रिय आणि आदरार्ह) होय (होतो, असतो) [इतकेंच नाहीं तर त्या जांवयाची] माता विहिणीव्याह्यांकरवीं (सुनेच्या आईबापांकडून) निजपादतोयज (आपलें चरणकमल) धुववविति. त्या समयीं दशार्णभूपतीला शिखंडी अत्यंत सत्कार्य झाला आणि त्याच्या मातेनें दशार्णाधिप आणि तत्पत्नी यांजकरवीं आपलीं पादकमलें धुवविलीं. ४. आपल्या पादकमलास. ५. वरदा (तुला दुर्योधनाला वर देणाऱ्या मज भीष्माला—मी सेनापतित्व स्वीकारून रणांत शत्रुपराभव करून तुला यश मिळवून देईन असा भीष्मानें दुर्योधनास वर दिला होता म्हणून भीष्माला 'वरद' हें विशेषण लाविलें आहे) मज (मला—भीष्माला) ईश्वरा (रण करण्यास मोठा समर्थ अशा मला) ऐसा समाचार (याप्रमाणें शिखंडीचा जन्मवृत्तांत) अवगत आहे (ज्ञात आहे). ६. चार (जासूद, दूत) मज (मला भीष्माला) वरदा ईश्वरासमा (वर देणाऱ्या शंकरासारख्या भीष्माला—वरदशंकरासमान जो मी भीष्म त्या मला) सर्व (सर्व वृत्तांत) कळवित होते. ७. त्या स्थूणाकर्ण नामक यक्षाच्या (सदनातें). कुबेराचा स्थूणाकर्ण हा आवडता सेवक होता. ८. कुबेर.

स्त्रीभावास्तव लज्जित होउनि [1]तो दाखवी न वदनातें. ॥ २२१
धनद म्हणे, ‘हर्षप्रद दासाला जेंवि हा[2], तसा मोरा ।
धनहि नसे, स्थूण न कां आला जोडूनि हात सामोरा?’ ॥ २२२
‘दे[3]उनि पुरुषत्व, स्त्री झाला, दावावया मुखा लाजे,’ ।
ऐसें यक्ष [4]कथिति, बहु [5]पाहुनियां पावले सुखाला जे. ॥ २२३
धनद म्हणे, ‘हा! मंदा! केलें भलतेंचि हें कसें स्वमतें? ।
गमतें पुरुषत्वीं न स्त्रीत्वींच [6]स्वांत बहु तुझें रमतें. ॥ २२४
[7]स्त्रीत्वचि असो, अशा या मूढाला अन्य काय शासन हो? ।
न्यूनत्व लेशमात्र [8]द्रुपदाच्या कन्यकायशास न हो.’ ॥ २२५
विनवुनि शापांतार्थ [9]स्वामीचें वळविलें मन [10]दहांनीं, ।
[11]बहु खवळलाहि न करी सत्प्रभुचा कोप अमृतनद हानी. ॥ २२६
[12]शिवसख म्हणे, ‘शिखंडी समरीं पावेल मरण जेव्हां हो! ।
गेलें स्वरूप त्याची प्राप्ति पुन्हा या [13]कुधीस तेव्हां हो.’ ॥ २२७
होउनि [14]कृतकार्य पुन्हा पुंस्त्व जयाचें तयासि ओपावें ।

---

१. तो स्थूणाकर्ण. २. हा मी. ३. शिखंडिनीला स्वपुरुषत्व देऊन. ४. यक्ष कुबेराला सांगतात. ५. जे यक्ष कुबेराला पाहून सुख पावले ते. ६. अंतःकरण. ७. अध्याय १९२ श्लोक ४०-४७ पहा. ८. येथें ‘द्रुपदाच्या’ या पदाचा ‘कन्यकायशास’ या पदाशीं निकट संबंध असतांही समास केला नाहीं हें अप्रशस्त होय. हा दोषच समजला पाहिजे. असे त्रुटित अथवा छिन्न समास रघुवंशादि महाकाव्यांतही कोठें कोठें आढळतात. याचें समाधान टीकाकार वारंवार करीत असतात तें असें:—‘अत्र साक्षेपत्वेऽपि गमकत्वात्समासः’ अपेक्षा असतांही जर अर्थाला बाध येत नसेल तर अशा प्रकारचा समास करावा. येथें ‘द्रुपदकन्यकायशास’ असें एक समस्त पद पाहिजे होतें, अथवा ‘द्रुपदनृपतिकन्यकायशास न हो’ असा पाठ पाहिजे होता. ९. कुबेराचें. १०. अनेक यक्षांनीं. ११. सत्प्रभुचा कोप [हाच कोणी] अमृतनद [हा] [यद्यपि] बहु खवळलाही [तथापि] हानी न करी= सुजाण किंवा भल्या यजमानाचा राग हाच कोणी अमृताचा नद होय. तो नद किती जरी खवळला तथापि हानी करित नाहीं. येथें कोप आणि अमृतनद यांत अभेद मानिला म्हणून **रूपका**लंकार जाणावा. कुबेर फार रागावला होता तरी त्या क्रोधानें हानि झाली नाहीं, कारण सत्प्रभुचा कोप हानी करीत नाहीं. पूर्वार्धांतील विशेषविधानावरून उत्तरार्धांत सामान्य विधान सांगितलें आहे म्हणून **अर्थांतरन्यास** अलंकार झाला. सत्प्रभु=चांगला स्वामी, भला धनी. १२. शिव आहे मित्र ज्याचा असा कुबेर. १३. मूढास, स्थूणाकर्णास. १४. ज्याचें कार्य झालें तो.

म्हणउनि [1]ती गेली कीं [2]अभिलाषें ईश्वरें न कोपावें. ॥ २२८
[3]यक्ष म्हणे, 'राजसुते! जा, [4]यावज्जीव तूं असीच रहा, ।
[5]मत्स्वामीनें अथवा त्वद्दैवानेंचि तुज दिला वर हा.' ॥ २२९
कवडी दुर्लभ ज्या त्या मोत्यांची जेंवि राशि खंडीची, ।
पुंस्त्वप्राप्तिकथा हे कथिली तुज [6]नरवरा! [7]शिखंडीची. ॥ २३०
यास्तव म्हणतों आम्हीं हाणूंना [8]बायकोस [9]हातेरें, ।
करिती सर्वस्वाचें परि न यशाचें सुबुद्धि [10]मातेरें. ॥ २३१
'[11]स्त्रीतुल्य, स्त्रीनामा स्त्रीपूर्व स्त्रीस्वरूप हे तीन ।
या चौघांवरि आम्हां [12]दृढसंधाची उठेल [13]हेती न.' ॥ २३२
ऐसे **शां**तनवाचे साचे परिसोनि बोल [14]कानांहीं ।
सभ्य म्हणति, '[15]गंगासुतसम [16]गौरीसुतहि बोलका नाहीं.' ॥ २३३

---

## अध्याय चौदावा.

[17]राजा, 'वधाल **पां**डवबळ [18]कितिदिवसां' असें पुसे **भी**ष्मा, ।
**द्रो**णा कृपा [19]गुरुसुता [20]कर्णासहि [21]रिपुंचमूनदीग्रीष्मा. ॥ १

---

१. शिखंडिनी. २. 'अभिलाषें' ही निमित्तार्थी तृतीया समजावी. (जोशीकृत प्रौढबोध व्याकरण–पृ० २८७.) ३. यक्ष=यक्ष्यंते पूज्यंते इति यक्षाः । इः कामदेवस्तस्येवाक्षिणी अस्येति यक्ष इत्यन्ये. ज्यांला मनुष्यें पूजितात ते यक्ष। इ (कामदेव) त्याच्या अक्षांसारखे (नेत्रांसारखे) नेत्र ज्याचे ते यक्ष. ४. यावदायुः, आयुष्य आहे तोंपर्यंत. ५. 'मत्स्वामीनें' म्हणजे कुबेरानें हा वर दिला, असें म्हणणें एकांशीं असत्यकथन होईल म्हणून त्याची दुरुस्ती करण्यासाठींच जणूं काय 'त्वद्दैवानेंचि' असें निश्चयार्थक पद योजिलें आहे. ६. हे दुर्योधना! ७. 'मोत्यांच्या,' 'खंडीच्या' आणि 'शिखंडीच्या,' या 'सर्वसंग्रहां'तील तीन पाठांच्या ठिकाणीं 'मोत्यांची,' 'खंडीची,' आणि 'शिखंडीची,' असे पाठ पोथींत आहेत तेच येथें घेतले आहेत. ८. शिखंडीला. ९. हत्यारानें. १०. 'मातेरें करणें' हा लोकप्रवादाचा अनुकार आहे म्हणून ही **लोकोक्ति** समजावी. उत्तरार्धांत **सविरोध अर्थांतरन्यास** अलंकार झाला आहे. ११. 'व्रतमेतन्मम सदा पृथिव्यामपि विश्रुतम् । स्त्रियां स्त्रीपूर्वके चैव स्त्रीनाम्नि स्त्रीस्वरूपिणि ॥ ६६ ॥ न मुंचेयमहं बाणमिति कौरवनंदन! । न हन्यामहमेतेन कारणेन शिखंडिनम्. ॥ ६७ ॥ [अध्याय १९२] असें भीष्मवचन आहे. १२. दृढ प्रतिज्ञा ज्याची. (संधा=प्रतिज्ञा.) १३. तलवार. १४. हें ठरींव यमक आहे. पृ० ४८ टीप १७ पहा. १५. भीष्माप्रमाणें. १६. गजानन. १७. दुर्योधन. [अध्याय १९३ श्लोक १-७.] १८. मराठी प्रौढबोध व्याकरण–नियम ५३४ पहा. १९. द्रौणीला. २०. या प्रसंगाचें वर्णन बाल-

भीष्म [1]म्हणे, 'राजा ! मी मारिन पांडवबळास [2]मासानें, ।
[3]द्रोणहि असेंचि सांगे वृद्ध म्हणुनि निजबळा [4]समासानें. ॥ २
आचार्य कृप म्हणे, 'हो ! [5]व्हावे मज दोन मास या काजा.' ।
[6]गुरुसुत म्हणे, '[7]दशदिवस बहुत म्हणाया [8]परासि '[9]नाका जा.' ॥ ३
कर्ण म्हणे, 'या [10]कांमा पांच दिवस बहु, कशास दिवस दहा ? ।
[11]शिवशिष्यच्छात्रें म्यां उक्त न करितां म्हणेल शिवसद 'हा !' ॥ ४
भीष्म [12]म्हणे, '[13]रे ! उडणें विसरे [14]हरिदृष्ट [15]कृष्णसार [16]थितें, ।

---

भारतांत आहेः–'सुयोधनो योधवरानथोचे कालेन को वः कियता सकोपः । अक्षौहिणीः सप्त तपःसुतस्य जेतुं समर्थः समरातिरेकात् ॥ स्वं त्रिंशता शांतनिकुंभयोनी कृपस्तु षष्ठ्या दशभिः कृपाभूः । कर्णो दिनैः पंचभिरस्य वैरिक्षये समर्थं कथयांबभूवुः ॥ [श्रीमदमरचंद्रसूरिविरचित बालभारत–उद्योगपर्व–अ० ५ श्लो० ९८-९९ पृ० २८९.] २१. रिपुचमू हीच नदी तिला ग्रीष्माप्रमाणें नाश करणाऱ्याला. रिपुचमूरूप नदीला शुष्क करणाऱ्या ग्रीष्माला.

१. अध्याय १९३ श्लोक ८-१४ पहा. २. एक महिन्यानें, एक महिना भरून गेल्यावर. या तृतीयेचा अर्थ 'अवधि' समजावा. ३. द्रोणहि असेंचि (भीष्माप्रमाणें एक महिन्यानें) निजबळा (आपलें बळ) सांगे (दुर्योधनाला कळवी). एक महिन्यानें पांडवसैन्य मारीन असें संक्षिप्त भाषेनें द्रोणानें सांगितलें. ४. संक्षेपानें. 'असेंचि' अशा अर्थपूरक संक्षेपानें, थोडक्या शब्दांत, थोडक्यांत. आपण वृद्ध असें थोडक्यांत सांगून भीष्माप्रमाणेंच आपलें सामर्थ्य, त्याहून अधिक नाहीं असें सांगितलें. ५. हवेत, पाहिजेत. (अध्याय १९३ श्लोक १९.) ६. अश्वत्थामा. ७. परासि (शत्रूला) 'नाका (स्वर्गाला) जा' [असें] म्हणाया दश दिवस (दहा दिन) बहुत (पुष्कळ) [होत]–असा अन्वय. ८. शत्रूला. ९. स्वर्गीं. १०. पांडवसैन्यनाशाला. [अ० १९३ श्लो० २०.] ११. शिवाचा (शंकराचा) शिष्य (परशुराम) त्याचा छात्र (शिष्य) कर्ण त्यानें उक्त (बोलल्याप्रमाणें, प्रतिज्ञेप्रमाणें जें योग्य तें) न करितां (न केलें असतां) शिवसद (शिवाची सभा) 'हा !' (हाय हाय) धिक्कार असो या परशुरामशिष्याला–असें) म्हणेल. [कर्णाच्या पराक्रमाविषयीं शिवसभा साभिमान असावयाची हें साहजिक आहे. आणि त्यानें आपल्या उक्तीप्रमाणें पराक्रम करून दाखविला नाहीं तर शिवसभेला बरें कोठून वाटणार ? कर्णानें आपल्या उक्तीप्रमाणें पांच दिवसांच्या आंत पांडवसैन्यवधरूप मोठा पराक्रम केला नाहीं तर शिवसभा दुःखी होणार म्हणून तो मोठा पराक्रम–जो पराक्रम शिवशिष्यछात्राला शोभेल–करून दाखविणार–हा भावार्थ.] १२. भीष्म हंसून म्हणाला. [अध्याय १९३ श्लोक २१.] १३. रे (कर्णा !) हरिदृष्ट (सिंहानें पाहिलेला, ज्यावर सिंहाची दृष्टि पडली आहे असा) कृष्णसार (हरिण, थितें उडणें विसरे (थोडें देखील उडणें विसरतो–उडी मारून पळून जाण्याचें सर्वस्वी विसरून मरायाला आपणच सिंहापुढें जातो–असा भाव.) १४. सिंहावलोकित काळवीट.

तोंवरि उड[1] **राधेया!** जोंवरि न पहासि **कृ**[2]ष्णसारथितें.' ॥ ५
हें चा[3]रकथित वृ[4]त्त प्रातःकाळींच साधुराय कवी ।
**धर्मनृप अर्जुनास** स्वमुखें **कृष्णा**समक्ष आयकवी. ॥ ६
आपणहि म्हणे, '[5]वीरा! रिपुवधकालप्रमाण सांग मला, ।
कु[6]रुबलसिंधु सुरांसहि, दुस्तर केवळ न माणसां गमला.' ॥ ७
**अ[7]र्जुन** म्हणे, 'प्रभो! बहु थोरचि ज्यांच्या अशा प्रतिज्ञा ते, ।
परि पावति धर्मबळें न तदितरबळें यशाप्रति ज्ञाते.' ॥ ८
इतुकें वदोनि पाहुनि **मे**[8]घश्यामाननाकडे डो[9]ले, ।
'पु[10]सतां प्रमाण तरि अरि वधिन नि[11]मेषांत मी' असें बोले. ॥ ९

---

१५. कृष्णसार=काळवीट, कृष्णमृग. [कृष्णेन सारः शबलः=कृष्णशारः । कृष्णश्चासौ शारश्च=कृष्णशारः । कृष्णसार=कृष्णशार, कृष्णसारंग.] १६. थोडें.

१. उड=उड्या मारणें, उडणें=मोठ्या वल्गना करणें, प्रौढी मिरविणें, मोठमोठ्या गोष्टी सांगणें, रिकामी ऐट मिरविणें. पूर्वार्धात **दृष्टांत** आहे. उडणें हा शब्द जरी प्रकृत व अप्रकृत या दोहोंत एकच आहे, तरी अर्थ भिन्न असल्यामुळें त्यांत बिंबप्रतिबिंबभाव आहे. उडणें=(१) उडी मारणें (२) प्रौढी मिरविणें, बढ्या बाता मारणें. २. कृष्ण सारथि ज्याचा त्या अर्जुनाला. [अध्याय १९३ श्लो० २२.] ३. सेवकांनीं सांगितलेलें. ४. कोणता वीर पांडवसैन्याचा नाश किती दिवसांनीं करील इत्यादि प्रश्नोत्तरवृत्त. [अध्याय १९४ श्लो० १-७.] ५. हे अर्जुना! ६. यांत कुरुबळसिंधुतरण हें माणसांसच नव्हे तर देवांसही अशक्य आहे असें तरणार्थाचें असंभाव्यत्व वर्णिलें आहे म्हणून हा **असंभवा**लंकार जाणावा. ७. अर्जुन म्हणे (म्हणाला):—प्रभो (हे धर्मराजा!) ज्यांच्या अशा प्रतिज्ञा ते बहु थोरचि [होत]. हे धर्मराजा! ज्यांच्या पूर्वीं सांगितल्याप्रमाणें मोठमोठ्या प्रतिज्ञा झाल्या आहेत ते खरोखर थोरच होत, ते सामान्य नव्हत, त्यांच्या अंगीं तसाच मोठा पराक्रम आहे). परि (पण) ज्ञाते (शहाणे लोक, धर्म जाणणारे लोक) धर्मबळें (धर्माच्या बळानें, धर्माप्रमाणें वागण्यानें) यशाप्रति पावति (यश मिळवितात, यशस्वी होतात) तदितरबळें (धर्मेतरबळानें, अधर्माच्या जोरावर) न [यशाप्रति पावति] आम्ही धर्ममार्गानें चाललों आहों म्हणून आम्ही यशस्वी होऊं, परंतु कुरुवीर अधर्मानें चालतात म्हणून पराक्रमी असले तरी यशस्वी होणार नाहींत—असा भाव. 'यतो धर्मस्ततो जयः' असा न्यायच आहे. ८. कृष्णमुखाकडे. (मेघ+श्याम+आननाकडे=घन+श्याम, कृष्णवर्ण+मुखाकडे=मेघासारखा श्यामवर्ण जो कृष्ण त्याच्या मुखाकडे.) ९. आनंदानें डोलूं लागला. १०. आपण धर्मराज मज अर्जुनाला कुरुबलक्षयाचें प्रमाण विचारतां तर. ११. अध्याय १९४ श्लो० ८-११ पहा.

'किति कुरुबळ? भस्म करिल जग पा[1]शुपतज्ञ[2] हा निमेषांत, ।
हरि कोपतां गजांतहि शिरती, मग कां न हानि मे[3]षांत? ॥ १०
जें स्वप्रभुसीं[4] धरितें मजसीं हें तेंचि पाशुपत नातें, ।
पावेल ब्रह्मांडहि या मत्तेजेंचि आशु[5] पतनातें[6]. ॥ ११
जळतिल खळ देवा! जरि करशील कटाक्षपातही रागें, ।
किति खलबल? जोडावे भंगभयें यासि हात हीरागें[7]? ॥ १२
म्हणतो सर्वां कार्यांहूनि अतिअवश्य कार्य भी[8]म रणा, ।
भीतो अयशा, न तसा हा[9] मानिबलींद्र आर्य भी मरणा. ॥ १३

---

१. पाशुपतास्त्र जाणणारा. २. हा (मी अर्जुन) पाशुपतज्ञ (पाशुपतास्त्र जाणणारा) जग (सर्व विश्व) निमिषांत (एका निमिषांत) भस्म करिल (नष्ट करिल) [मग] कुरुबळ किति? (मग कौरवसैन्याची बिशाद काय? हरि कोपतां (सिंह रागावल्यावर) गजांतहि हानि शिरती (हत्तींची सुद्धां धुळधाण होते) मग कां न हानि मेषांत? (मग मेंढरांची हानि कां होणार नाहीं? सिंहाचे कोपानें मेंढरांची दुर्दशा होईल यांत संशय नाहीं—असा भाव). येथें 'पाशुपतज्ञ' हें साभिप्राय विशेषण आहे. जग भस्म करण्याचें सामर्थ्य पाशुपतास्त्रज्ञानामुळें प्राप्त होतें म्हणून हा **परिकर** अलंकार होय. जग भस्म करण्याचें सामर्थ्य आहे तर अल्पशा कुरुबळाचा नाश करण्याचें सामर्थ्य सहजच आहे, असा दंडपूपिकान्याय प्राप्त झाला म्हणून **काव्यार्थापत्ति** अलंकार झाला. 'मग कां न हानि मेषांत?' यांतही **काव्यार्थापत्ति** अलंकार जाणावा. [**'दंडापूपिकयार्थांतरापतनमर्थापत्तिः'** अलंकारसर्वस्व–पृ० १५६] एकंदर गीतींत **प्रतिवस्तूपमा** आहे. पूर्वार्ध व उत्तरार्ध यांतील अर्थांत उपमेयोपमानसंबंध आहे. भस्म करणें व हानि शिरणें हे दोन्ही धर्म एकार्थवाचक आहेत म्हणून **प्रतिवस्तूपमा** अलंकार झाला. 'पाशुपतज्ञ' असें अर्जुनानें म्हटलें आहे, यांत वीररस पराक्रमाच्या उत्कर्षास कारणीभूत होत आहे म्हणून हा **वीररसवत्** अलंकार होय. ३. मेंढ्यांत. ४. आपला प्रभुशंकर याशीं. ५. लवकर. ६. नाशातें, विलयातें. ७. हीर+अगें=हिरा+पर्वतानें=हीरक पर्वतानें. तुझ्या सकोप कटाक्षपाताचें सामर्थ्य इतकें प्रचंड आहे कीं त्याजपासून आपला भंग (चुराडा) होईल या भयानें त्याला हीरागानें 'माझा नाश करूं नको' असें विनविण्यासाठीं हात जोडावे. ८. भीम (भीमसेन) सर्वकार्यांत अवश्य कार्य असें रणाला म्हणतो. ९. हा मानि (मानशील) बलींद्र (बलवंतांमध्यें श्रेष्ठ असा) आर्य (पूज्य) अयशा (अपयशाला, अपकीर्तिला) जसा भितो तसा मरणा न भी (तसा मरणाला भीत नाहीं) शक्तिमान् असून जीवाची पर्वा न करणारा व शत्रूवर तुटून पडणारा योद्धा कधींही अयशस्वी होत नाहीं—असें सांगण्याचें तात्पर्य. ['न भीतो मरणादस्मि केवलं दूषितं यशः' या मृच्छकटिक नाटकांतील चारुदत्तोक्तीचें स्मरण येथें होण्याजोगें आहे.]

नुरतिल या भवदाज्ञादेवीसिंहापुढें अरातिकरी, ।
भीमाकडे परचमूमुख जैसें रविकडे न राति करी. ॥ १४

नकुलसहदेवसात्यकिधृष्टद्युम्नादि वीर हे, राया! ।
तेजस्वी रवि, यांसि न धरितिल खलघूक धीर हेराया. ॥ १५

केला शुष्क समुद्र क्षणहि न भरतां अगस्त्यपाणितळें, ।
रक्षील स्वबळानें त्यापासुनि काय जी! स्व पाणि तळें?' ॥ १६

या कृष्णसखोक्तीतें धर्मात्मा धर्म होय मानवता, ।
कीं ते पुराणमुनिता वदवी, वदवील काय मानवता? ॥ १७

सिद्ध कुरुक्षेत्रीं ते सर्वहि झाले करावया समरा, ।
राजे अन्योन्य म्हणति सफळ रणमखा करावयास 'मरा.' ॥ १८

## उपसंहार.

जनमेजयासि ऐसी वैशंपायन कथी कथा, तीतें ।

---

१. तुझी आज्ञा हीच देवी तिच्या सिंहापुढें (भीमसेनापुढें) हा **रूपक** अलंकार होय. २. शत्रुरूपहर्त्ती. ३. 'नरचमूमुख' या 'सर्वसंग्रहा'तील पाठाच्या स्थानीं 'परचमूमुख' असा पाठ पोथींत आहे तोच येथें स्वीकारला आहे. ४. रात्रि. ५. येथें **रूपक** अलंकार झाला आहे. ६. दुष्ट हेच घुबड. ७. हेराया (पाहण्यास) धीर (धैर्य) न धरतिल=यांस पाहण्याचें धैर्य होणार नाहीं. ८. त्या अगस्त्यपाणितळापासून. यांत नकुल सहदेव सात्यकी हे महायोध्यांसही पुरे पुरे करणारे आहेत, त्यांच्या पुढें कौरवांचा टिकाव कसला निघणार ही प्रकृत गोष्ट सांगावयाची असतां ती सोडून, तत्सदृश ज्यानें समुद्र एका आचमनानें आटविला त्याजपुढें तलाव कितीसें भरून राहणार ही अप्रकृत गोष्ट सांगून प्रकृत गोष्टीचें भान करविलें आहे म्हणून हा **अप्रस्तुतप्रशंसा** (अन्योक्ति) अलंकार होय. समुद्र आटविला तेथें तळें आटविणार हें सिद्धच आहे म्हणून **अर्थापत्ति** अलंकार आहे. ९. उदक. १०. सरोवर. ११. कृष्ण+सख+उक्तीतें=कृष्णाचा सखा अर्जुन त्याच्या वचनाला. अर्जुनवचनाला. 'राजाहःसखिभ्यष्टच्' [पाणिनि–५-४-९१] या सूत्रानें (कौमुदीसूत्र ७८८) 'सखि'शब्दाला 'सख' असा आदेश होतो. १२. मान्य करता झाला. १३. नरमुनित्व. १४. मनुष्यत्व. येथें **प्रश्ना**लंकार आहे. १५. रणरूप यज्ञाला. मागें पृ० २९२ टीप १ पहा. १६. 'मरा' असें परस्परांस राजे म्हणाले. १७. 'कथी कथा' हें Cognate accusative चें उदाहरण आहे. याचीं अन्य उदाहरणें:–(१) तप तपलासि [मंत्रभागवत–स्कंध ७ गी० १२], (२) तर्क तर्किले [मुक्तेश्वर–वनपर्व–अ० ७ ओंवी १७२ पाठांतर.] (३) गीत गाईलें, (४) खाऊ खातो. असे प्रयोग इंग्रजींत बरेच आहेत. He ran a race, He fought a fight.

गाय मयूर[1] रसिककविकिंकर चित्तें असत्पथातीतें[2]. ॥ १
स्ववरविरचित[3] गुरुवरें हें 'भारत'[4] लिहविलें मयूरकरें ।
मुनिरचित मयूरेश्वरदेवकरें द्वापरांत जेंवि हरें. ॥ २

---

१. मोरोपंत. येथें पंतांनीं स्वतःला 'रसिक कविकिंकर' असें म्हटलें आहे. या विशेषणांत पुष्कळ अर्थ आहे. सहृदय पंडितांचा सेवक म्हणवून घेऊन पंतांनीं आपली निरभिमानिता व नम्रशीलता व्यक्त करून आपलें मार्मिकत्व सूचित केलें आहे. २. असत्+पथ+अतीत=वाईट+मार्ग+सोडलेलें=वाईट मार्गापासून दूर गेलेलें, सत्पथगामी, सन्मार्गपरायण अशा (चित्तें). ३. जेंवि द्वापरांत हरें मुनिरचित [भारत] मयूरेश्वरदेवकरें [तेंवि] गुरुवरें हें स्ववरविरचित भारत मयूरकरें लिहविलें—असा अन्वय. ज्याप्रमाणें द्वापरयुगांत हरें (ईश्वरानें—भगवंतानें) मुनिरचित (व्यास मुनीनें रचिलेलें) भारत (महाभारत नामक महापुराण, व्यासप्रणीत महाभारत) मयूरेश्वरदेवकरें (गजाननाच्या हातानें) [लिहविलें] त्याप्रमाणें गुरुवरें (गुरुवर्यानें—गुरुश्रेष्ठानें, श्रीगुरुनें) हें स्ववरविरचित (आपल्या वरप्रसादानें रचिलेलें, गुरुच्या वरप्रसादानें मोरोपंताकडून रचिलेलें) भारत (गीतिवृत्तात्मक भारत) मयूरकरें (मोरोपंताच्या हातानें) लिहविलें आहे. व्यास आणि गजानन या दोघांकडून महाभारतरचना आणि महाभारतलेखन झालें. हीं दोन्हीं कामें एकट्या पंतांनीं केलीं म्हणून त्या दोघांपेक्षां पंतांस श्रेष्ठ म्हटलें पाहिजे. ही कार्यसिद्धि गुरुकृपेनें झाली अतएव ईश्वरा(हरा)पेक्षां गुरु श्रेष्ठ म्हटला पाहिजे—असें या गीतींत सूचविलें आहे. या गीतींत उपमालंकार आहे. या गीतींत पंतांनीं उपमालंकारद्वारें व्यासाशीं आपली तुलना केली आहे. हें भारत मीं रचिलें असें नम्रत्व दाखविलें. पुनः नामैक्यानें आपलें व गजाननाचें साम्य दर्शविलें. गजाननसाम्यानें अनिष्टनाशनही सूचविलें. गजाननाचा लेख निर्दोष असावयाचाच कारण तो विद्यानाथ म्हणून त्याची उपमा घेऊन आपल्या काव्याचें निर्दोषत्व सूचविलें. ४. 'भाति सर्वेषु वेदेषु रतिः सर्वेषु जंतुषु । तरणं सर्वतीर्थानां तेन भारतमुच्यते ॥.' असें महाभारताचें महत्त्व वर्णिलें आहे. या ग्रंथास 'महाभारत' अशी संज्ञा पडण्याचें कारण दर्शविलें आहे तें असें:—'चत्वारश्चैकतो वेदा भारतं चैतदेकतः । पुरा किल सुरैः सर्वैः समस्य तुलया धृतम् ॥ चतुर्भ्यः सरहस्येभ्यो वेदेभ्योऽप्यधिकं यदा । तदा प्रभृति लोकेऽस्मिन्महाभारतमुच्यते ॥.' पूर्वीं सर्व देवांनीं मिळून महाभारत आणि वेदचतुष्टय याचें वजन केलें, तेव्हां वेदांपेक्षां भारत वजनानें ज्यास्त भरलें, तेव्हांपासून महाभारत हें नाम सुप्रसिद्ध झालें. ५. रा० रा० गणेश बळवंत जोशी, बी. ए. एल्. एल्. बी; वकील (कोल्हापूर) यांनीं पाठविलेल्या हस्तलिखित प्रतींत लक्ष्मीपूजक दाजी नामक कोणा लेखकाचीं पुढें लिहिलेलीं पद्यें आढळतात. हा लेखक कदाचित् कोल्हापुरच्या महालक्ष्मीदेवीचा पुजारी (पूजक) असावा. ही पोथी केव्हां लिहिलेली आहे हें जरी लिहिलेलें नाहीं तरी ती सुमारें ७५।८० वर्षांची जुनी असावी असें

तिच्या जीर्णत्वावरून दिसून येतें. या पद्यांवरून त्या काळीं पंताच्या कृतीविषयीं केवढी पूज्यबुद्धि जागृत होती हें दिसून येतें:—

सुकविवर्य मयूरेश्वरविरचित 'उद्योगपर्व' आर्यांहीं ।
श्र्यर्चक[1] दाजिमुनीश्वर लिहि, वाचावें म्हणूनि आर्यांहीं. ॥ १
हें फार सार भारतपर्वांत अपूर्व पर्व उद्योग ।
म्हणवुनि लिहिलें स्वकरें, निकरें सोडूनि सर्व उद्योग. ॥ २
'उद्योग' नाम सर्वा पर्वांमाजी अपूर्व हें पर्व, ।
आल्हादक रसिकांला जेंवि उदधिलागिं होय विधुपर्व[2]. ॥ ३

* * * *

कविता मयूरकविची, तीस मना! सुरभि मान, वाचा वी[3], ।
तीच सतत, निरसाया कविहीं निजदुरभिमान वाचावी. ॥ १
म्यां श्रीमयूरकविपरि न परिसिला सकल कवि महीवरता[4], ।
साजे ना कां तैशा त्या कविला सकलकविमहीवरता[5]? ॥ २
श्रीमन्मयूरकविच्या होय जसें सुख रसिक जनां कवनीं, ।
विबुधेश्वरासहि[6] तसें ऐकूनि न निनद पिकज[7] नाकवनीं[8]. ॥ ३

या पोथीच्या शेवटीं असा अंतिम लेख आहे:—'इति श्रीमदार्याविरचिते भारते पर्वप्रवरमुद्योगाख्यमिदमार्यवर्याभिवंदिते श्रीरामचरणकमलयुगले समर्पितमस्तु.' 'उद्योग' नाम सर्वा पर्वांमाजी अपूर्व हें पर्व' हें लक्ष्मीपूजक दाजीचें म्हणणें बहुतांशीं खरें दिसतें, कारण या पर्वावर मराठी टीका अनेक कवींनीं केली आहे. चार कवींनीं केलेलीं निरनिराळीं चार उद्योगपर्वें आमच्या संग्रहीं आहेत:—(१) गोपाळकविकृत—अध्याय २१ ग्रंथसंख्या ३३५०, (२) चंद्रात्मजकृत—अध्याय १७ ग्रंथसंख्या १७५०, (३) सुभानंतस्वामीकृत—अध्याय ५२ ग्रंथसंख्या ६४००, (४) नरहरीकृत—अध्याय २५ ग्रंथसंख्या ३५००. शिवाय आणखी एक ओंवीबद्ध उद्योगपर्व—ग्रंथसंख्या ७००० मिळण्याचा संभव आहे. प्रयत्न चालू आहे. एकंदरींत उद्योगपर्व फार अपूर्व व लोकप्रिय दिसतें.

---

१. श्री+अर्चक=लक्ष्मी+पूजक=महालक्ष्मीचा पुजारी. २. पौर्णिमा. ३. वाचा कविता वी (प्रसवे). ४. पृथ्वीवर. ५. सर्वकविराजता, सकल कविजनांचें भूपत्व. ६. इंद्राला. ७. कोकिळांचें गान. ८. नंदनवनांत.

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ. | ओळ. | शुद्ध. | पृष्ठ | ओळ. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|---|
| ३ | १ | रविला ?’ | ८५ | ९ | जाईं न |
| ५ | ३ | सांगावें ? | ८७ | ,, | आठ वण |
| ,, | ५ | गड्यांनीं ? | ८८ | १ | या |
| १६ | ७ | वाखाणा | ,, | ४ | दुर्योधन |
| १७ | ५ | ‘या जो, | ८९ | १४ | पांचां |
| २१ | १ | जरि काय | ९१ | ७ | आम्हां |
| ,, | ६ | कैवी | ९३ | १ | भुजांप्रति |
| ३१ | ४ | पितृधर्नविभागी | ९५ | ,, | दावुनि |
| ,, | ५ | होइल | ९६ | ६ | सिही |
| ३४ | ४ | जरि | ९७ | ४ | त्यांसि |
| ३९ | ६ | रैणन्मणिनूपुरयौवर्त | १०० | ९ | वार्धी |
| ,, | ७ | राज्यश्रीमदिरेच्या | १०१ | १० | दावुनि |
| ४४ | ५ | वरायचेंचि, न | ,, | ११ | पर परमेश्वर |
| ५२ | ३ | च्छेदी | १०६ | ४ | होती |
| ,, | ९ | मंदेशा | १०८ | ८ | महिविरवीरेंद्रपांडुची |
| ५३ | १ | याची | ११० | ५ | लाजविले |
| ५७ | ४ | भीमाब्धि | ११४ | ६ | सर्वविदुर्ग |
| ५८ | ६ | पांडव | १२३ | ६ | या |
| ५९ | १ | नव्यसाचि, | १२५ | ३ | कोणी |
| ६१ | ७ | रणा | १२९ | २ | होउनि |
| ६२ | २ | बारा | १३१ | ११ | आर्यका |
| ,, | ३ | ती | १३३ | ४ | शिकवि |
| ६५ | १२ | गुरुगुरुनी | ,, | ७ | शरणागतसर्वसत्व |
| ६७ | ५ | चारदिवस | १३४ | ६ | आज्ञा |
| ७० | १० | तो | १४५ | ७ | [illegible]र, उगा |
| ७२ | १ | बेत ! | १५३ | ४ | कोणीहि |
| ७७ | ४ | अलंध्य, असे हा. | १५९ | [illegible] | तीची |
| ८२ | ४ | द्या, ना तरि तुमचे | ,, | ७ | न भुज |
| ८४ | १० | जे हेचि | १६० | ३ | आपणाला, |
| ८५ | २ | दीप्तालयसमदुर्जनसंगांतुनि | ,, | ४ | या |
|  |  |  | १६४ | ६ | पतिजेवळी |

| पृष्ठ. | ओळ. | शुद्ध. | पृष्ठ. | ओळ. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|---|
| १६५ | ३ | उपरमलों | २५७ | १ | रांगत्यातें |
| ,, | ,, | कथितां | ,, | ६ | हरिजनांची |
| १६६ | २ | वा! | २५९ | ५ | स्ववेग |
| १६७ | १ | 'मी | ,, | ८ | द्रौणि |
| ,, | ४ | पांडवांचा | ,, | ९ | महारथ |
| ,, | ६ | प्राणांतें | २६३ | ७ | उपाय, |
| १७० | ५ | दहनांत | २६४ | ५ | जोडुनि, |
| ,, | १० | मी, परा | २६५ | ८ | म्हणुनि |
| ,, | १२ | मी करींना | २६७ | १ | सद्रसना |
| १८१ | ७ | लोष्ठंसा | २६८ | ७ | सर्वा रथांहुनी |
| १८४ | ३ | कीर्तिरसें | २७३ | २ | ज्याच्या |
| १८७ | ३ | असते क्षम, | ,, | ७ | स्वभावातें |
| ,, | ४ | व्यसनगर्तलीनांहीं | २८३ | १ | तों |
| १८९ | २ | कृत्या भासे त्या, | २८८ | ११ | मोतें, तें |
| १९० | १ | पीती | २८९ | ६ | बहु तरले |
| १९१ | ६ | गुर्वनादर, | २९० | ,, | शिष्य |
| १९८ | १ | पुरविजेल; | २९३ | १ | बाणांहीं |
| ,, | ,, | इतरें, | २९७ | ३ | तें, |
| १९९ | ८ | शुभ्रसहस्रस्तंभप्रासादीं | २९९ | २ | बळ |
| २०९ | २ | तसे बंधु, सत्य | ,, | ८ | दिव्यास्त्रप्रयोग, तच्छमना |
| ,, | ८ | कुंतीवचोवसानीं | ,, | ९ | झालों, |
| २१७ | १ | कथिली, | ,, | ११ | म्यां |
| २३९ | ,, | हरिचरणीं, | ३०३ | ५ | म्यां |
| २४१ | ७ | कृप, सुरासुर | ३०५ | ९ | राजा! |
| २५४ | २ | लोकीं, तुझिया | ३०६ | ८ | रुचिकें |
| ,, | ४ | त्यजूनि | ३१० | ८ | दीपदीप्ति |
| २५६ | २ | पावे न अंघ्र्याश्रित, | ३२० | १३ | सरें |